# स्वामी विवेकानंद

यांचे

# समग्र ग्रंथ.




चतुर्थ खंड.

१९२५

Printed and published by M. N. Kulkarni
at the Karnatak Press, 318 A
Thakurdwar Bombay

जे ज्ञानामृताची जान्हवी।
जे आनंदचंद्रींची सतरावी।
विचारक्षीरार्णवींची नवी।
लक्ष्मी जे॥
साचचि बोलाचें नव्हे हें शास्त्र।
पैं संसार जिणतें शस्त्र।
आत्मा अवतरविते मंत्र।
अक्षरें इयें॥

—श्री ज्ञानेश्वर.

# ‘ क्षमस्व ।’

तृतीय खंड प्रसिद्ध होऊन आज दोन वर्षें झालीं. इतक्या अवधीनंतर तरी आमच्या प्रिय वाचकांच्या भेटीचा योग आला याबद्दल आम्हांस आनंद होत आहे. आम्हांकडून झालेल्या दिरंगाईबद्दल वाचकवर्ग आम्हांवर रुष्ट झाला असेल व तसें असेल तर ‘ क्षमस्व ’ म्हणून म्हणण्यावांचून आम्हांस आमच्या तर्फे कांहीं सांगावयाचें नाहीं. आमच्या मार्गांत अनेक प्रकारच्या आपत्ती आडव्या पडल्या ही गोष्ट खरी, तथापि सर्व प्रकारच्या अडचणीही पूर्वकर्मानुसार प्राप्त होत असल्यामुळें त्यांजबद्दल वाचकवर्गाकडे गाऱ्हाणें न सांगता त्याची क्षमा मागणेंच उचित आहे. “ ही माला बंद पडली कीं काय ? ” अशी पृच्छा अनेक वाचकांकडून वेळोवेळां झाली आहे. “ माला बंद न करतां वाटेल त्या अडचणी सोसून ती पुढें चालू ठेवावी ” अशींही आग्रहाचीं पत्रें अनेकांकडून आम्हास आलीं. वाचकवर्गाचें जें आम्हावर प्रेम आहे त्याचेंच हें निदर्शक आहे, असें आम्ही समजतों, आणि त्यांस असें आश्वासन देतों कीं कितीही अडचणी आल्या तरी ही माला पुरी करण्याचा यत्न आम्ही सोडणार नाहीं.

प्रस्तुतखंड लवकर प्रसिद्ध करू असें आगाऊ आश्वासन आम्हीं तिसऱ्या खंडाच्या वेळीं दिलें होतें. परंतु तें आश्वासन आमच्याकडून पुरें झालें नाहीं याबद्दल दिलगिरी वाटते. पांचवा खंड होतां होईल तों लवकर प्रसिद्ध करावा असा आमचा मनोदय आहे, तो सफल करण्यास परमेश्वर साहाय्यभूत होवो !

आमच्या प्रत्येक आश्रयदात्यानें एक एक नवीन वर्गणीदार या ग्रंथमालेस मिळवून द्यावा, अशी त्यास विनती करून व त्यांच्या भेटीचा योग पुन्हां लवकर यावा, अशी परमेश्वराची प्रार्थना करून वाचकांची तूर्त रजा घेतों.

मुंबई,<br>ता० २५ नोव्हेंबर १९१५.

प्रकाशक.

# द्वितीयावृत्तीची प्रस्तावना.



पूर्वीच्या खडांप्रमाणें या खंडाची ही द्वितीयावृत्ति निघत आहे. मागच्या आवृत्तींत व हींत चुकांच्या दुरुस्तीशिवाय विशेष काहीं फरक नाहीं. मराठी वाचकवर्ग पूर्वीच्या आवृत्तीमाणें या आवृत्तीलाही आश्रय देऊन लवकरच तिसरी आवृत्ति काढण्याचा सुयोग आणून देईल अशी आशा आहे

—प्रकाशक

# अनुक्रमणिका.

—— . ० . ——

| | पृष्ठ. |
|---|---|
| कोलंबो-आल्मोरा व्याख्यानमाला | |
| कोलंबो येथील मानपत्र व त्यास उत्तर . | १ |
| जाफना येथील मानपत्र . . | १८ |
| वेदान्त (जाफना येथील व्याख्यान). | २० |
| पांबन येथील मानपत्र व त्यास उत्तर . | ४५ |
| रामेश्वर येथील व्याख्यान . . | ५० |
| रामनद येथील मानपत्र व उत्तर . | ५३ |
| परमकुडी येथील व्याख्यान | ६८ |
| शिवगंगा आणि मनमदूरा येथील मानपत्र | ७८ |
| मदूरा येथील मानपत्र व उत्तर | ८४ |
| कुंभकोणम् येथील मानपत्र आणि व्याख्यान | ९४ |
| मद्रास येथील मानपत्र . . . . | १२६ |
| भावी कार्यांची रूपरेषा . . . . | १३५ |
| ईश्वराचे अवतार . . . . | १६९ |
| भगवान् बुद्ध . . . . . . . | १९२ |
| भगवान् येशू ख्रिस्त . . . | १९५ |
| माझे सद्गुरु . . . . | २१८ |
| गीतेसंबंधानें कांहीं विचार . . . | २६१ |
| भक्ति . . . . . . . | २७० |
| जडभरताख्यान . . . . | २८१ |
| प्रल्हादाख्यान . . . . . | २८६ |
| खासगी पत्रें . . . . . . . . . | २९१ |



# स्वामी विवेकानंद यांचे समग्र ग्रंथ.

## चतुर्थ खंड.

## कोलंबो–आलमोरा व्याख्यानमाला.

[ पाश्चात्य देशांतील आपली कामगिरी संपवून स्वामी विवेकानंद स्वदेशीं परत आले ते प्रथम ता. १५ जानेवारी १८९७ रोजीं कोलंबो येथें उतरले त्या ठिकाणच्या हिंदु रहिवाशांनी स्वामींचें स्वागत मोठ्या थाटानें करून त्यांस खालील मानपत्र अर्पण केलें. ]

परमपूज्य स्वामीमहाराज,

कोलंबो येथील हिंदु रहिवाशांच्या जाहीर सभेंत ठरल्याप्रमाणें आम्ही आपलें मनःपूर्वक स्वागत करतों पाश्चात्य देशांतील आपली अत्यंत महत्वाची कामगिरी संपवून आपण स्वदेशीं परत आला असतां आपलें स्वागत करण्याचा मान आम्हांस प्रथम मिळाला, याचा आम्हांस मोठा अभिमान वाटतो

परमेश्वराच्या कृपेनें आपली कामगिरी यशस्वी झाली, याबद्दल आम्हांस आनंद आणि कृतज्ञता वाटत आहे. हिंदूंच्या विश्वव्यापी धर्मतत्वांची ओळख आपण पाश्चात्यांस करून दिली; सर्व धर्मांची एकवाक्यता हिंदुधर्म कशी करतो हें आपण दाखविलें, आणि स्वतःच्या गरजेप्रमाणें स्वतंत्र असा धर्ममार्ग आक्रमण करून मुक्त होण्यास हिंदु धर्मानें प्रत्येक जीवात्म्याला सवड कशी ठेविली आहे हेंहि आपण उच्च घोषानें कथन केलें अत्यंत पुरातन कालापासून अनेक महात्म्यानीं शोधून ठेवलेलीं धर्मतत्वें आणि त्यांचा प्रत्यक्ष आचार याची ओळख आपण जगाला करून दिली याच महात्म्यांच्या पदरजांनीं आमची आर्यभूमि पवित्र झाली आहे अनेक शतकांच्या परिभ्रमणांत आर्यभूमि हेलकावे

खात असतांही तिचा ज्ञानदीप उज्ज्वल राहिला, याचें कारणही या पुण्यपुरुषांचा आशीर्वाद हेंच.

अशा प्रकारच्या विभूतींपैकी श्रीरामकृष्ण परमहंस देव हेही एक होत. त्याच्या प्रसादानें आणि आपल्या निःस्वार्थपूर्ण उत्साहामुळें जो अलभ्य लाभ पाश्चात्य राष्ट्रांस मिळाला आहे, त्याबद्दल त्यांनीं आपलें ऋणी असलें पाहिजे. आर्यभूमीच्या धर्मज्ञानाची ओळख, आपणाशिवाय त्यास झाली नसती. त्याचप्रमाणें पाश्चात्य संस्कृतीच्या लखलखाटानें अंध झालेल्या आमच्यातील कित्येकांस आम्हांपाशीं असलेल्या वडिलार्जित ठेव्याची किंमतही आपणामुळेंच पूर्णपणें समजली.

आपण जी पुण्यप्रद कामगिरी बजावली आहे, तिजमुळें आपण सर्व मनुष्यजातीवर महदुपकार करून ठेवले आहेत. या उपकाराची फेड तिला करता येणार नाहीं. तसेंच आपल्या या मातृभूमींतही आपण नवीन दीप प्रज्वलित करून ठेवला आहे आपणावर परमेश्वराची कृपा सदोदित असावी, आणि आपल्या कार्यास त्यानें यश द्यावें, इतकीच त्याजपाशी आमची प्रार्थना आहे.

हिंदु रहिवाशातर्फे,

पी. कुमारस्वामी,

कोलंबो येथील कायदेकौन्सिलचे सभासद

आणि जाहीर हिंदु सभेचे अध्यक्ष.

ए. कुलवीरसिंहम्,

सेक्रेटरी.

या मानपत्रास स्वामींनीं थोडक्यांत उत्तर दिलें, आणि आपणास दिलेल्या सन्मानाबद्दल त्यांनीं लोकांचे आभार मानले. ते म्हणाले " आजचें हें मानपत्र एखाद्या सेनानीला, मोठ्या मुत्सद्द्याला, अथवा एखाद्या लक्ष्मीपुत्राला दिलें जात नसून, ते एका अकिंचन सन्याशाला दिलें जात आहे, ही गोष्ट विशेषेंकरून लक्ष्यात ठेवण्यासारखी आहे. यावरून हिंदु लोकाची मनःप्रवृत्ति धर्माकडे कशी आहे या गोष्टीची साक्ष पटते हिंदु राष्ट्राचा तारकमंत्र धर्म हाच आहे. आपणास राष्ट्र म्हणून जगावयाचे असेल, तर आपल्या सर्व प्रकारच्या चळवळीच्या मुळाशीं धर्म पाहिजे. आपण जो मान आज मला

दिला आहे, तो एका व्यक्तीला दिला आहे असें मी समजत नसून, तो मान आपण धर्मतत्त्वाला दिला असें मी समजतों. ”

* * *

ता. १६ जानेवारी रोजीं फ्लोरल हॉल नावाच्या ठिकाणीं त्यांचें जाहीर व्याख्यान झालें.—

“ पाश्चात्य देशांत जो कांहीं कामगिरी माझ्या हातून झाली, ती केवळ माझ्या स्वत:च्याच सामर्थ्यानें झाली नसून, मला जें प्रोत्साहन आणि जो आशीर्वाद माझ्या पवित्र आणि प्रिय मातृभूमीकडून मिळाला, त्यामुळेंच ही कामगिरी माझ्या हातून पार पडली. माझ्या पर्यटनानें, पाश्चात्य लोकांचाही कांहीं फायदा झाला असेल ही गोष्ट खरी; तथापि मला स्वत:लाही फार मोठा लाभ झाला आहे यात संशय नाहीं. माझी मातृभूमि ही पुण्यभूमि आहे असें मला नित्य वाटत असे. केवळ जन्मभूमीच्या प्रेमामुळेंच मला प्रथम असें वाटत असेल, पण या पर्यटनानंतर या गोष्टीबद्दल माझी पक्की खात्री झाली. यासंबधी माझी खात्री इतकी पक्की झाली आहे कीं, ज्या कोणास या गोष्टीबद्दल संशय असेल, त्याची संशयनिवृत्ति करण्याची माझी तयारी आहे हिंदुस्थान ही पुण्यभूमि आहे असें हिंदुमात्रास वाटत असते, आणि मलाहि तसेच वाटे, यांत नवल काय ? पण त्या वेळीं या माझ्या ‘ वाटण्याला ’ कांहीं महत्त्वाचा आधार नव्हता. आज प्रत्यक्ष अनुभव घेतल्यानतर मी आपणासमोर उभा राहून बिनदिक्कत आणि प्रतिज्ञापूर्वक म्हणतो कीं, हिंदुस्थान ही पूण्यभूमि आहे. पुण्यभूमि या नांवास पात्र अशी एखादी भूमि या जगतीतलावर असेल तर ती हिंदुस्थान हीच होय. आपापल्या कर्मांची पूर्तता करण्यास–आपल्या कर्मांचे हिशेब पुरे करण्यास, या जगांतील सर्व जीवात्म्यांनीं या भूमीकडेच धाव घेतली पाहिजे. परमेश्वराकडे जाण्यास निघालेल्या प्रत्येक जीवात्म्याची अखेरची कर्मभूमि हीच. या भूमींत जन्म घेण्यानेच त्याला मुक्तिलाभ मिळेल. जगांतील अत्यत मोठे सौजन्य, औदार्य, पावित्र्य आणि शांति याची अत्युच्च दशा या भूमीवांचून दुसऱ्या कोठेंही सापडणार नाहीं. अतर्मुखता आणि धर्म याचा वास जगांत जर कोठें असेल तर तो याच भूमींत आहे. अध्यात्मविद्येच्या जिवत झऱ्यातील ज्ञानजलाचा वर्षाव इतर देशांत करणारे मेघ येथूनच बाहेर पडले. पूर्व, पश्चिम, दक्षिण आणि उत्तर या चारी दिशाकडे अध्यात्म-

विद्यासागराच्या भरतीनें लाट पोंहोंचवून चार्वाकवादी राष्ट्रांच्या संस्कृतीचा ओघ धार्मिक संस्कृतीकडे वळविण्याचें कार्य हेंच राष्ट्र आजपर्यंत करीत आलें आहे, आणि चालू मन्वतरातही याच राष्ट्रानें ही कामगिरी बजाविली पाहिजे धडाडून पेटलेल्या भोगाग्नीच्या तृष्णेनें इतर देशांतील ज्या लक्षावधि लोकांचे कठ करपूं पाहत आहेत, त्यास शातिजलाचा साठा याच भूमींतून मिळेल. मित्रांनो, माझें हें भाकित खरें होईल याबद्दल आपण खात्री बाळगा.

माझ्या अवलोकनात जें काही आलें आहे, त्यावरून हें घडून येईल याबद्दल मला शका वाटत नाहीं; पण मानवकुलांच्या इतिहासाचा अभ्यास आपणापैकी ज्या कोणीं केला असेल, त्यांचीही या भविष्याबद्दल खात्री असेल. आपल्या मातृभूमीनें जगावर आजपर्यंत अनेक उपकार करून ठेविले आहेत. या जगांतील साऱ्या मानवकुलांचा इतिहास पाहिला तर शात आणि सात्विक हिंदुकुलानें जगाचें हित सर्वाहून अधिक केलें असल्याचें आढळून येईल हिंदुकुलाचें सौजन्य हें कित्येक वेळां त्याच्या उपहासाचा विषय होऊन बसलें आहे. त्याच्या सौजन्यावर दुबळेपणाचा आरोप अनेक वेळां लादला गेला आहे. पण या 'दुबळेपणा' बद्दल आमची कोणी कितीही थट्टा केली तरी ईश्वराच्या सदैव प्रेमाला पात्र असे हेंच एक कुल आहे. जगाच्या इतर भागांत पूर्वकाळीं अनेक संस्कृत राष्ट्रें होऊन गेलीं. पूर्वकाळीं आणि साप्रतही मोठ्या आणि बलवान् राष्ट्रातून विशाल कल्पना उद्भूत झाल्या आहेत व होत आहेत पूर्वकाळीं आणि सध्याही एका राष्ट्रांतून विशाल कल्पनांचा प्रवाह दुसऱ्या राष्ट्राकडे वाहत गेला आहे आणि जात आहे; पूर्वकाळीं आणि साप्रतही सत्य-प्रमेयांचें बीजारोपण एखाद्या राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्रात केलें आहे या सर्व गोष्टी खऱ्या आहेत; पण आपण हें पक्के लक्ष्यांत ठेवा कीं, हे कार्य रणदुदुभीच्या गर्जनेंत आणि रणतुताऱ्यांच्या कर्कश नादांत घडून आलें आहे ! प्रत्येक प्रमेय जणूकाय मनुष्याच्या रक्तांत भिजवून पेरलें गेलें आहे ! लक्षावधि लोकांच्या रक्ताची नदी वाहत असता त्यांतून हीं प्रमेयें चालत गेलीं आहेत ! एखादी नवी कल्पना पेरली गेली कीं, तिजबरोबर लक्षावधि लोकांचा रुदनस्वर उठला आहे; लक्षावधि पोरक्या पोरानीं टाहो फोडिला आहे; आणि लक्षावधि बांगडी फुटून विधवांच्या आक्रोशानें आकाश भरून गेलें आहे, असेच आपणास आढळून येईल सर्व राष्ट्रांच्या संस्कृतीचा इति-

ह्रास चालून पाहिला तर सर्वत्र हाच प्रकार आपणास आढळून येईल. सर्वत्र अशी स्थिति असतांही आर्यभूमि मात्र शांततेनें नांदत आहे ! ग्रीस राष्ट्राला अस्तित्वही नव्हते, अशा वेळीं आर्यभूमि कार्यरत होती. ज्या वेळी रोमन राष्ट्र कल्पनेच्याही हद्दींत आलें नव्हते, त्या वेळीं आर्यभूमि आपलें कार्य करीत होती ! ज्यावेळीं साम्प्रतच्या युरोपियांचे बापदादे अंगाला रंग लावून रानावनात भटकत होते, त्या वेळी आर्यभूमि सत्य प्रमेयाच्या उद्घाटनांत गढून गेली होती ! इतिहास कशाशी खातात याची कल्पनाही कोणाला नव्हती अशा वेळी, आणि ज्या जुन्या काळाच्या अंधाऱ्या गुहेत इतिहास डोकावूनही पाहू शकत नाहीं, त्या वेळींही आर्यभूमीचें मानवसंस्कृतीचें कार्य चालूच होतें. त्या कालापासून तों तहत चालू क्षणापर्यंत तिचें हे कार्य अव्याहत चालू आहे. त्या कालापासून चालू क्षणापर्यंत अनेक विशाल प्रमेयें तिच्यातून बाहेर पडून जगभर पसरत आहेत, आणि प्रत्येक प्रमेयाबरोबर आशीर्वाद आणि शांतता हींही जात आहेत. आमच्या राष्ट्रानें जगद्विजयाचें कार्य केलें नाहीं किंवा तरवारीच्या धारेनें दुसऱ्या एखाद्याही राष्ट्रास त्याने जिंकलें नाहीं आमच्या राष्ट्रानें सर्वांना ' चिर जीव ' असा आशीर्वाद मात्र दिला आहे. आम्ही आजपर्यंत जीव धरून आहो याचे कारण हेच. ग्रीक लोकाच्या चतुरंग सैन्याची चाहूल लागतांच सर्व जग थरारू लागे असाही एक काळ येऊन गेला, पण त्याच ग्रीक लोकांचें काय झालें, याची वार्ताही सांगण्याला आज कोणी उरला नाहीं ! या जगात ताबा मिळविण्यासारखी जी जी वस्तु होती, ती प्रत्येक वस्तु रोमन राष्ट्राच्या गरुड चिन्हांकित निशाणाखाली गेली होती, या जगांतील अखिल मानवजातीच्या मानेवर रोमन लोकांचें जू एके काळीं बसलें होते आणि 'रोम' या अक्षरांच्या उच्चारानेंच सर्व जग कांपत होतें. ज्या क्यापिटोल नावाच्या टेंकडीवर शेंकडों रोमन वीराचे पुतळे त्यांच्या अतुल शार्याची आणि जगज्जेतृत्वाची साक्ष पटवीत होते, ज्या टेकडीवर शेंकडों देवमंदिरें होतीं आणि ज्या ठिकाणचें वैभव रोमन राष्ट्राच्या महत्त्वाची साक्ष पटवीत होतें, तेंच ठिकाण कालवशात् आज नुसत्या दगडमातीचें निवासस्थान होऊन राहिलें आहे. ज्या ठिकाणीं सीझराचा राजदंड एके काळीं होता, त्याच ठिकाणीं कोळी आपलीं राज्यें आज बिनधोकपणें स्थापित आहेत ! रोम आणि ग्रीस यांच्याप्रमाणेंच आणखीही कित्येक राष्ट्रें उदयास येऊन अस्तगत झालीं. पाण्यावरील लाटा नाहींशा

झाल्यावर, ज्याप्रमाणें त्यांच्या अस्तित्वाचें कांहींच चिन्ह मागें उरत नाहीं, त्याचप्रमाणें या राष्ट्रांच्या अस्तित्वाचें चिन्ह आज मागे राहिलेलें नाहीं. मनुष्यजातीच्या इतिहासांत या राष्ट्रांच्या नामनिर्देशापलीकडे अधिक महत्त्वाची बाब सांपडावयाची नाहीं जगभर अशा प्रकारची धुमश्चक्री चालू असतां आम्ही अद्यापि जीव धरून राहिलों आहों, एवढेंच नव्हे तर आम्ही या पूर्वस्थितीचा त्यागही केलेला नाही. मनु जर आज आमच्या भूमींत पुन्हां अवतरला तर आपण परक्या स्थळीं आलों आहों, असें त्यास कधींही वाटणार नाहीं. पूर्वकाळचे कायदे आजही अस्तित्वांत असल्याचें त्याला आढळून येईल. हजारो वर्षांच्या अनुभवाने त्या कायद्यांस स्थैर्य प्राप्त झाल्याचें त्यास दिसेल. हजारों वर्षांच्या अनुभवानें तावूनसुलाखून पक्क्या बनलेल्या चालीरीती कालस्थलातीत कायद्याप्रमाणे अचल असल्याचें त्याच्या अनुभवाला येईल. आज हजारों वर्षें कालाचे हजारों प्रचंड तडाखे आमच्या चालीरीती खात आल्या आहेत, पण या तडाख्यांचा परिणाम इतकाच झाला कीं त्या अधिक बळकट आणि अधिक चिवट मात्र झाल्या आहेत. या आमच्या एकदर स्थितीचें मूळ कारण जी अत करणाची शुद्ध स्थिति ती आम्हांपाशीं आजही आहे. बाह्य देशांतून फिरून आल्यानतर जो कांहीं प्रत्यक्ष अनुभव मला आला त्याला स्मरूनच मी हें बोलत आहें, हें आपण ध्यानात ठेवा धर्मासंबधी इतर देश बहुतांशीं उदासीन आहेत. रोजच्या जीवनक्रमांत ज्या अनेक गोष्टी कराव्या लागतात, त्यांपैकींच धर्म ही एक बाब आहे असें तेथील लोकांस वाटतें. त्याच्या दृष्टीनें धर्माची किंमत याहून अधिक नाहीं. ज्याप्रमाणें कांहीं राजकारणाच्या गोष्टी अथवा सामाजिक गोष्टी आपण करतों, अथवा ज्याप्रमाणें द्रव्यद्वारा प्राप्त होणाऱ्या अनेक वस्तूंचा उपभोग आपण घेतों, अथवा ज्याप्रमाणें अनेक प्रकारचीं इंद्रियजन्य सुखें आपण भोगतों, त्याचप्रमाणें इतक्या गोष्टी करीत असता धर्माच्या एखाद्या बाबीकडे सवडीनुसार एखाद्या प्रसंगीं थोडें बहुत लक्ष्य घालण्यास हरकत नाहीं, असा तिकडील लोकाचा समज आहे. त्यांच्या चळवळी अनेक प्रकारच्या दिसल्या तरी त्यांचें पर्यवसान मुख्यतः इंद्रियप्रवृत्ति वाढविण्याकडे असावयाचें. पण आम्हा लोकांची गोष्ट याहूनही अगदीं निराळी आहे. धर्म हेंच जीवितसर्वस्व, असा आमचा समज आहे. धर्म हा जीविताचा एकच हेतु आहे,

असें आमचें पक्कें मत झालें आहे. चीन आणि जपान या दोन देशांत मोठें युद्ध झालें होतें, हें आपणापैकीं कितीजणाना ठाऊक असेल बरें ? देशांत सर्व समाजाची क्रांति होण्यासारख्या गोष्टी घडत असतात, त्याची माहिती आपणापैकीं कितीकास असते बरें ? बहुतेकास या गोष्टींची गधवार्ताही नसते. पण अमेरिकेत सर्व धर्मांची मोठी सभा भरली होती आणि त्या सभेत एका हिंदु संन्याशानें भाषण केलें, ही गोष्ट आबालवृद्धास माहित आहे. यावरून हिंदु राष्ट्राच्या मनोवृत्तीचें सामान्य धोरण बाधतां येतें, आणि हिंदु राष्ट्राच्या जीवनक्रमाचा प्रमुख हेतु काय आहे याचेंही दिग्दर्शन होतें. अनेक देशातून फिरलेल्या पाश्चात्यांनीं लिहिलेलीं पुस्तके वाचण्याचा नाद मला असे. आम्हा पौर्वात्याच्या अज्ञानाबद्दल त्या पुस्तकांत खेदपूर्ण उद्गार जागोजाग काढलेले असत. त्याचे म्हणणें अशत खरें आहे, तथापि त्यात खोट्या गोष्टीही पुष्कळ आहेत हे लक्ष्यात ठेवलें पाहिजे. एखाद्या जर्मन, फ्रेंच, अमेरिकन अथवा इग्रज शेतकऱ्यास ' तू कोणत्या पक्षाचा आहेस ' असा प्रश्न केला तर तो ' लिबरल ' किंवा 'कॉन्सरव्हेटिव्ह' अथवा ' डिमॉक्रॅट ' अथवा ' रिपब्लिकन् ' यापैकीं एखादें नाव पटकन् सागेल आणि आपण कोणत्या पक्षाला मत देणार याचाही खुलासा तो करील, पण धर्मासंबधीं कांहीं प्रश्न त्याला केल्यास तो ' मी अमुक विशिष्ट पथाचा ' एवढाच जबाब देईल. ' तूं त्या पथाचा कां म्हणवितोस ' असा प्रश्न आपण त्याला विचारला तर त्याचें उत्तर त्याला देतां येणार नाहीं. असले प्रश्न त्याच्या डोक्यात कधीं उद्भवतच नाहींत बाजारात चांदीच्या भावाची वधघट का होते, हें एक वेळ तो सागू शकेल, पण धर्मांच्या बाबतींत तो केवळ अरण्यपडित असतो

आतां आपल्या या देशाची स्थिति पाहिली तर ती याच्या उलट असल्याचें आढळून येतें. एखाद्या हिंदु शेतकऱ्याला राजकीय बाबतींतील कांहीं प्रश्न विचारला तर ती बाबत त्याच्या कानावरूनही कधीं गेली नसल्याचें आढळून येईल ! त्याला सामाजिक प्रश्नासंबंधींही जुजबी माहितीहून अधिक कांहीं सांगतां येणार नाहीं. धनी आणि मजूर याचे संबध अथवा अर्थशास्त्रातील दुसऱ्या अनेक बाबी अशा सांपडतील कीं, त्यांची वार्ताही त्यास नसावयाची. श्रम करावे आणि पोटाला मिळवावें, इतकेंच तो जाणतो पण धर्माच्या बाबतींत कांहीं प्रश्न त्याला विचारा, म्हणजे तो एकादें दुसरें उत्तर इतकें चोख

देईल कीं, त्याला त्या बाबतींत बरीच माहिती आहे, अशी तुमची तावड-तोब खात्री होईल. या गोष्टीचा अनुभव मला स्वत:ला कित्येक वेळां आला आहे. राष्ट्र या नात्यानें आमच्यात कोणते गुणदोष आहेत हे या सामान्य गोष्टीवरून कळून येते. 'व्यक्ति तितक्या प्रकृति' ही म्हण आपल्या कानांवरून अनेक वेळा गेली असेल. प्रत्येक मनुष्याचा विकास निरनिराळया रीतीने होत असतो. कोणत्याही बाबतीत एकच पद्धत सर्वांस सारख्या रीतीनें लागू करता येणार नाही. पूर्वकर्माच्या अनेक परपरा प्रत्येक व्यक्तीच्या मागें असतात आणि पुढील मार्गक्रमण या परपरास अनुसरून आखलेलें असतें. पूर्वकर्मानुसारे विशिष्ट परिस्थितींत त्याचा जन्म झालेला असतो, आणि तो चालू स्थितीचा जसा उपयोग करील तसा भावी जन्म त्याला प्राप्त होईल. अशा रीतीनें या जगात जन्म पावणाऱ्या प्रत्येक व्यक्तीचा विशिष्ट मार्ग असतो. प्रत्येकाचा विशेष प्रकारचा कल दिसून येतो. प्रत्येकाची दिशा वेगळी असते आणि तो त्या दिशेकडे अपरिहार्यपणे जात असतो. त्याचा सारा आयुष्यक्रम त्या विशिष्ट दिशेनेच चालत असतो. जी गोष्ट एखाद्या व्यक्तीला तीच एखाद्या राष्ट्राला अथवा मानवकुलाला लागू असते. प्रत्येक राष्ट्राच्या वाढीचे मार्ग विशिष्ट असतात आणि त्याची वाढ त्याच मार्गांनीं व्हावयाची असते. प्रत्येक राष्ट्राला काहीं विशिष्ट कामगिरी या जगात करावयाची असते. त्याचा जन्म त्या विशिष्ट कामगिरीच्य पूर्ततेकरिताच असतो. स्वत च्या ठरींव मार्गानें चालूनच त्या कामगिरीची पूर्तता त्या राष्ट्रास करावयाची असते. राजकीय महत्त्व मिळविणें ही आमची कामगिरी नाहीं, देशामागून देश जिंकीत सुटणें ही आमची कामगिरी नाहीं; पूर्वकाळीही ही कामगिरी आम्हाकडे कधीं आली नव्हती आणि सांप्रतही नाहीं, इतकेंच नव्हे, तर भविष्यकाळीही ही कामगिरी आपल्याकडे येणार नाहीं, हे माझे निश्चयात्मक वचन आपण पक्कें ध्यानात धरा. पूर्वकालापासून आमच्या राष्ट्राकडे दुसऱ्या एका प्रकारची कामगिरी सोपविण्यात आली आहे. आध्यात्मिक बल सांठविणें, त्याचे रक्षण करणें, त्याचें केंद्रीकरण करणें आणि योग्य काळी व योग्य स्थळीं त्या आध्यात्मिक शक्तीची लाट पृथ्वीवर पसरविणें ही आमची कामगिरी आहे. इराणी, ग्रीक, रोमन, अरब अथवा इंग्रज यानीं युद्धसामग्री सज्ज करून पृथ्वीवरील देश जिंकीत सुटावे आणि अनेक देशांस एका सूत्रांत बांधावें, ही

त्याची कामगिरी आहे. त्याचप्रमाणें ज्या ज्या राष्ट्रांत संधि सांपडेल तेथें तेथे आध्यात्मिक ज्ञानाची लाट पोंहोंचवावी, ही आमची कामगिरी आहे. मनुष्याची वाढ होण्याचे मार्ग अनेक आहेत हिंदूंनीं आपल्या शांतताप्रिय बुद्धीने या संस्कृतीच्या वाढीला मदत करावी, हेच योग्य आहे हिंदुस्थानांतून जगाला जें काहीं प्राप्त व्हावयाचे आहे, तें अध्यात्मज्ञानाचा प्रकाश हेंच होय.

आपण पूर्वकालाच्या इतिहासाचे अवलोकन केलें तर एक विशेष गोष्ट आपल्या लक्ष्यात येईल. एखाद्या जेत्या राष्ट्राच्या अनुषंगाने हिंदुस्थानाचा संबंध जेव्हा जेव्हा इतर देशाशीं आला आणि हिंदुस्थानाला स्वत.च्या अज्ञातवासाचा भंग करण्याची वेळ जेव्हा जेव्हा आली, त्या त्या वेळी हिंदुस्थानातील अध्यात्मसागराची लाट दूर देशात जाऊन पोहोंचली असल्याचे आपल्या नजरेस येईल. तरवार परजून जगातील देश जिंकीत सुटावे ही अपेक्षा नसल्यामुळे वारंवार अज्ञातवास पतकरण्याची सवय आमच्या आर्यभूमीला जडली आहे. इतर देशाच्या अनुषंगाने या अज्ञातवासाचा भंग होत असतो, आणि असा भंग झाला म्हणजे येथील अध्यात्मसागराला भरती येऊन त्याच्या लाटा परदेशातही जाऊन पोहोचतात. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं जर्मनीत शॉपेन हौर या नावाचा एक विख्यात पंडित होता. यानें वेदाचें भाषांतर वाचिलें होते हे भाषांतर विशेषसें शुद्ध नव्हतें. एका फारशी भाषांतराचा तर्जुमा एका फ्रेंच मनुष्यानें लॅटिन भाषेत केला होता आणि तें भाषांतर या जर्मन महापंडिताच्या अवलोकानात आलें होते. या भाषांतराचा उल्लेख करताना शॉपेन हौर म्हणतो, ' उपनिषद्ग्रथांचें वाचन हे मनुष्याला कल्याणप्रद आणि प्रकाशक असें आहे. यावाचून साऱ्या जगातील दुसऱ्या कोणत्याही विद्येचा अभ्यास श्रेयस्कर नाही. माझ्या जीवनक्रमात याच अभ्यासानें मला शांतीचा लाभ दिला आहे; आणि मृत्युसमयींही तोच मला शांति देईल ' प्राचीन ग्रीक वाङ्मयाचे संशोधन होऊ लागलें, त्या वेळीं युरोपीय पंडितात विचारसंशोधन व संक्रमण फार झपाट्यानें घडून आलें, पण त्याहूनही मोठ्या प्रमाणावर विचारसंक्रमण घडून येण्याचा काळ जवळ येत आहे असें भाकित या जर्मन आचार्यानें केलें होते. हें त्याचें भविष्य आता खरें होऊ पाहत आहे. युरोपाचा चालू व्यवहार जे कोणी उघड्या डोळ्यानीं पाहत असतील, पाश्चात्य जनतेच्या मनोवृत्तींत पडत असलेला फेर ज्यांच्या लक्ष्यांत

येत असेल आणि जे कोणी पाश्चात्यांच्या मनोभूमिकेचा अभ्यास विचारपूर्वक करीत असतील, त्यास अशा प्रकारच्या विचारसंक्रमणाचा प्रत्यय येईल. आर्यतत्त्वज्ञानाच्या झऱ्याचें पाणी पाश्चात्य देशांत हळू हळू पण अनिवार्यपणें मुरत आहे आणि त्यामुळें पाश्चात्यांच्या समाजशासनपद्धतींत आणि विचारात संक्रमण घडून येत आहे, ही गोष्ट बुद्धिमतांच्या लक्ष्यात आल्यावाचून राहणार नाहीं, पण अशाप्रकारचें संक्रमण घडून येत असता आणखी एक विशेष गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. या विशेष गोष्टीचा उल्लेख पूर्वीं एक वार मीं केलाच आहे. ती गोष्ट ही कीं, हें विचारसंक्रमण अत्यंत शांतपणें घडून येत आहे. या विचारसंक्रमणाबरोबर युद्धाचा भेसूर ध्वनि उमटत नाहीं, या विचारसंक्रमणाबरोबर तरवारींचा चकचकाट दिसणार नाही, अथवा उल्हाटयंत्रांचा गडगडाटही ऐकू येणार नाहीं आमच्या आर्यतत्त्वज्ञानाचा प्रसार कसा होतो, हें एकाच इंग्रजी शब्दानें सांगावयाचें म्हटलें तर तें Fascination या शब्दानें सांगतां येईल. या शब्दाचा अर्थ ‘ मोहकता ’ असा आहे. पाश्चात्य संस्कृति एखाद्या ठिकाणीं जाते त्या वेळीं तेथील समाजांत एकदम मोठी खळबळ उडून जाते. एखादी गोष्ट अगदीं अनपेक्षितपणें घडून आली म्हणजे मनुष्य जसा बावरतो, त्याचप्रमाणें पाश्चात्य संस्कृतीच्या पहिल्या सलामीबरोबर तो समाज गडबडून जातो. आर्यतत्त्वविचारांच्या संक्रमणाचा प्रकार याच्या अगदीं उलट आहे समाजास नकळत तो त्यामध्यें प्रवेश करतो. त्याच्या प्रथमस्पर्शानें समाज जणू काय भारला जातो. हिंदूंच्या तत्त्वविचारांची ओळख ज्यास मुळींच झालेली नसते, असा परका मनुष्य प्रथम ‘ हिंदू ’ या शब्दानेंच बावरतो. हिंदु तत्त्वज्ञान, हिंदु चालीरिती, हिंदु समाजरचना, हिंदु वाङ्मय इत्यादि सर्व प्रकारच्या ‘ हिंदु ’ वस्तुसंघाचा तो तिरस्कार करतो. हिंदु ह्या नुसत्या शब्दानेंच त्याच्या कपाळाला सतरा आंठ्या पडतात. पण थोडा वेळ धीर धरून जर ते आमच्या विचारपद्धतीशीं परिचय करून घेतील, तिचें परिशीलन करतील आणि आमच्या आचारकल्पनांच्या मुळाशीं कोणतीं महत्तत्त्वें आहेत हें समजून घेतील, तर त्यांच्या पूर्वभावना पालटून त्यांच्या जागीं कौतुक उत्पन्न होईल आणि ते मोहून जातील अशी माझी नव्याण्णव हिस्से खात्री आहे. रात्रीच्या वेळीं पडणाऱ्या दवाचा आवाज कोणाला ऐकू येत नाहीं; आणि तें पडतांना कोणाला दिसत नाहीं !

तथापि तें जसें वनस्पतिपोषणाचें महत्कार्य करतें, त्याच प्रमाणें आमच्या या शांत, सहनशील, सोशिक आणि धर्मैकजीवी हिंदुकुलानें आपलें कार्य निःशब्द-पणें संपादिलें आहे.

या पूर्वेतिहासाची पुनरावृत्ति होण्याचा काळ आतां आला आहे. अर्वाचीन काळच्या भौतिक शास्त्राच्या भडिमारानें पूर्वकल्पनाच्या किल्ल्यातील माऱ्याच्या जागा साप्रत सर करून टाकिल्या आहेत त्यातील मजबूत बुरूज पायापासून ढासळून गेले आहेत. मनुष्यजातीनें धर्माच्या बाबतींत एखाद्या विशिष्ट परं-परेचाच अंगिकार केला पाहिजे, या पूर्वभावनेचा समूळ लोप झाला आहे. चिनी मातीचीं भांडीं मोठ्या घणाच्या डाख्याखालीं ज्याप्रमाणें कडाकड फुटून जातात, त्याचप्रमाणें प्राचीन वस्तुसशोधनाच्या तडाख्याखाली जुन्या भोळसर समजुतींचा चकाचूर उडत आहे. युरोपांत सध्या धर्म हा अशिक्षित जनसमूहाच्या ताब्यांत पूर्णपणें गेला आहे धर्माचे कोणत्यातरी प्रकारचें अस्तित्व असावे असें युरोपांत सध्या जर कोणास वाटत असेल तर ते अज्ञ-जनसमूहास मात्र वाटते. तेथें जे सज्ञान म्हणवितात ते एखादी बाब धार्मिक म्हणूनच तिची अवहेलना करतात अशा स्थितीत आर्यतत्त्वज्ञानाच्या प्रसारास अवसर मिळावा हें सर्वथा योग्य आहे. हिंदूच्या मनोभूमिकेतून बाहेर पड-णाऱ्या अत्यत विशाल धार्मिक कल्पना त्यात गोवलेल्या सापडतात, आणि त्याचप्रमाणें अध्यात्मविद्येतील सिद्धांतांचा प्रत्यक्ष आचारही येथे पहावयास सांपडतो. अध्यात्मविद्येतील कित्येक सिद्धांत आम्हां लोकांच्या हाडींमासीं मुरून गेले आहेत आणि आमच्या सामान्य व्यवहारांतहि त्याचें प्रत्यक्षरूप पदो-पदीं आढळून येतें. सांप्रतच्या घोटाळ्यांतून जगाला सुरक्षितपणें बाहेर काढ-ण्यास आमच्या आर्यतत्त्वज्ञानाचा मात्र उपयोग होईल, ही गोष्ट अगदीं नैसर्गिक अशी आहे. अनत घोटाळ्याच्या पोटीं एकतानता आहे असें निःसंशयपणें स्थापित करणारें, मृत्यूचें साम्राज्य रोजच्या अनुभवानें सिद्ध होत असतांही जगाची निःसीमता सिद्ध करणारें, मानवी जीवित क्षणभगुर आहे असा अनुभव असतांही आत्म्याचें अमरत्व सिद्ध करणारें, प्रत्येक क्षणीं जगाच्या पालटणाऱ्या स्वरूपामागें त्याचें स्थिररूप आहे असें सिद्ध करणारें आणि या विश्वाचें अनतत्त्व सिद्ध करणारें असें जें शास्त्र असेल, तेंच सध्याच्या झोटिंगबादशाहीच्या काळीं उपयोगीं पडेल. जग हें एक चिखलाचें लहा-

नसें डबके आहे अशी कल्पना जुन्या काळीं होती. आमच्या जुन्या-पुराण्या ग्रथातूनही असल्या प्रकारचा उल्लेख सापडतो. त्याचप्रमाणें जग हे क्षणभगुर आहे आणि एकदर कालही इतकाच आकुञ्चित आहे, अशीही कल्पना पूर्वकाळीं होती, पण त्याच आमच्या ग्रथात कालस्थलांच्या अनतत्वाची आणि मानवी आत्म्याच्य अनत वैभवाची कल्पना उदय पावत असल्याचे आढळून येईल धर्मशास्त्राच्या बाबतींत जे जे शोध यानतर झाले, त्याच्या मुळाशीं याच अनतत्वाच्या कल्पनेचे वास्तव्य होते. सध्याच्या काळीं उत्क्रांतिशास्त्राने आणि इतर भौतिकशास्त्रांनीं जुन्यापुराण्या ईश्वरविषयक कल्पनाचा नायनाट करून टाकिला आहे. अशा वेळीं कसल्या प्रकारचें शास्त्र मनुष्यजातीच्या उपयोगी पडेल बरें ? ज्या शास्त्राच्या सिद्धाताच्या प्रसारानें मानवी मनाचा आकुञ्चितपणा कमी होईल, ज्या शास्त्राच्या सिद्धातानीं सशयनिवृत्ति होईल आणि ज्या शास्त्राच्या सिद्धातांनीं अत करणांतील क्षुद्र वृत्ति मावळून तेथे औदार्याचा उदय होईल, असेच शास्त्र सध्या मनुष्यजातीस हवे आहे हे अगदी उघड आहे, आणि तसे शास्त्र म्हटलें म्हणजे वेदान्त हेच होय. येथें मानवी आत्म्याचें अत्यत आश्चर्यकारक आणि उज्ज्वल असे रूप पाहावयास सापडते आणि येथेच परावाणीचा मधुर शब्द ऐकू येतो.

आता येथे आणखीही एक गोष्ट विशेषेंकरून लक्ष्यात ठेवली पाहिजे, हे सागणे अवश्य आहे. हिदुधर्माच्या प्रसाराच्या आवश्यकतेबद्दल जें विवेचन आतापर्यंत केलें, त्यातील 'हिंदुधर्म' या शब्दाने फक्त तत्त्वसिद्धातांचाच बोध होतो असें समजावे. ज्या मूलतत्त्वावर आणि सिद्धांतावर हिंदुधर्माची इमारत उभारली गेली आहे, त्या सिद्धातांसबधीच हें विवेचन लागू आहे असें समजावे. त्या सिद्धांताचे ग्रहण पाश्चात्याकडून करविलें पाहिजे, असा माझ्या म्हणण्याचा आशय आहे. हिदुधर्माचें जें काहीं बाह्यस्वरूप आज दिसत आहे, त्याची नक्कल त्यांनीं करावी असें माझें म्हणणें नाहीं. ग्रहण करावयाचें तें बाह्य उपाधींचे नसून निरुपाधिक सिद्धांताचें करावयाचें, हा माझा मुख्य मुद्दा आहे. कित्येक शतकाच्या अनुभवामुळें जीं विशिष्ट प्रकारचीं समाजबधनें, चालीरीती अथवा समाजघटना हीं आज हिंदुकुलांत आढळून येत आहेत त्यांचा अविभाज्य संबध शुद्ध धर्मतत्त्वांशीं आहे असें नाहीं. ज्ञानकाड आणि कर्मकांड अथवा श्रुति आणि स्मृति असे दोन स्पष्ट विभाग आपल्याकडेही केलेले

आहेत हे आपणास ठाऊक आहेच. यांपैकीं ज्ञानकाड हें कालस्थलातीत सिद्धांतांचें शास्त्र असल्यामुळें त्याची सत्यता कालस्थलाच्या अनुषगानें बाधित होत नाहीं. मनुष्यस्वभाव, आत्मप्रतीति, जीवात्मा आणि परमात्मा यांचे नित्यसंबध परमात्म्याचे रूप आणि मुक्ति इत्यादि वस्तूंच्या पायावर ह्या शास्त्राची उभारणी झाली असल्यामुळें त्याचे सिद्धांतही सर्वकालीं आणि सर्वस्थलीं अबाधित असावे हें निसर्गसिद्धच आहे. त्याचप्रमाणें सृष्टिरचना, सृष्टिरचनेचें अनाद्यनतत्व अथवा सृष्टीची उत्क्राति आणि प्रतिक्रांति इत्यादिकांचें विवेचन हें कालस्थलातीत नियमांस अनसरून केलें असल्यामुळें तें सर्वकालीं आणि सर्वस्थली एकसारखेंच लागू करतां येईल. यानतर स्मृतिशास्त्र निर्माण झालें. या शास्त्रांत सामान्य व्यवहारातील आचारांचें विवेचन केलें आहे. याचा अतर्भाव धर्मतत्त्वांत करतां येणार नहीं. यातील सिद्धांत सामाजिक परिस्थितीनें बद्ध असल्यामुळें, ते कालस्थलातीत आहेत असें म्हणतां येत नाहीं श्रुतिसिद्धांतांशीं यांचा अविभाज्य संबध नाहीं. खुद्द आपल्या देशांतही स्मृतिसिद्धांत वारंवार बदलत असतात, ही गोष्ट आपल्या नेहमींच्या अनुभवातील आहे. एका युगांतील चालीरीती दुसऱ्या युगात आढळत नाहींत, आणि युगांचें संक्रमण होईल त्याप्रमाणें या कल्पनातही फेरबदल अवश्य होईल. योग्य काळीं महापुरुष आणि ऋषी आपणा सामान्य जनांत जन्म घेतात आणि त्या त्या काळच्या परिस्थितीला अनुरूप अशी समाजरचना म्हणजे स्मृति निर्माण करतात.

जीवात्मा, परमात्मा आणि सृष्टि यांसंबधीं अत्यत विस्मयकारक, आणि उन्नतिकारक सिद्धात याच देशांत प्रकट झाले आहेत. ‘ माझा मार्ग खरा कीं तुझा खरा ’ असल्या क्षुद्र गोष्टीचीं भाडणें हिंदुस्थान कधींही भाडला नाहीं. धर्मसंबधानें जेथें कधींही रक्तपात झाला नाहीं, असा देश हिंदुस्थान हाच आहे. असल्या क्षुद्र कल्पनांचा स्पर्शही आम्हा लोकांस कधींही झाला नाहीं. आमचीं धर्मतत्त्वें सनातनस्वभावसिद्ध असल्यामुळें त्यांचें कल्याणकारित्व सर्वदा एकसारख्या प्रमाणांतच कायम आहे हजारों वर्षांमागें त्यांचा उदय झाला, आणि त्या काळीं जें मनुष्यजातीचें हित त्यांनीं केलें, तेंच हित करण्याचे सामर्थ्य त्याच्या अंगीं आजही कायम आहे. जोपर्यंत ही सृष्टि चालू राहील जोपर्यंत कर्मांचे कायदे अबाधित चालतील आणि जोपर्यंत आम्ही मनुष्यें

स्वकर्मानुसार बद्ध असू तोपर्यंत या सिद्धाताचा अमल आम्हावर अव्याहत चालू राहाणारच यांत तिळमात्र शका नाहीं. जोंपर्यंत आमचे कल्याण दुसरा कोणी करू शकत नाही—जोंपर्यंत स्वबलानेंच आम्हास मुक्ति मिळविणें भाग आहे—तोपर्यंत सनातनधर्मही अबाधित राहील.

आम्हापाशीं जगाला देण्यासारखे जे कांहीं आहे ते हेंच. निरनिराळया मानव कुलाच्या धर्मांची वाढ आपण पाहिली तर एक गोष्ट आपल्या लक्ष्यात विशेषेकरून येते, ती ही कीं, त्या कुलाच्या बाल्यावस्थेच्या कालीं त्यांतील निरनिराळ्या शाखाचे निरनिराळे देव असत. जर या शाखात परस्पर प्रेमभाव नादत असला तर या सर्व देवाचा अतर्भाव एकाच नावांत होत असे. सर्व बाबिलोनियन देवदेवता एकाच नावानें ओळखिल्या जात असत. बाबिलोनियनाच्या अनेक शाखा आणि त्या शाखागणिक अनेक देव होते, तरी त्या सर्वांचा समावेश ‘बाल’ या एकाच नावात होत असे. त्याचप्रमाणें यहुदी कुलाच्या अनेक शाखांच्या अनेक देवताचा समावेश ‘मोलॉक’ या एकाच नावात होत असे. यानतर यातील एखादी शाखा प्रबळ होऊन इतरावर आपले वर्चस्व गाजवूं लागली म्हणजे आपला राजा इतर शाखाच्या राजाहून श्रेष्ठ आहे असें म्हणत असे. त्याचप्रमाणें आपला विशिष्ट देव हाही इतर शाखाच्या देवांहून वरिष्ठ असें म्हणूं लागे ‘ बाल—मरोडाक ’ हा सर्व देवात श्रेष्ठ असें एक बाबिलोनियन शाखा म्हणू लागली. त्याचप्रमाणे ‘ मोलॉक—यावा ’ हा सर्व देवात श्रेष्ठ असें एक यहुदी शाखा म्हणू लागली. देवाच्या श्रेष्ठपणाबद्दल शाखाशाखांत अशीं भांडणें सुरू झालीं म्हणजे त्यांचा अखेर निकाल ‘ धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे ’ व्हावयाचा हे ओघाला आलेच. आमच्याकडेही आरभीं अशाच तऱ्हेचा काहीं प्रकार घडला असावा असें मानण्यास जागा आहे. अनेक देवदेवतात श्रेष्ठत्वाबद्दल स्पर्धा होत असल्याचें आढळून येते, पण आमच्या या आर्यभूमीची पुण्याई मोठी म्हणून येथें एक अशरीरिणी वाणी झाली कीं, ‘ एकं सद्विप्रा बहुधा वदंति ’ जें कांहीं आहे तें वस्तुत· एकच असून पडित त्यालाच निरनिराळ्या नांवानीं संबोधतात. तुम्ही त्या तत्वाला विष्णु म्हणा, शिव म्हणा अगर दुसरींही हजारों नांवें द्या, तें तत्व एकरूपच आहे, हा सिद्धात इकडे प्रस्थापित झाल्यामुळें भाडणांच्या मुळावरच कुऱ्हाड पडली. हिंदुस्थानांतील धर्मांच्या वाढीचा इतिहास या एकाच वाक्यांत समाविष्ट झाला आहे.

या एकाच मूलभूत सिद्धांतासभोंवतीं प्रचंड प्रथरत्नाचे प्रकार बांधले गेले आहेत. या एकाच तत्त्वाचा उच्च घोष इतक्या प्रकारानीं झाला कीं, त्याचा प्रवेश जनतेच्या अगदी तळापर्यंत झाला. अगदीं सामान्य लंगोट्याच्याही रक्तमांसात हें तत्त्व खेळू लागलें आणि अशा रीतीनें हें तत्त्व हिंदुजनतेच्या जीविताशीं अगदीं एकरूप होऊन गेले आहे. यामुळेंच परमतसहिष्णुता ही जन्मादारभ्य आम्हांस प्राप्त झाली आहे. बाहेरून कितीही नवे धर्म आणि नवे पंथ आले तरी ते आपल्या आदिमातेला भेटण्याकरिताच येथे येतात असें आम्हास वाटते. सर्व धर्मांशीं आणि पंथांशीं आमचा सहोदर संबध आहे असेंच आम्हांस नित्य वाटत असतें.

खुद्द आमच्या या देशांतही अनेक पथ आणि धर्म आजमितीस असून ते सारे सुखानें एकत्र नादत आहेत असें कां होते याचें उत्तर 'एक सद्विप्रा बहुधा वदंति' या वचनात आढळून येते. कोणी एखादा अद्वैती असेल आणि दुसरा द्वैती असेल एक ह्मणतो कीं 'मीच परमेश्वरस्वरूप आहें' आणि दुसरा म्हणतो 'मी परमेश्वराचा सदैव भक्त आहें.' पण असा मतभेद असला तरी दोघेही अस्सल हिंदु म्हणविले जातात. याचें कारण 'एक सद्विप्रा बहुधा वदंति' हेच. माझ्या प्रिय बांधवानो, आपणास हेंच ब्रीदवाक्य सर्व जगाला शिकवावयाचें आहे. परक्या देशातील मोठमोठे विद्वान म्हणविणारे लोकसुद्धां 'हिंदुधर्म' एवढा शब्द ऐकल्याबरोबर नाक अगदीं वाकडें तिकडे मुरडतात आणि म्हणतात, 'हिदुधर्म म्हणजे मूर्तीची–दगडमातीची –पूजा !' मित्रहो, हें अनेक वेळा मीं माझ्या डोळयानीं पाहिलें आहे. पण लोकांच्या डोळयांतील कुसळ पाहणाऱ्या या घमडानदनांस आपल्या डोळ्यांत केवढे मोठें मुसळ होतें याची शुद्धि नाहीं. आजमितीसही तेथे धर्मवेड अगदीं नाही असें म्हणता यावयाचें नाहीं. विशिष्ट धर्माच्या अथवा पंथाच्या बाबतींतील युरोपियन लोकाच्या मनांचा हा आकुंचितपणा अजूनही गेलेला नाहीं. स्वतःजवळ जें कांहीं आहे तेंच सर्वोत्कृष्ट असें त्यांस अद्यापि वाटतें. कनक आणि कामिनी याच काय त्या पूज्य वस्तू आहेत असें त्यांस वाटते. स्वतःच्या संपत्तीशिवाय जगात मिळविण्यासारखी दुसरीही एखादी चीज असेल असें त्यांच्या स्वप्नांतही येत नाही. एखाद्यानें एखादी दगडमातीची वस्तू बनविली अथवा एखादें लोखडी यन्त्र तयार केलें तर त्याची पूजा करा-

वयास मात्र हरकत नाहीं. शिक्षणाचा इतका मोठा प्रसार झाला असतांही जगभर आज हीच स्थिति आहे. वस्तुतः खऱ्या शिक्षणाला अद्यापि सुरुवात झालीच नाहीं. ती ज्या दिवशीं होईल तो सुदिन ! आणि खऱ्या संस्कृतीबद्दल म्हणाल तर तिलाही कोठें अद्यापि आरंभ झालेला नाही. आजमितीसही शेंकडा नव्याण्णव लोक कमीअधिक प्रमाणानें रानटीच आहेत. आज पुस्तकी ज्ञान, पुस्तकी संस्कृति आणि पुस्तकी सहिष्णुता, यांचा मात्र मुबलक सुळसुळाट झाला आहे; पण याचें प्रत्यतर प्रत्यक्ष आचारांत पहावयास सांपडेल ही आश मात्र करावयास नको. मी हें कांहीं तरी बोलत आहें असें आपण समजूं नका. मला जे कांहीं प्रत्यक्ष अनुभव आले त्यावरूनच हे मी बोलत आहें. आज शेंकडा नव्याण्णव लोक असे आहेत की, ते ह्या गोष्टींचा कधी विचारही करीत नाहींत धर्ममताबद्दल होणारा छळ अजूनही चालू आहे. काहीं नवी गोष्ट शिकावी असें एखाद्याच्या मनांत आलें तर जुन्या काळच्या साऱ्या अड-चणी आजही त्याच्या मार्गांत उभ्या राहतात. परमतसहिष्णुता अल्प प्रमाणा-वर तरी या जगात कोठें असेल तर ती आपल्याच देशात आहे आर्यभूमी-वांचून इतरत्र कोठेंही तिचा वास नाहीं. मशिदी अगर ख्रिस्ती देवळे बांधण्या-साठीं हिंदूची मदत नेहमीं मिळते. ही गोष्ट फक्त या भूमींतच शक्य आहे. तुम्ही एखाद्या मुसलमानी अगर ख्रिस्ती देशात जाऊन एखाद्या हिंदु देवळा-साठीं मदत मागितली तर माझ्या म्हणण्याचे प्रत्यतर तुम्हाला ताबडतोब येईल. तुमचें देऊळच नव्हे, तर शक्य असल्यास, तुम्हांसही नष्ट करण्यास ते मागेंपुढें पाहणार नाहींत. साऱ्या जगाला आम्हां हिंदु लोकांपासून जर कांहीं धडा शिकावयाचा असेल तर तो हाच कीं, परकीयाबद्दल नुसती सहिष्णुताच नव्हे तर सहानुकपाही बाळगावयाची. महिम्न स्तोत्रात शिवाची स्तुति करताना कवि म्हणतो, "ज्याप्रमाणें निरनिराळ्या पर्वतशिखरांपासून निरनिराळ्या नद्या उगम पावतात व त्या वक्र अथवा सरळ गतीनें चालल्या तरी शेवटीं समुद्रांत एकत्र होतात, त्याचप्रमाणें निरनिराळ्या मनोवृत्तींना अनु-सरून मनुष्यें निरनिराळ्या मार्गांनीं गेलीं तरी शेवटीं तुलाच येऊन मिळतात."

सर्वांचे मार्ग आज निरनिराळे दिसत असले, तरी त्यांचा शेवटचा मुक्काम एकच आहे. कोणी नागमोडी वाटेनें चालत असतील अथवा दुसरे कोणी सरळ मार्गानें जात असतील; तथापि ते सर्व त्या एकाच ठिकाणीं एकरूप

होतील. हें सर्व एकरूपच आहे असें ज्या दिवशीं तुम्ही पहाल, त्याच दिवशीं तुमची भक्ति आणि शिव हीं एकरूप होतील. शिवाचा वास फक्त लिंगाकृतींतच नसून तो सर्वत्र आहे, असें ज्या दिवशीं तुमच्या अनुभवाला येईल, त्याच दिवशीं तुमच्या भक्तीची अखेर होईल. हरि सर्वभूतातरात्मा आहे असा प्रत्यय ज्याला येतो, तोच खरा हरिभक्त. जर तुम्ही खरोखर शिवभक्त असाल तर वस्तुमात्राचे ठायी शिवाचा वास आहे, असा अनुभव तुम्हास अवश्य येईल. कोणी कोणत्याही मार्गानें पूजन करीत असला तरी तो त्याचेंच पूजन करीत आहे असें तुम्हांस मनापासून वाटू लागलें पाहिजे. कोणी निमाज पढत असला अथवा कोणी ख्रिस्ती देवळांत गुडघे टेकून प्रार्थना करीत असला अथवा तिसरा एखादा बुद्धाच्या देवालयात जाऊन प्रार्थना करीत असला तरी तो शिवपूजनच करीत आहे, अशी तुमची भावना झाली पाहिजे अनेक लोकांनीं अनेक नावें दिली म्हणून शिवरूपात कांहीं फरक पडतो काय? ते निरनिराळया ठिकाणीं फुले वाहत असले तरी शेवटी ती सारी शिवाच्या मस्तकावर एकत्र होतील; कारण तो ‘ सर्वव्यापी सर्वभूतातरात्मा ’ आहे. या जगाला वस्तुत· कशाची गरज आहे हें तुम्हा आम्हापेक्षा तो अधिक जाणतो. सर्व भेद आजच नष्ट होतील ही गोष्ट अगदीं अशक्य आहे. भेद आहेत म्हणून सृष्टि आहे, आणि भेद नाहींसे झाले तर सृष्टिही नाहींशी होईल. भेद आहेत म्हणून विचारसपत्तींत वाढ होत आहे. भेद आहेत म्हणून गतीला आणि प्रकाशाला चालन मिळतें परस्पराशीं अत्यत विसवादी अशा प्रकारच्या भेदांचेंही अस्तित्व राहणारच पण यामुळें आपण एकमेकाचे द्वेष्टे बनावें हे मात्र सिद्ध होत नाहीं. भेद आहेत म्हणून एकमेकाशीं सदोदित लढत असावे असें नाहीं. याकरितां आपण आपलें ब्रीदवाक्य सदोदित ध्यानांत धरलें पाहिजे. जें वाक्य फक्त आपल्या या मातृभूमीतच उच्चारलें गेलें, त्याचा प्रसार आपण जगभर केला पाहिजे. हें वाक्य केवळ आपल्या ग्रथातरींच आढळतें असें नाहीं. तें आपल्या हाडींमासी खिळून गेले आहे. आपल्या वर्तनांत तें रोज दृग्गोचर होत आहे. या वाक्याचा प्रत्यक्ष आचार फक्त याच देशात होत आहे, हे जो कोणी उघड्या डोळयांनीं पाहील त्यास दिसेल. आम्हापाशीं दुसरींही अनेक तत्त्वरत्नें आहेत, पण ती फक्त विद्वानाच्या मात्र उपयोगी आहेत. सौजन्य, सहिष्णुता, सहानुकपा आणि बधुभाव हीं कोणीही

कोणापासून शिकावीं; त्यांत जातगोताचा, वर्णभेदाचा अगर लिंगभेदाचा अडथळा नाहीं. शेवटीं सर्वांनीं मुख्यत्वेंकरून जें कांहीं शिकावयाचें आणि आचारावयाचें तें हेंच ' एक सद्विप्रा बहुधा वदंति । '

---

## जाफना येथील मानपत्र.

'परमपूज्य स्वामी महाराज,

लंकेच्या या भागांत आपण यावें अशी इच्छा आम्हीं प्रदर्शित केली आणि आपण त्या इच्छेस मान देऊन जाफना येथें आलां व आम्हांस दर्शन दिलें, याबद्दल आम्ही सर्व हिंदुरहिवासी आपले फार ऋणी आहों. आमचें शहर हे लंकेंतील हिंदुरहिवाशांचें एक प्रमुख स्थान आहे.

सुमारें दोन हजार वर्षांपूर्वी आमचे पूर्वज दक्षिण हिंदुस्थानांतून लंकेंत आले व त्यानीं येथें वसती केली. जाफना येथें त्या वेळीं तामील राजे राज्य करीत होते. आमच्या पूर्वजांबरोबर आलेल्या हिंदु धर्मास या राजांकडून फार प्रोत्साहन मिळालें. कालांतरानें या राजांचा अमल नष्ट होऊन तेथें पोर्तुगीज व डच लोकांचा अमल चालू झाला आणि या अमलांत आमच्या धर्मक्रियांचें संपादन नीट होईनासें झालें. सार्वजनिक धर्मोत्सव बंद झाले; अत्यंत नामांकित अशा दोन तीन देवळांचा विध्वंस करण्यात आला, ख्रिस्ती धर्मांचा स्वीकार करण्यासाठीं आमच्या पूर्वजावर अनेक प्रकारचा जुलूमही झाला, हा सर्व छळ त्यांनीं निमूटपणें सोसला, पण स्वधर्मत्याग केला नाहीं. आतां त्यांनीं ही मोलवान वारमदारी आमच्या स्वाधीन केली आहे. प्रभुकृपेनें हा प्रांत ग्रेट ब्रिटनच्या अमलाखालीं गेल्यापासून सर्व प्रकारच्या तत्त्वज्ञानास आणि विद्यांस प्रोत्साहन मिळालें आहे. तसेंच पूर्वी जमीनदोस्त झालेल्या इमारती पुन्हां उभारल्या गेल्या आहेत व जात आहेत.

अमेरिकेंत भरलेल्या सर्व धर्मांच्या महापरिषदेंत आमच्या परमपूज्य धर्मांच्या वतीनें हजर राहून वेदान्तर्गत सत्याचें कथन निरपेक्षबुद्धीनें आपण केलें, याबद्दल आम्ही आपले अंतःकरणपूर्वक उपकार मानतों. हिंदुस्थानांत जन्म पावलेली पराविद्या अमेरिकन व इंग्रज लोकांस आपण सांगितली व यामुळें प्राच्य आणि पाश्चात्य राष्ट्रांच्या एकीकरणास आपण मदत केली.

हिंदुधर्मांतील प्रमेयें त्यांस समजावून देताना हिंदूच्या अंतःकरणाची ओळखही त्यांस सहजासहजीं होणार आहे. हल्लींचें युग चार्वाकवाद्यांच्या प्राबल्याचे आहे. श्रद्धेला उतरती कळा लागली असून धर्मप्रमेयाबद्दल सर्वत्र उदासीनता पसरली आहे. अशा वेळीं आमच्या सनातनधर्माच्या पुनरुज्जीवनाचें महत्कार्य आपण सुरू केलें, याबद्दल आपले किती उपकार मानावे?

आमच्या सनातनधर्ममतांच्या औदार्याची ओळख पाश्चात्यांस करून दिली. एवढेंच नव्हे, तर पाश्चात्याच्या तत्त्वज्ञानाला ज्या प्रमेयाचें दर्शन स्वप्नातही झालें नाहीं, अशा अनेक प्रमेयाचें विवेचन आमच्या अनेक दर्शनात उत्तम प्रकारें केलें आहे, ही गोष्ट आपण त्याच्या निदर्शनास आणली, याबद्दल आपली योग्य स्तुति करण्यास भाषेला सामर्थ्य नाहीं.

पाश्चात्य देशांत आपण करीत असलेल्या कामगिरीकडे आम्ही सकुतूहल पाहत होतो आणि सनातनधर्माच्या कार्यांत जे यश आपण तिकडे संपादन करीत होतां ते पाहून आम्हास अत्यानंद होत होता, हे आपणास सांगितलें पाहिजे असें नाहीं तिकडील वर्तमानपत्रांतून आपणांबद्दल स्तुतिपूर्ण लेख येत असत बौद्धिक, मानसिक आणि धार्मिक उन्नतीसाठीं जेथे अहर्निश खटपट सुरू आहे, अशा प्रमुख शहरातील विद्वज्जनानींही आपले स्तुतिपाठ गायिले आहेत. यावरून आपण हातीं घेतलेल्या कार्याचें महत्त्व आणि त्यात मिळविलेलें यश याचें स्वरूप स्पष्ट होत आहे.

आमच्या या भूमीत येऊन आम्हांस आपल्या दर्शनाचा लाभ आपण दिल्याबद्दल पुन्हा एकवार आम्ही आपले आभार मानतो. सत्यधर्मज्ञानाचा पाया वेदानी घातला आहे असें आपणाप्रमाणे आम्हासही वाटते. आपल्या दर्शनाचा लाभ आम्हांस वारंवार मिळावा, इतकीच आमची इच्छा आहे.

ज्या भगवताच्या कृपेनें आपल्या महत्कार्यांत आपणास येथवर यशाची प्राप्ति झाली, त्याने आपणास उदंड आयुष्य, आपल्या नियत कार्यास लागणारें सामर्थ्य आणि उत्साह ही द्यावीं, इतकीच आम्ही त्याजपाशीं मनोभावे प्रार्थना करतों.

आपले,

जाफना येथील हिंदु रहिवाशी.

वरील मानपत्राला स्वामींनीं वक्तृत्वपूर्ण उत्तर दिलें.

* * *

दुसरे दिवशीं 'वेदान्त' या विषयावर त्यांचे व्याख्यान झालें.

## वेदान्त.

आजच्या व्याख्यानाचा विषय अत्यंत विस्तृत असल्यामुळें त्याचें सविस्तर विवेचन एकाच व्याख्यानात आणि थोड्याशा वेळात करणें अशक्य आहे याकरिता त्यातील मुख्य मुद्द्याचे विवरण शक्य तितक्या सोप्या भाषेत आज मी आपणासमोर करणार आहें आम्हा लोकास 'हिंदु' असें जातिवाचक जें एक विशेष नांव प्राप्त झालें आहे, त्याची सार्थकता सध्यातरी उरलेली नाही; कारण सिंधुनदापलीकडे राहणाऱ्या लोकासच हे नाव प्रथम प्राप्त झालें जुन्या काळच्या इराणी लोकानी सिंधु शब्दाचा अपभ्रंश करून त्यापासून हे नाव निर्माण केलें. सिंधुनदाच्या परतीरावर राहणाऱ्या सर्व लोकांना त्यानीं 'हिंदु' हे नाव दिलें. अशा प्रकारची या नावाची उत्पत्ति आहे, आणि त्या काळापासून आजपर्यंत हे नांव चालत आलें आहे. त्यानंतर मुसलमानी अमल या देशावर सुरू झाला आणि तेव्हापासून आम्ही स्वतःही आपणास हिंदु म्हणवू लागलों या नावात काही वाईट आहे असे भासविण्याचा माझा उद्देश नाही. तथापि त्या नावातील पूर्वीच्या अर्थाचा मात्र लोप झाला आहे, इतकाच माझ्या सांगण्याचा तात्पर्यार्थ आहे. कारण सिंधुनदाच्या या तीरावर राहणारे जुने लोक ज्या धर्माचे होते, तोच धर्म ते आता पाळीत आहेत असें नाही यामुळें सांप्रत 'हिंदु' या शब्दात केवळ हिंदुधर्मानुयायांचाच समावेश होत नसून ख्रिस्ती, मुसलमानी, जैनी, आणि इतर धर्मानुयायांचाही समावेश त्या शब्दांत होतो. याकरिता आमच्या धर्माच्या लोकासंबंधी बोलत असतां 'हिंदु' या शब्दाचा उपयोग मी करीत नाहीं त्याकरिता काहीं विशेष शब्दयोजना केली पाहिजे असें मला वाटते. आमच्या लोकासबंधीं बोलताना 'वैदिक' किंवा 'वेदान्ती' यांपैकीं कोणतातरी शब्द योजावा असे मला वाटते. आम्ही वेदाचे अथवा विशेषत. वेदान्ताचे अनुयायी असल्यामुळें हे शब्द अधिक सार्थ होतील. जगात जे धर्म आज विशेष प्रसिद्ध आहेत, त्यांपैकी प्रत्येकाची इमारत एखाद्या विशिष्ट

ग्रंथाच्या पायावर उभारली गेली आहे. या ग्रंथातील प्रमेयें प्रत्यक्ष परमेश्वरापासून अथवा अवतारी पुरुषापासून प्राप्त झालीं आहेत, असा त्या त्या धर्माच्या अनुयायाचा विश्वास आहे. अशा प्रकारच्या सर्व धर्मग्रंथात हिंदूचे वेदग्रंथ हे पहिले आहेत असा युरोपीय तज्ज्ञाचा अभिप्राय आहे. याकरिता वेदांबद्दल प्रथम माहिती करून घेणें इष्ट आहे.

वेद या नावानें ज्या एका विस्तृत ग्रंथसंग्रहाचा उल्लेख केला जातो, तो संग्रह मनुष्यांनीं निर्माण केलेला नाहीं. वेदग्रंथांचा काल निश्चित केला गेला नाही आणि तो निश्चित करणें शक्यही नाही. आमच्या लोकाच्या समजाप्रमाणे वेद अनादि आहेत. आता एक महत्त्वाचा मुद्दा मी आपणास सागणार आहे आणि तो विशेषेंकरून लक्ष्यात ठेवण्याजोगा आहे, असेंही मी आपणास आगाऊ सुचवून ठेवतो. तो मुद्दा हाच कीं, वैदिक धर्माशिवाय इतर धर्मांचे अनुयायी आपापला धर्म प्रत्यक्ष ईश्वरदत्त अथवा ईश्वरावतारी पुरुषापासून प्राप्त झालेला आहे असे समजतात ईश्वरानें एखाद्या देवदूतामार्फत अथवा खास अवतारी पुरुषामार्फत जगाला आपला धर्म दिला असा त्यांचा पक्का विश्वास आहे. वैदिक धर्मानुयायाचें असें मत नाही. वेदग्रंथ हे एखाद्या व्यक्तिविशेषानें लिहिलेले ग्रंथ नाहीत ते एखाद्या अवतारी पुरुषाने लिहिले म्हणूनच त्यास प्रमाण मानावयाचे असे नाहीं, तर परमेश्वरविषयक ज्ञान त्यात असल्यामुळें ते स्वत च प्रमाणभूत आहेत, आणि विशिष्ट व्यक्तीपासून त्याची उत्पत्ति झाली नसल्यानें ते अनादि आहेत, असे त्यांचें मत आहे. ते अमक्याच वेळीं लिहिले गेले असें नाही, त्याची कोणी उत्पत्ति केली असेही नाहीं. कालाच्या उत्पत्तीबरोबरच त्याचीही उत्पत्ति झाली आहे. ज्याप्रमाणें विश्वरचना ही अनाद्यनत आहे आणि ती जशी कोणीं निर्माण केलेली नाही, त्याचप्रमाणें परमात्म्याचें ज्ञानही अनाद्यनत असून ते कोणीं उत्पन्न केलेलें नाहीं अगर त्याचा कधीं नाश होईल असेंही नाहीं. एवगुणविशिष्ट जें ज्ञान, ते ‘ वेद ’ या एका शब्दाने ओळखलें जाते. वेद हा शब्द विद् म्हणजे जाणणें या धातूपासून निघाला आहे. वेदान्त या शब्दानें ज्या विशिष्ट प्रकारच्या ज्ञानाचा बोध होतो तें ज्ञान ऋषींनीं प्रत्यक्षत्वास आणलें. ऋषींना मंत्रद्रष्टे अशी सज्ञा आहे. ‘ मंत्रद्रष्टा ’ ही शब्दयोजनाच किती समर्पक आहे पहा ! मंत्र आणि त्यांतील ज्ञान हीं त्या ऋषीपासून उद्भवलीं

नाहीत. त्या ज्ञानाचें जनकत्व ऋषींकडे नाहीं त्याला अस्तित्व पूर्वीच असून त्या ऋषींनी तें ' पाहिलें ' आणि उघडकीस आणलें. ' अमुक एका ऋषीनें अमुक एका वेदवाक्याचें कथन केले ' याचा अर्थ त्या ऋषीनें ते वाक्य लिहिलें असा होत नसून पूर्वीच अस्तित्वांत असलेल्या वाक्याचें त्यानें पुनरुच्चारण केलें, असा अर्थ होतो हे लक्ष्यांत ठेवण्यासारखे आहे. त्या मन्त्राचें अगर वाक्याचें उत्पत्तिस्थान ऋषीचें मन हे नव्हे. तो मन्त्र अनादिकालापासून सृष्टीबरोबरच अस्तित्वात होता आणि तो त्या ऋषीना गोचर झाला इतकेच जो विचार गुप्तरूपांत होता, तो ऋषींनीं उघडकीस आणला. ऋषी हे मन्त्राचे कर्ते अथवा उत्पादक नसून मन्त्रद्रष्टे मात्र आहेत.

वेदग्रंथाचे मुख्यत्वेंकरून दोन भाग आहेत. एका भागाला कर्मकांड अशी संज्ञा असून दुसऱ्याला ज्ञानकांड अशी संज्ञा आहे कर्मकांडांत नानाप्रकारच्या यज्ञयागाचे व होमहवनांचे विवेचन केलें आहे. हल्लीच्या युगाला अननुरूप असल्यामुळें सांप्रत यज्ञयागादि क्रियांचा लोप झाला आहे पण ज्ञानकांड मात्र कोणत्याना कोणत्या रूपाने आजतागाईत प्रत्यक्ष अस्तित्वांत राहिलें आहे कर्मकांडापैकीं यज्ञयागाचा लोप आज झाला असला, तरी त्यापैकी काहीं प्रमुख आचार आजपर्यंत आमच्या समाजांत राहिले आहेत. कर्मकांडांत सांगितलेले ब्रह्मचाऱ्यांचे, गृहस्थाचे व सन्याशाचे धर्म हे आजपर्यंत पाळले जात आहेत; तथापि या दोन कांडात ज्ञानकांड मुख्य आहे व त्यातच वेदान्ताचे विवरण केलें आहे. वेदान्त म्हणजे वेदाचा शेवट अथवा वेदाचें अंतिमसाध्य ज्यांत सांगितलें आहे, तो भाग. वेदांतील प्रमुख व अत्यंत महत्त्वाचा भाग हाच होय. यांत उपनिषद्ग्रंथाचा अंतर्भाव होतो. आमच्या देशांतही अनेक पंथांचें अस्तित्व आहे, तथापि हिंदु या सामान्य नांवाखालीं ज्या ज्या पंथाचा अंतर्भाव होतो, ते सारे पंथ उपनिषद्ग्रंथास प्रमाणभूत मानतात, किंबहुना, या ग्रंथांचे प्रामाण्य ज्यांस मान्य नाहीं तो सनातनधर्ममार्गी होऊं शकत नाहीं. कोणी द्वैती, अद्वैती अगर विशिष्टाद्वैती असो, अथवा कोणी शैव, वैष्णव, शाक्त, सौर अगर गाणपत्य असो, त्यानें वेदांचें प्रामाण्य कबूल केलेंच पाहिजे. त्यानीं आपल्या मताला अनुकूल अशा पद्धतीनें वेदवचनांचे अर्थ वाटल्यास करावे, पण त्यांचें प्रामाण्य हे कबूल केलेंच पाहिजे. याकरितांच ' हिंदु ' या नावाबद्दल ' वेदान्ती ' या

नांवाचा उपयोग करणें अधिक बरोबर आहे, असें मीं पूर्वीं म्हटलें होते. पूर्वपरंपरेला धरून चाललेल्या साऱ्या दर्शनकारानीं वेदांचें प्रामाण्य कबूल केलें आहे. यामुळें आमच्यात कितीही निरनिराळे पंथ अस्तित्वात असले, काही पंथ बाह्यतः कितीही अज्ञानपूर्ण दिसले अथवा काही पंथातील आचाराची मीमांसा आज आपणास उघड दिसून येत नसली, तरी त्या पंथांचा अभ्यास आपण काळजीपूर्वक केला, तर ते पंथ मूळ उपनिषद्ग्रंथांच्या आधारावरच स्थापले गेले आहेत, असें आपल्या लक्ष्यात आल्यावाचून राहणार नाहीं. उपनिषद्ग्रंथांतील काहीं तत्त्वे आम्हा लोकाच्या हाडींमासीं इतकीं खिळून गेलीं आहेत कीं, आपण एखाद्या अगदीं गावढळ पंथाचा अभ्यास केला, तर त्यातील विशिष्ट आचारांत वेदान्तातील काहीं तत्त्वे गोंवली असल्याचें आढळून येईल. हे आचार बाह्यत· अगदीं गावढळपणाचे, भोळेपणाचे व अर्थशून्य असे भासत असले, तरी तीं अव्यक्त वेदान्तप्रमेयाचीं व्यक्त रूपें असतात, व त्याचप्रमाणें विशिष्टपंथाच्या मूर्ती, यासुद्धा विशिष्ट प्रमेयाचीं व्यक्त रूपें असतात असे आपणास आढळून येईल आमच्या घरांत अनेक प्रकारच्या मूर्तींची पूजा आम्ही करीत असतो यातील कियेक मूर्ती अगदीं वेड्या-वाकड्या आकाराच्या व बाह्यत अगदीं अर्थशून्य अशा भासतात, पण हीं सारीं वेदान्तप्रमेयांचीं मूर्तरूपें आहेत. अशा रीतीनें अत्यत महत्त्वाच्या प्रमेयाचा प्रवेश आम्हां लोकाच्या घरींदारीं झाला आहे. अशा रीतीनें आमच्या रोजच्या व्यवहारांत आलेल्या मूर्ती व चिन्हें हीं सारीं वेदग्रथातून आलीं आहेत. या चिन्हांबरोबर आणि मूर्तींबरोबर वेदान्तसिद्धाताचाही प्रसार होत होत ते जनतेच्या अगदीं खालच्या तळापर्यंत पोहोंचले आणि सामान्य व्यावहारिक रूपानें ते आतां आमच्याशीं अगदीं एकजीव होऊन राहिले आहेत.

वेदान्तग्रथांनतरचे महत्त्वाचे ग्रथ म्हटले म्हणजे स्मृती ह्या होत. स्मृति-ग्रथही ऋषिप्रणीत आहेत, तथापि त्यांचें प्रामाण्य श्रुतींच्या खालोखाल आहे. ख्रिस्ती लोकांना जसे बायबल अथवा महमदी लोकाना कुराण, त्याचप्रमाणें आम्हास स्मृती प्रमाण आहेत. स्मृती या निरनिराळ्या ऋषींनीं निर्माण केल्या आहेत ज्याप्रमाणें बायबल अथवा कुराण हीं त्या त्या विशिष्ट धर्मप्रवर्त-कांनीं निर्माण केलीं, त्याचप्रमाणें स्मृतीही निर्माण केलेल्या आहेत. परंतु त्यांचा अधिकार श्रुतींपेक्षां कमी दर्जाचा आहे. अखेरचें प्रामाण्य स्मृतींकडे

नसून श्रुतींकडे आहे. जर श्रुतींना असमत असे एखादें वचन स्मृतिग्रथांत असेल, तर त्याचा खुशाल त्याग करावा. अशा वेळीं स्मृतींची नियामक सत्ता सर्वथा नष्ट होते. निरनिराळया स्मृती निरनिराळ्या काळीं लिहिल्या गेल्या आहेत. त्याचप्रमाणें निरनिराळ्या काळीं निरनिराळया स्मृतींकडे लोकनियामकत्वाचा अधिकार असावा असेही उल्लेख सापडतात एखाद्या स्मृतीचा अधिकार सत्ययुगात, तर दुसरीचा त्रेतायुगांत, तिसरीचा द्वापारात आणि चौथीचा अधिकार कलियुगात चालतो. लोकव्यवहार कालेंकरून बदलतात आणि पहिली परिस्थिति जाऊन तिच्याजागीं दुसरी येते. व्यवहारांत अशा रीतीने बदल झाला म्हणजे चालीरीतींतही बदल होतो, आणि स्मृती या चालीरीतीच्या नियमनाकरिताच असल्यामुळें, त्यातही बदल व्हावा, हें नैसर्गिकच आहे. या मुद्याकडे आपण विशेष अवधान द्यावे, अशी मी आपणांस सूचना करतो. वेदान्ताचे सिद्धात कालस्थलातीत असल्यामुळें सर्वदा एकरूप असतात. त्यात कोणत्याही कालीं आणि कोणत्याही स्थलीं बदल होणें शक्य नाहीं. जीं तत्त्वें अखिल मानवजातीसच नव्हे, तर साऱ्या चराचर सृष्टीस व्यापून उरलीं आहेत, त्या मूलभूत तत्त्वावरच वेदान्तसिद्धांताची उभारणी झालो आहे. लक्षावधि वर्षापूर्वी जीवात्म्याविषयींचे अगर मुक्तीबद्दलचे जे सिद्धात होते तेच आज कायम आहेत; आणि लक्षावधि वर्षांचा काळ आणखी उलटून गेला तरी हे सिद्धात अबाधितच राहणार आहेत, पण धर्माचरण म्हणून जे विशिष्ट आचार आज आपण पाळतो, तेच लक्षावधि वर्षांनी पाळू हे मात्र शक्य नाहीं. आजचे धार्मिक आचार हे आजच्या परिस्थितीला अनुरूप असे आहेत लक्षावधि वर्षांनीं चालू परिस्थितीत केवढें रूपातर होईल हें कोणीं सागावें ? परिस्थितीचें रूपातर झालें कीं पूर्वाचार अवश्यमेव अननुरूप—नष्ट होणार, याकरितां स्मृतिवचनें ही त्या त्या कालापुरती मात्र खरीं आहेत कालातरानें त्यांची अनुरूपता नष्ट व्हावी यात नवल नाहीं. अमक्यानें अमुक प्रकारचें अन्न मात्र खावे अशी स्मृतीची आज्ञा त्या विशिष्ट कालापुरती मात्र योग्य असू शकेल, पण वातावरणातही कालातरानें बदल होत असल्यामुळें आणि व्यवहाराचें रूपही पालटत असल्यामुळे, त्या त्या कालास अनुरूप असा बदल भक्ष्याभक्ष्याच्या नियमांत करणें इष्ट आहे. याकरितांच निरनिराळ्या स्मृतींनीं निरनिराळ्या कालास अनुलक्षून विहिताविहित कर्मांचे

नियम सांगितले आहेत. आमच्या सध्याच्या परिस्थितींत व्यावहारिक नियमांची मांडणी बदलणें इष्ट असेल तर कोणी तरी महापुरुष येऊन हे कार्य करील; पण आमच्या धर्मतत्त्वांत कांडीचाही फरक करण्याचें सामर्थ्य कोणासही नाहीं, हें येथवर केलेल्या विवेचनावरून आपल्या लक्ष्यात येईल. तीं तत्त्वे त्रिकालाबाधित आहेत.

धर्मदृष्ट्या लोकव्यवहाराचें नियमन करणारें तिसऱ्या प्रतीचे साधन पुराण ग्रंथ हे होत 'पुराण पंचलक्षणम् ।' असे एक शास्त्रवचन आहे. याचा अर्थ पुराणग्रंथ पाच लक्षणांनीं युक्त असतात असा आहे. पुराणांत इतिहासाचा आणि सृष्टिरचनेचा अंतर्भाव होतो त्याचप्रमाणें अनेक प्रकारच्या गोष्टींनीं आणि देवतांच्या कथांच्या रूपाने तत्त्वज्ञानाचे सिद्धांतही त्यांत विशद केलेले असतात. वेदांतर्गन्त धर्माचे व्यावहारिक रूप सांगण्याकरिता पुराणरचना झाली आहे. परोक्ष धर्मतत्त्वे समाजाच्या अगदी खालच्या पायरीपर्यंत पोहोंचविण्याचें कार्य पुराणानीं केलें आहे वेदग्रंथाची भाषा अत्यंत प्राचीन आहे आणि वेदाचा काल कोणता असावा याचा वाद करता करता मोठमोठे पंडितही टेकीस आले आहेत. पुराणें हीं त्या त्या कालच्या व्यावहारिक भाषेत रचलीं गेलीं आहेत. पुराणग्रंथ पंडिताकरितां लिहिलेले नसून सामान्य प्रतीच्या व्यवहारी लोकाकरिता लिहिले गेले होते. सामान्य लोकाना तत्त्वज्ञानाचा विषय रूक्ष वाटत असल्यामुळे त्यातील तत्त्वे त्याच्या गळीं उतरविणें हे फार कठीण आहे याकरिता संतचरिताच्या अथवा राजाच्या आणि इतर पुरुषांच्या चरित्रांच्या रूपानें आणि इतिहासातील प्रसंगाच्या कथनानें ही तत्त्वे सामान्य जनतेच्या हृदयात ठसविता येतात. त्रिकालाबाधित सिद्धांतांचें ग्रहण सामान्य लोकास व्हावे म्हणून हा मार्ग पुराणलेखकानीं काढला.

यानंतर तंत्रग्रंथाचा उल्लेख करणें अवश्य आहे. हे ग्रंथ कांही बाबींत पुराणासारखे आहेत. त्यापैकीं काहींत कर्मकांडांतर्गत होमहवनादि क्रियाकलापाचें पुनरुज्जीवन करण्याचा यत्न केल्याचें दिसून येतें

हिंदु धर्मग्रंथ या सदरात या साऱ्या ग्रंथपरंपरेचा अंतर्भाव होतो. ज्या मानवकुलानें स्वतःच्या अंगच्या बहुतेक कर्तबगारीचा व्यय धर्म आणि तत्त्वज्ञान यांचाच अभ्यास करण्यामध्यें कित्येक शतकें करून इतक्या प्रकारचे

अनेक धर्मग्रंथ निर्माण केले, त्या मानवकुलात अनेक मतें आणि अनेक पंथ प्रचलित असावे हे अगदीं रास्तच आहे. भरतभूमीतील आर्यांची शाखा हा अभ्यास किती शतकें अथवा सहस्रके करीत आहे, हें कोणींही अद्यापि निश्चित केलेलें नाहीं. वास्तविक पाहता हजारों वर्षांच्या वाढीत आणखीही शेकडों अथवा हजारों पंथ निर्माण व्हावयास पाहिजे होते, ते कां झाले नाहींत याचेच मला मोठे नवल वाटते. या निरनिराळ्या पंथांच्या मतात भेद कोणते आहेत याचें सामान्य दिग्दर्शन करण्यासही सध्या आपणांस वेळ नसल्यामुळें केवळ मूलतत्त्वाच्या दृष्टीनेंच या विषयाचा आपण विचार करूं.

सृष्टिरचनेचा विचार हा अर्थातच प्रथम केला पाहिजे. ज्याला अर्वाचीन भाषेत निसर्ग ( Nature ) म्हणतात, त्याच अर्थी प्रकृति अथवा माया अशा शब्दांची योजना आमच्या प्राचीन तत्त्ववेत्त्यानीं केली आहे. प्रकृति ही अनादि असून अनंत आहे ही सृष्टि अमुक एका दिवशीं निर्माण झाली असें नाही ईश्वर नावाचा कोणी एक प्राणी आला आणि त्यानें जग घडले, आणि नंतर तो खुशाल झोंपी गेला असे नाही. कारण असें होणे ही गोष्ट मूलतःच अशक्य आहे ज्या मूलभूत शक्तीमुळे सृष्टि निर्माण होते, ती शक्ति सदैव अखडरूप आहे ती शक्ति—अथवा पाहिजे तर परमेश्वर म्हणा—सदैव कार्यरत आहे भगवान् श्रीकृष्ण गीतेत म्हणतात " उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यात् कर्मचेदहम्।" म्हणजे 'जर मीं कर्म केलें नाहीं तर सर्व लोक नाश पावतील.' आपल्या भोवतीं विश्वशक्तीचे कार्य अहर्निश चालू आहे जर हे कार्य क्षणमात्रही बद पडलें तर सव विश्वरचनेचा एकदम विध्वस होईल. विश्वशक्तीचें कार्य बंद असण्याची वेळ या विश्वात केव्हांही नसते. तिचे कार्य प्रत्येक क्षणीं सुरू आहे. असें आहे तरी काहीं मर्यादित कालानतर प्रलय होऊन विश्व आपल्या अव्यक्तरूपास काहीं काळ परत जाते. पूर्वी कशाचेंही अस्तित्व नसता विश्व नवीन उत्पन्न होनें असा आमचा सिद्धात नाहीं. याकरितां इंग्रजींतील Creation हा शब्द आमचा सिद्धात बरोबर रीतीनें व्यक्त करीत नाहीं. या इंग्रजी शब्दात नास्तित्वातून अस्तित्व उत्पन्न झालें अशा अर्थाचा ध्वनि आहे. आमच्या दृष्टीनें ही कल्पना अशास्त्र आहे. या साऱ्या विश्वाला नेहमींच अस्तित्व आहे कांहीं वेळ त्याच्या स्थूल रूपाचें सूक्ष्म रूपात रूपांतर होतें व कांहीं काळ तें अगदीं निष्पदावस्थेंत असते. त्या स्थितींत, जणूकाय, तें

विश्रांतीच घेत असतें. त्यानतर या निष्पदावस्थेचा भग होऊन तें पुन्हा आपल्या जडरूपानें व्यक्त होते. तें व्यक्त होण्याची क्रिया चालू झाली म्हणजे पूर्वकल्पाप्रमाणेंच उत्क्रातीच्या सर्व क्रिया पुन्हां चालू होतात. त्यावेळीं पुन्हा तेच नानाविध आकार प्रतीत होतात अशा रीतीनें व्यक्त आणि अव्यक्त या अवस्थांचें राहाटगाडगे अखड चालू आहे. समुद्रावर ज्याप्रमाणें क्षणोक्षणीं लाटाची घडामोड सुरू असते, त्याचप्रमाणें विश्वामध्येंही घडामोड एकसारखी सुरू आहे. देश-काल-निमित्त या उपाधींचा अतर्भाव या प्रकृतींतच होतो याकरिता विश्व अमुक वेळी ‘ उत्पन्न ’ झालें असें म्हणणें अशास्त्र, अतएव मूर्ख-पणाचे आहे ज्याप्रमाणें ते कधीं उत्पन्न झालें असें नाहीं, त्याचप्रमाणें त्याचा अत्यत नाश कधीं तरी होईल असेंही नाहीं. याकरितां ज्या वेळीं जगाचा ‘ आरभ ’ अगर ‘ शेवट’ असे शब्द आपल्या तात्त्विक वाङ्मयात आढळतील त्या वेळी कल्पारभ अथवा कल्पात इतका त्याचा अर्थ समजावा. यापलीकडे दुसरा कोणताही अर्थ त्या शब्दांस नाहीं

हें विश्व कोणी उत्पन्न केलें, या प्रश्नास इग्रजीत उत्तर द्यावयाचें म्हटले तर ते God या शब्दानें देता येईल पण इग्रजींतील God हा शब्द आणि आमचा परमेश्वर हा शब्द यात पुष्कळ अतर आहे, हें ध्यानात ठेवलें पाहिजे. आमची कल्पना व्यक्त करण्यास इग्रजी भाषेत दुसरा याहून चागला शब्द व नाही आमच्या परिभाषेतील शब्द ‘ ब्रह्म ’ हा आहे. हे सर्व विश्व ब्रह्मामुळे व्यक्तदशेला येते ब्रह्म हे अनत, अविकार्य, सदैव चिद्रूप, सर्वसमर्थ, सर्वज्ञ, सर्वव्यापी, निराकार आणि अविभाज्य असें आहे ब्रह्मामुळेंच विश्वाला शक्ति आहे. जर सदैव एकरूप असणारें ब्रह्म विश्वाचें कारण आहे आणि जर त्यामुळेंच विश्वाला प्रत्यक्षावस्था आहे, तर त्यात नानाविध भेद आणि कमीअधिक-पणा याचा प्रत्यय का येतो ? असा प्रश्न येथें सभवतो विश्वात असमता असल्याचा प्रत्यय आपणास पदोपदीं येतो. एखादा मनुष्य जन्मतःच सुखी असतो. तर दुसरा जन्मतःच दु.खी असतो, एखादा श्रीमत असला तर दुसरा दरिद्री असतो. अशा प्रकारची असमानता सर्वत्र भरली असल्याचें आढळून येते, पण ही असमानता येथेंच संपते असेंही नाहीं. प्रेममय ईश्वराच्या राज्यांत निर्दय-पणाही आढळून यावा हें आश्चर्य नव्हे काय ? दुःखाचे सुस्कारे आणि रुद-नाचे तारस्वर सर्वत्र ऐकू यावे, असे कां ? एक प्राणी उठतो तो दुसऱ्याला,

फाडून खातो मानवी प्राण्यातही याच पशुवृत्तीचें अनुकरण चालू आहे. दुसऱ्याचें नुकसान आणि स्वतःचा फायदा करण्याची संधि प्रत्येकजण पाहत असतो. चढाओढ, दुष्टपणा, भीति आणि रुदनस्वर याचें साम्राज्य सर्वत्र आणि सर्वकाळ चालू असल्याचा प्रत्यय येतो दयामय परमेश्वरानेंच जर ही सृष्टि निर्माण केली असली तर ही त्याची ' दया ' क्रौर्याहूनही अधिक वाईट म्हटली पाहिजे हे क्रौर्य खरोखर आमच्या मानवी कल्पनेपलीकडचें आहे. कितीही भयकर क्रौर्याची कल्पना आपण केली तरी ती या क्रौर्यापुढे फिकी पडेल. अशा प्रकारच्या प्रश्नपरपरेस आमचा वेदान्त असें उत्तर देतो कीं, ही असमता आणि अहमहमिका हीं परमेशनिर्मित नाहींत. तीं तुमचीं तुम्हीच निर्माण केलीं आहेत ही स्थिति निर्माण करणारे ब्रह्मदेवाचे अवतार तुम्हीच ! आकाशातून पाण्याचा वर्षाव मेघ करूं लागले म्हणजे सवत्र समान दृष्टीनें ते जलदान करतात. पण ज्या जमिनीची मशागत चांगली झाली असेल तिलाच या पाण्यापासून फायदा होतो. खडकाळ अथवा पडीत जमिनीला त्यापासून काय फायदा होणार ? आता अशा प्रकारच्या जमिनींत पीक आलें नाहीं तर याचा दोष त्या मेघाकडे आहे काय ? दोन निरनिराळ्या जमिनींतून निरनिराळ्या प्रकारचीं फळे प्राप्त व्हावीं, यासाठीं मेघाने कोणतीही खटपट केलेली नव्हती या भेदाचा आरोप मेघावर कोणत्याही प्रकारें लादता येत नाहीं. त्याचप्रमाणें परमेश्वराची दया सर्वत्र समप्रमाणानें वाटली गेली असून तींत भेद आणि असमता दिसून येते, ती आपण मनुष्यानीं निर्माण केलेली आहे आता यावर असा एक प्रश्न उद्भवतो कीं, जी असमता जन्मादारभ्य दिसून येते, तिला कारण कोण ? चालू आयुष्यात काही कुकर्म अथवा सत्कर्म त्याच्या हातून घडलेलें नसते हें खरें, पण चालू आयुष्य हे पूर्वजन्मार्जित कर्माची फलभूमि आहे.

यानतर सर्व पौर्वात्य धर्मांची ज्याबद्दल एकवाक्यता आहे, असा दुसराही एक मुद्दा आहे जीवात्मा अनत आहे याबद्दल बौद्ध, जैन आणि हिंदु तत्त्ववेत्ते यांची एकवाक्यता आहे. जीवात्मा हा नास्तित्वांतून नवीनच उत्पन्न झाला असे नाहीं. कारण तसें होणें शक्यच नाहीं, आणि नास्तित्वातून उत्पन्न होणाऱ्या असल्या जीविताचा उपयोग तरी काय ? ज्याला आरभ आहे, त्याला शेवट निश्चयानें येणारच कोणत्याही कार्याला आरंभ झाला कीं ,

त्याचा शेवटही त्याच वेळीं निश्चित होतो. आमचें जीवित आज सुरू झालें असें समजलें, तर उद्या त्याचा शेवटही होणारच आणि तो शेवट म्हणजे पुन्हा नास्तित्व अथवा शून्यावस्था. नास्तित्वातून अस्तित्व उत्पन्न होणें अशक्य असल्यामुळें चालू जीवितापूर्वीही आम्हाला जीवित असलेंच पाहिजे हें अगदी उघड आहे हा सिद्धात आतां इतका उघडपणें सिद्ध झाला आहे की, त्यावर अधिकच चर्चा करण्याचे यत्किंचितही प्रयोजन उरलेलें नाही जगातील दृश्य पदार्थांच्या शोधाच्या मागें लागलेली आधुनिक भौतिक शास्त्रे आमच्या जुन्या पुराण्या शास्त्रातील गोष्टी प्रत्यक्षरीत्या सिद्ध करू लागलीं आहेत. अनत अशा पूर्वकालातील कर्मानुरोधानेंच आपणापैकी प्रत्येकाची उत्पत्ति चालू काळी झाली आहे, हे आपणास अवगत आहेच. मूल जन्मास येते ते अगदीं कोरें करकरीत असते असे नाहीं. ते निर्विकार आहे, शुद्ध आहे, अशा प्रकारच्या कल्पना कवींनीं कराव्या आणि वाटल्यास त्यावर काव्येही रचावी. पण त्या कल्पना निरकुश कवीनाच शोभण्यासारख्या आहेत ! शास्त्रज्ञास त्याचा काय उपयोग आहे ? मूल जन्मास येते त्या वेळीं हजारो बऱ्यावाईट कर्मफलास बरोबर घेऊन येते व त्या त्या फलाचा उपभोग त्याने घेतलाच पाहिजे असें शास्त्रज्ञ म्हणणारच जगात सर्वत्र असमता आढळून येते याचें कारण हेच. कर्माचा हा अनुल्लघनीय कायदा आहे आपणापैकी प्रत्येकाबरोबर त्याचें कर्मफल आलेले आहेच अमुक गोष्ट अमक्याच्या नशिबाने घडली, असल्या प्रकारची भाषा आपण नित्य ऐकतों. पण ही भाषा अशास्त्र आणि मूर्खपणाची आहे. कर्माचा कायदा मोडण्यास समर्थ असा कोणीही जन्मास आलेला नाहीं त्या कायद्याची कैची ज्याच्या गळ्यात नाही असा एकही प्राणी नाहीं. मग असल्या पक्क्या बदोबस्तातून नशीब आपली वाट काढू शकेल ही गोष्टच बोलावयास नको. याकरिता एखादे महद्दु ख प्राप्त झालें असतां परमेश्वराच्या नावानें अथवा गरीब बिचाऱ्या नशिबाच्या नावाने खडे फोडणें हे बालिशतेचे लक्षण आहे. जें जे सुखदु ख आपणास प्राप्त होते ते तें आपल्याच कर्माचें फळ असते. यात दुसऱ्या कोणास नावे ठेवण्यास यत्किंचितही जागा नाही आपला जो कांहीं चालू जीवनक्रम असेल त्याचें कारण आपणच आहो म्हणजे कारण आणि कार्य हीं दोन्ही आपणच आहों. जर कारण आणि कार्य ही दोन्ही आपल्याच हातीं आहेत, तर पाहिजे ते

करण्यास आपण मुखत्यार आहों—स्वतंत्र आहों—असें म्हणावयास काय हरकत आहे? जर आज मी सुखी असेन तर त्याचें कारण मीच आहें. यावरून, माझी मर्जी असल्यास मला सुखी होतां येईल, हे सिद्ध होत नाहीं काय? जर मी अशुद्ध असेन तर त्याचें कारणही मीच आहे यावरूनच माझी इच्छा असल्यास मला पवित्र होता येईल असें सिद्ध होते. मानवी इच्छा ही परिस्थितीपलीकडची आहे परिस्थिति तिला बद्ध करूं शकत नाहीं ती बद्ध होते, तेव्हा ती परिस्थितीनें बद्ध होत नसून स्वेच्छेनेंच बद्ध होते. ही आमची शक्ति अशी प्रचंड आहे कीं, हिच्या हुकुमापुढें जगातील सर्व प्रकारच्या कार्यांनीं मान वाकविलीच पाहिजे—हिच्यापुढें बद्यागुलामासारखे हात जोडून त्यांनीं उभें राहिलेंच पाहिजे.

आता यापुढे प्रश्न असा उद्भवतो कीं, अशा प्रकारच्या ह्या जीवात्म्याचे स्वरूप तरी कोणत्या प्रकारचें आहे? जीवात्म्याचें स्वरूप समजल्याशिवाय परमात्म्याचें स्वरूप समजणार नाहीं. या सृष्टीचा अभ्यास करून तिच्याद्वारें तिच्या पलीकडल्या तत्त्वाचें ओझरतें दर्शन तरी घ्यावें म्हणून आजवर कित्येकांनीं धडपड केली आहे. अशी धडपड करणारे हिंदुस्थानातच होते असें नाहीं, तर पाश्चात्य देशांतही असे वीर पुष्कळ होऊन गेले व आहेतही, पण या सृष्टीचें—प्रकृतीचें—रूप असें मायावी आहे कीं, तिच्या अभ्यासास सुरुवात केल्याबरोबर ती एक एक खोडा आपल्या पायात अधिकच अडकवीत जाते; मग परमतत्त्वाचें दर्शन होणें तर लांबच राहिलें! सृष्टीच्या अभ्यासास सुरुवात करण्याच्या आधीं या परमतत्त्वाचें दर्शन घडावे अशी जी थोडी इच्छा आपल्या मनात असते, तीही नंतर मावळते! सृष्टीचा अभ्यास करणें हा तत्त्वदर्शनाचा मार्गच नव्हे. अंतःकरण शुद्ध करून जीवात्म्याच्याद्वारा आपण गेलो, तरच परमात्मदर्शन आपणास शक्य आहे. परमात्म्याबद्दल बाह्यसृष्टि आपणांस काहींही शिकवू शकत नाहीं या मार्गानें जाऊन अनंताचा शोध कधींही लागणार नाहीं. अंतर्गत अभ्यास हा एकच मार्ग, या कार्याकरिता आपणास उपलब्ध आहे. अतःसृष्टीच्या अवलोकनानें आणि अभ्यासानें जीवात्म्याचा शोध आपण लाविला म्हणजे परमात्ममार्ग आपोआप सांपडेल. जीवात्म्याचें स्वरूप काय, याबद्दल निरनिराळ्या वैदिक पंथांचीं निरनिराळीं मते आहेत, तथापि काहीं बाबींत त्यांची एकवाक्यताही

आहे. जीवात्म्याला आदि नाहीं व अंतही नाहीं याबद्दल आम्हां सर्वांची एक-वाक्यता आहे. तसेंच तो स्वभावतःच अमर्त्य आहे, याबद्दलही आमचा वाद नाहीं त्याचप्रमाणें सर्व प्रकारच्या शक्तींचें, मंगलाचें, पावित्र्याचें, सर्वशक्तिमत्त्वाचे आणि सर्वसाक्षित्वाचें बीज त्याच्या अंतरंगांत आहे, याबद्दलही आम्हां सर्वांत मतैक्य आहे हा शेवटचा सिद्धांत अत्यंत महत्त्वाचा आहे, हें अवश्य लक्ष्यात ठेवण्यासारखे आहे. प्रत्येक मनुष्यांत आणि प्रत्येक प्राण्यांतसुद्धा सर्वसाक्षित्वाचें आणि सर्वशक्तिमत्त्वाचें बीज आहे. एखादा प्राणी मोठा असला आणि दुसरा लहान असला, आणि तिसरा दुष्ट असला अथवा चौथा अशक्त असला तरी त्या सर्वांत हे बीज आहेच. त्यांत जो फरक बाह्यत दिसतो त्याचें कारण आत्मरूपांतील फरक हें नव्हे, तर ज्या उपाधीमुळें हें आत्मरूप व्यक्त झालें आहे. त्या उपाधींतील फरक हें या दृश्य फरकाचें कारण आहे जें आत्मबीज माझ्या ठिकाणीं आहे, तेंच एखाद्या क्षुद्र कीटकाच्या ठिकाणींही आहे. त्याच्यांत व माझ्यांत जो भेद बाह्यत. दिसतो, त्याचें कारण बाह्योपाधिभेद हेच आहे. वस्तुतः तो क्षुद्र प्राणी व मी यांत कांहीं फरक नाहीं. त्याचा आत्मा आणि माझा आत्मा हे एकरूप असल्यामुळें त्या किड्याशींही माझें बंधुत्वाचें नाते आहे आमच्या आर्यभूमींत निर्माण झालेल्या तत्त्वरत्नातील हा कोहिनूर आहे. सर्वत्र बंधुभाव असावा असें जेव्हा युरोपीय पंडित म्हणतात, तेव्हां फक्त मनुष्यजातीबद्दलच ते बोलत असतात पण विश्वातील प्रत्येक वस्तु दुसरीशीं बंधुभावानें जोडली गेली आहे, ही कल्पनाही त्यास शिवत नाहीं हत्तीपासून तो क्षुद्र मुंगीपर्यंत सर्व दृश्य देहात एकच आत्मरूप विलसत असल्यामुळें दृश्यभेद खोटा आहे, हें आमच्या आर्यमातेनेंच जगास प्रथम शिकविलें.

आमच्या देशात गरीबदुबळ्यांबद्दल, पशुपक्ष्याबद्दल आणि एकंदरीनें सर्व वस्तुजाताबद्दल जी दयेची भावना सर्वसामान्यपणें आढळून येते, तिचें मूळही हेच तत्त्व होय. हें तत्त्व हिंदु लोकांच्या हाडीमासीं मुरलेलें आहे, आत्मस्वरूपाबद्दल जो कांहीं कल्पनासमूह आपल्या लोकात सर्वत्र आढळतो त्यांत हेंही एक तत्त्व आहे.

आतां यापुढें परमात्मरूपाबद्दल विचार करणें इष्ट आहे, तथापि जीवात्म्यासंबंधीं युरोपात ज्या कल्पना प्रचलित आहेत, त्याबद्दल थोडी सूचना आप-

णास करणें इष्ट आहे. इंग्रजी भाषेचा अभ्यास जे करीत असतील ते Soul आणि Mind या शब्दानीं अनेक वेळां फसण्याचा सभव आहे, याकरितां ही सूचना आवश्यक वाटते. आपल्या भाषेतील 'आत्मा' या शब्दानें जो अर्थ व्यक्त होतो, तो इंग्रजींतील Soul या शब्दानें व्यक्त होत नसतो. आपण ज्या वस्तूला मन या सज्ञेने ओळखतों तीच वस्तु इंग्रजीत Soul या सज्ञेनें ओळखली जाते जीवात्म्याच्या वास्तविक स्वरूपाबद्दल पाश्चात्यास योग्य कल्पना फार थोड्या वर्षांपूर्वी झाली, आणि ती कल्पना आमच्या सस्कृत तत्त्वग्रथाच्या द्वारेंच झाली आहे. शरीर ही प्रत्यक्ष दृश्य वस्तु असून त्यापलीकडे मन आहे मन अदृश्य असलें तथापि मन म्हणजे आत्मा नव्हे. मन हें अत्यत सूक्ष्म परतु जड पदार्थांचेंच बनलें आहे. लिगदेह अथवा सूक्ष्म शरीर ज्याला म्हणतात त्यात मनाचा अतर्भाव होतो पुन:पुन्हां होणारीं जन्ममरणे हा या सूक्ष्मशरीराचा धर्म आहे. या दोन देहापलीकडे आत्मा आहे त्याला इंग्रजींत प्रतिशब्द द्यावयाचा असल्यास Soul किंवा Mind यापैकी एकही शब्द अर्थद्योतक होणार नाही. याकरिता तेथे आत्मा याच शब्दाची योजना करणे युक्त आहे. पाश्चात्य तत्त्वज्ञ अलीकडे Self (स्वत्व) या शब्दाची योजना याच अर्थी करू लागले आहेत. शब्द कोणताही असला तथापि ध्यानात धरण्याचा मुख्य मुद्दा हाच कीं, जड देह अथवा सूक्ष्म देह या दोहोंपासून आत्मा अगदीं भिन्न आहे. आत्मा निरनिराळे जड देह धारण करतो, तेव्हा सूक्ष्म देह त्याजबरोबर असतो. मनुष्य पूर्ण ज्ञानी झाला म्हणजे आत्मा आणि सूक्ष्म देह याचा सबध सुटतो, आणि हा सबध सुटला म्हणजे जन्ममरणाचे फेरेही बद होतात. मग त्याची मर्जी असेपर्यंत, त्याने वाटल्यास सूक्ष्म देह धारण करावा अथवा त्याचा सर्वथा त्याग करून सदैव केवलरूप रहावे जीवात्म्याचें अतिम साध्य मुक्ति हेच आहे. मुक्ति हेंच अतिम साध्य आहे, असें म्हटलें म्हणून इतर धर्माप्रमाणें स्वर्गनरकादि कल्पनाचा उदय आमच्या धर्मांत झाला नव्हता असें नाही. इतर धर्माप्रमाणेंच याही कल्पना आमच्या धर्मांत रूढ आहेत, तथापि स्वर्ग अथवा नरक यातील वास चिरकाल टिकणारा आहे, ही कल्पना मात्र आमच्या इकडे कधींही अस्तित्वात आली नाहीं. कारण या वस्तूच्या चिरस्थायित्वाची कल्पना ही मुळातच अशास्त्रीय आहे. या वस्तू चिरस्थायी होऊं शकणारच

नाहींत. स्वर्गाबद्दल जो कांहीं कल्पनासमूह आपल्या चित्तांत असेल, त्याचें सूक्ष्मदृष्टया परीक्षण केलें तर शेवटीं काय आढळून येते ? आपल्या याच जगाची सुधारून वाढविलेली आवृत्ति म्हणजे स्वर्ग, पण असला स्वर्ग खरोखर अस्तित्वात असेल तर आत्म्याच्या मुक्तीला तो साधक नसून बाधक मात्र निश्चयानें होईल. स्वर्गामारख्या अनेक प्रकारच्या लोकाची कल्पना आपल्याकडे प्रचलित आहे फलाच्या अपेक्षेनें ज्यानी सत्कर्माचे आचरण केलेले असतें, अशा मनुष्यांना देहपातानंतर देवयोनींत जन्म प्राप्त होतो. इद्रादि देव हे याच प्रकारच्या प्राण्यापैकीं होत. पूर्वजन्मीं ही सारीं सामान्य मनुष्येच होतीं, परतु त्यांनीं आचरलेल्या सत्कर्मांच्या योगानें त्याना देवयोनींत जन्म मिळाला इद्रादि अनेक देवांच्या ज्या कथा आपण पुराणांतरीं वाचतो, ते सारे देव एकएकटेच आहेत—अथवा होते—असें नाहीं. हीं नावे व्यक्तीचीं दर्शक नसून स्थानाचीं दर्शक आहेत एखादा जीवात्मा सत्कर्मानीं इद्राच्या स्थानीं जातो आणि नियत कालापर्यंत इद्राची पदवी पावतो त्याचे पूवजन्मार्जित पुण्यकर्माचें फळ भोगून झाल्यानतर तो पुन्हा मनुष्ययोनीत जन्मास येतो देवलोकांत सुखप्रद वस्तूचा भरणा मोठ्या प्रमाणावर असला तरी मानवी देहाची योग्यता देवदेहाहून नि.सशय मोठी आहे. देवलोकी मिळणाऱ्या सुखवस्तूचा त्याग करून मुक्ति मिळविणे अशक्य आहे असें नाहीं तथापि तेथील वस्तुजातींचा मोह येथल्या वस्तूपेक्षा अधिक अनिवार्य असल्यामुळें, देवलोकी फसगत होण्याचा संभव मात्र अधिक आहे. तेथील सुखद वस्तूच्या चरकांत सापडलेला देव पुण्यक्षय होऊन शुष्क झाला म्हणजे पुन्हा मानवलोकीं जन्म घेतो. मनुष्ययोनी ही कर्मभूमि आहे. येथें बरीं वाईट फळें समसमान स्थितीत असतात. यामुळें सुखाऱ्या लाटेबरोबर वाहत जाऊं पाहणाऱ्या प्राण्यास वाटेत एखादा दु.खाचा खडकही लागतोच, आणि त्यामुळें दिशाभूल होण्याचा संभव कमी होऊन, अखेर मुक्तिमार्ग सापडण्याचा संभव वाढतो याकरिता स्वर्ग हे आपलें साध्य नव्हे हे अवश्य लक्ष्यात ठेवलें पाहिजे आपलें साध्य मुक्ति हे एकच आहे याहून दुसरी कोणतीही अवस्था आपलें अखेरचें साध्य होऊ शकत नाहीं आपण कसल्याही प्रकारचीं सुखें देणाऱ्या स्वर्गलोकात गेलो तरी आमच्या कपाळची गुलामगिरी चुकणार नाहीं. हजारों वर्षें तुम्ही राज्यपद भोगलें तरी त्याचा

उपयोग काय? जोंपर्यंत तुम्हाला देह आहे, जोपर्यंत देहसुखाच्या इच्छेनें तुम्ही जिभल्या चाटीत आहा, तोपर्यंत कालाची मर्यादा तुम्हास आहे, आणि जोंपर्यंत स्थलानें तुम्ही बद्ध आहा, तोंपर्यंत गुलामगिरीच्या शृखला तुमच्या पायात असणारच याकरिता बाह्य अथवा आतर अशा दोन्ही प्रकारच्या देहबंधनातून सुटणें, हेच आपलें अखेरचें साध्य आहे. या साऱ्या सृष्टीत कोणत्याही प्रकारचे बधन आम्हास असता उपयोगी नाहीं. या सृष्टीनें आमच्या पायापाशीं राहिले पाहिजे. सृष्टीतील असंख्य वस्तूस तुडवून आपण पलीकडे गेलो तरच मुक्तीचा मार्ग आपणास सांपडेल, आणि त्याच वेळीं आपल्या सपूर्ण तेजानें आपण प्रकाशू. अशा स्थितीत पुन्हा जन्म घेण्याचे नावही नको. जन्म नसल्यावर त्याचा मित्र मृत्यु तरी कोठून येणार? अमुक एक वस्तु सुखद ही भावना मावळल्यावर अमुक वस्तु दु ख देणारी ही भावना तरी कोठून येईल? सुखाची आणि दु.खाची समाप्ति येथे बरोबरच होते येथे शुद्ध मगलरूपाचा मात्र अनुभव असतो ज्याला कधी शेवट नाहीं आणि जे अखिल दृश्याच्या पलीकडे आहे, ते सदैव मगलरूप हेच.

"न मृत्युर्न शंका न मे जातिभेद । पिता नैव मे नैव माता च जन्म ।
न बधुर्न मित्रं गुरुर्नैव शिष्य । चिदानंदरूप शिवोऽहं शिवोऽहम् ॥"

असें म्हणण्याजोगी स्थिति हेंच आपले अतिम साध्य आहे

जीवात्म्याच्या ठिकाणी लिंगभेद नाहीं. अमुक आत्मा पुरुष आणि अमुक स्त्री, असा भेद आत्म्याच्या ठिकाणी सभवत नाही लिंगभेद हा फक्त देहाचे ठिकाणीं मात्र आहे. याकरिता आत्म्याबद्दल बोलावयाचें म्हटलें म्हणजे तेथे लिंगभेदानें बोलणें शक्यच नाहीं ही भाषा फक्त देहभेदाचीच दर्शक आहे. त्याचप्रमाणें वयोमानादिकाच्या कल्पनाही आत्म्याच्या ठिकाणीं संभवत नाहीत. आत्मा प्रथम बाल अथवा तरुण असून नतर तो वृद्ध झाला; अशा प्रकारची भाषा त्याजबद्दल संभवत नाहीं. आत्मा सदैव एकरूप असतो. अशा प्रकारचा आत्मा शरिराने व दुसऱ्या अनेक प्रकारच्या उपाधींनी बद्ध कां झाला? या प्रश्नाला आमच्या श्रुतीनी एकाच शब्दानें उत्तर दिलें आहे तो शब्द 'अज्ञान' हाच अज्ञानामुळेंच आत्मा बद्ध झाला आहे. "सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि" अशी श्रुति आहे. ज्ञानरूप नौकेच्या साहाय्यानेंच या मायानदीचें परतीर आपणास गाठतां येईल. हें ज्ञान मिळविण्याचा राजमार्ग भक्ति

हाच होय. परमेशाचें आराधन करणें, आणि प्राणिमात्र हें ईश्वराचेंच वसतिस्थान आहे असा दृढनिश्चय सदोदित कायम ठेवणें, हाच ज्ञानप्राप्तीचा राजमार्ग आहे. सर्व प्राण्याच्या अंतर्यामीं एकाच आत्म्याचें वास्तव्य असल्यामुळे प्राण्याची शरीरें हीं देवळेंच आहेत, असें म्हटलें पाहिजे. ही भक्ति अत्यंत दृढ झाली म्हणजे ज्ञानरवीचा उदय होतो, आणि त्यायोगें अज्ञानतिमिराचा नाश होऊन जीवात्मा मुक्त होतो. परमेश्वरस्वरूपाविषयीं श्रुतींत दोन प्रकार आढळतात. परमेश्वर साकार आहे हे एक रूप, आणि तो निराकार आहे हे दुसरे रूप परमेश्वर हा या जगाचा निर्माता, संरक्षणकर्ता आणि संहारकर्ता आहे. तसेच तो विश्वाचा शास्ता आणि पिताहि आहे तो आणि त्याचे भक्त हे एकरूप होऊ शकणार नाहीत, याकरितां परमेश्वरस्वरूपाच्या अत्यंत संनिध वास हीच मुक्ति. साकार परमेश्वराबद्दलच्या तत्त्वाचे हे अगदीं थोडक्यात दिग्दर्शन केलें आहे यानंतर दुसऱ्या प्रकारचें रूप म्हणजे निराकार रूप हे होय. साकार रूपाचें वर्णन करताना ज्या विशेषणाचा उपयोग केला आहे, तीं सर्व विशेषणें या स्वरूपवर्णनात अयुक्त होतात. तीं सर्व विशेषणे तर्कशास्त्राशीं विसंगत असल्यामुळें सर्वदा त्याज्य ठरतात. सर्वत्र एकरूपच भरलेलें आहे असा अंतिम सिद्धांत असल्यामुळें तो सर्वज्ञ आहे हे म्हणणें व्यर्थ आहे, कारण ज्ञान हा पदार्थ मानवी मनातून निर्माण झाला आहे. परमेश्वर विचारवान् प्राणी आहे असेंही म्हणता येणार नाहीं; कारण विचार हे फक्त अपूर्णाच्या ठिकाणीच संभवतात. जेथे कसल्याही गरजेची भावना नाही, तेथे विचार तरी कशाचा आणि का उद्भवावा? तो सदसद्विवेकी आहे असेंही म्हणता येणार नाहीं, कारण सत् आणि असत् ही भेददृष्टि असणे हें स्वातंत्र्याचें लक्षण नव्हे. तो विश्वनिर्माता आहे असेंही म्हणता येणार नाहीं, कारण विकृतीवाचून निर्माण करण्याची क्रियाच संभवत नाहीं. कर्म करणें हे विकृतीचे द्योतक आहे. आशा अथवा इच्छा याचा संभव प्रथम झाल्यावाचून कर्म करणें संभवत नाही इच्छापूर्ति हें कर्माचें एकच साध्य आहे ज्याला कशाचीही इच्छा नाहीं त्यानें कर्म तरी का करावें? ‘ मला कशाची तरी गरज आहे ’ ही भावनाच मनुष्याला कर्मरत करते, पण परमेशाच्या ठिकाणीं ही भावना संभवण्यास कांहीही कारण नाहीं, आणि या भावनेच्या अभावीं कर्मप्रवणता असणेही शक्य नाहीं. श्रुतींत परमेश्वराबद्दल बोलतांना ‘ तो ’ या सर्वनामाच

उपयोग केला नसून 'तें' याचा उपयोग केला आहे हें विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखे आहे; कारण 'तो' हे सर्वनाम पुरुषवाचक आहे आणि पुरुष अथवा स्त्री अशा लिंगभेदानें परमेश्वराचा निर्देश करता येत नाहीं. यामुळें 'तो' या सर्वनामाचा उपयोग केला असतां लिंगभेदाचा मिथ्यारोप परमेश्वरावर केलासे होईल ज्या मतानें सर्वत्र या 'ते' चाच उपयोग केला आहे व या 'ते' च्या विवरणार्थच अनेक ग्रंथ निर्माण केले आहेत, त्याला अद्वैतमत असें नाव आहे.

आता या निराकाराशीं आम्हां मनुष्याचे नाते काय आहे, याचा विचार केला पाहिजे त्याचे आणि आमचें नातें इतकेंच की तो आणि आम्ही वस्तुतः एकरूपच आहो—एकच आहों. सर्व विश्वाचें अधिष्ठान तोच असल्यामुळे आम्ही मनुष्यें हीं त्याचींच अनेक व्यक्त रूपें आहो. या अनत निराकाराशीं आम्ही एकरूप नाहीं ही भावना—हे अज्ञान—सर्व प्रकारच्या दु:खांच्या मुळाशीं आहे. या रूपाशीं आपण एकरूप आहों असा अनुभव होणे याचेच नाव मुक्ति. अशा प्रकारचीं दोन स्वरूपवर्णनें आमच्या धर्मग्रथात आढळून येतात.

या दोन मतांचे परीक्षण करण्याची आणखीही एक दृष्टि आहे. विवेचकबुद्धीच्या कसोटीला उतरेल अशा प्रकारची नीतिसिद्धांतपद्धति आपणांस तयार करावयाची असेल, तर ही गोष्ट अद्वैतसिद्धाताच्या साहाय्यावांचून करतां येणार नाही. आतांच ज्या निराकार स्वरूपाचें वर्णन आपण केलें त्याजविषयींचे प्रतिपादन कबूल केल्यानतर नीतिसिद्धाताची श्रेणी बाधता येईल 'स्वतःप्रमाणेंच तू आपल्या शेजाऱ्यावरही प्रीति कर' हे सत्य अत्यत प्राचीन कालापासून सर्व देशांत सागण्यांत आलें आहे. आमच्या देशांत हेच सत्य याहून थोड्या निराळ्या रीतीनें सागण्यांत आलें आहे. 'प्राणिमात्रवर स्वत प्रमाणेंच प्रेम करावें' अशी आमच्या शास्त्राची आज्ञा आहे. इतर देशाच्या शास्त्रानी या प्रेमाला केवळ मनुष्यत्वाची हद्द बाधून दिली आहे. मनुष्यमात्रावर प्रेम करावे अशी पाश्चात्य शास्त्राची अनुज्ञा असून प्राणिमात्रावर प्रेम करावे अशी आमच्या शास्त्राची अनुज्ञा आहे. कारण, मनुष्यें आणि इतर प्राणी यांत आमच्या शास्त्रांनीं भेद केलेला नाहीं आतां 'मी स्वत·प्रमाणेंच शेजाऱ्यावरही प्रेम कां करावें' असा प्रश्न उपस्थित झाला, तर त्याचें उत्तर मात्र या नीतिशास्त्रानीं दिलेलें नाहीं. तें उत्तर आम्हांस अद्वैतमतानें दिलें

आहे. ज्या अर्थी हें सारें विश्व एकरूप आहे त्याअर्थी त्यांत अनेक आकार प्रतीत होत असतांही ते सर्व एकरूप आहेत. याकरितां दुसऱ्या कोणास दुखविणें म्हणजे स्वतःलाच दुखविण्यासारखें आहे. त्याचप्रमाणें दुसऱ्यावर प्रेम करणें म्हणजे स्वत वरच प्रेम करण्यासारखें आहे. यावरून ही नीतिशास्त्रांची अनुज्ञा हितकर कशी आहे, याचा आपणांस उलगडा होतो साकार परमेशरूपाच्या भक्तींत प्रेमाचा खरा उमाळा उत्पन्न होतो, ही गोष्ट मी नाकबूल करतो, असें आपण समजू नका निरनिराळ्या काळी या भक्तिबळानेंच केवढालीं प्रचंड कार्यें उठविलीं आहेत हेंही मी जाणून आहे या साकार भक्तीच्या बळात अत्यत मोठी कार्यक्षमता असते, ही गोष्टही मी कबूल करतों. पण सध्याच्या काळीं आपणाला जर कशाची अत्यत जरूर असेल तर ती ‘ साबळ्या भक्तीची नाही. आपणास सध्या मानसिक बळाची अधिक आवश्यकता आहे. आमचा अद्वैतसिद्धांत ही या बळाची खाणच आहे. वाऱ्याच्या सोसाट्यानें भूस उडून जावे, त्याप्रमाणें सर्व प्रकारच्या भोळसटपणाच्या कल्पना दशदिशा होऊन गेल्यानतर ‘मी आणि तो एकच’ अशी दृढश्रद्धा उत्पन्न होते ! अशा स्थितीत मला भीति दाखवणारें कोण असणार? माझी एखादी कृति सृष्टिनियमास अनुसरून आहे कीं त्याच्या विरुद्ध आहे हा विचारही मला शिवण्याचें कारण नाहीं. सृष्टीच्या अखेरच्या मर्यादेवर पाऊल ठेवल्यानतर हा विचार मी का करावा? अशा स्थितींत मृत्यु हा माझ्या दृष्टीने शिळोप्याच्या गप्पाचा एक विषय मात्र होऊन बसतो. थट्टेच्या आणि गप्पागोष्टींच्या अनेक विषयांपैकीं, हाही एक विषय आहे, इतकीच माझ्या दृष्टीनें मृत्यूची किंमत उरते. “ नैनं छिंदंति शस्त्राणि नैनं दहति पावकः । न चैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुतः ॥” अशा प्रकारचा आत्मा तो मीच ही श्रद्धा दृढ होते. ज्याला जन्म नाहीं अथवा मरणही नाहीं, ज्याच्या तेजापुढे सूर्यासारखे गोल निवळ खद्योतासारखे आहेत, हा शरच्चद्र आणि हे अनंत तारकापुज ज्या अनत समुद्रावरील क्षुद्र फेंस मात्र आहे, ज्याला कालकल्पना स्पर्शही करू शकत नाहीं, आणि ज्याला स्थल बद्ध करू शकत नाहीं, असा अनत–निरवधि–मी आहें. या सिद्धांतावर आमची श्रद्धा दृढतम झाली पाहिजे. ही श्रद्धा जसजशी अधिक जीव धरील तसतसें मनोबलही वाढत जाईल. ज्या ज्या प्रकारच्या भावना आपल्या चित्तांत दृढ

होत असतात, त्या त्या प्रकारचे आपण खरोखर बनत असतो ' मी दुबळा आहे–अशक्त आहें '–अशा प्रकारची भावना तुमच्या चित्तात पक्की झाली, तर तुम्ही खरोखर नेभळे व्हाल. 'मी बलवान् आहे–समर्थ आहें'–अशा प्रकारच्या भावनेवर तुम्हीं आपलें चित्त स्थिर केलें, तर तुम्ही नि.संशय बलवान् व्हाल 'मी पापी आहे' या भावनेने पापी आणि याच्या उलट भावनेने तुम्ही पुण्यवान्ही होऊ शकतां. तुम्ही दुबळ आहा, पापी आहां, परिस्थितीनें बद्ध आहा, असल्या प्रकारच्या गोष्टी अद्वैतमत तुम्हास सागत नाहीं. उलटपक्षी तुम्ही सर्वज्ञ, सर्वसाक्षी आणि सर्वांचे शास्ते आहां असें या मताचे तुम्हास सागणे आहे आजच्या स्थितींत तुम्ही दुर्बल दिसत असला, तरी ही दशा सपण्याची वेळ येईल आणि आज अदृश्यरूपानें तुमचे बलही दृश्यावस्थेस येईल असें तुम्हांस अद्वैतमत सागत आहे. सर्व ज्ञान, सर्व शक्ति, सर्व पवित्रता आणि पूर्ण स्वातत्र्य हीं बीजरूपानें आम्हामध्ये आहेत. आतां येथे एक प्रश्न असा सभवतो कीं, 'मी वस्तुत' सर्वज्ञ असता अगदी अज्ञानावस्थेंत काळ का कठीत आहे ?' या प्रश्नाचे उत्तर असे आहे की, 'मी सर्वज्ञ आहे' या सिद्धातावर माझी दृढ श्रद्धाच नाहीं. ही श्रद्धा खरोखर दृढ झाली तर हा सिद्धांत प्रत्यक्ष प्रत्ययासही येईल. अद्वैतमताचें सांगणें या प्रकारचें आहे याकरितां मुलां-बाळांच्या मनात लहानपणापासून अशा प्रकारची श्रद्धा दृढ करणे योग्य आहे. भेकडपणाच्या कल्पनाचा पगडा त्याच्या चित्तावर कधीही बसूं देऊ नये नुसत्या धार्मिक कवाइतीचा मुलाना कांहींही उपयोग नाहीं त्यांना स्वावलबनाचे शिक्षण प्रथम अवश्य आहे अनेक प्रकारच्या आपत्तींनी चोहोकडून घेरलें असतांही छाती शाबूत राहील, अशा प्रकारचें शिक्षण त्यांना अवश्य आहे. आत्म्याच्या अत्यंत भव्य रूपाची कल्पना त्याच्या चित्ता-वर प्रथम ठसविली पाहिजे ही सारी व्यवस्था आपणांस अद्वैतमतांत मात्र आढळून येते. दुसऱ्या कोठे या व्यवस्थेचा मागमूसही लागत नाहीं इतर धर्मात भक्ति आणि परमेशपूजन यांचें जें विवेचन केलें आहे त्याला अद्वैत-मतात स्थल मिळालें आहेच, पण त्यांवाचून इतर अनेक गोष्टींसही तेथें अवकाश मिळाला आहे. विशेषतः जीवात्म्याबद्दलचे वर सांगितलेले सिद्धात हे अत्यत उत्साहदायक आहेत. आधिभौतिक ज्ञान आणि आध्या-त्मिक ज्ञान यांतील दृश्यविरोध नाहींसा करून त्यांची एकवाक्यता करणें व

त्यांच्यायोगें मानवजातीच्या सध्याच्या विचारसरणींत मोठी क्रांति घडवून आणणें, हीं कार्यें करण्याचे सामर्थ्य एकट्या अद्वैतमताला मात्र आहे.

आपल्या धर्मात जे महत्त्वाचे मुद्दे आहेत, त्याचें यथामति विवेचन येथवर केलें आहे. हे विवेचन फक्त उपपत्तीबद्दल झालें. आता या उपपत्तीचे व्यवहार्यरूप कसें असावे, याचाही थोडाबहुत विचार करणें वावगें होणार नाहीं. हिंदुस्थानच्या सांप्रतच्या स्थितींत नानाविध पथ आणि मतें अस्तित्वात असावीं, ही मोठीशी आश्चर्याची गोष्ट नाहीं. किंबहुना असे होणे अपरिहार्यच आहे. हिंदुस्थानात अनेक पंथ अस्तित्वात असले, तथापि ते आपसांत तटेभाडणें करीत नाहीत, ही गोष्टही अवश्य लक्ष्यात ठेवली पाहिजे शैव तितके नरकाचे अधिकारी असें कोणीही वैष्णव म्हणत नाही, अथवा वैष्णवांविरुद्ध शैवाचीही काहीं तक्रार नाहीं दोघाचे मार्ग आज निरनिराळे दिसत असले, तरी शेवटीं सर्वांच्या भेटीचें ठिकाण एकच आहे, ही गोष्ट त्यांच्या लक्ष्यातून गेलेली नाहीं आम्ही भारतवासीय ही गोष्ट केव्हाही विसरलो नव्हतो सर्वांच्या अखेरच्या भेटीचें ठिकाण एकच असलें, तरी प्रत्येकाचा इष्टमार्ग वेगळा असल्यास हरकत नाही, ही गोष्ट अत्यत प्राचीन काळापासून आम्हीं गृहीत केली आहे. 'व्यक्ती तितक्या प्रकृती' ही म्हण सर्वथैव खरी आहे. याकरिता भिन्न प्रकृतीना रुचतील असे मार्गही भिन्न असणें हे उचित आहे एखादा मार्ग एखाद्या व्यक्तीला इष्ट असला, तर दुसऱ्या व्यक्तीलाही तो इष्ट होईल असे नाहीं; प्रसंगी तो अनिष्टही होण्याचा सभव आहे. याकरिता सर्वांचा मार्ग एकच असावा, ही गोष्ट अनर्थावह आणि अशास्त्र असल्यामुळें सर्वथा त्याज्य आहे. जगातील सर्व लोक एकाच धर्माचे एकाच मार्गाचे असें कधीं काळीं झालें, तर जगाच्या दैन्यावस्थेस पारावार उरणार नाही अशा स्थितींत सर्व धर्माचा आणि सर्व विचाराचा नाश मात्र होईल. अनेकत्व हे विश्वाच्या अस्तित्वाचें एक प्रमुख कारण आहे अनेकत्व–विविधता–आहे म्हणून विश्व दृश्यत्वास आलें आहे विविधत्व नष्ट होणें याचा अर्थ प्रलय होणें हाच. जोंपर्यंत विचारांत विविधत्व आहे, तोपर्यंत जग चालेल. याकरितां अनेक पथ आणि अनेक मते असणें ही कांहीं भिण्याजोगी गोष्ट नाहीं. माझी इष्ट देवता निराळी आणि तुमची निराळी असावी हें सर्वथा युक्त आहे. जगांतील अनेक धर्म या भरतभूमीत येऊन

गेले, परंतु त्यापैकी कोणाचाही द्वेष आम्हीं केला नाहीं, हे अवश्य लक्ष्यात ठेवण्यासारखें आहे. परतु उद्या जर एखादा असे म्हणेल कीं 'अमुक एकच धर्म खरा आणि त्याचाच तुम्ही स्वीकार केला पाहिजे' तर अशा मनुष्याकडे पाहून आम्हाला खरोखर हसू येईल. अशा मनुष्याकडे पाहून नुसते हसणें हेंच त्याला योग्य उत्तर आहे, कारण केवळ आपणाहून भिन्न मार्गाने जाणारा म्हणून आपल्या मानवबधूचा जो नाश करू पाहतो, त्याच्याशीं भक्ति, प्रेम, इत्यादि सात्त्विक वृत्तीविषयी भाषण करणे म्हणजे व्यर्थ शीण करून घेणे आहे. अशा मनुष्यानी बाह्यात्कारी प्रेमाचा आविर्भाव दाखविला तरी त्यांची हृदये प्रेमशून्य असतात. प्रत्येकाला स्वत च्या उत्क्रातीकरिता भिन्न मार्ग असणेही ज्याला खपत नाहीं, त्याच्या प्रेमालापाना कवडीची तरी किंमत आहे काय? तुम्हाला अनिष्ट असलेला मार्ग तुम्हावर लादू पाहणे हे जर प्रेमाचे चिन्ह असेल तर द्वेष कशाला म्हणावे हे ठरविणें कठीण आहे. कोणी ख्रिस्तापुढें गुडघे टेकीत असला, कोणी बुद्धाची पूजा करीत असला अथवा तिसरा एखादा महमदानुयायी असला, तरी त्यापैकी एकही आम्हास द्वेष्य नाही. त्या सर्वांना आम्ही बधुभावाने जवळ करण्यास तयार आहो त्याच्या मार्गात त्याना काही मदत आमच्यानें झाली तर आम्ही करू. आमच्या मार्गानें त्यानीही आम्हास जाऊं द्यावे हीच आमची इच्छा आहे त्याचे मार्ग त्याना फार सोइस्कर आहेत ही गोष्ट आम्ही कबूल करतो, परतु तेच आम्हाला भयप्रद होण्याचा सभव आहे मला कोणत्या प्रकारचे अन्न इष्ट होईल हे मला फक्त माझा स्वत चा अनुभवच सागू शकेल, डझनभर वैद्य एकत्र झाले तरी त्याना हे ठरविता येणार नाहीं. जर एखाद्या देवळामुळें, एखाद्या मत्रोच्चारामुळे अथवा एखाद्या मूर्तिदर्शनाने तुमच्यातील सात्त्विक अश उद्दीपित होत असेल, तर त्या मार्गाने जाण्याचा तुम्हास पूर्ण अधिकार आहे. एकच काय पण शेकडो मूर्तींच्या गराड्यात तुम्ही स्वत.स कोडून घेतलें, तरी ते तुमचें कृत्य धर्माला मान्य आहे. कर्ममार्गाच्या अवलबनानें तुमच्यातील ईश्वरत्व जागृत होत असेल, तर खुशाल कर्ममार्गाचें अवलंबन करा वाटतील तितकीं देवळें बाधा, वाटतील तितके विधी करा अथवा दुसरेही बाह्योपचार हवे तितके करा, पण मुद्द्याची गोष्ट हीच कीं ईश्वराला जवळ करा, आणि हे करीत असता कोणाशींही तटेभांडणें करू नका; कारण भांडणाचें

बीज तुमच्या हृदयात शिरलें कीं परमेश्वर दुरावलाच हे नि सशय समजा. "कामक्रोध आड पडले पर्वत। राहिला अनंत पलीकडे" असें होईल यात तिळमात्र शंका नाही ज्या क्षणीं भाडणाचे बीज आपल्या हृदयात रुजू लागतें त्याच क्षणीं आपण परमेश्वराच्या निवासस्थानाचा रस्ता सोडून पशु होण्याच्या मार्गाला लागतों, हा सिद्धात नित्य लक्ष्यात बाळगला पाहिजे

अशा प्रकारचे आमच्या धर्माचे सामान्य स्वरूप आहे. आमचा धर्म सर्वांना सारख्याच प्रेमानें पोटाशी धरतो. तो कोणालाही झिडकारीत नाही. आम्हा हिंदूचा धर्म म्हअजे अनेक जातीचा आणि अनेक शुष्क कर्मांचा गोधळ आहे असे पुष्कळास वाटते, पण जातिभेद आणि हिदुधर्म याचा अविभाज्य सबध आहे असे नाहीं सध्या जो सबध दिसतो, तो दृश्याभास मात्र आहे. राष्ट्र म्हणून जगण्याला या सस्थाचा आम्हास उपयोग झाला आहे. आत्म-संरक्षणार्थ कोणताही उपाय करावयास नको अशी वेळ आली, तर या सस्थाही आपोआपच नामशेष होतील. आमच्या हिदुस्थानात आज अशा अनेक प्रकारच्या रूढी काळाशीं झुजून अजून जिवत राहिल्या आहेत, आणि वयाबरोबरच त्याजवरील माझें प्रेमही डळमळत चाललें आहे ! पुष्कळशा रूढी निरुपयोगी आणि त्याज्य आहेत, असे मलाही एका काळीं वाटत असे, पण माझें वय वाढत चालले, तसतसे माझें मतही डळमळत चालले. या अनेक रूढीपैकी एकीलाही मनःपूर्वक शाप द्यावा असें मला वाटेना. अहो, कित्येक शतकाचा अनुभव त्याच्या उदरी गर्भस्थ आहे, हे लक्ष्यात ठेवावयास नको काय ? एखादे कालचे पोर येऊन जर मला म्हणू लागेल की, ‘तुम्हीं अमुक पद्धतीने वागणे चागले आहे’ आणि मी जर त्याच्या सागण्याप्रमाणें वागू लागलो, तर माझ्या पदरी मूर्खत्वावाचून दुसरें काय पडणार ? बाहेरच्या अनेक देशातून ज्या प्रकारच्या उपदेशाचा अनुग्रह आपणावर केला जातो, तो उपदेश वास्तविक इतक्याच किमतीचा आहे. या लब्धप्रतिष्ठित पंडितास आमचे इतकेच सांगणें आहे कीं, ‘पंडितमहाराज, आपले स्वत.चे पाय अद्यापि अधातरीं लोंबत आहेत ते अगोदर जमिनीस लागू द्या, म्हणजे मग तुमच्या उपदेशाचा विचार आम्ही करू. तुम्ही आज एक पद्धत चांगली म्हणता, पण पुरे दोन दिवसही त्या पद्धतीला तुम्ही चिकटून राहत नाहींत. तिजबद्दल तुमच्यात मारामाऱ्या होतात आणि शेवटीं तुम्ही पुन्हा आपल्या

मूळ पदावर कायमच. ज्याप्रमाणें कांही जातींचे कीटक आतां जन्मास येतात आणि घटकेनें मरतात, त्याचप्रमाणें तुमच्या समाजाचीही अवस्था आहे. तुमचें अस्तित्व पाण्यावरील बुडबुड्या इतकेच चिरस्थायी आहे. याकरिता आमच्या समाजाप्रमाणे तुम्ही स्वत चा समाज प्रथम चिरजीवी बनवा. कित्येक शतकाचा काळदड वरून फिरत असतांही ज्या आचारविचाराचें अस्तित्व बालाग्रही ढळले नाहीं, असे आचारविचार तुम्ही स्वत च्या समाजात प्रथम रूढ करा. इतकी तयारी झाली म्हणजे या बाबतींत आमच्याशी दोन शब्द बोलण्याचा अधिकार तुम्हास प्राप्त होईल; पण तोपर्यंत तुमचा उपदेश म्हणजे लहान मुलाचे बोबडे बोल, असेच आम्ही समजणार

आपल्या धर्माबद्दल जे कांहीं मला सांगावयाचें होतें, ते मीं सांगितले. आता चालू परिस्थितीत आपणांस कशाची गरज आहे, हें सांगून मी आपलें भाषण पुरे करतों. या कलियुगात ज्या ग्रथरत्नाचा लाभ आपणास झाला आहे, त्याच्या कर्त्यास शतश प्रणिपात असोत. त्या ग्रथाचें नाव महाभारत असून त्याचा कर्ता भगवान श्रीव्यास हा होय जपतपादि ज्या मार्गांचें वणन या ग्रथराजांत आढळते, ते मार्ग सध्याच्या काळाला प्रतिकूळ आहेत ते मार्ग चालू स्थितींत अनुसरणें कठीण आहे या युगात दान हेच अत्यत श्रेष्ठ आहे. " परोपकारः पुण्याय " हे वचन सध्याच्या काळाला अत्यत अनुरूप असे आहे आता दान या शब्दापासून काय बोध होतो, याचा विचार करूं. सर्वांत अत्युच्च प्रतीचें दान म्हटलें म्हणजे आध्यात्मिक ज्ञानदान हे आहे. दुसरी प्रत व्यावहारिक ज्ञानाची लागते. त्यानतरचें स्थान जीवदानाचे आहे, आणि अखेरचें स्थान द्रव्यदान, अन्नदान इत्यादिकांचे आहे अध्यात्मज्ञानाचे ज्ञान करणारा सर्वांत श्रेष्ठप्रतीचा दाता होय. त्याच्या दानाने अनेक जन्ममरणाचे फेरे चुकतात व्यावहारिक ज्ञानानें मनश्चक्षूवरील पटल नाहींसें होऊन, आध्यात्मिक विद्यकडे जाण्याचा मार्ग दिसू लागतो. याकरिता हा दाताही पहिल्याच्या खालोखाल श्रेष्ठ आहे बाकीचे दाते हे या दात्यांहून फार खालच्या पायरीचे आहेत फार काय सागावे, पण प्राणदानाची योग्यताही पहिल्या दोन दानाहून कमी प्रतीची आहे. याकरिता या विद्येचें अध्ययन आणि अध्यापन हें श्रेष्ठतम कर्तव्य आहे. अध्यात्मज्ञानदानाइतकी श्रेष्ठ वस्तु दुसरी नाहीं, हें आपण नित्य लक्ष्यांत बाळगलें पाहिजे. अध्यात्मज्ञानाचा प्रसार व्हावा म्हणून केलेली मदत ही

सर्व प्रकारच्या मदतींत अत्यंत श्रेष्ठ प्रकारची मदत होय. अध्यात्मज्ञानाचें प्रत्यक्ष अथवा आचरणातील रूप कसे असावें हें पहावयाचें असेल, तर महाभारतादि पुराणाकडे पहा. अध्यात्मविद्येचे जिवंत झरे तेथे तुम्हास आढळून येतील. ज्ञानाच्या प्रत्यक्ष मूर्ती आपणाला केवळ याच आपल्या जन्मभूमीत सापडतील. या अफाट पृथ्वीवरील इतर कोणत्याही देशात त्याची जोड तुम्हास आढळून येणार नाहीं मला या जगाचा काही विशेष अनुभव आहे असें नाही, तथापि जो काही अनुभव मला आला, त्यावरून मी निश्चयानें सांगतों की धर्मतत्त्वांचा प्रत्यक्ष आचार फक्त आमच्या देशातच दिसेल. बाह्य देशात या बाबतींत वाग्युद्धें मोठमोठी होतात ही गोष्ट खरी, पण या तत्त्वाचा आचार तेथें आढळून येणार नाहीं पुष्कळ आणि लबींचवडीं भाषणे करणें हे धर्माचरण नव्हे. पोपटही घटका घटका बोलत नसतो काय? फार काय, पण सध्याच्या काळीं निर्जीव यंत्रेंही बोलतात; पण त्यागाचें, खऱ्या धर्माचरणाचें, तितिक्षेचें आणि विश्वव्यापी प्रेमाचे चालतें बोलते उदाहरण औषधासही मिळावयाचे नाहीं खऱ्या धर्माचरणात इतक्या गुणाचा अंतर्भाव होतो. आपल्या देशात याप्रमाणें जिवंत अध्यात्मविद्या वास करीत असता, आमच्या देशातील योगी पुरुषाच्या मानसगंगेच्या प्रवाहाचे पाट आपण जर दारोदार पोहोचविले नाहींत, तर आमच्यासारखे अभागी आम्हीच असें म्हणण्याचा प्रसंग येईल! या प्रवाहाचें शांतिजल केवळ आपल्याच देशात दारोदार पोहोचवायाचे आहे असे नाही तर अन्य देशींही त्याचें भरपूर दान आपण केलें पाहिजे. आमच्या सध्याच्या श्रेष्ठतम कर्तव्यापैकीं हें एक कर्तव्य आहे. हे कर्तव्य करणे म्हणजे नुसताच परोपकार करणें असें नाहीं, तर ते आपल्या स्वतःच्या उन्नतीलाही पोषक होईल जर तुमच्या मातृभूमीवर तुमची खरी भक्ति असेल आणि जर तुमचा धर्म तुम्हांस खरोखर प्रिय असेल, तर ग्रंथरूपी गुहात दडून बसलेलीं तत्त्वरत्नें शोधून काढून, तीं त्याच्या योग्य वारसाकडे पावती करावयाची, हे तुमचें आद्य कर्तव्य आहे हे अक्षय्य ऋण तुमच्या मस्तकावर आहे

यानंतर चालू परिस्थितींतल्या दुसऱ्याही एका कर्तव्याचा विचार करणे अवश्य आहे सध्या आम्ही मत्सराच्या डोहांत बुडाल्यासारखे झालों आहो. मत्सर हा कित्येक शतकाचा आमचा जिवश्चकंठश्च मित्र बनून गेला आहे. बघावें तिकडे हा दैत्य गोंधळ घालतांना आढळतो 'अमक्याच गोमाजीला

लोक मान कां देतात आणि मला कां नाहीं ?' हे विचार ज्याच्या त्याच्या चित्तात घोळत असावयाचे. एखाद्या धर्मकार्यात सुद्धा हा मत्सर आमच्या हात धुऊन पाठीस लागलेला असतो. इतक्या अत्यत हीन दशेला आपण येऊन पोहोचलो आहों. आता या दशेचा त्याग करण्याचा यत्न आपण मनापासून करू या. आज जर काही भयकर पापाचरण आमच्या हातून घडत असेल तर तें हेच होय. आपण आज मत्सराचे निवळ गुलाम बनून गेलों आहो प्रत्येकाची इच्छा सेनापति होण्याची आहे. शिपायाच्या जागेला मात्र एकही उमेदवार नाही. ब्रह्मचर्याश्रमधर्माचा सपूर्ण लोप झाल्याचे हे फळ आहे प्रथम आज्ञाधारकपणा शिका, म्हणजे नायकत्व आपोआप प्राप्त होईल. सेवक होण्यास प्रथम शिका, म्हणजे धनीपणाची ओळख आपोआप होईल. आपणापुढे महत्कार्य पडलेलें आहे व ते आपणास शेवटास न्यावयाचे आहे मत्सरापासून प्रथम तुम्ही मुक्त झालें पाहिजे, म्हणजे तें कार्य तुमच्या हातून तडीस जाईल आमच्या पूर्वजानी केलेली कार्यें तुम्हास आनद आणि आश्चर्य यानी भरून टाकतील अशीं आहेत त्याच्या मोठेपणाचा आम्हास मोठा अभिमान वाटतो आणि त्याबद्दल जी पूज्यबुद्धि आमच्याठायीं आहे, तीही योग्यच आहे; तथापि त्याचींच महत्कार्यें आपणास पुढे सुरू ठेवावयाची आहेत, हे विसरून कसें चालेल ? आमच्या पूर्वजानी मोठी कार्यें केली म्हणून मोठ्या अभिमानानें त्याचें नाव घेतो, तसेच आमच्या पुढील पिढ्यांनी आमचेही नाव भक्तिभावानें घ्यावे असें काहीं कार्य आपण करू या.

प्रिय श्रोतृवद ! आपल्या पूर्वजाच्या कार्याहूनही महत्तम कार्यें आपल्या पैकी प्रत्येकाच्या हातून अजूनही घडणार नाहींत असें कशावरून म्हणावें ? भगवताचा आशीर्वाद आपणास मिळेल आणि आपणही ' बापसे बेटा सवाई' असे होऊ

---

# पांबन येथील मानपत्र व त्यास उत्तर.

( स्वामी महाराज पांबन येथें आले त्यावेळीं रामनदच्या महाराजानी त्यांचें स्वागत केलें व पांबन येथील रहिवाशातर्फे त्यास मानपत्र अर्पण केलें)

स्वामीमहाराजांचा विजय असो.

आपणास अनेक ठिकाणांहून निकडीचीं बोलावणीं आलीं असताही आमच्या बोलावण्यास प्रेमाने मान देऊन आम्हांस आपल्या दर्शनाचा लाभ दिला याबद्दल आम्ही सर्व अतःकरणपूर्वक आपले उपकार मानतो. तसेंच, जे महत्कार्य आपण उदारबुद्धीने आपल्या शिरावर घेतलें आहे व त्या कार्यांत जी शक्तिमत्ता, जो उत्साह आणि निश्चय प्रकट झाला आहे, त्याबद्दल आमच्या अत -करणात पूज्यभाव उत्पन्न झाला आहे.

हिंदुतत्त्वज्ञानाचें बीजारोपण पाश्चात्य देशात करण्यासाठीं जे परिश्रम आपण केले, ते फलद्रूप होण्याच्या मार्गास लागले आहेत, हे पाहून आम्हास आनंदाचें भरते येत आहे. आपण लावलेल्या या वृक्षास लवकरच पुष्कळ फळें येऊ लागतील, अशी आमची खात्री आहे. आमचा हा मातृदेश आज बराच काल निद्रासुख भोगीत आहे. आता आपण आपल्या प्रयत्नानी आपल्या हिंदुबाधवास नवजागृति आणावी व ज्या सत्यसिद्धाताची ओळखही ते विसरून गेले आहेत त्यांचे स्मरण त्यांना करून देण्याकरता निकराचे प्रयत्न करावे, अशी आमची आपणास करद्वय जोडून विनति आहे.

आपणाबद्दल वाटत असलेली पूज्यबुद्धि, मन.पूर्वक प्रेम आणि सानद कौतुक यानी आमचें अत करण इतके भरून गेलें आहे कीं, तीं व्यक्त करण्यास योग्य असे शब्द आमच्यापाशीं नाहींत. आपणास परमेश्वराने उदड आयुष्य देऊन अनेक उपयुक्त कार्यें आपणाकडून करवावीं व विश्वबधुत्वाची बुजालेली ओळख आपल्या द्वारें सर्वास पुन्हा व्हावी, इतकीच त्या जगन्नियत्याच्या चरणीं आम्हां सर्वांची मनोभावें प्रार्थना आहे.

## स्वामी महाराजांनी दिलेलें उत्तर

आपली पवित्र जन्मभूमि ही धर्म आणि तत्त्वज्ञान यांची भूमी आहे. या भूमींत अनेक अध्यात्मविद्याशार्दूल जन्मास आले आहेत. ही भूमि वैराग्याची जन्मदात्री आहे. अत्यत प्राचीन कालापासून तो थेट आजपर्यंत जन्मसाफ-

त्याची अत्युच्च कल्पना फक्त याच भूमींत उदय पावत आली आहे. मानवदेहाचें आत्यंतिक साफल्य कशात आहे, हे फक्त याच भूमींत निदर्शनास येते.

पश्चिम गोलार्धांतील पुष्कळशा देशातून मी प्रवास केला, आणि अनेक मानवजातींचे निरीक्षण केले. प्रत्येक राष्ट्राला विशिष्ट धोरण अथवा साध्य असून, त्याच साध्याच्या पायावर तेथील समाजाचा आयुष्यक्रम आखला गेला आहे असे माझ्या नजरेला आले अनेक प्रकारच्या आनुषंगिक चालीरीती त्या साध्याच्या पूर्ततेकरिताच निर्माण झालेल्या असतात, आणि एकंदर राष्ट्राचा आयुष्यक्रमही त्याच साध्याच्या पूर्तीची खटपट करीत असतो, असें मला आढळून आले राजनीति, क्षात्रतेजाचे पोषण, व्यापारी श्रेष्ठत्व अथवा यंत्र-शास्त्रविशारदत्व यापैकी एकही हिंदुस्थानाचें साध्य नाहीं. धर्मजीवन हे एकच आपलें साध्य आहे. आजपर्यंत फक्त धर्माचे पोषण या भूमीने केलें आहे, आणि इतउत्तरही ते एकच कार्य करावयाची तिची इच्छा आहे. अध्यात्मविद्येचा लोप ज्यात झाला असा थोडाहि काल आमच्या देशात नव्हता.

शारीरबल ही एक महत्त्वाची चीज आहे तसेच भौतिकशास्त्राच्या साह्याने निर्माण केलेल्या यंत्राच्या द्वारें जे बुद्धिबल व्यक्त होते, तेही कौतुकास्पद आहे, हेही खरे आहे; पण या दोहोंहूनही आध्यात्मिक बलाची थोरवी अधिक आहे. एकंदर जगाला वळण लावण्याचे सामर्थ्य जसे आध्यात्मिक बळात आहे, तसें ते दुसऱ्या कोणत्याही बळात नाहीं.

हिंदु मानवशाखेचा इतिहास पाहिला तर तिच्या ठिकाणीं कर्मप्रवणता फार आहे असे आढळून येईल हिंदुलोक स्वभावतःच फार मंद व दैववादी आहेत, असे सांगणारे लोक आज आपल्या पाहण्यांत पुष्कळ येतात. यांत जी काही विचारवान् माणसे आहेत, त्यांना तरी अशा प्रकारचे उद्गार काढण्यास जागा सापडू नये, असें मला वाटते. हिंदुस्थानचे लोक म्हणजे आळशी आणि दैववादी लोक, असाच अर्थ बाहेर देशीं रूढ झालेला आहे, पण आम्ही हिंदु लोक भवितव्यतावादी कधीही नव्हतों, असे मी अगदीं स्पष्टपणें म्हणतो. आमच्या या भाग्यशाली देशात जी उद्यमशीलता आढळून येते, ती दुसऱ्या कोठेही आढळावयाची नाहीं अत्यंत जुनी आणि उदारचरित अशी ही आमची

शाखा अद्यापि जिवंत आहे, इतकेच नव्हे तर प्रसंगोपात तिचें बळ वाढत आहे आणि नवें तारुण्य तिला प्राप्त होत आहे, याचें कारण काय असावें बरें ? याचे कारण हेच कीं, ती भवितव्यतावादी नसून कर्तृत्वशाली आहे. ही शाखा जणु काय अमरच झाली आहे! आमच्या उद्यमशीलतेचें क्षेत्र धर्म हें आहे आमच्या कर्तृत्वाचा प्रभाव फक्त या एकाच क्षेत्रांत आढळून येतो, या मुळें तो इतरांच्या डोळयांत भरत नाही. मनुष्यस्वभाव असा विलक्षण आहे कीं, परक्याच्या कर्तृत्वशक्तीची मोजदाद तो स्वतःच्या ठरींव मापानें करीत असतो. एखाद्या चांभाराच्या दृष्टीनें फक्त जोडे शिवणे हेच उद्यमशीलतेचें लक्षण ठरू शकेल ! एखादा कुंभार म्हणेल कीं, गाडगीं भाजणे हेच काय तें मनुष्याच्या कर्तृत्वशक्तीचें लक्षण आहे ! कारण त्याचा सारा जन्म या एकच प्रकारच्या कर्तव्यास जुपलेला असतो. सामान्य मनुष्यस्वभावच असा असतो की, तो जगाची पारख स्वत च्या ठरलेल्या कसोटीनेंच करीत असतो दिव्याच्या ज्योतीचे स्पंद अत्यंत झपाट्याचे असले म्हणजे ते आपणास दिसत नाहीत, कारण आपल्या डोळयाची नैसर्गिक रचना अशी आहे कीं त्यांना फक्त विशिष्ट परिमाणाचेच स्पंद दिसावे त्या परिमाणापलीकडील स्पंद आम्हास दिसणें शक्य नाहीं. अशा प्रकारच्या अनेक बाह्य अडचणीस झुगारून देऊन वस्तुस्थितीची बरोबर पारख करणे हे फक्त योग्यालाच शक्य असते.

अध्यात्मविद्येच्या अन्नाची भूक सध्या साऱ्या जगाला लागली असून त्याचे डोळे या बाबतींत हिंदुस्थानाकडे लागून राहिले आहेत. हे अन्नदान आता या भरतभूमीने केलें पाहिजे. जीवितसाफल्याची अत्युच्च कल्पना फक्त आम्हापाशींच आहे. ही कल्पना मुख्य देवाच्या मूर्तीसारखी असून तिजभोवती साहित्य आणि तत्त्वज्ञान याचे देऊळ बांधले आहे. हजारों वर्षे हे देऊळ अस्तित्वात असून आजतागाईत कित्येक वेळा त्याच्या सौंदर्यांत भर पडत आली आहे. पाश्चात्य पंडित या देवळात शिरण्याचा आणि मुख्य मूर्तीचें दर्शन घेण्याचा प्रयत्न आता करीत आहेत.

हिंदुतत्त्वज्ञानाची आणि धर्ममताची ओळख बाहेर देशांतील लोकांस करून देण्याकरिता एकही उपदेशक येथून बाहेर गेल्याचें इतिहासांतरीं नमूद नाहीं, पण ही स्थिति आता बदलत आहे. आम्हा लोकांच्या अंगो आता निराळ्याच प्रकारचें वारें खेळणार अशीं चिन्हें दिसू लागलीं आहेत भगवान् श्रीकृष्ण

म्हणतात " यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत । अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥" धर्मासबंधीं जे काहीं शोध आजपर्यंत झाले आहेत त्यावरून एक विशेष गोष्ट लक्ष्यांत येते ती ही की, कोणत्याही देशातील एखादा नीतिग्रथ आपण पाहिला, तर त्यांतील काहीं मुद्दे आमच्या देशातून तिकडे गेले असल्याचे आढळून येईल. त्याचप्रमाणें जगांत जितके धर्म आज अस्तित्वात आहेत त्यांतील आत्म्याच्या अमरत्वाबद्दलची काहीं थोडीं तरी सुदर प्रमेयें आमच्याकडूनच तिकडे गेलीं आहेत, असें आढळून येईल.

'बळी तो कान पिळी' या म्हणीचें सत्यत्व साऱ्या जगभर जितके आज दिसून येत आहे, तितके पूर्वी कधींही ते दिसलें नव्हते, पण नैराश्यावाचून मुक्तिलाभ कधीही होणार नाहीं आणि जडवादाच्या पलीकडे जो गेला नाहीं त्याला खऱ्या स्वातत्र्याचा मार्ग सांपडणार नाहीं. अत्यत महत्त्वाचा मुद्दा प्रत्येकाने नीट ध्यानात ठेवला पाहिजे. हा मोठा मुद्दा सर्व राष्ट्राच्या लक्ष्यात आता हळू हळू येऊ लागला आहे, आणि त्याचे महत्त्वही त्याऱ्या ध्यानीं येत आहे. हे तत्त्व शिष्याच्या चित्तात प्रथम उत्तम रीतीनें आणलें कीं, तेथे मार्गदर्शक सद्गुरू धावून येतात मदतीची खरी अपेक्षा उत्पन्न झाली कीं, परमेश्वर लाब आहे असें नाहीं त्याच्या दयेचा झरा अखड वाहत आहे, आणि ज्याला खरी तृष्णा उत्पन्न झाली असेल, त्याच्या मुखात शातिजलाचे थेब तो अवश्य घालतोच. खरी गरज उत्पन्न होण्याचाच काय तो अवकाश आहे. या पलीकडे दुसऱ्या कशाचीही अपेक्षा तो तुम्हांपासून करीत नाहीं. तुम्ही एखाद्या विशिष्ट धर्माचे म्हणवा अथवा म्हणवू नका, कांहीं विशिष्ट मतें आणि मार्ग मान्य करा अथवा करू नका. यांपैकीं कशाचीही गरज त्याला नाहीं. आम्हा हिदुलोकाचा परमेश्वर, हा सर्व धर्मांचा परमेश्वर आहे सर्व धर्म त्याचेच आहेत. सर्वांवर त्याच्या कृपेचा वर्षाव सारखाच होत असतो. ही ईश्वरविषयक कल्पना फक्त आमच्या या मातृभूमींतच उदयास आली आहे. या कल्पनेचा उदय दुसऱ्या कोणत्याही धर्मग्रथातच झाला असल्याचे कोणी सिद्ध करावे असें मी आपणास आव्हान करतों.

सध्याची वेळ मोठी आणीबाणीची आणि प्रसंगीं महत्त्वाची कामगिरी आम्हीं आपल्या शिरावर घ्यावी असा ईशसंकेत दिसतो. पाश्चात्य राष्ट्रें आ-

ह्यांकडून आध्यात्मिक मदतीची अपेक्षा करीत आहेत. मानवी जीविताची अगम्य कोडीं सोडविण्याचा मार्ग जगास दाखविण्याची तयारी आता भरतभूमीच्या पुत्रानीं केली पाहिजे. ही महत्त्वाची कामगिरी आता त्याच्याच शिरावर आहे पूर्वकालीन जगद्वंद्य ऋषीचे आम्ही वशज आहों, असें म्हणविण्यात आम्हास मोठें भूषण वाटते आम्हात आणि पाश्चात्यात जो काहीं फरक आहे, त्याचें या एका लहानशा गोष्टीवरून दिग्दर्शन होतें. पाश्चात्यातील एखाद्या लौकिकवान् पुरुषाला त्याची वशावळ विचारली, तर आपला पूर्वज मोठा धाडशी सरदार—कदाचित् लुटारूचा सरदार—होता असें तो मोठ्या अभिमानानें सागेल एखाद्या डोंगरी किल्ल्यात राहणाऱ्या आणि वाट मारून श्रीमत झालेल्या लुटारू सरदारापर्यंत स्वत ची वशावळ नेऊन भिडविण्यात पाश्चात्य लोकाना मोठें भूषण वाटते. पण उलट आम्हा हिंदूंना स्वत च्या वंशाचा आदिपुरुष आश्रमवासी आणि कदफलाशन असा ऋषि होता असें सागण्यात भूषण वाटते आम्ही आज अवनतावस्थेला पोंहोंचलेले असू, आज आमचे जिणें अपमानास्पद होऊन बसलें असेल, पण आमच्या मन प्रवृत्ती जोंपर्यंत आम्हास सोडून गेल्या नाहींत आणि स्वत ची ओळख जोंपर्यंत आम्ही विसरलों नाहीं, तोपर्यंत योग्य मार्गानें आम्ही धर्मकार्याला आरभ केला, तर आमचें गेलेलें महत्त्व फिरून प्राप्त करून घेणें शक्य आहे

तुम्हीं आज माझा जो गौरव केला आणि प्रेमपूर्वक जें स्वागत केलें, त्याबद्दल मी आपला सर्वांचा फार ऋणी आहें. रामनदच्या महाराजाबद्दल माझ्या मनांत वसत असलेला आदर नुसत्या शद्वानी व्यक्त करून दाखविणें मला शक्य नाही. जर माझ्या हातून काहीं थोड्याफार महत्त्वाची कामगिरी झाली असेल, तर तिचे श्रेय हिंदुस्थानानें या पुण्यपुरुषाला दिलें पाहिजे. शिकागोच्या परिषदेंत मीं हजर असावे, ही कल्पना प्रथम यांनाच सुचली, त्यानींच याबद्दल वारंवार प्रोत्साहन दिलें. अजूनही माझ्या हातून काहीं कामगिरी होईल, असे त्यांस वाटत आहे. त्यांचा तो पूर्वीचा उत्साह आजही कायम दिसत आहे. आमच्या पवित्र जन्मभूमीच्या उदरीं असे आणखी पाचदहा राजे जन्मले असते तर काय बहार झाली असती ! आध्यात्मिक विद्येंत तिचें पाऊल पुढें पडण्याकरिता अशींच नररत्नें आज आपणास हवीं आहेत.

---

# रामेश्वर येथील व्याख्यान.

[ श्री रामेश्वराच्या दर्शनाकरितां स्वामीमहाराज गेले असता तेथे जमलेल्या जनसमूहाच्या विनतीवरून त्यांनीं पुढील व्याख्यान दिलें. ]

धर्माचावास बाह्योपचारात नसून खऱ्या भक्तींत असतो. तुमच्या अतःकरणांत शुद्ध आणि सात्त्विक भक्ति ज्या मानानें असेल, त्या मानानेंच तुमच्यांत खरी धर्मबुद्धि असते. शरिरानें आणि मनानें शुद्ध झाल्यावाचून नुमतें शिवालयात येऊन पूजा करणें, ही खरी पूजाच नव्हे. जे अत करणानें आणि शरिरानें पवित्र असतील, त्यांचीच पूजा शिवाला मान्य होते आणि त्याचीच प्रार्थना शिवापर्यंत जाऊन पोंहोचते. स्वतः अपवित्र राहून जे इतरास धर्माधर्म शिकवीत असतात, त्यांच्या सागण्याचा परिणाम जनतेवर यत्किंचित्‌ही होत नाहीं, असेंच शेवटीं आढळून येईल. बाह्योपचारविधी हे केवळ जड असून मानसपूजा आणि पावित्र्य या सत्य वस्तू आहेत. ज्या पूजेंत अत करणाची भक्ति आणि पवित्र्य याचा वास नसेल, ती केवळ जडपूजा होय. ती केली अथवा न केली सारखीच. याकरिता बाह्योपचारावरच भर न ठेवता खरी भक्ति आणि पावित्र्य हीं ईश्वरप्राप्तीचीं प्रमुख साधनें आहेत, हें आपण नित्य लक्ष्यांत बाळगलें पाहिजे. सांप्रतच्या कलियुगांत आपण इतके नादान बनून गेलों आहों कीं, कसल्याहि गोष्टीचा विधिनिषेध आपणांस उरलेला नाहीं. कसलेंही अमगल कृत्य करावें आणि नतर एखाद्या तीर्थांत जाऊन स्नान करावें, हाच कायतो धर्म सध्या आपण अनुसरत आहों. एखाद्या क्षेत्रीं जाऊन मुडन केलें कीं सर्व पापांचें क्षालन होतें, हीच समजूत सामान्य जनात सध्या रूढ झाली आहे. वास्तविक स्थिति अशी आहे कीं, अशुद्ध मनानें एखाद्या पवित्र तीर्थाच्या ठिकाणीं गेल्यास पापक्षालन तर होत नाहींच, पण असा मनुष्य उलट अधिक पापाचा अधिकारी मात्र होतो. ज्या ठिकाणीं पवित्र वस्तुसंघ आणि सत्पुरुष नांदत असतील, अशा ठिकाणाला तीर्थ ही संज्ञा प्राप्त होते. सत्पुरुषाचा महिमा अगाध आहे. ज्या ठिकाणीं त्यांच्या चरणांचा वास असतो तेथे एखादें देऊळ असलें, अगर नसलें तरी ते ठिकाण म्हणजे पवित्र तीर्थच होय एखादें ठिकाण मूळचे तीर्थाचें म्हणून मानलें गेलें असलें, आणि त्या ठिकाणीं शेंकडों देवळें असलीं, तरी अपवित्र मनुष्यांच्या संचाराबरोबर त्यांतील तीथपणा

नष्ट होतो याकरिता तीर्थांच्या ठिकाणीं वास करणें हें मोठ्या धोक्याचें काम आहे. इतर ठिकाणीं केलेल्या पापाचें क्षालन तीर्थांच्या ठिकाणीं होईल, पण तीर्थांच्या ठिकाणीं केलेल्या पापाचें क्षालन कोठें होणार ? आपण शुद्ध आणि भक्तियुक्त अंत करणानें राहून तीर्थांचें पावित्र्य कायम राखलें पाहिजे. पूजेचे सर्व रहस्य हेच. अंत करणाची शुद्धता आणि परोपकार हींच पूजेचीं महत्त्वाचीं अंगें होत. 'जे कां रंजले गाजले । त्यांसी म्हणे जो आपुले ।' त्यानेच पूजेचे रहस्य जाणलें असें समजावे. दारिद्र्याने गाजलेले अथवा शरिरानें असमर्थ अशा लोकाच्या ठिकाणचें शिवत्व ज्याला दिसतें, त्याचीच पूजा शिवाला मान्य होते एखाद्या विशिष्ट मूर्तीच्या ठिकाणींच शिवत्व पाहणें, ही शिवपूजेची पहिली पायरी आहे. जात, धर्म, कुल अथवा दुसऱ्या कसल्याही उपाधींना मागे टाकून निराश्रिताच्या ठिकाणचे शिवपण जो पहातो आणि त्याना जो मदत करतो, त्याची पूजा शिवाला अधिक मान्य होते. फक्त एखाद्या देवळात अथवा एखाद्या मूर्तींत शिवाचे अस्तित्व पाहणें ही शिवपूजनाची कनिष्ठ प्रत आहे.

एका श्रीमान् मनुष्याची एक बाग होती. त्या बागेंत कामाकरिता त्याने दोन माळी ठेवले होते. या दोघांपैकीं एक माळी आळशी आणि कामचुकाऊ होता, पण तो मोठा स्तुतिपाठक होता. धनी बागेंत आल्याबरोबर तो आळशी माळी उभा राहून "माझ्या धनीसाहेबांचें मुख नजरेस पडल्याबरोबर माझी तहानभूक हरते" असें म्हणून तो एकसारखा नाचत सुटे. दुसरा माळी फारसा बोलत नव्हता, पण तो मेहनती होता. एकसारखे कष्ट करून त्यानें ती बाग चांगल्या रंगारूपाला आणली होती. त्याने नाना प्रकारची शाकभाजी, फलझाडे आणि फुलझाडे तेथे तयार केली होतीं, आणि पिकलेलीं फळें व भाजी वगैरे घेऊन तो कधींमधी आपल्या धन्याच्या घरीं जात असे. आता अशा प्रकारच्या दोन नोकरांपैकीं धन्याची मर्जी कोणावर बसेल बरें ? या विश्वोद्यानाचा मालक शिव हा आहे. या प्रचंड उद्यानांत दोन प्रकारचे नोकर आहेत एक प्रकारचे नोकर नुसते स्तुतिपाठक आहेत. शिवाच्या सुंदर मुखाचें आणि इतर अवयवाचें वर्णन करण्यातच ते चूर होऊन गेलेले असतात. हे नोकर आळशी आणि दांभिक असून कोरड्या स्तुतिपाठावाचून दुसरे कांहींच करीत नाहींत. दुसऱ्या प्रकारचे नोकर आहेत, ते शिवाच्या मुला-

लेकराची बरदास्त ठेवतात. दुबळे लोक, पोरकी पोरे, मुकीं जनावरे आणि इतर सर्व वस्तुजात हीं शिवाच्या मुलासारखींच आहेत. या दोन प्रकारच्या नोकरापैकी शिवाचें प्रेम कोणत्या प्रकारचे नोकर सपादितील बरें ? शिवाच्या लेकराची जो काळजी वाहतो, तोच शिवाला अधिक प्रिय होईल, हे सागावयास पाहिजे काय ? ज्याला बापाचे प्रेम सपादणें असेल, त्याने मुलाचे प्रेम प्रथम सपादिलें पाहिजे. ज्याला शिवाचे पूजन करावयाचें असेल त्यानें त्याच्या मुलाचें पूजन प्रथम केलें पाहिजे जें जे काहीं या विश्वात उत्पन्न झालें आहे, त्याची पूजा करणें हा भावी शिवपूजनाचा मार्ग आहे "मद्भक्ताना च ये भक्ता· ते मे भक्ततमा मता" असें भगवद्वचन आहे.

आपणापाशीं मदत मागावयास कोणी आला तर जातगोताचा विचार न करता शक्त्यनुसार त्याला मदत करणे हीच खरी भक्ति आहे, हे आपण नित्य लक्ष्यात बाळगलें पाहिजे हेच सत्कर्म होय. सत्कर्माच्या योगानें अत.करण पवित्र होऊ लागते चित्तशुद्धि झाली म्हणजे आपल्या अत करणांत वसत असलेला शिव उदय पावू लागतो. यच्चयावत् वस्तुमात्राच्या ठिकाणी शिवाचा वास आहे. आरसा मलिन असला म्हणजे आपले तोंड त्यात आपणांस दिसत नाही त्याचप्रमाणें अज्ञान आणि दुर्गुण यांचा थर आपल्या अत करणावर बसला म्हणजे त्यात शिवाचे प्रतिबिंब दिसत नाहीं आपलपोटेपणा हे सर्व पापाचे माहेरघर आहे 'मी' आणि 'माझें' याचाच जप सदोदित करणारें अत करण अत्यत मलिन झालेलें असते ते अत करण सर्वात अत्यत अपवित्र होय सर्व जगातील सपत्ति मला पाहिजे, आणि दुसऱ्याच्या अगोदर स्वर्गसुख मला मिळालें पाहिजे, असे ज्याला वाटते तो खरोखर पापी होय फार काय सागावे, पण मला सर्वाआधीं मुक्ति पाहिजे असे म्हणणाराहि पापी होय. पुण्यात्मा म्हणेल कीं "स्वर्गांत अधिक ते काय आहे ? मी सर्वांच्या मागून तेथे जाईन एखाद्या माझ्या बधूला मदत होत असेल तर नरकवासही मी मोठ्या आनदानें पत्करीन." स्वत्व विसरणें हीच धार्मिकपणाची खरी कसोटी होय. ज्याच्या ठिकाणी हा विसर अधिक प्रमाणावर असेल, तोच अधिक धार्मिक आणि तोच शिवाच्या अधिक जवळ गेलेला आहे हे नि.संशय समजावे. तो विद्वान असो अगर नसो, तो शिवाच्या सनिध आहे हें मात्र खास. एखाद्याने जगांतील सर्व तीर्थयात्रा केल्या, सर्व देवाचीं दर्शनें घेतलीं आणि सर्व प्रकारच्या

चित्रविचित्र रंगाचा पोषाख केला, तरी जर तो स्वत्व विसरला नसेल तर तो शिवापासून अद्यापि पुष्कळ लांब आहे असेंच म्हटलें पाहिजे.

---

## रामनद् येथील मानपत्र व उत्तर.

( पुढील मानपत्र रामनद येथील महाराजांनी अर्पण केलें )

श्रीमत् परमहंस यतिराजदिग्विजयकोलाहलसर्वमतसंप्रतिपन्नपरमयोगीश्वर श्रीमद्भगवान् श्री रामकृष्णपरमहंसकरकमलसंजातराजाधिराजसेवित श्री विवेकानंदस्वामी यांचा जयजयकार !

परमपूज्य यतिराज,

रामनाथपुर अथवा रामनद या नावाने प्रसिद्ध असलेल्या सेतुबंध-रामेश्वराजवळील या प्राचीन व इतिहासप्रसिद्ध संस्थानांतील आम्ही रहिवासी आपलें प्रेमपूर्वक स्वागत करीत आहों श्री भगवान् रामचंद्राच्या पदरजांनी पवित्र झालेल्या या भूमीवर आपलें स्वागत करण्याचा मान आम्हास प्रथम मिळाला याबद्दल आम्हास अत्यंत धन्यता वाटत आहे.

आमच्या पुरातन अणि उदार धर्माचीं अत्युच्च तत्त्वे पाश्चात्य पंडितांना पटविण्याच्या प्रशंसनीय कार्यांत आपण अपूर्व यश संपादन केलें, याबद्दल आम्हास अभिमान आणि आनंद वाटत आहे. सर्व विश्वाचा धर्म होण्याची योग्यता जर कोणत्या धर्मांत असेल तर ती हिंदुधर्मांतच आहे ही गोष्ट आपण आपल्या अश्रुतपूर्व वक्तृत्वानें आणि अस्खलित शब्दांनी अमेरिकन आणि इतर पाश्चात्य पंडितांच्या ध्यानी पूर्णपणें आणून दिली आहे. सर्व पंथांच्या आणि शाखांच्या स्त्रीपुरुषांना मानवतील अशीं तत्त्वे हिंदुधर्मांत आहेत, ही गोष्ट स्पष्टपणे आपण सिद्ध केली आहे स्वहिताचा कोणताही हेतु मनांत न धरतां, अत्यंत कष्ट व झीज सोसून आणि दुस्तर जलपर्यटन करून आपण शांतीचा आणि सत्याचा हा संदेश पाश्चात्यास पोहोचविला आहे हिंदुस्थानाच्या धर्मविजयाची पताका अमेरिकेत आणि युरोपांत आपण रोविली आहे. सर्वत्र समता आणि बंधुभाव यांचे महत्त्व किती आहे, हें आपण आपल्या स्वतःच्या उदाहरणानें आणि उपदेशाने शिकविले आहे. अमूल्य अशा हिंदुधर्मांचें रहस्य, हिंदुस्थानांतील धर्मपराङ्मुख झालेल्या

स्त्रीपुरुषाच्या ध्यानी आले आणि आपल्या सनातन धर्माचा अभ्यास करून तो प्रत्यक्ष आचरणात आणावा असे त्यांना वाटू लागलें, हासुद्धा आपल्या महत्कार्याचाच एक अप्रत्यक्ष परिणाम झाला आहे

पूर्व आणि पश्चिम या दोन्ही दिशाकडील देशात धर्माचें बीजारोपण आपण उदारबुद्धीनें केलें, याबद्दल आमच्या चित्तात असलेला आदर व पूज्यभाव पूर्णत्वानें व्यक्त करण्याचे सामर्थ्य शब्दात नाही. आमच्या महाराजावर जे आपलें प्रेम आहे, त्याबद्दलही आदरपूर्वक उल्लेख येथे करणें उचित आहे. आमचे महाराज हे आपल्या शिष्यवर्गापैकीं आहेत, आणि त्याच्या राज्याच्या सीमेवर आपण प्रथम येऊन उतरला, याबद्दल त्यानाही अवर्णनीय आनद होत असून आपण दिलेल्या या मानाबद्दल त्याना मोठा अभिमान वाटत आहे.

आपणास उदंड आयुष्य आणि शारीरस्वास्थ्य परमेश्वराने द्यावे आणि अगीकृत कार्य यशस्वी करावे अशी आम्ही मनोभावे त्याची प्रार्थना करतो.

## स्वामींनी दिलेले उत्तर.

दीर्घकालीन निशा संपत आल्याचीं चिन्हें दृग्गोचर होऊ लागलीं आहेत. अत्यत कष्टमय दशा लवकरच सपणार अस वाटू लागलें आहे. प्रेतवत् पडलेल्या देहात चैतन्य पुन्हा सचरूं लागले आहे, आणि एक कर्णमनोहर ध्वनि ऐकूं येऊ लागला आहे. ज्या काळाच्या अथाग पोटात इतिहासच काय, पण दतकथाही प्रवेश करू शकत नाही, त्या ठिकाणातून हा ध्वनि येत आहे. हिमालयातून निघालेला गगेचा ओघ ज्याप्रमाणे डोंगराच्या वळणावळणानी खाली उतरतो, त्याचप्रमाणें ज्ञान, भक्ति आणि कर्म या तीन शिखराच्या हिमालयांतून अत्यत मृदु पण स्पष्ट असा मजुळ ध्वनि आमच्या मातृभूमीकडे धांव घेत आहे. काळाच्या ओघाबरोबर या ध्वनीची गति वाढत आहे, आणि तो अधिक जोमदारही होत आहे. प्रेतवत् पडलेल्या देहापर्यंत हा ध्वनि पोहोंचताच त्या देहांत हालचाल होऊ लागली. कुंभकर्ण जागा होऊ लागला. हिमालयांतील वारा ज्याप्रमाणें तप्त देहास शांत करतो, त्याचप्रमाणें ज्ञानाचलावरून येणारा हा वायु मृतवत् झालेल्या हाडांस आणि स्नायूस पुन्हा चैतन्य देत आहे. त्यामुळें आलस्यनिद्रेचा नाश होत आहे. आमची मातृभूमि आपली लांबचलांब झोंप सोडून उठत

आहे, ही गोष्ट जन्माधाला मात्र पटणें शक्य नाही. तसेंच अहकारानें ज्यांची बुद्धि तमोगुणी झाली आहे, त्यांना हें पटवून घेण्याची इच्छाही होणार नाहीं आता तिच्या मार्गात कोणोही अडथळा आणू शकणार नाहीं. यापुढें झोप घेण्याची तिची इच्छा नाहीं. ही अत्यत विस्तृत अशी भूमि आता उभी राहू पाहत आहे आणि तिच्या इच्छेला आळा घालण्याचे सामर्थ्य कोणत्याही बाह्यपदार्थांत नाहीं.

रामनदचे महाराज, आणि सभ्य गृहस्थ हो, आपण जें माझे मन पूर्वक स्वागत केलें, त्याबद्दल मी आपला फार ऋणी आहे. आपण माझें स्वागत शुद्ध मनानें आणि केवळ प्रेमानें प्रेरित होऊन केलें याची साक्ष माझे अत करणच मला देत आहे. अत करणाची प्रवृत्ति हेंच या गोष्टीचें महत्तम प्रमाण होय. अत.करणाची भाषा अतःकरणच जाणू शकते. तोंडानें बोललेले शब्द कानापासून परत फिरतात, पण अत करणाचे शब्द थेट अतःकरणा-पर्यंत जाऊन भिडतात. जीवात्मा जीवात्म्याची भेट घेतो तेव्हां शब्द मूक होऊन बसतो. जीवात्म्याची भाषा अगदीं नि.शब्द असली तरी अत्यत स्पष्ट असते.

सभ्य गृहस्थ हो, पाश्चात्य देशांत धर्माची आणि आपल्या मातृभूमीची जर काही सेवा माझ्या हातून घडली असेल, स्वत च्या घराच्या जवळपासच अमूल्य रत्नांचा निधि पुरून ठेवलेला आहे, ही गोष्ट आपल्या लोकाच्या लक्ष्यांत येण्यास माझे श्रम कारणीभूत झाले असतील, अज्ञानाने अध झाल्या-मुळें एखाद्या सडक्या डबक्यात घाणेरड्या पाण्याने आपली तहान भागवू पाहणारास अनतकालापासून वाहणाऱ्या शुद्ध झऱ्याची वाट सांपडली असेल, जर काहींतरी कर्तव्यस्फूर्ति आपल्या बाधवांस झाली असेल, धर्म हाच कायतो आर्यभूमीचा तरणोपाय आहे ही गोष्ट त्यास पटली असेल, आणि धर्महानि झाली तर आर्यभूची प्राणहानि निश्चयानें होईल याबद्दल त्याची खात्री झाली असेल, तर या गोष्टीचें श्रेय मुख्यतः रामनदच्या महाराजा कडेच आहे पाश्चात्य देश आणि हिंदुस्थान यांना उपयुक्त अशी जी कांही कामगिरी माझ्याद्वारें झाली, तिचा मुख्य वांटा महाराजांचाच आहे या आर्य भूमींतून धर्म निघून जाणें म्हणजे तिची जीवनकला निघून जाणेंच होय तुम्हीं केवढेंही मोठें राजकारण केलें, केवढीही मोठी समाजसुधारणा घडवून

आणली आणि हिंदुस्थानच्या प्रत्येक रहिवाशाला कुबेराची संपत्ति मिळवून दिली, तरी धर्माच्या अभावीं आर्यभू केवळ स्मृतिविषय होऊन राहील, ही गोष्ट माझ्या बांधवांस पटली असेल, तर या यशाचाही मुख्य वाटा महाराजांकडेच आहे. ही कल्पना महाराजांमुळेंच माझ्या मनांत प्रथम उद्भवली. हे कार्य मीं करावें म्हणून महाराजांनीच मला एकसारखें प्रोत्साहन दिलें. पुढें काय होणार याचें ज्ञान महाराजास जणूंकाय आगाऊच झालें होते. त्यानीं मला हाताशीं धरले, मला सर्वप्रकारें मदत केली आणि अडचणीच्या वेळीं मला सतत प्रोत्साहनही दिलें. याकरिता माझे श्रम थोडेफार सफल झाले, याबद्दल आपणास विशेष आनंद वाटावा हे अगदी साहजिक आहे. अजून राच' मोठा कार्यभाग आपणास करावयाचा आहे आपल्यात गुप्त राहिलेल्या ऋद्धिसिद्धींस पुन्हा कार्यकारी करावयाचे आहे. पाश्चात्य राष्ट्राच्या स्वप्नातही न आलेल्या अशा अनेक गोष्टींचें शिक्षण त्यास द्यावयाचे आहे. आपली मातृभूमि ही तत्त्वज्ञानाची, पराविद्येची, नीतिशास्त्राची, शांतीची आणि प्रेमाची जन्मभूमि आहे, ही अजूनही आपल्या भूमींत जिवत आहेत. मी साऱ्या जगभर फिरलो आणि वस्तुस्थितीचें जें निरीक्षण केलें, त्यावरून माझी अशी बालबाल खात्री झाली आहे कीं, तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र, शांति इत्यादिकाचा वास जगात जर कोठें असेल तर तो आपल्या या भूमींतच आहे. आपली भूमि या बाबतींत जगांतील सर्व राष्ट्रात श्रेष्ठ आहे. माझें हें म्हणणें धाष्ट्याचें आहे असें आपण समजू नका प्रत्यक्ष अनुभवानें माझी याबद्दल खात्री झाली आहे आपणाभोंवतीं कोणत्या प्रकारच्या घडामोडी सुरू आहेत याचें क्षणभर निरीक्षण केल्यास, माझ्या म्हणण्याची सत्यता आपणास पटल्याशिवाय राहणार नाहीं. गेल्या चारपाच वर्षात पश्चिमेकडे बऱ्याच प्रकारच्या घडामोडी झाल्या सध्या अस्तित्वात असलेली समाजघटना पालथी घालण्याच्या उद्देशानें मोठमोठे संघ पाश्चात्य देशात अस्तित्वात आले असून, त्यानीं आपल्या या मोडतोडीच्या कार्यात थोडेंबहुत यशही संपादिलें आहे. या घडामोडींपैकीं आपल्या लोकांना एखाद्या तरी भागाची माहिती आहे कीं काय याची चौकशी करा. या बाबींत आम्हां लोकांची माहिती पाहिली तर अगदी शून्य ! पण शिकागो येथें सर्व धर्मांची मोठी सभा भरली होती, आणि त्यात एका संन्याशानें भाषण केलें आणि त्या वेळे-

पासून पाश्चात्य देशात तो सन्याशी धर्मप्रचाराचें काम करीत आहे, या गोष्टी येथे आबालवृद्धांस माहित आहेत. आमचा सामान्य जनसमूह अज्ञानाच्या घोर अंधकारांत बुडालेला असून त्याला शिक्षणाची अथवा दुसऱ्या कसल्याही प्रकारच्या माहितीची गरज भासत नाही, असा एक प्रवाद माझ्या कानीं आलेला आहे. एके वेळीं मलाही या मूर्खपणाच्या कल्पनेनें पछाडलें होतें, पण प्रत्यक्ष अनुभव हा या बाबतींत रामबाण मात्राच आहे. अशा बाबतींत कितीहि भवतिनभवति केली अथवा साखरेची साल निघेपर्यंत सूक्ष्म बुद्धिवाद केला तरी प्रत्यक्ष अनुभवाची बरोबरी या गोष्टींनी कधींही होणार नाहीं जगभर फिरणाऱ्या प्रवाशांनी वरवर केलेल्या अवलोकनावरून लिहिलेली चोपडींही अशा प्रकरणीं निरुपयोगी असतात. मला जो काहीं अनुभव आला त्यावरून माझी अशी खात्री झाली आहे कीं, आमचा समाज मठ्ठ नाहीं अथवा आळशीही नाही. या पृथ्वीवरील इतर कोणतेही राष्ट्र जितकें ज्ञानलोलुप असेल तितकेंच आमचेही राष्ट्र ज्ञानलोलुप आहे, पण प्रत्येक राष्ट्राची भवितव्यता निराळी असते हें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. या भवितव्यतेला अनुरूप असे विशेष त्या राष्ट्रांत उत्पन्न होत असतात. "पिंडे पिंडे मतिर्भिन्ना" हा न्याय व्यक्तीइतकाच राष्ट्रालाही लागू आहे. एखाद्या विण्याच्या तारा प्रत्येकीं निरनिराळा सूर काढीत असल्या, तरी त्या सर्व सुरांच्या समीकरणातून ज्याप्रमाणे एकतानता उद्भवते त्याचप्रमाणें विश्वाची एकतानता निरनिराळ्या राष्ट्रांच्या निरनिराळ्या वृत्तींच्या समीकरणातून जन्म पावते. प्रत्येक राष्ट्राची विशिष्ट वृत्ति ही त्या राष्ट्राच्या जीविताची मुख्य बाब आहे. ती वृत्ति नष्ट झाली तर ते राष्ट्रही अवश्यमेव लयाला जाईल. राष्ट्र या नात्यानें एखादा समाज दीर्घकाल जगतो तोच याच वृत्तीच्या बळावर जगतो या विशिष्ट वृत्तीच्या पायावरच त्या राष्ट्राची इमारत उभी असते. आमच्या राष्ट्राच्या इमारतीचा पाया फक्त धर्म हाच आहे. धर्मावांचून दुसरा कोणताही जीवनहेतु आमच्या राष्ट्राला नाही. राजकारणें दुसऱ्या राष्ट्रांनीं खुशाल करावी, व्यापार करून कुबेराची सपत्तीही वाटल्यास इतरांनीं मिळवावी, जड स्वातंत्र्याच्या मनमुराद गप्पा इतर राष्ट्रांनीं खुशाल झोकाव्या. आमच्या राष्ट्राला या गोष्टीचे महत्त्व काय, हेच समजत नाहीं. ते समजावें अशी त्याची इच्छाही नाहीं. त्याचा जीवनस्वर कशात आहे याची ओळख तुम्हांस करून घ्यावयाची असेल, तर धर्माच्या बाबीला जरा स्पर्श करून पहा,

म्हणजे आमच्याकडील एखाद्या लगोट्याला या बाबींत जितकी माहिती असते तितकी इतर देशांतील जाड्या पडिताला्ही नसते असें तुम्हास आढळून येईल इतर देशाना शिकविण्यासारख्या अनेक गोष्टी आपणापाशीं आहेत, असे मी नुकतेंच म्हटल्याचे आपल्या स्मरणांत असेलच. याच कारणासाठीं आपला देश अद्यापि जीव धरून राहिला आहे. हजारो वर्षाच्या छळाखालीं दडपला असताही आणि हजारो वर्षे परक्याच्या छत्राखालीं असतांही हा देश अद्यापि जगला आहे, याचेंही कारण हेंच. तो परमेश्वराला चिकटून बसला आहे व धर्म आणि पराविद्या याचे निवासस्थान होऊन राहिला आहे म्हणूनच तो अद्यापि जिवत आहे.

धर्म आणि पराविद्या यांचा मोठा खजिना याच देशात असून तो तुडुंब भरलेला आहे. आपली मर्यादा उल्लघून त्यातील ज्ञानजलाचा प्रवाह इतर देशांकडे वाहूं पहात आहे, आणि असे होणें हे सध्याच्या काळी अत्यत आवश्यकही आहे. अनिवार राज्यतृष्णेच्या ओझ्याखालीं आणि समाजाच्या विषमरचनेमुळें पाश्चात्य राष्ट्रे दडपून जाऊन अर्धमेली झाली आहेत. जीविताच्या उच्च हेतूपासून तीं पतन पावत आहेत. त्याना नवजीवन आणि चिकाटी ही प्राप्त करून देण्याकरिता पराविद्येच्या झऱ्याचें जिवंत पाणी तिकडे जाणें हेच इष्ट आहे. हिंदुस्थानात अनेक मताचा आणि मतातराचा कोलाहल होत असला, आणि सम व विषम सुराच्या नादानें आमचा देश भरून गेला असला, तरी त्या सर्वांहून मोठा असा एकच सूर निरतर ऐकू येत असतो हा सूर सर्वात मोठा, स्पष्ट आणि पूर्ण शक्तिमान असा आहे. या सुराचे नांव 'त्याग' असें आहे. " न धनेन न प्रजयात्यागेनैकेनामृतत्वमानशु ।" हाच हिंदुधर्माचा प्रमुख मंत्र आहे. साऱ्या धर्मांचें सार एकाच वाक्यात सागावयाचें म्हटलें तर तें याच वाक्यात साठविलेले सापडेल. या मायावी जगाच्या पलीकडे अनतत्व आहे आणि तेच आपलें साध्य आहे. आमच्या या विस्तृत देशांत वीरवृत्तीचे आणि प्रचड बुद्धिमान असे अनेक पुरुष जन्मास येऊन गेले. त्यानीं सर्व देश प्रकाशमान केला होता. एखादे राष्ट्र अथवा एखादें जगच काय, पण ज्याचा विस्तार अचित्य आहे असें हें विश्वही त्याच्या दृष्टीनें एखाद्या क्षुद्र डबक्यासारखें दिसत होतें. या विश्वाच्याही सीमा उल्लघून ते पलीकडे गेले. अनत कालालाही त्यांच्या दृष्टीनें अस्तित्व नव्हतें. कालही त्यांच्या भरारीला मर्यादा घालूं शकला नाहीं. ते कालापलीकडे गेले. स्थलमर्यादाही त्यांच्या

गतीला अडथळा करू शकली नाहीं. ते स्थलातीत झाले दृश्याच्या पलीकडे जाणें हेंच धर्मसर्वस्व आहे प्रकृतीनें उभारलेला हा चित्रपट फाडून त्याच्या पलीकडे पाहण्यासाठीं काय वाटेल ते करावयाचें आणि देह गेला अथवा राहिला तरी पलीकडच्या वस्तूचें दर्शन झाल्याशिवाय स्वस्थ बसावयाचे नाही, हाच माझ्या जन्मभूमीचा बाणा आहे. आपले हेच अखेरचे साध्य आहे; पण असे असलें तरी या देशातले सारेच लोक एका चुटकीसरसे त्यागी बनतील ही गोष्टही शक्य नाहीं. मुख्य मुद्याची गोष्ट इतकीच कीं आमच्या देशाचे ध्येय इतरापासून अगदीं वेगळे आहे हे लक्ष्यात बाळगलें पाहिजे. तुमच्या राजकारणांच्या गोष्टी, सामाजिक सुधारणेच्या गप्पा, व्यापारविषयक चळवळी अथवा अर्थविषयक उलाढाली या सर्वांचे स्थायित्व अळवाच्या पानावरील मोत्याइतकेच आहे, आणि त्यांची किंमतही तितकीच. आमची पराविद्या आम्हांस इतरास शिकवावयाची आहे आता आम्हास जगापासून शिकण्यासारखे काय आहे हेही पाहिलें पाहिजे. भौतिकशास्त्राचें ज्ञान आम्हास इतरापासून प्राप्त करून घ्यावयाचे आहे त्याचप्रमाणे सघशक्तीनें कोणतेंही कार्य कसे पार पाडावे हेही आम्हांस इतरापासून शिकले पाहिजे. त्याचप्रमाणे क्षुद्र कारणापासून महत्कार्यें कशीं निर्माण करावी, शक्तीची योग्य सघटना कशी करावी आणि त्या सघटनेचा उपयोग कसा करावा, याही गोष्टींत पाश्चात्यास आपण गुरु केलें पाहिजे. या सर्व गोष्टी मी कबूल करतो, पण 'खावे–प्यावें–मजा मारावी' हीच मानवी जीविताची इतिकर्तव्यता आहे, असें कोणी सांगूं लागला अथवा ऐहिक सुख हीच परमेश्वराची भेट असे कोणी म्हणू लागला, तर तो सत्यापलाप करीत आहे, असेच म्हटलें पाहिजे अशा मनुष्याला माझ्या या पवित्र भूमींत स्थान मिळावयाचे नाही. अशा मनुष्याचा एक शब्दही ऐकून घेण्याची आमची इच्छा नाही. पाश्चात्य सुधारणेच्या अंगावर मोराच्या पिसाऱ्यावरचे सारे रंग चमकत असले, तिचा झगझगाट कितीही मोठा असला, विचारशक्तीचा देखावा कितीही मोठा असला, तरी या उच्चासनावर उभा राहून मुक्तकंठानें मी असे जाहीर करतो कीं, ही सारी सुधारणा पोकळ आहे; निवळ वाऱ्याचा हा फुगवटा आहे. या संस्कृतीचे जीवित कमळाच्या पानावरील जलबिंदूइतकेंच स्थिर आहे. चिरस्थायित्व फक्त परमेश्वरालाच आहे, चिरस्थायित्व फक्त आत्म्यालाच आहे, चिरस्थायित्व फक्त पराविद्येलाच.

आहे. या चिरतन वस्तूनाच तुम्ही कायमचे चिकटून रहा. तुमची मगरमिठी फक्त याच वस्तूभोवतीं पडूं द्या

त्याग हे आपलें अखेरचें ठिकाण असलें, तरी सर्वांनाच ते एकदम साध्य होईल असें नाहीं. आपणापैकी जे कोणी हे सत्य जाणण्यास अद्यापि असमर्थ असतील त्यांच्याकरितां थोडीबहुत जड सुधारणा आपणांस हवी, तथापि ती सुधारणाही आमच्या विशिष्ट गरजास आणि परिस्थितीस अनुकूल होईल अशा प्रकारचीच पाहिजे. केवळ पाश्चात्याची सुधारणा जशीच्या तशीच इकडे आणणें इष्ट नाही. आमच्या विशिष्ट वृत्तीचा उच्छेद होणार नाही अशा प्रकारे तिच्यात फेरबदल केला पाहिजे. सर्व देशांत आणि सर्व काळीं यासबधात एक मोठी चूक नेहमी होत असल्याचे आढळून येते तुमची सुधारणा केवढीही मोठी असो अगर तिच्यात केवढेही मोठे सत्य भरलेलें असो, पण जे लोक ती सुधारणा घेण्याला तयार झालेले नाहीत, त्याजवर ती सक्तीनें लादू पाहणे अनर्थकारक आहे आपल्या देशातही ही चूक वारंवार झालेली आहे, ही मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे जो गोष्ट माझ्या उपयोगीं पडेल, तीच तुम्हालाही तशीच उपयुक्त होईल, असें समजणें चुकीचे नाही काय? आमच्या समाजरचनेंत सन्यास ही अखेरची पायरी आहे, हे आपणा सर्वास ठाऊक आहेच. आमच्या समाजशास्त्राप्रमाणे प्रत्येकानें शेवटी सन्यस्तवृत्तीचा आश्रय केला पाहिजे असे आहे हिंदुसमाजपद्धतीची ती अखेरची पायरी आहे. लौकिक सुखाचा आस्वाद घेतल्यानंतर—आयुष्याच्या सायकाळीं—प्रत्येक हिंदूने सन्यासग्रहण करावे असें आमच्या शास्त्राचें अनुशासन आहे. जो कोणी असे करणार नाहीं, तो हिदु नसून स्वत ला हिदु म्हणविण्याचा अधिकारही त्याला उरत नाहीं. या जगातील अखिल वस्तुजात निवळ मायावी आहे असा अनुभव आयुष्याच्या अंतिम भागापर्यंत घेऊन, शेवटीं या वस्तुजाताचा त्याग करणें हेच आपलें अखेरचे कर्तव्य आहे, या गोष्टीची जाणीव आपणा सर्वास आहे. जड जगाचा फुगारा केवढाही मोठा दिसत असला, तरी आत ते सर्व पोकळ आहे अशी अनुभवानें खात्री झाल्यानंतर या फुगाऱ्याचा त्याग करणें हेंच उचित आहे. इंद्रियाकडे मन एकसारखे धाव घेत असते; इंद्रियें, मनाची गति बाह्यवर्ती करीत असतात. मन अतर्वर्ती करणें हे आपलें साध्य आहे. इंद्रियांचें कोड पुरवून जगाचा पोकळपणा अनुभवानें पटला म्हणजे

प्रवृत्ति-मार्गाची अखेर होऊन निवृत्तीला आरभ होतो. हें आपलें अखेरचे साध्य आहे ही गोष्ट खरी, पण जगाचा तसा अनुभव आल्यानतरच तें साध्य सिद्ध होण्याच्या मार्गाला लागेल हेही खरे आहे. एखाद्या लहान मुलापुढे सन्यस्तवृत्तीचे कितीही गोडवे गायिले तरी त्याचा काय उपयोग होईल बरे? उपजल्यापासून मुलाचे मन जगाकडे प्रवृत्त झालेले असते. या जगात सुख भरलेलें आहे अशी त्याची पक्की भावना असते. त्याचा सर्व जीव इद्रियात येऊन बसलेला असतो. इद्रियजन्य सुखाचा उपभोग हेंच जीवनसर्वस्व आहे असें त्या वेळी त्याला वाटत असते. अशा बालवृत्तीचे लोक प्रत्येक समाजात असतात. अशा मनुष्याना इद्रियजन्य सुखाचा आस्वाद मनमुराद घेऊ देणें हेच इष्ट असतें हा आस्वाद घेता घेता त्याचा पोकळपणा अनुभवाने कळल्यानतर सन्यस्तवृत्तीचा अरुणोदय त्याच्या ठिकाणी आपोआप होतो अशा प्रकारच्या लोकाकरिता आमच्या शास्त्रानीं अनेक मार्ग आखून अनेक प्रकारच्या सवलती निर्माण करून ठेवल्या आहेत, पण शास्त्राचे मार्ग आचारात येऊ लागल्यानतर दुर्दैवानें त्यांत घोटाळे उत्पन्न होऊ लागले पुढे पुढे सन्यस्तवृत्ति प्रत्येकावर लादली जाऊ लागली सन्यस्तवृत्तीचे नियम प्रत्येकावर जबरीनें लादणें ही भयकर चूक आहे अशा प्रकारच्या चुकीमुळे दारिद्य आणि त्याच्या अनुषगाने असणारी अनेक प्रकारची दु खे यानीं आमच्या समाजात ठाणें दिलें अशी चूक झाली नसती, तर आज आपल्या दारिद्याचे जे प्रमाण दिसत आहे ते दिसलें नसते एखाद्या दरिद्याचाही जीवनक्रम अनेक प्रकारच्या व्रतवैकल्यानी आणि इतर धर्मबधनानीं इतका पक्का जखडून गेला आहे कीं, त्याला जरासेंही आग हालविण्याची फुरसत सापडत नाहीं. हीं बधनें त्याच्या वाढीला अनुकूल आहेत असें म्हणावे तर नसेंही दिसत नाही. आता या साऱ्या बधनाचा उच्छेद झाला पाहिजे. त्या बिचाऱ्याला या जगातील चैनीचा थोडातरी उपभोग घेऊं दिला पाहिजे. कांही काळ उपभोग घेतल्यानतर त्याचें चित्त आपोआप शात होऊ लागेल आणि आपखुषीनेच ते सन्यस्तवृत्तीकडे वळेल. अशा प्रकारचें शिक्षण पाश्चात्यांकडून घेणें थोडेबहुत फायदेशीर होण्याचा सभव आहे, पण हें शिक्षण घेत असताही आपण अत्यत दक्षता बाळगली पाहिजे. पाश्चात्य शिक्षणानें 'सुशिक्षित' झालेल्या लोकात बहुधा "इतो भ्रष्टस्ततो भ्रष्ट" अशां-

चाच भरणा दृष्टीस पडतो ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे. आपला मार्ग सध्या अत्यत बिकट झाला आहे आपल्या दोन्ही बाजूस भयाच्या जागा आहेत आणि त्या दोहोतील भीतिप्रद स्थळें टाळून आपणास सुरक्षितपणें बाहेर पडावयाचें आहे एका बाजूला आमच्या जुन्या कर्मठपणाचा फुफाटा आहे, तर दुसऱ्या बाजूला आधुनिक पाश्चात्य सुधारणेच्या ज्वाला भडकल्या आहेत हीं दोन्ही टाळून मधल्या सुरक्षित रस्त्यानें मार्ग काढणे हे फार कठीण काम आहे. हें साध्य होत नसेल आणि या दोहोपैकीं कोणत्यातरी मार्गाचा स्वीकार करणें आपणास भागच असेल, तर जुन्या कर्मठपणाचा फुपाटा मी पसंत करीन. आधुनिक सुधारणेच्या ज्वाला मला नकोत असेंच मी म्हणेन आमचा जुना कर्मठ मनुष्य अज्ञानात बुडालेला असेल, आणि त्याच्या अगी अतःकरणाचे सात्विक गुणही नसतील, पण असें असलें तरी तो पुरुष असतो यात मात्र सशय नाहीं. त्याच्या ठिकाणी पौरुष असते. त्याच्या ठिकाणीं श्रद्धा असते. तो स्वावलबी असतो. त्याच्या ठिकाणी आत्मबळ असतें. उलटपक्षी आमच्या नव्या पद्धतीच्या बाडाकडे पाहिलें तर त्याच्या ठिकाणीं प्रथम स्थिर पायाचाच अभाव असतो. एखाद्या गारोड्याच्या पोतडीत ज्याप्रमाणें कमीअधिक किंमतीच्या वस्तू एकत्र सांठविलेल्या असतात, त्याचप्रमाणें आमचा आधुनिक पाश्चात्य पद्धतीचा 'सुशिक्षित' म्हणजे हजारो बऱ्या वाईट चिजाचें गाठोडें बनलेला असतो शक्य तितक्या निरनिराळया ठिकाणातून उचललेल्या अनेक कल्पना त्याच्या तोबऱ्यात भरलेल्या असतात, आणि त्याचें तो पुन पुन· चर्वण करीत असतो. अन्न अधिक झालें म्हणजे जसें तें पचत नाहीं आणि शक्तिदायक होत नाहीं, त्याचप्रमाणें या साऱ्या कल्पना कशातरी गिळलेल्या असल्यामुळें त्यांचा काहीं सुपरिणाम घडल्याचें नजरेस येत नाहीं. पूर्वीचें होते ते मात्र गेलें आणि नवें कांहीं प्राप्त झालें नाहीं, अशा स्थितींत तो अधातरीं लोबत राहतो. अशा स्थितीत त्याला भोंवळ येऊ लागते आणि त्याचे मस्तक सदोदित चक्राकार परिभ्रमण करीत असतें. आपण काहीं महत्वाची कामगिरी करावी अशी इच्छा चित्तात उद्भवण्यास काही विशेष कारण असावे लागतें आणि विशेष प्रकारचे पाठबळही लागतें. आपल्या कार्याबद्दल विशेष प्रकारची आस्था अथवा पूज्यभाव यांचें बळ आंगीं नसलें, तर अशा मनुष्याच्या

ह्यातून कोणतेंही कार्य नेटानें पार पडणें शक्य नाहीं. अशा प्रकारचें बळ आमच्या पाश्चात्य पद्धतीच्या ‘ सुशिक्षित ’ लोकांच्या अगीं कितीसें आहे ? आधुनिक सुशिक्षितांना मोठें बळ म्हटलें म्हणजे युरोपीय पंडितमन्यांकडून मिळालेली शाबासकी हेच. या शाबासकीच्या इच्छेनें तो एखाद्या कार्याला हात घालणार ! आमच्या चालीरीती वाईट आहेत, असें तो म्हणतो. कां ? तर युरोपीय पंडित त्या वाईट म्हणतात म्हणून. या पलीकडे त्याला काहीं महत्त्वाचें कारण सांगतां येणार नाहीं. प्रत्येक बाबतींत परक्याच्या तोंडाकडे पाहण्याची ही खोड सर्वथैव त्याज्य आहे. स्वत.चा बरेवाईटपणा परक्याच्या मापानें कधींही मापू नका. असें करणें म्हणजे स्वत.च्या भयकर मनोदौर्बल्याचे प्रदर्शन करणेंच होय. जगात जर कांही भयकर पातक असेल, तर तें मनोदौर्बल्य हेंच आहे. याहून अधिक भयकर असें दुसरें एकही पातक नाहीं. मनोदौर्बल्य म्हणजे साक्षात् मरणच. अशा प्रकारचे धेडगुजरी प्राणी पाहिले म्हणजे यांची स्थापना तरी कोणत्या कोटींत करावी याची शका वाटते. ज्याना कोठेच घर नाहीं आणि ज्याचे पाय कोठेंच स्थिर झालेले नाहींत त्याची जात तरी कोणती? याना पुरुष म्हणावे कीं स्त्री म्हणावें ? कीं याची योजना तिर्यक् योनींत करावी ? आमचे जुने कर्मठ लोक नि.सशय पुरुष होते–मर्द होते. स्वत.च्या चित्ताला पटेल तेंच सदोदित करावयाचें असा त्याचा बाणा होता. अशा प्रकारचीं माणसें अजूनही हयात आहेत; आणि त्याचा नमुना आपणास पहावयाचा असला, तर ह्या आपल्या महाराजांकडेच पहा रामनदच्या महाराजांइतका खरा हाडाचा हिंदु या साऱ्या आर्यावर्तात क्वचित् असेल. दुसरे अनेक राजे आणि महाराजे यांपेक्षां सर्व बाबतींत रामनदच्या महाराजांना अधिक माहिती आहे. पाश्चात्य राष्ट्राचे कोणत्या प्रकारचे उद्योग सुरू आहेत आणि त्यातून आपणास काय घेतां येईल, इकडे त्याचें सदोदित लक्ष्य असते. ‘अत्यजापासूनही ज्ञान शिकावे; अत्यजाची सेवा करून मुक्ति मिळत असेल तर ती मिळवावी; आणि सदाचारसपन्न स्त्री कोणत्याही जातीची असली तरी पत्नी करावी’ असें महर्षि मनूचें वचन आहे. या वचनाला अनुसरून ज्ञान कोणापासूनही अवश्य प्राप्त करून घ्यावे. पाश्चात्याकडून जें कांहीं ग्राह्य असेल तें अवश्य घेऊन त्याचा संग्रह करावा; इतकेच नव्हे, तर त्याचा आपल्या चित्ताशीं एकमेळ करून

टाकावे हेही खरे आहे, पण हें करीत असता स्वत्व नष्ट होणार नाहीं याबद्दल मात्र फार काळजी घेतली पाहिजे. आमच्या ठरलेल्या राष्ट्रीय जीवनाच्या आड येईल असे कांही सुद्धा आम्हाला नको. प्रत्येक मनुष्याला या जगात काहीं ठरींव कामगिरी करावयाची असते. ती कामगिरी त्या विशिष्ट व्यक्तीच्या अनेक पूर्वकर्मास अनुरूप अशी असते. तुम्हाआम्हांपैकीं प्रत्येका-बरोबर पूर्वकर्मांचा वारसा आलेला आहे. आमच्या राष्ट्राची पूर्वपरंपरा किती उज्ज्वल आहे याची कल्पना आपणा सर्वांस आहेच मग याच परप-रेचा वारसा आम्हास आजही मिळालेला आहे असे समजणें चुकीचे होईल काय? आमचे लक्षावधि पूर्वज आमच्या प्रत्येक कृतीकडे बारीक लक्ष्य पुरवीत आहेत. याकरिता आमची प्रत्येक कृति त्याच्या नजरेने कशी दिसेल. याचा विचार आपण आपल्या चित्तात सदोदित जागृत ठेवला पा-हिजे. आता प्रत्येक हिंदु मुलाच्या जन्माबरोबर कसल्या प्रकारचा वारसा त्याला मिळालेला असतो हे पाहिलें पाहिजे. महर्षि मनु म्हणतात "धर्माचे रक्षण करण्याकरिताच ब्राह्मणाचा जन्म आहे." यावर मी असे म्हणतों कीं हे काम फक्त ब्राह्मणाचेच नसून ते प्रत्येक व्यक्तीचें आहे प्रत्येक हिंदु मुलाचें आणि मुलीचेही पहिले कर्तव्य धर्मरक्षण हेच आहे. या दिव्य भूमीत जन्म घेण्याचें भाग्य ज्याला प्राप्त झाले आहे, त्या प्रत्येक व्यक्तीचें हें कर्तव्य आहे. धर्मरक्षण हे आद्य कर्तव्य असून बाकीचीं सर्व केवळ त्याचीं अनुषगी असली पाहिजेत. हे एक कर्तव्य प्रमुख असून बाकीचीं सारीं कर्तव्यें हीं केवळ उपागें होत एखाद्या वाद्यात एक सूर प्रमुख असून दुसरे दोन तीन सूर त्याचे पोषक असले, म्हणजे ज्याप्रमाणें त्या सुराचें समीकरण सुरेल आणि अत्यंत आनददायी होते, त्याचप्रमाणें धर्मसग्रह हा प्रमुख हेतु असून इतर सारे हेतु त्याला पोषक असले, म्हणजे सारे आयुष्य त्या विशिष्ट व्यक्तीला आणि इतरानाही आनददायी होतें सर्व जगात राजकीय वर्चस्व मिळविणे हा एखाद्या राष्ट्राचा प्रमुख हेतु असेल, तर अशा राष्ट्रांत धर्म आणि इतर हेतू हे त्या प्रमुख हेतूचे नुसते पोषक असतात, पण ही गोष्ट आमच्या राष्ट्राला कधींही लागू पडणार नाहीं. आमच्या राष्ट्राचा मुख्य जीवनहेतू 'धर्म आणि त्याग' हाच आहे. हे सर्व जग केवळ मायेचा—भ्रमाचा—पसारा आहे, असें बाळकडू आम्हास पाजलेलें आहे. याकरिता परा-

विद्येवांचून अन्य कोणतीही विद्या आमचा आद्य हेतु होऊ शकतच नाहीं. भौतिक शास्त्राचें ज्ञान असो अथवा दुसऱ्या कसल्याही विषयाचे ज्ञान असो, त्यानें मूळ हेतूच्या आड येता उपयोगी नाहीं लौकिक सुखें वाटली तर मिळवावीं, सत्ता आणि सपत्ति यांचाही सग्रह वाटल्यास करावा, कीताही वाटल्यास संपादावी, पण हीं सारीं त्या एकाच हेतूची पोषक झालीं पाहिजेत. तो हेतु मागें ठेवून याचे सपादन करणे हें आमचें काम नव्हे. हिंदुत्वाचें खरे रहस्य म्हटलें म्हणजे युरोपीय विद्याचें ज्ञान, सपत्ति, कीर्ति आणि वजन ही सारी मुख्य जीवनहेतूचीं पोषक बनविणें हेच आहे धर्म-रक्षणाचा आणि आपली हिंदुकुलपरपरा कायम राखण्याचा जो हक्क वारस-दारीनें आज आपणाकडे आला आहे, तोच हक्क अबाधित राखून तो आपल्या मुलाबाळाच्या स्वाधीन करणें हें आपलें अत्यंत पवित्र कर्तव्य नाही असें कोण म्हणेल ? हे जर कबूल असेल तर अगोदर सागितलेल्या दोन प्रका-रच्या लोकापैकीं कोणता प्रकार आपणास पसत पडेल बरें ? पहिल्या प्रकारचे लोक जुनाट आणि कर्मठ आहेत ही गोष्ट खरी, पण त्याच्यात हिंदुकुलपर-परेचें बीज अद्यापि जिवत आहे ते स्वत्व विसरलेले नाहींत. धार्मिकपणा अद्यापि त्याच्यापाशीं आहे. आता दुसऱ्या प्रकारच्या लोकाकडे पाहता काहीं निराळाच प्रकार दृष्टीस पडतो दुसऱ्या प्रकारच्या लोकाच्या खिशात खूपसे खोटे हिरे आणि नकली माणके आहेत; पण हिदुत्वाचे खरें रहस्य जी धर्मसम्मुखता ती मात्र त्याजपाशीं नाहीं. पराविद्येचा ओनामाही ते साफ विसरून गेले आहेत. हे दोन नमुने आज आपणापुढे आहेत यापैकी आपण कोणता पसत करता ? आपणापैकीं प्रत्येकजण पहिला नमुनाच पसत करील अशी माझी पक्की खातरी आहे. कारण या पहिल्या नमुन्याचा काहीं तरी खरा उपयोग होण्याची आशा आहे. राष्ट्राच्या जीवितहेतूची ओळख तरी अद्यापि तो विसरलेला नाहीं, आणि जीवनाचा हेतु त्याजपाशी शिल्लक असल्यामुळें तो स्वतः काहीं काळ तरी जगेल आणि इतरास जगवील, पण ज्याचा जीवनहेतुच नष्ट झालेला आहे, त्याच्या जगण्याचीही आशा नाही. व्यक्तीचें जीवन प्राणशक्तीवर अवलंबून असतें. ही प्राणशक्ति अनेक द्वारानीं कार्यकारी होऊन व्यक्तीला जिवंत ठेवीत असते या अनेक द्वारापैकी एखाद दुसरें द्वार कारणपरत्वे निरुपयोगी झालें अथवा त्यास धक्का पोहोचला तरी

त्यामुळे व्यक्तीची जीवितहानी होत नाहीं. मुख्य प्राणशक्ती जोंपर्यंत शाबूत आहे, तोंपर्यंत बारीकसारीक व्यगे उत्पन्न झालीं तरी तीं चिरस्थायी होऊं शकत नाहींत. तीं व्यगे नाहींशीं करणें अशक्य नसतें. त्याच प्रमाणें आमच्या राष्ट्राचा मुख्य जीवनहेतु जोंपर्यंत अबाधित राहील तोंवर आपलें राष्ट्रही जिवत राहील. अनेक प्रकारचे बाह्य उत्पात त्याला नामशेष करू शकणार नाहींत, पण हा जीवनहेतु खुटला की राष्ट्रानेंही राम म्हटलाच. आपल्या धार्मिक जीवनाला रजा देऊन आपण पाश्चात्य जडवादाच्यामागें हात धुऊन लागलों तर तीन पिढया उलटतात न उलटतात तोंच आपण नामशेष होऊ, हे माझें वाक्य आपण नीट ध्यानांत धरा धार्मिक जोवन नाहींसे झालें की आपल्या इमारतीचा पायाच नाहींसा होईल. ज्या पायावर या राष्ट्राची भव्य इमारत उभारली गेली आहे, तो पाया नष्ट झाल्यावर इमारतही खचून पडेल. काहीं काळानें तिचें अस्तित्व केवळ स्मरणात मात्र राहील ' पूर्वी अशा अशा प्रकारचें एक राष्ट्र होते ' इतकी आठवण मात्र भविष्यत्कालीं शिल्लक राहील.

आपल्या राष्ट्राची स्थिति अशी होऊ नये अशी आपली इच्छा असेल तर प्रथम आपलें धार्मिक जीवन सुरक्षित राहील अशी व्यवस्था करणें, हें अत्यत अगत्याचे आहे. आपल्या परमपूज्य प्राचीन पूर्वजानीं जो हा बिनमोल ठेवा आपल्या स्वाधीन केला आहे, त्याचें जतन करणे हे आपलें परम पवित्र कर्तव्य आहे आपण अमक्या मोठ्या सरदाराचे वशज म्हणून सागण्यांत बाह्य देशातील एखाद्या मोठ्या राजासही कौतुक वाटतें; आणि हे सरदार ( ! ) कोण म्हणाल, तर लोकांना लुटून श्रीमत झालेले वाटमारे! असल्या लुटारूचे-श्रीमत लुटारूचे-वंशज म्हणवून घेण्यांत पाश्चात्य देशातील लोकास अजूनही भूषण वाटते! पण वल्कलें नेसून अर्धनग्नावस्थेंत रानावनात भटकणाऱ्या ऋषींचे वशज म्हणवून घेण्यात भूषण मानणारे लोक या पृथ्वीतलावर कोणी असतील ते आम्हीच! 'वासिष्ठगोत्रोत्पन्नोहम्' असे अद्यापिही आम्ही मोठ्या अभिमानानें म्हणत असतों. दरिद्री पूर्वजाबद्दल इतका अभिमान बाळगणारी भूमि हीच! बाहेरील देशांत एखादा धर्माधिकारीही आपली परंपरा एखाद्या राजापर्यंत नेऊन कशी भिडविता येईल, हा विचार करीत असतो, पण आमच्या देशांतला एखादा राजासुद्धां आपण अमुक दरिद्री धर्माधिकाऱ्याचे वशज असें मोठ्या अभिमानानें म्हणतो.

या गोष्टीवरून आपलें राष्ट्रीय जीवित कशांत आहे, हें समजण्यासारखें आहे. याकरितां आपली इच्छा असो अगर नसो, धर्मावर आपला विश्वास असो अगर नसो, जर आपलें राष्ट्र कालचक्रांत सांपडून नष्ट होऊं नये असें आपणांस वाटत असेल, तर आपली पराविद्या जागृत ठेवणें हेंच एक साधन आपणांस उपलब्ध आहे. हें साधन प्रथम जय्यत ठेवून नंतर दुसऱ्यांपासून जें कांहीं घेण्यासारखें असेल तें खुशाल घ्या; पण बाहेरून जो कांहीं विद्या आपण पैदा केली असेल, ती आपल्या मूलहेतूला विघातक न होतां पोषक झाली पाहिजे. आपण आपला एकंदर कार्यक्रम या रीतीनें आंखला तर भविष्यकालांतील हिंदुराष्ट्र भूतकालीन हिंदुराष्ट्राहूनही भव्यतर होईल अशी माझी खात्री आहे. या भावी स्थितीचा अरुणोदय आतांच होऊं लागला आहे असें माझी मनोदेवता मला सांगत आहे. आपल्या प्राचीन ऋषींहून अधिक लोकोत्तर अशा विभूती आपणांमध्यें भविष्यत्काळीं निपजतील अशी माझी खात्री आहे. ही आपली भावी पिढी अशी निपजेल कीं, ज्यांच्याकडे अवलोकन करून अपल्या पूर्वजांस संतोष होईल; एवढेंच नव्हे तर त्यास अत्यंत अभिमानही वाटेल. आपले वंशज आपणांहूनही कांकणभर सरस निघाले, हें पाहून त्यांस आनंदाचें भरतें आल्यावांचून कसें राहील? प्रिय बंधूंनो, आपण आतां सारेच कामाला लागूं या. आपण अविरत उद्योग करूं या. आतां कृष्णनिशा संपत आली आहे. पूर्वेकडील आकाशांत अरुणोदयाची आनंददायी रक्तिमा दिसूं लागली आहे. ‘जागनकी बेर भयी’ असें पक्षिगणही आपणांस आपल्या कलरवानें सुचवूं लागला आहे. आतां झोंपेची वेळ संपली. भावी हिंदुराष्ट्राचे कारागीर आपणच आहों. भावी हिंदुराष्ट्राची इमारत आपल्या कर्तबगारीची साक्ष देणारी होणार आहे. ही पहा आपली माता तयार होऊन बसली आहे! तिच्या चेहऱ्यावर फक्त निद्रेची शेवटची छटा मात्र उरली आहे. मित्रहो, जागे व्हा आणि तिला तिच्या हक्काच्या सिंहासनावर बसवा. पूर्वीच्याहूनही अधिक देदीप्यमान रत्नांनीं तिची प्रभावळ अलंकृत करा. धर्माचा डंका या भूमीसारखा आजपर्यंत इतरत्र कोठेंही वाजलेला नाहीं; कारण असा डंकाच दुसऱ्या कोठें नाहीं. माझ्या या म्हणण्याचें तुम्हांस आश्चर्य वाटत असेल; पण पृथ्वीवरील सारीं धर्मपुस्तकें धुंडाळून त्यांतून आमच्या ग्रंथांतल्या सारखीं वचनें काढून दाखवा असें मी आपणांस आव्हान करतों. इतर ग्रंथांतील ईश्वरविषयक कल्पना

किती तरी कोट्या आहेत. आरबी, यहुदी किंवा दुसरे कोणतेही धर्मग्रंथ पाहिले तरी त्यांतील देव एका एका टोळी पुरते, आणि तेही वर्चस्वासाठीं परस्पराशीं लढाया करणारे ! पण सर्वांतर्यामी, सर्वव्यापी, सर्वसुहृत्, सर्वांची माता आणि सर्वांचा पिता असा परमेश्वर फक्त येथेंच आढळून येतो शैवांचा शिव, वैष्णवांचा विष्णु, बौद्धाचा बुद्ध, जैनाचा जिनेंद्र, ख्रिस्त्यांचा आणि यहुद्यांचा जिहोवा, महमदीयाचा अल्लाह, वेदात्यांचे ब्रह्म इत्यादि अनेक रूपें धारण करणारा सर्वव्यापी, सर्वभूतातरात्मा आपणा सर्वास आशीर्वाद देवो. तोच आपणास सामर्थ्य देवो आपल्या आजच्या इच्छांना मूर्तरूप देण्यास लागणारी शक्ति त्याजकडून आपणास प्राप्त होवो आपण जें काहीं आज ऐकिलें आहे, तें आपणास शक्तिदायक होऊन त्याचा प्रत्यक्ष उपयोग आपण परस्परहिताकरिता करावा, अशी माझी प्रार्थना आहे.

हरिः ॐ शांति शांति शांति ।

---

## परमकुडी येथील व्याख्यान.

श्रीमत् विवेकानद स्वामी,

पाश्चात्य देशात सुमारें चार वर्षें प्रवास करून व तेथील लोकांत धर्मासबधी जागृति उत्पन्न करून, आपण येथे येऊन आम्हास आपल्या दर्शनाचा लाभ दिला, याबद्दल आम्ही परमकुडीचे रहिवासी आपले स्वागतपूर्वक आभार मानितों. चिकागो येथे भरलेल्या महापरिषदेंत आपण हजर राहिला व आजवर गुप्त राहिलेलें आर्यतत्त्वज्ञान परधर्मीयांस विदित केलें, याबद्दल आमच्या इतर देशबाधवांप्रमाणें आम्हालाही अत्यानद होत आहे. आमच्या प्राचीन धर्माबद्दल जी अनादरबुद्धि परकीयाच्या चित्तात वसत होती तिचे उच्चाटन आपल्या विस्तृत आर्यतत्त्वविवेचनाने आपण केले आहे आणि आमचा धर्म विश्वव्यापी असून सर्व प्रकारच्या बौद्धिक गरजास तो पुरा पडण्यासारखा आहे, ही गोष्टही आपण सिद्ध केली आहे.

आपल्या धर्मपर प्रवचनाचा परोक्ष उपयोग पाश्चात्यास झाला आहे; एवढेंच नव्हे तर आमचा धर्म व्यवहार्य आहे, ही गोष्ट आपले पाश्चात्य

शिष्यच सिद्ध करीत आहेत. आपली भव्य आकृति पाहून आम्हांस आमच्या प्राचीन ऋषिवर्यांची आठवण होते. आत्मसंयमनानें आणि उग्र तपश्चर्येमुळें प्राचीन ऋषींना ज्याप्रमाणें मानवजातीचें धुरीणत्व आणि गुरुपद प्राप्त झालें होतें, त्याचप्रमाणे तें आपणासही आज प्राप्त झालें आहे

मानवजातीचें कल्याण व्हावें व त्यांना आपले आशीर्वाद पुष्कळ काळ मिळावे यासाठीं परमेश्वरानें आपणास उदंड आयुष्य द्यावे, अशी त्या करुणाघनाची आम्ही प्रार्थना करतों.

## उत्तर

आपण माझें जें मन:पूर्वक प्रेमानें स्वागत केले, त्याबद्दल वाटत असलेली कृतज्ञता मला शब्दांनीं व्यक्त करतां येत नाहीं, पण इतके मात्र मी सांगतों कीं माझ्या देशबांधवानीं मला प्रेमपूर्वक 'सुस्वागतम्' म्हटलें किंवा माझा अनादर केला, तरी माझ्या मातृभूमीवरील माझें प्रेम कधींही उणे होणार नाहीं; कारण हें माझे प्रेम केवळ अत्यंत अहेतुक आणि निरुपाधिक आहे. त्याच्या बदल्यात मला कांहीं मिळावें अशी अपेक्षा हृदयांत कधीं उद्भवली नाहीं. "कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन" अशी भगवान् श्रीकृष्णाची अनुज्ञा आहे. पाश्चात्य देशात मीं केलेल्या कार्याचा उल्लेख आपण केला आहे; परंतु वास्तविक पाहता माझ्या हातून झालेला कार्यभाग अत्यल्प आहे. आपणांपैकीं कोणीही याहून शतपट अधिक कार्य करून दाखविलें असते अशी माझी खात्री आहे. हिंदुस्थानच्या अरण्यांत जन्म पावलेलीं आणि याच भूमीच्या खुद्द मालकीचीं अशी दोन रत्नें आहेत. एक रत्न पराविद्या आणि दुसरें त्याग. हीं रत्नें पाश्चात्य देशांत नेऊन त्याच्या प्रकाशानें तीं अखिल भूमि प्रकाशित करतील, असे विशाल बुद्धीचे पुरुष आपल्या मातृभूमींत केव्हां जन्म घेतात, याची मी वाट पहात बसलो आहें. लौकिक सुख आणि ऐहिक संपदा ही तृणवत् आहेत असें सबंध राष्ट्राला केव्हां केव्हां वाटूं लागण्याचा काळ येत असतो. आपण आजपर्यंत ज्या आकांक्षास चिकटून बसलों होतों, त्या आकांक्षा आपल्या देखत देखत नाश पावत आहेत, जुन्या संस्था आणि जुन्या पद्धती झपाट्यानें नाहींशा होत आहेत, सर्व आशा नष्ट होत आहेत आणि सर्वत्र विभक्तपणा दिसूं लागला आहे, असा अनुभव एखाद्या राष्ट्राला येऊं लागला म्हणजे नैसर्गिकपणेंच त्याला ऐहिक सुखें तुच्छ वाटूं लागतात. सर्व जगभर जी समाजरचना आज

दिसते तिचे दोन प्रकार आहेत. तिची रचना दोन निरनिराळ्या आद्यतत्त्वांस अनुसरून झाली असल्यामुळें हे भिन्न प्रकार उत्पन्न झाले आहेत. एकीच्या मुळाशीं धर्म हें आद्यतत्त्व होतें आणि दुसरीच्या मुळाशीं समाजबंधन हें आद्यतत्त्व होतें. समाजाचें जीवन धर्मतत्त्वांस अनुसरून असावें या हेतूनें पहिली रचना अस्तित्वांत आली. ऐहिक सुखांची रेलचेल होण्यासाठीं समाजबंधनाची जितकी आवश्यकता असेल तितकींच तीं ठेवावीं, या हेतूनें प्रेरित अशी दुसरी रचना झाली मनुष्यमात्रानें दृश्याच्या पलीकडे जावें हा पहिलीचा हेतु असून, दृश्यांतून शक्य तितकें सुख पिळून काढावे हा दुसरीचा हेतु आहे. त्याग हा पहिलीचा हेतु आहे आणि भोग हा दुसरीचा हेतु आहे. पहिलीची दृष्टि ह्या जगाच्या क्षितिजापलीकडे पाहणारी असून, खऱ्या जीविताचा आरंभ त्या क्षितिजापलीकडे होतो असें मानणारी आहे. हें जीवित प्राप्त करून घेण्याकरिता सर्व ऐहिक वस्तूंचा संपूर्ण त्याग करावा लागला तरी तोही करण्याची तिची तयारी आहे. दृश्याचा त्याग करण्याची दुसरीची इच्छा नसून या जगांतील वस्तूंना चिकटून बसून तेथेच सुखाचा जिवंत झरा शोधून काढण्याची तिची आकांक्षा आहे. निरनिराळ्या वेळीं या दोन तत्त्वांचा जयजयकार आळीपाळीनें होत असतो, असा एक चमत्कारिक देखावा जगाच्या इतिहासांत आढळून येतो. एका वेळीं पहिल्या तत्त्वाच्या हातांत राजदंड असतो, आणि त्या तत्त्वाच्या अनुरोधानें समाजशासन होतें, इतक्यांत दुसरें तत्त्व प्रबळ होऊन तें पहिल्याच्या हातून सर्व सत्ता हिसकावून घेतें आणि आपण प्रमुख होऊन बसतें. अशा रीतीनें आळीपाळीनें या दोन तत्त्वांचा कारभार चालू असतो. कित्येक वेळां एकाच देशांत या दोन तत्त्वांचा आळीपाळीनें अमल चालत असतो, असाही देखावा नजरेस पडतो. एका वेळीं तो देश पूर्णपणे चार्वाकवादाच्या अमलाखालीं असलेला दिसतो. त्यावेळीं संपत्ति भौतिक विद्या आणि इतर ऐहिक सुखसाधनें यांची सर्वत्र बोलबाला होत असते कालांतरानें समाजाच्या या वृत्तींत फरक पडतो आणि त्याला ऐहिक सुखें तुच्छ वाटूं लागतात. हीं सुखें तुच्छ वाटूं लागलीं म्हणजे तीं मिळण्याचीं साधनेंही आपोआपच कमी होऊं लागून तो समाज अज्ञानग्रस्त आणि मागसलेला असल्यासारखा दिसूं लागतो ऐहिक सुखसंपत्तीची रेलचेल झाली म्हणजे मानवी हृदयांतील असूयादि दुष्ट विकार अत्यंत प्रबळ होतात. अशा वेळीं सर्वत्र चढा-

ओढ आणि तदनुषंगी निर्दयपणा यांचें अखंड साम्राज्य सर्वत्र दिसू लागतें. 'जिवलग जिव घेती प्रेत साडूनि जाति' या साधुवचनाचा अनुभव या वेळीं सर्वत्र येत असतो. अशा स्थितींत समाज कांहीं काळ राहिला म्हणजे वाढत्या चढाओढीमुळें सामान्य जीवितही असत्य आणि कटाळवाणें होतें या वेळीं मानवी जीवित हें सुखाचें नसून दुःखाचें माहेरघर मात्र आहे, असा अनुभव येऊन समाजांत सर्वत्र उदासीनता पसरते. अशा वेळीं धर्मज्ञानाची सोडवणूक नसेल तर या बुडत्या समाजाला कोणीही वाली उरत नाहीं. अशा वेळीं धर्मज्ञान पुढें सरसावते, आणि बुडत्या जगाला हात देतें. या वेळी नव्या कल्पनांचा उदय होतो. समाजरचनेची पहिली घडी पालटून नव्या रचनेला सुरवात होते, आणि अशा रीतीनें धार्मिक जीवनाचा काहीं काल उदय होतो; पण ही स्थितीही चिरकालीक नसते. तिचाही अत कालांतरानें होतो अशा रीतीनें त्याग आणि भोग याचा अमल जगावर आळीपाळीनें चालू राहतो. त्यागाचा विजय होतो त्या वेळी एक विशिष्ट मनुष्यांचा वर्ग निर्माण होत असल्याचा अनुभव सर्वत्र येतो. हा वर्ग शक्य त्या रीतीने लौकिक वर्चस्वाचे सर्व मार्ग आपल्या हातीं घेण्याचा यत्न करीत असतो त्याच्या या कृतीचा तात्कालिक परिणाम म्हटला म्हणजे भोगाचें साम्राज्य पुन्हा सुरू होणें हाच होय. या नव्या साम्राज्याच्या सुरवातीच्या वेळीं एका विशिष्ट वर्गाच्या हाती सर्व सत्ता गोळा होऊ लागते त्यावेळीं केवळ धर्माचीच बाब या वर्गाच्या हातीं जाते असें नाहीं, तर सर्व ऐहिक विषयातही तेच सत्ताधीश बनतात, आणि धार्मिक व ऐहिक अशा दोन्ही प्रकारचें वर्चस्व साऱ्या शाखेवर ते गाजवू लागतात. हा मूठभर वर्ग सर्वसत्तासारी होऊन इतरेजनाच्या बोकाडीस बसून, आपलें जूं त्याच्या मानेवर कायमचे रहावें, यासाठी अनेक प्रकारच्या खटपटी करीत असतो. असें होऊ लागलें म्हणजे भोगाचें साम्राज्य अधिक बळावत जाते आणि या मूठभर वर्गाचें वर्चस्व आपोआप कमी होऊ लागतें. त्याच्या जाचांतून एकदा सामान्य जनतेची सुटका होण्यास भोगाचें प्राबल्य होणें हाच मार्ग उरलेला असतो. आपण आपल्याच मातृभूमीचा इतिहास पाहिला, तरी त्यांतही माझ्या सांगण्याचें प्रत्यतर आपणास दिसून येईल. भोगी पाश्चात्य देशानें तुम्हांला जागें केलें नसते, तर युरोपात जाऊन वेदांतावर व्याख्यानें देणाऱ्या व्यक्तीचें स्वागत तुम्ही करीत असल्याचा जो देखावा

आज दिसला, तो दिसला नसता. पाश्चात्याच्या चार्वाकवादानें आमच्या समाजाचे जें मोठे हित केलें आहे, तें हेंच कीं त्याने सर्व समाजाला जागृति आणून, मानवी जीविताच्या हेतूच्या पूर्ततेचे सर्व मार्ग त्याने मोकळे करून दिले आहेत. विशिष्ट जातीच्या हाती एकवटलेल्या सत्तेची विभागणी करून त्यानें ती सर्वांच्या हातीं सारखी वाटून दिली आहे. ज्ञाननिधीच्या किल्ल्या एकाच विशिष्ट वर्गाच्या हातीं राहिल्यामुळें त्या निधींतलीं रत्नें सर्व समाजास निरुपयोगी झालीं होती. पाश्चात्य सत्तेच्या अमदानीत हीं रत्नें बाहेर पडून त्याजवर बसलेला मळ घर्षणाने नाहीसा झाला आहे ज्यानी हीं रत्नें दडवून ठेवली होतीं, त्यांनीं स्वत ही त्याचा उपयोग केला नाही, एवढेच नव्हे तर त्याचा उपयोग कसा करावा ही विद्यासुद्धां ते विसरून गेले. अर्ध्या निधीची वाट अशा रीतीनें लागल्यानतर जो अर्धा भाग शिल्लक राहिला, त्याचा उपयोग त्यांनीं स्वतः केला नाही आणि दुसऱ्यासही करू दिला नाहीं गवताच्या गजीवर बसलेला कुत्रा ज्याप्राणे स्वतः गवत खात नाहीं आणि बैलालाही खाऊ देत नाहीं, तसेच वर्तन त्यांनीं केलें. पाश्चात्य चार्वाकवादाने केलेल्या उपकाराचा हा विचार झाला आता त्याच्या दुसऱ्या बाजूकडेही थोडेसे लक्ष्य दिलें पाहिजे. राज्यरचनेच्या ज्या विशिष्ट प्रकारासाठीं आज आपण धडपड करीत आहों, ते सारे प्रकार युरोपात कित्येक काळ प्रचारात आहेत, आणि बहुजनसमाजाचें हित साधण्याचें सामर्थ्य त्याच्यात नाही, ही गोष्टही तेथे नि सशय सिद्ध झाली आहे त्याच्यात अनेक प्रकारच्या उणिवा आहेत ही गोष्ट युरोपीय पडितांस मान्य झाली आहे एकामागून एक अशा अनेक प्रकारच्या राजकीय सस्था आणि पद्धती तेथे प्रचारात आल्या आणि अगदीं निरुपयोगीही ठरल्या. आतां यापुढें कोणत्या पद्धतीचा स्वीकार करावा याचें कोडे युरोपापुढें येऊन पडलें आहे. कोणत्या दिशेला हे समाजाचे तारूं वळवावे, याचा उमज त्यास पडेनासा झाला आहे. एखाद्या अत्यंत जुलमी राजाप्रमाणें पाश्चात्याचा चार्वाकवाद त्याना पिळून काढीत आहे जे स्वतः हाताने कसलेंही काम करीत नाहींत, अशा मूठभर लोकाच्या हातात सर्व सपत्ति आणि सत्ता हीं तिकडे एकवटून राहिली आहेत. अशी मनुष्यें स्वत कोणतेही काम न करतां लक्षावधि मनुष्यांच्या श्रमानें उत्पन्न झालेली संपत्ति मात्र भोगतात. लक्षावधि मनुष्यें हीं त्यांच्या हातचीं खेळणीं होऊन बसली आहेत. या मूठभर

लोकाच्या हाती सध्या इतकी सत्ता एकवटली आहे कीं, त्यानीं मनात आणलें तर साऱ्या पृथ्वीभर रक्ताच्या नद्या ते वाहवू शकतील. धर्म आणि इतर साऱ्या बाबी याच्या छातीवर पाय देऊन ते आपलें भोगाचे राज्य बिनधोक चालवीत आहेत. एकदर पश्चिम दिशेची भवितव्यता सध्या मूठभर मारवाड्याच्या हातीं येऊन पडली आहे आमच्या इकडे सर्व सत्ता भिक्षुक वर्गाच्या हातीं गेली आहे या दोन सत्तानीं परस्परांवर दाब ठेवला पाहिजे. यापैकीं कोणतीही एकच प्रबळ झाली तर जगाचें कल्याण होणार नाही. वास्तविक पाहतां 'भेद' हा शब्द परमेश्वराने आपल्या सृष्टीत उत्पन्न केलेलाच नाहीं. तृणाच्या पातीपासून तो थेट ब्रह्मापर्यंत सर्वत्र त्याची दृष्टि सारखीच आहे. अमुक एक वस्तु सर्वथेव चागली आणि अमुक दुसरी सर्वथैव वाईट असें कधीही आढळून यावयाचे नाही गुणदोषाची वाटणी परमेश्वरानें सर्वत्र सारखी केली आहे. एखाद्या दैत्यातसुद्धा एखादा सद्गुण इतक्या उच्चत्वापर्यंत पोंहोचलेला असतो कीं, त्या बाबतीत एखादा महान सत्पुरुषसुद्धा त्याच्यापुढें हात टेकील. एखाद्या क्षुद्र किड्यातसुद्धा एखादा गुण असा असेल कीं, तो थोर मनुष्यातही आढळून येणार नाही. एखाद्या गरीब मजुराकडे पाहिलें तर त्याची स्थिति तुम्हास कधींहि स्पृहणीय वाटणार नाहीं दिवसभर खपावें आणि कसें तरी पोट भरावे, हाच त्याचा नेहमीचा आयुष्यक्रम. त्याला तुमच्यासारखी बुद्धिमत्ता नसते, त्याला तुमचा वेदान्त कळावयाचा नाहीं, पण त्याला असणारे देहसौख्य तुम्हांला नाही. तुम्हाला कांही थोडीशी विकृति होण्याबरोबर तुम्ही आकाशपाताळ एक करता, पण असल्या व्याधी तो हंसत खेळत घालवितो. त्याच्या शरिराला जखम झाली तर कसल्या तरी झाडपाल्याने तो ती बरी करतो आणि तुम्हाला साऱ्या शस्त्रवैद्याना बोलावणें पाठवावे लागते. त्याचा जीव त्याच्या जड इंद्रियात येऊन बसलेला असतो आणि त्यातच त्याचें सारें सौख्य असते. त्याला बौद्धिक गरजा कधीं उत्पन्नच होत नसल्यामुळें त्यांच्या साम्यावस्थेचा भगही कधी होत नाही. कायिक, बौद्धिक अथवा आध्यात्मिक यांपैकीं कोणत्याही स्थितींत तुम्ही असला, तरी गुणावगुणांचे मिश्रण तुम्हां सर्वांस परमेश्वरानें सारखेंच वाटून दिलेलें असतें, असें तुमच्या लक्षात येईल. याकरितां माझ्याच अस्तित्वानें जग चाललें आहे आणि माझ्यामुळेंच त्याचें कल्याण होईल, असा अभिमान बाळगण्याचे कारण

कोणासही नाहीं. जगाला शिकवण्यासारखे कांहीं सद्गुण तुमच्याजवळ असतील, तर जगाजवळही तुम्हांला शिकण्यासारखे सद्गुण आहेत हें तुम्ही नित्य लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. तुमच्या पाशीं जें कांहीं देण्यासारखे असेल आणि त्याची गरज जगाला असेल तर तें तुम्ही अवश्य द्या. पाश्चात्यांना सध्या आध्यात्मिक ज्ञानाची अत्यंत गरज आहे. हें ज्ञान त्याना आतां न मिळालें तर अर्ध शतकाच्या अवधींत त्याच्या सस्कृतीचा सारा डोल्हारा धुळीस मिळेल. नुसत्या तोफा-बंदुकाच्या जिवावर अवलबून असलेली रचना कधींही चिरस्थायी होऊं शकणार नाहीं. तोफा-बदुकाच्या जिवावर राज्याचा गाडा चालविण्याची कल्पना प्रथम ज्या केंद्रातून उद्भवते तेच केद्र प्रथम दुर्बळ होऊ लागतें; आणि त्यामुळें त्याच्या जिवावर उभी असलेली इमारतही डळमळू लागते. केवळ लौकिक सुखें भोगावीं याच हेतूनें पाश्चात्यांची समाजरचना आणि राज्यरचना हीं अस्तित्वात आलीं आहेत. आतां खुद्द हीं भोगसाधनेंच समाजाच्या जिव्हारीं लागत आहेत आणि समाजांत दुहीचें पीक पेरीत आहेत ही स्थिति लक्ष्यांत घेऊन युरोपीय समाज सध्याची दिशा सोडून अध्यात्मविद्येकडे न वळला, तर पाचपन्नास वर्षांच्या अवधींत तो धुळीस मिळाल्यावांचून राहणार नाहीं. युरोपखड निर्घृण काळाच्या जात्यांत सापडू नये अशी युरोपियाची इच्छा असेल, तर उपनिषत्प्रणीत धर्मावांचून त्याला दुसरा कोणी त्राता नाहीं आपल्या देशात अनेक पथ आणि मतें प्रचलित आहेत आणि धर्मग्रथही अनेक आहेत हें खरें, पण आत्म्याच्या स्वरूपासंबधीं या सर्व पथांचें ऐकमत्य आहे. केवळ हे एकच मत जगांत क्रांति घडवून आणण्यास समर्थ आहे. जैन, बौद्ध अथवा हिंदु यांपैकीं कोणताही धर्म घेतला, तरी आत्मा सर्वशक्तिमान् आणि सर्वज्ञ आहे हेंच मत त्यात प्रतिपादन केल्याचें आढळून येईल. सामर्थ्य किंवा पवित्रता या बाहेरून मिळविण्याच्या वस्तू आहेत, असें एकाही पंथानें आपल्या या देशांत प्रतिपादन केलेलें नाहीं. या वस्तु आत्म्याच्या ठायीं स्वतःसिद्धच आहेत, हें मत सर्व पथांस एकसारखेंच मान्य झालेलें आहे. 'पावित्र्य हा प्रत्येक मानवी प्राण्याचा जन्मसिद्ध हक्क आहे. आत्मा स्वभावतःच पवित्र आहे. अज्ञानाचें पटल त्यावर असल्यामुळें बाह्यतः तो अपवित्र आहेसा दिसतो. या पटलाखालीं त्याचें खरें स्वरूप झांकून गेलें असल्यामुळे मानवी प्राणी अपूर्णसा दिसतो; पण या

पडद्यामागचा खरा प्राणी स्वभावतःच सर्वशक्तिमान् आणि पूर्ण असा आहे. स्वत ची परिचर्या चालविण्यास वास्तविक तुम्हांस कोणाच्याही मदतीची अपेक्षा नाहीं. आपणांला मदत पाहिजे असे वाटणें हा भ्रम आहे. हा भ्रम-निरास होणें एवढेंच काय तें बाकी उरलें आहे. या भ्रमालाच अविद्या असें नांव आमच्या शास्त्रज्ञांनीं दिलें आहे. परमेश्वर आणि मनुष्य अथवा साधु आणि सामान्य मनुष्य यांतील फरक एकाच शब्दांत सांगतां येईल. तो शब्द 'अविद्या' हाच एखादा मोठा सत्पुरुष आणि आपल्या पायांखाली सरपटणारा क्षुद्र किडा यांत तरी काय फरक आहे ? यांतील फरकही अविद्या हाच या अविद्येमुळेंच हे सर्व फरक उत्पन्न झाले आहेत. त्या क्षुद्र कीटकामध्येंही अनत सामर्थ्य, अनत ज्ञान आणि पावित्र्य हीं समाविष्ट झालीं आहेत. परमेश्वराला लावलेले सर्व गुण त्या किड्यामध्येंही आहेत. ते गुप्तरूपानें वसत असल्यामुळें त्यांचा प्रत्यक्ष प्रत्यय येत नाही इतकेच. हे गुण प्रकट होण्याचीही वेळ केव्हांतरी खास येईल. या एकाच सत्य प्रमेयाचा प्रसार हिंदुस्थानानें जगभर केला पाहिजे, कारण जगांत दुसऱ्या कोठेंही हा ध्वनि उमटलेला नाहीं. अध्यात्मविद्येचें पर्यवसान हेंच आहे. आत्म्याचें सशास्त्र स्वरूप हेंच सामर्थ्य हें आत्म्याचें एक विशिष्ट व्यक्तरूप आहे या सामर्थ्यावर ज्या कर्मानें दडपण पडते, ते प्रत्येक कर्म पापरूप होय. हें सामर्थ्य प्रकट करणारें कर्म पुण्यरूप आहे. सर्व उपनिषदांनीं निरनिराळया प्रकारें या एकाच तत्त्वाचा अनुवाद अट्टाहासानें केला आहे. " नायमात्मा बलहीनेन लभ्यः । " इत्यादि वचनानीं श्रुति हेंच कठरवानें सागत आहे, कीं 'बलवान् व्हा.' बलवान् होणें हाच खरा धर्म. साऱ्या धर्मांचें सार ' बल ' या एकाच शब्दांत साठविलेलें आहे. दुबळेपणा हाच साऱ्या आयुष्याचें मातेरें करतो. ऐहिक अथवा पारलौकिक सुखाची होळी करावयाची असल्यास दुबळेपणासारखें दुसरें साधन नाहीं. दुबळेपणा हा अनेक प्रकारच्या पातकांचा आणि दु खांचा पिताच आहे. अवनतीचा सरळ रस्ता दाखविणारा वाटाड्या हाच. दु खें, पातकें आणि मृत्यु यांचें माहेरघर म्हटलें म्हणजे दुबळपणा हेंच. हा दुबळेपणा कोठून उत्पन्न झाला ? हा विस्मृतींतून उत्पन्न झाला आहे. आपल्या खऱ्या स्वरूपाची विस्मृति आपणांस झाल्यामुळें आपण दुबळे आहों, असा भ्रम आपणांस पछाडतो आणि आपल्या साऱ्या आयुष्याची राखरांगोळी करून टाकतो. आपण

बादशाहाच्या बादशाहाचे शाहाजादे आहों, आपण प्रत्यक्ष परमेश्वराचेंच दृश्य रूप आहों 'मी क्षुद्र मनुष्य' अशी खोटी भावना करून तुम्ही स्वतःस क्षुद्र समजत आहां 'आपण सारेच आपल्या मूलरूपापासून भ्रष्ट झालो असल्या मुळें हा मोठा आणि तो लहान असें आपण म्हणतों. आर्यभूमीपाशीं इतरांस शिकविण्यासारखें जें काहीं आहे तें हेंच. हा धडा एक वेळ पक्का ध्यानात राहिला कीं सृष्टीचें स्वरूप पालटतें, कारण पूर्वी ज्या दृष्टीनें तुम्ही सृष्टीकडे अवलोकन करीत होतां, ती तुमची दृष्टीच आतां बदललेली असते. जोपर्यंत हा मोठा आणि तो लहान असा भेद शिल्लक असेल, तोंपर्यंत अहमहमिका शिल्लक असाव-याचीच. तोपर्यंत सर्वत्र चढाओढ आणि तिचींच अपत्यें तटेभाडणें यांचें साम्राज्य असावयाचेंच, पण सर्वत्र एकरूप झाल्यावर कमीअधिकपणाचें आणि तंट्याभांडणाचें मूळच उपटलें जातें भेददृष्टीमुळें जग म्हणजे एक प्रचड रणभूमि होऊन बसली आहे. त्या जागीं अभेददृष्टि आली तर हीच भूमि आनदानें बागड-ण्याचे आणि खेळण्याचें मैदान होईल. अभेददृष्टि उत्पन्न झाली तर परमेश्वर आणि आपण हे एकमेकाचे खेळगडी होऊ. सध्याही आपण वस्तुत त्याचे खेळगडी असून हा लपडाव आपण मौजेनें माडला आहे, पण दौर्बल्यामुळें भीतीनें आपल्या हृदयांत प्रवेश केला आहे; आणि भीतीमुळे तो खेळ आपणास भयप्रद दु·खाचा आणि धोक्याचा वाटतो. त्याचे खरे स्वरूप काय आहे याची भूल आपणास सध्या पडली आहे. जीवात्म्याच्या खऱ्या स्वरूपाचा बोध झाला तर अत्यत दुबळया मनुष्याच्या चित्तात आशेचा अकुर उद्भवतो कोणी केवढाही अज्ञानग्रस्त असला अगर पापी असला, तरी त्याच्याही मनात भवितव्यतेबद्दल शुभ आशा उत्पन्न झाल्यावाचून राहणार नाही. मनुष्याने कधींही निराश होऊ नये असें आपलीं शास्त्रें सागतात. कारण आत्म्यावर कितीही दडपणें पडलेलीं असली तरी त्यामुळें त्याचे खरे स्वरूप नष्ट होत नाहीं. जन्मजातस्वभावात कशानेही बदल होत नाही. प्रकृति प्रकृतीचा नाश करूं शकत नाहीं. पवित्रता ही आत्म्याची प्रकृति आहे, तो त्याचा स्वभाव आहे. लक्षावधि युगें त्याचा हा स्वभाव गुप्त राहिला तरी तो नष्ट न होतां कधींना कधीं त्याचा विजय होईल; आणि तो आपल्या सपूर्ण रूपाने प्रकट होईल. अद्वैतसिद्धात नैराश्य उत्पन्न करीत नसून निराश झालेल्याना उत्तेजित मात्र करतो. त्याच्यामुळेंच कोमे-जलेल्या अतःकरणवृक्षाला नवी पालवी फुटते. आपण मोठे पापी आहों आणि

आपण परमेश्वराची भक्ति न केली तर तो आपणांस दड करील" असल्या प्रकारची भीतिजनक भाषा अद्वैतसिद्धांत बोलत नाहीं. तुम्ही सन्मार्ग सोडला तर सैतान तुमच्या बोकाडीस बसेल, असे तो कधींही म्हणणार नाहीं सैतान आणि त्याचें राज्य असल्या प्रकारच्या गोष्टींशीं त्याला काहीं कर्तव्य नाहीं " आत्मैव ह्यात्मनो बधुरात्मैव रिपुरात्मन ।" असें तो सागत आहे स्वकर्मामुळेच तुम्हास हा देह प्राप्त झाला आहे. तो दुसऱ्या कोणीही तुम्हांवर लादलेला नाहीं. अज्ञानामुळें तुमचें सर्वव्यापित्व झाकलें गेलें हा दोष तुमचाच आहे तुमची खुषी नसता तुमच्यावर जुलूम करून तुम्हाला ह्या जगात कोणी जन्माला घातलें असें नाहीं या भयप्रद जगांत तुम्हांला कोणीं बळजबरीनें ढकललेलें नाहीं या देहाचे जनक तुम्हीच आहां. तुम्हीच याचे पोषण करतां. ही तुमची क्रिया प्रत्येक क्षणीं चालू आहे. अन्न तुम्हीच भक्षण करता आणि त्याच्यायोगानें देहाचें सवर्धन करता. दुसरा कोणी तुमच्या करिता खातो असें नाहीं. अन्नाचें रूपांतर करून त्याचें रक्त बनविणें आणि त्यापासून स्नायू बनविणें या क्रिया कोण करतो ? या गोष्टींबद्दल कोणीं तुमच्यावर जुलूम केला आहे काय ? अनत काल तुम्ही हेच करीत आला आहां. साखळीतल्या एखाद्या दुव्याचें स्वरूप बरोबर समजलें म्हणजे सगळ्या साखळीचेंही स्वरूप समजते. या शरीराचे क्षणभर तरी संवर्धन तुम्हीच करीत असल्याचें सिद्ध झालें तर अनत कालपर्यंत तुम्हींच हें कार्य केलें असलें पाहिजे हें सिद्ध होतें एवढेंच नव्हे, तर भावी देहाची घटनाही तुमच्याच हातात आहे, हेंहि सिद्ध होते. बऱ्याची अथवा वाईटाची सर्व जबाबदारी तुमच्यावरच आहे. आपल्या आयुष्यक्रमात भावी आशेचा अकुर हाच हे बधनाचे जाळें मीच आपल्या हातानें विणलें असेल, तर त्याच्या गाठी सोडून त्यातून मोकळें होण्याचा मार्गही मला सापडेल. परमात्मा सदैव कृपारूप आहे. आपणांस आपल्या कार्यात मदत करावयास तो सदैव तयार आहे, पण बरें आणि वाईट अथवा पुण्य आणि पाप इत्यादि द्वद्वांत मात्र तो नसून तो त्याच्या बाहेर उभा आहे. तो सदा मुक्त आणि सदा कृपाळू आहे. आपण या द्वंद्वाच्या ओघात सापडून वाहत आहो आणि तो किनाऱ्यावर उभा असून आपणांस हात द्यावयास तयार आहे. शुद्ध अतःकरणानें जो कोणी त्याची मदत मागतो त्याला ती अवश्य मिळते.

चालू युरोपीय समाजरचना बदलून तिच्या ऐवजीं आपल्या धर्मवृत्तीच्या पायावर तिकडील समाजाची रचना. केली पाहिजे. द्वैतमताच्या मुळाशीं ज्या ईश्वरविषयक भावना आहेत, त्याचा उपयोग हल्लींच्या जडवादाच्या वेळीं होत नाहीं, आणि अद्वैतसिद्धाताचा आश्रय केला, तरच पाश्चात्यांस सध्याच्या काळी तो अधिक उपयुक्त होईल असें मला वाटते. मला अधिक वेळ असता तर माझ्या या मताची सिद्धि कशी होते, हे मीं दाखविलें असते. एखाद्या मनुष्याला आमचा अद्वैतसिद्धांत सर्वथैव न पटला व उपासनेसाठीं द्वैती परमेश्वराची अथवा विशिष्ट प्रकारच्या देवळाची अथवा मूर्तीची गरज त्याला भासत असली, तरी आमचा सिद्धात या गोष्टीच्या आड येतो असे नाहीं. आमच्या अद्वैतमतातही त्याच्या उपासनामार्गाला पोषक अशा अनेक गोष्टी सापडतील. कोणाला केवळ बुद्धीवर आरूढ व्हावयाचें असेल, तर त्याला त्या मार्गानें नेऊन ' सर्वं खल्विदं ब्रह्म ' हा अतिम सिद्धात आमचें अद्वैतमत त्याला पटवून देईल.

---

# शिवगंगा आणि मनमदूरा येथील मानपत्र.

## श्रीस्वामी विवेकानंद यांस—

परमपूज्य स्वामीमहाराज,

आम्ही शिवगगा आणि मनमदूरा येथील जमीनदार न रहिवासी आपलें मन पूर्वक स्वागत करतो. आपली मूर्ति आमच्या अत करणात पूर्वींपासूनच वसत आहे, पण आपण येथें येऊन आपल्या दर्शनानें आम्हास पावन कराल, असें आमच्या स्वप्नींही कधीं आलें नव्हते. आमच्या गावीं येता येत नाही, असा संदेश आपणांकडून प्रथम आला त्या वेळी आमचीं अत.करणें अगदीं उदास होऊन गेलीं, पण आतां आपण केलेल्या कृपेमुळें ती उदासीनता नष्ट झाली आहे. आपले पाय आमच्या गांवाला लागणार अशी खात्रीलायक बातमी जेव्हा आम्हांस प्रथम समजली, त्या वेळीं आमच्या साऱ्या आशा सफल झाल्या असेंच आम्हांस वाटलें. जणूं काय कल्पवृक्षच आमच्या दारीं आला असें आम्हास वाटलें. आमच्या विनतीला आपण मान दिला यामुळें आमचीं अत:करणें शांत झालीं आहेत.

जलप्रवासाच्या शेंकडों अडचणींस तोंड देऊन आणि केवळ परार्थासाठीं कष्ट सोसून, आपण पौर्वात्यभूमींतील ज्ञानवृक्षाचें बीं पाश्चात्यभूमींत पेरलें. हें कार्य आपण इतक्या उत्तम रीतीनें केलें कीं, अजमासाबाहेर आपल्या कार्याला तिकडे यश आलें आहे. आपल्या या कृतीनें आपण अजरामर कीर्ति संपादन केली आहे हिंदु लोकाच्या स्वभावतःच धार्मिक अशा अंतःकरणावर पाश्चात्य जडवादाचा अमल सध्या बसत आहे. आमच्या संतांचीं आणि ऋषींचीं वचनें मृतप्राय होऊ लागलीं आहेत अशा वेळी आपण अवतीर्ण झालां व आमच्या सनातनधर्माचें पुनरुज्जीवन केलें. आर्यतत्त्वज्ञानात जी हिणकस भेसळ झाली असेल, ती आपल्या बुद्धिसंस्कारानें जळून जाऊन शुद्ध सोनें मागें उरेल व कालेंकरून त्याचा प्रसार जगभर होईल, अशी आम्हांस आशा आहे. अमेरिकेतील सर्वधर्मांच्या महापरिषदेत अनेक पंथाचे, मतांचे आणि धर्मांचे प्रतिनिधी जमले असतांही आर्यतत्त्वज्ञानाची विजयपताका तेथें रोंवण्यास आपण समर्थ झालां, यावरून लवकरच सर्व जगभर आपला विजय होईल अशी आम्हांस आशा वाटते. इंग्रज प्रभूच्या राज्यात ज्याप्रमाणें सूर्य कधींही मावळत नाहीं, त्याचप्रमाणें आपण जिंकलेल्या राज्यातही सूर्य कधीं मावळणार नाहीं इतका त्याचा विस्तार होईल, अशी आशा करण्यास बरीच जागा आहे. या दृष्टीनें पहाता चक्रवर्ती राजाची आणि आपली बरोबरीच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं, फरक इतकाच कीं चक्रवर्तीचें प्रभुत्व देहावर असते आणि आपलें प्रभुत्व मनावर राहील सांप्रतचा ब्रिटिश राज्याचा विस्तार ही गोष्ट इतिहासकालात ज्याप्रमाणें अभूतपूर्व आहे, त्याचप्रमाणें धर्माच्या इतिहासात आपला विजय अभूतपूर्व गणला जाण्याइतका मोठा व्हावा, अशी आमची फार इच्छा आहे. आमची ही इच्छा पूर्ण होण्याकरितां परमेश्वरानें आपणास दीर्घायुरारोग्य द्यावे व ज्या निर्हेतुक कामगिरीचा पाया आपण घातला, ती कामगिरी आपल्याच हातून पूर्णतेस जावी अशी आम्ही जगन्नियंत्याची मनःपूर्वक प्रार्थना करतो.

## उत्तर.

आपण माझें मनःपूर्वक आणि प्रेमानें स्वागत केलें, त्याबद्दल मला वाटत असलेलें उपकाराचें ओझें नुसत्या शब्दानीं हलकें होणार नाहीं. माझी कितीही इच्छा असली तरी लांबलचक भाषण करण्याइतकें प्रकृतिस्वास्थ्य सध्या

मला नाहीं, याबद्दल फार वाईट वाटतें. आताच एका विद्वान वक्त्यांनीं मला अत्यंत सुंदर अशा संस्कृत विशेषणांनी अलंकृत केले; पण माझे शरीरही जड मातीचेंच बनलें असल्यामुळें सृष्टीच्या क्रमाचा अमल त्यावरही चालतो. अर्थात् श्रमाच्या अतिरेकाने माझेंही शरीरस्वास्थ्य भंग पावलें तर त्यांत नवल कसलें ? पाश्चात्य देशांत जी कांहीं अल्पशी सेवा मजकडून घडली, तिजबद्दल माझ्या मातृभूमींत जागोजाग मला अत्यंत आनंदाचे आणि प्रोत्साहनाचे उद्गार ऐकूं आले, याबद्दल मला मोठी धन्यता वाटते ज्या भावी महापुरुषाचा उदय येथे होणार आहे, त्याच्या आगमनाची ही पूर्व तयारीच आहे असें मला वाटतें. माझ्यासारख्या सामान्य मनुष्याच्या हातून घडलेल्या अल्पशा कार्याचें जर तुम्ही एवढे कौतुक करतां, तर भविष्यत्काळीं येणाऱ्या त्रैलोक्यविजयी धर्मवीरांचें कौतुक तुम्ही किती कराल! हिंदुस्थान ही धर्मभूमि आहे. हिंदूंना जर कोणत्या एखाद्या गोष्टीचे ज्ञान असेल, तर ती गोष्ट धर्म हीच होय. शतकानुशतके या एकाच ज्ञानाच्या मागें आम्ही लागलों आहों. यामुळें धर्म हाच आमचा जीवितहेतु होऊन बसला आहे, या गोष्टीची आपणां सर्वांस पूर्ण जाणीव असेलच. या जगाचा व्यवहार सुरळीत चालण्यास त्यात अनेक प्रकार असावे लागतात. एखाद्या शहरांत ज्याप्रमाणें कांहीं लोक वाणीउदमी असतात, दुसरे काहीं शाळामास्तर असतात आणि तिसरे कोणी शिपाईगिरी करतात, त्याचप्रमाणें या जगातील निरनिराळया देशात निरनिराळ्या प्रकारचीं कामें वाटून देण्यात आली आहेत. हीं सर्व कामे यथासांग पार पडली म्हणजे विविधतेतही एकतानता उत्पन्न होते. प्रत्येकानें आपापलें काम चोख बजावलें म्हणजे सर्वांच्या हितांत काहीं वैगुण्य उत्पन्न होत नाही. या कामगिरीच्या वाटणींत धर्मज्ञानदानाचे कार्य आपल्या मातृभूमीच्या वाट्याला परमेश्वरानें घातलें असावे असें वाटते, आणि या कार्याची दिशा आपण अद्यापि सोडून दिलेली नाहीं, हें पाहून मला अत्यंत आनंद होतो ज्यांच्या नावाचा कोणासही अभिमान वाटेल, अशा आपल्या परमपूज्य पूर्वजांनीं आपल्या हातीं दिलेला ठेवा आपण अगदींच उधळून टाकला नाहीं, याचा मला मोठा आनंद वाटतो. आर्यांच्या या शाखेच्या भावी उदयाबद्दल याच गोष्टीमुळें मला आशा वाटते, इतकेच नव्हे तर तशी माझी पक्की श्रद्धा आहे. धर्मांचे कार्य म्हटलें की हिंदूचीं अंत करणें अजूनही टवटवीत होतात,

हें पाहून मला अत्यंत हर्ष होतो आपण मला मान दिला याकरिताच हे मी बोलतों असे आपण समजू नका. आपली ही वृत्ति धार्मिक अंतःकरणाची द्योतक आहे हें पाहून मला आनंद व स्फूर्ति होते. हिंदु राष्ट्र अद्यापि जिवंत आहे इतकेंच नाहीं, तर तें चांगलें शुद्धीवरही आहे. हिंदु राष्ट्र मेलेलें आहे असें म्हणावयाची कोणाची छाती आहे? आम्ही स्वस्थ बसलों आहों यावरून आम्ही मेलेले आहों असें अनुमान काढावयाचें काय? आम्ही उद्योगात निमग्न असावे असे पाश्चात्यांस वाटते आमची उद्योगप्रियता रणभूमीवर दिसावी अशी इच्छा पाश्चात्य राष्ट्रांना असेल, तर त्यांची सर्वथैव निराशा होईल असें आम्ही प्रांजलपणें कबूल करतों तें आमचें कामच नव्हे. शस्त्रास्त्रांनीं सज्ज झालेलीं राष्ट्रें धर्माच्या कार्यक्षेत्रात यावीं अशी आम्हीं इच्छा केली तर जशी आमची निराशा होईल, त्याचप्रमाणें आम्हीं जगज्जेतृत्वाचें कार्य करावें अशी कोणाची इच्छा असेल, तर तीही निष्फळ झाल्यावाचून राहणार नाही आमच्या जिवंतपणाचा प्रत्यय कोणास पाहणें असेल, तर तो धर्माच्या क्षेत्रांतच दिसेल. आमचें राष्ट्र पूर्वीप्रमाणेच आजही जिवंत आहे आणि कार्यरतही आहे. आम्ही मागसलेले आहो आणि अज्ञानग्रस्त आहों, अशा प्रकारच्या मूर्खपणाच्या कल्पनास सातासमुद्रापलीकडे झुगारून द्या. असो, जें झालें ते सर्व ठीकच झालें, पण आता काहीं अप्रिय गोष्टी मी सांगणार आहें, त्याबद्दल आपण माझा राग करणार नाही, अशी मला आशा आहे. पाश्चात्यांच्या जडवादानें आम्हास पक्कें घेरलें आहे असा प्रवाद वारंवार ऐकू येतो आणि त्याचेंच पुनरुच्चारण आताही झाले, याकरिता त्या बाबतींत चार शब्द बोलावे असें माझ्या मनात आहे चार्वाकवादानें आपल्या भूमींत ठाणे दिलें असेल, तर तो अपराध एकट्या युरोपियांच्याच माथी मारता येत नाहीं. त्या अपराधाचा बराचसा भाग आपल्याच पदरीं येतो. आपण ज्या अर्थी वेदान्ती म्हणवितो त्या अर्थी "आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मन.।" हा सिद्धान्त आपण प्रथम लक्षात ठेवला पाहिजे. आपले नुकसान करून घ्यावयास आपण स्वत. तयार झाल्याशिवाय या विश्वांतील एकही शक्ति आपलें नुकसान करू शकत नाहीं. सालोसाल पुष्कळसे हिंदु लोक धर्मांतर करतात याबद्दल कित्येकास फार वाईट वाटतें. हिंदुस्थानच्या लोकसंख्येपैकीं एकपंचमांश मुसलमान होते. त्यांच्या अगोदरच्या काळाकडे

नजर फेकली, तर एकदर वस्तीपैकीं दोनतृतीयाश लोक बौद्ध झाले होते असें आढळून येईल. ख्रिस्ती लोकाची सख्या दहा लक्षांवर गेलेली आहे, पण वास्तविक हा अपराध कोणाचा आहे बरे ? ज्यानी स्वधर्मत्याग केला त्याची कधीं वास्तपुस्त तरी आपण केली काय ? इग्लंडात एका तरुण मुलीची गोष्ट कोणीं मला सागितली कीं, ती भीक मागावयास निघाली असता एका श्रीमत बाईने तिला तसें न करण्याविषयी सागितलें. तेव्हा ती मुलगी म्हणाली 'असें केल्यावांचून माझ्याकडे कोणीही लक्ष देणार नाहीं. माझ्या सध्याच्या स्थितींत मला कोणीही मदत करण्यास तयार नाहीं, पण मी झोळी हातीं घेतली म्हणजे बऱ्याचशा दयाळू बायका येऊन मला घरीं नेतील आणि माझी कांहीं तरी व्यवस्था करतील.' हीच गोष्ट आम्हामही लागू आहे. इतक्यानी धर्मांतर केलें म्हणून आपण आता रडगाणें गातो, पण पूर्वी आपण त्याच्या-साठी काय केलें आहे ? आपणापैकीं प्रत्येकानें स्वत स हा प्रश्न विचारून त्याचें सरळ उत्तर द्यावे. आजपर्यंत अनेक आपत्ति आपण पाहिल्या, पण त्यांपासून कांही धडा आपण घेतला काय ? सत्याची मशाल आपण हाती धरली आहे काय ? धरली असली तरी तिचा उजेड कितपतसा पडतो हे आपण पाहिलें काय ? तिला लागणाऱ्या तेलाची व्यवस्था आपण केली आहे काय ? त्या मशालीच्या माहात्म्यानें अधाऱ्या जागा आपण प्रकाशित केल्या आहेत काय ? यापैकी आपण काय केलें आहे ? योग्य वेळी आपण त्यांना मदत केली नाहीं, मग आतां रडून फायदा काय ? मित्रहो, असल्या बाबतीत दुसऱ्या-वर बोटे मोडण्यापेक्षां स्वत च्या कर्माकडे पाहून रडावे हेच अधिक योग्य आहे. चार्वाकवाद काय अथवा दुसरा कसलाही वाद झाला, तरी त्याच्या विजयाची तयारी आपण केल्यावाचून तो कधींही विजयी होणार नाही. अत्याचार, खराब अन्न, उपासमार इत्यादि कारणानीं आपलें शरीर बेताल होईपर्यंत शेंकडों प्रका-रच्या रोगजतूनीं त्याभोंवती वेढा दिला, तरी त्याचा प्रवेश त्यांत होणार नाहीं लक्षावधि रोगजतूच्या ठाण्यांतून सदृढ 'मनुष्य खुशाल चालत जाऊ शकतो. असो. झालें तें होऊन गेलें. आतां तरी आपण स्वतःस शहाणें केलें पाहिजे. पूर्वकाळच्या अनेक गोष्टीविषयीं वादविवाद करण्यात आता फायदा नाहीं. गेलीं पाचसातशें वर्षे आपण काय उद्योग केला याचे सिंहावलोकन केलें तर काय आढळून येतें ? या काळांत आपले मोठ्या वादविवादाचे विषय म्हटले

म्हणजे पाणी उजव्या हातानें प्यावे कीं डाव्यानें प्यावे, असल्या प्रकारचे होत हात तीनदां धुवावा कीं चारदा, चुळा पाच वेळ टाकाव्या कीं सहा वेळ टाकाव्या, असल्या प्रश्नावर मोठे कडाक्याचे वाद करण्यापलीकडे आपण काहींसुद्धा केलें नाही. असल्या जाड्या प्रश्नावर वर्षानुवर्षे भवति न भवति करीत बसणाऱ्या आणि असल्याच विषयावर मोठमोठीं भाष्यें रचणाऱ्या अरण्यपंडितांपासून आपण कोणत्या फायद्याची अपेक्षा धरावी ? आता, आमचें धर्मज्ञान स्वयंपाक घरातल्या गोष्टींपर्यंत गेलें नाहीं म्हणजे मिळविली असें वाटण्याची वेळ आली आहे. खरें पाहिलें, तर आज आपण धड वेदान्ती नाही, धड पौराणिक नाहीं आणि धड तांत्रिकही नाहीं अशा स्थितींतले लोक आहों. आमचा सध्याचा धर्म पाहिला, तर तो फक्त सोवळेपणांत राहिलेला आहे स्वयंपाकघर हे आमचें मोठे कार्यक्षेत्र ! भाताचें तपेले तोच देव, आणि सोवळ्याचा कडेकोट बंदोबस्त हाच कायतो धर्माचार ! आमचा सध्याचा जप म्हटला म्हणजे 'हा शिवू नको, विटाळ होईल ' हाच. आणखी शेपन्नास वर्षें आहे हीच स्थिति राहिली, तर हिंदु राष्ट्र म्हणजे भलें मोठे वेड्याचें इस्पितळ बनून जाईल. आपल्या जन्माचा हेतु काय, आपल्या जन्माचे खरे साफल्य कशात आहे, इत्यादि प्रश्न ज्याच्या डोक्यात उद्भवत नाहींत, त्याच्या मेंदूला खरोखर काहीं तरी विकार झाला असला पाहिजे. आपल्या बुद्धीचें स्वातंत्र्य सर्वथैव नष्ट झाले आहे. केवळ स्वतंत्र्याच सामर्थ्यावर कोणत्याही विषयाचें आकलन ती करू शकत नाहीं. मनाचें सर्व सामर्थ्य अदृश्य झालें आहे त्यावर तमोगुणाचें राज्य पसरलें आहे यामुळें घाण्याच्या बैलाप्रमाणें लहानशा वर्तुळांत र र करीत बसण्यापलीकडे त्याची मजल जात नाहीं आपण अद्यापि डोळे उघडू नयेत काय ? आतां ही स्थिति आणखी किती दिवस चालणार ? या स्थितीला आपण आतां हद्दपार करू या. मनाचें सामर्थ्य आणि चापल्य आपणांस प्राप्त झालें, तरच आपल्या पूर्वजानीं ठेवलेल्या ठेव्याची खरी किंमत आपणास समजेल. या ठेव्यातील अल्पांशतरी आपणास मिळावा म्हणून सारे जग वाट पाहात बसले आहे. हा ठेवा चोहोंकडे वाटून टाकला नाहीं, तर जगाला निःसंशय मरण येईल. हा ठेवा बाहेर काढून तो आपण जगभर वाटून टाकू या. कलियुगात दानच श्रेष्ठ आहे असें भगवान् व्यासानीं म्हटलें आहे. सर्व प्रकारच्या दानात अध्यात्मज्ञानदान हें पहिल्या प्रतीचें आहे. त्याच्या

खालोखालचें दान, लौकिक विद्येचें दान हें असून, त्यापेक्षां कमी प्रतीचें दान जीवदान हें आहे, आणि अन्नदान हे कनिष्ठ गणलें आहे. आजपर्यंत आपण अन्नदान पुष्कळ केलें आहे. या बाबतींत दुसरा कोणताही देश आमची बरोबरी करणार नाहीं. आमच्या घरांत अर्धी भाकरी असली तरी त्यांतली चतकोर आम्ही क्षुधिताला देत आलो आहों हा देखावा फक्त हिंदुस्थानांतच पहावयास सापडेल. आता आपण याहून श्रेष्ठ प्रतीचीं दानें करू या लौकिक विद्येचें दान आणि अध्यात्मज्ञानदान याकडे आपण यापुढें अधिक लक्ष दिलें पाहिजे आपण खऱ्या शौर्यानें आणि मनापासून या उद्योगाला लागलों तर अवघ्या पचवीस वर्षाच्या अवधीत आपलें कोडें सुटेल, सर्व प्रकारच्या तत्त्यांचें मूळ दग्ध होऊन जाईल आणि हिंदुस्थान ही पुन्हां खऱ्या आर्यांची भूमी होईल. सद्गृस्थहो, मला सांगावयाचें होतें तें इतकेच. तोंडानें बडबड करीत बसण्याची संवय मला नाहीं. माझे बेत असे आहेत आणि तसे आहेत अशा कल्पना करण्यापेक्षा हातानें प्रत्यक्ष कृति करून दाखविणें मला अधिक आवडतें परमेश्वराची तशी मर्जी असेल, तर माझे बेत पार पाडण्यासाठीं उद्योग करण्याची धमक मला आहे परमेश्वराच्या कृपेनें मला आणखी आयुष्य लाभलें, तर उद्योगाची पराकाष्ठा केल्यावांचून मी राहणार नाही माझ्या कार्यात यश येईल की नाहीं हें मला सांगवत नाहीं, पण महत्कार्याप्रीत्यर्थ सर्व आयुष्य खर्च करणें हेच माझे काम आहे असें मी समजतों. महत्कार्यासाठीं हा देह न झिजला, तर या मातीच्या गोळयाचा उपयोग तरी काय? "महत्कार्यी वेंचिले। तरीच उपेगा आलें। ना तरी व्यर्थची गेले।" असेंच मनुष्यदेहाविषयीं म्हटलें पाहिजे हिंदुस्थानात धर्मजागृति होण्याचीं शुभचिन्हे दिसूं लागली आहेत. अशा वेळीं तापलेल्या तव्यावर पोळी भाजून न घेईल तो मूर्ख !

---

## मदूरा येथील मानपत्र व उत्तर.

परमपूज्य स्वामी महाराज,

प्राचीन आणि पवित्र अशा मदूरा शहरचे आम्ही हिंदु रहिवासी आपलें सादर आणि मन पूर्वक स्वागत करतों. हिंदु संन्याशाचा आयुष्यक्रम कसा असावा याचें मूर्तिमत उदाहरण आपण आम्हा लोकांसमोर मांडिलें आहे.

ससारांत राहून केलेलीं कर्तव्यें हीं केवळ तृष्णातृप्तीसाठीं केलेलीं कर्तव्यें होत. त्यामुळें अहकाराचा परिपोष मात्र होतो. असलीं कर्तव्यें झुगारून देऊन केवळ परहितासाठी आणि मनुष्यजातीची आध्यात्मिक उन्नति व्हावी या हेतूनें प्रेरित होऊन आपण हे महत्कार्य हातीं घेतलें आहे. काहीं विशिष्ट प्रकारचे नेमधर्म आणि आचार, हें हिदुधर्माचें खरें स्वरूप नव्हे, हे आपण आपल्या उदाहरणानें प्रत्यक्ष सिद्ध केलें आहे, आणि दु खव्याप्त जीवात्म्याला पूर्ण शाति देण्याचे सामर्थ्य आर्यतत्त्वज्ञानांत आहे, हेही आपण जगाला पट-विलें आहे.

परिस्थिति आणि सामर्थ्य यांना अनुरूप असा मार्ग प्रत्येक व्यक्तीला ज्या धर्मात सापडतो, अशा आमच्या सनातन धर्माची आणि तत्त्वज्ञानाची गोडी आपण अमेरिकनास आणि इग्लिश लोकास लावली. गेलीं तीन वर्षें आपलीं सारीं व्याख्यानें जरी परदेशांत झाली, तरी येथील रहिवाशानींही त्यांचा आकंठ आस्वाद घेतला आहे, आणि त्यामुळें वाढत्या प्रमाणावर असलेल्या पाश्चात्य जडवादाच्या प्रसाराला बराच आळा पडला आहे

विश्वाचे अध्यात्मदृष्ट्या योग्य नियमन व्हावे यासाठी हिंदुस्थानाची उत्पत्ति आहे आणि हेच कार्य करण्यासाठीं ही भूमि आजपर्यंत जगली आहे. ज्या अवतारी पुरुषाच्या आगमनानें हे महत्कार्य घडावयाचें, ते आता लवकरच अवतार घेतील अशी आम्हास खात्री वाटते. कलियुगाच्या चालू चरणाच्या अतीं आपणासारखी दिव्य विभूति जन्म घेते याचा अर्थ हाच आहे

प्राचीन विद्येचे निवासस्थान, सुंदरेश्वराचें वसतिस्थान आणि शुद्ध योग्याचें द्वादशातक्षेत्र असें हें मदूरा शहर आपलें अभिनदन करीत आहे.

प्राचीन सनातन धर्माचें विशदीकरण करून आपण मानवजातीच्या कल्याणार्थ जे अमोल श्रम केले, त्यामुळें हिंदुस्थानातील अनेक शहरे आपलें अभिनंदन करण्यासाठीं अहमहमिकेने पुढें येत आहेत, आणि आमचें हे शहरही आपलें अभिनदन करण्यास तितकेच उत्सुक झालें आहे.

आपणास परमेश्वरानें दीर्घायुरायोग्य द्यावें अशी त्याची आम्ही प्रार्थना करतो.

## उत्तर.

चार वर्षें पाश्चात्य देशांत फिरून मीं कोणते कार्य केलें आणि त्याचा परिणाम काय झाला व मला पाश्चात्यासंबधी विशेष अनुभव कोणत्या प्रकारचे

आले इत्यादि विषयांची माहिती मीं सागावी, अशी इच्छा आपल्या सम्माननीय अध्यक्षानीं प्रकट केली काही काळ आपल्या संगतींत घालवून ही आपली इच्छा मला पुरी करतां आली असती, तर मलाही मोठा संतोष वाटला असता, पण संन्याशालाही दुर्दैवानें देहबध शिल्लक उरलेला असतोच गेल्या तीन आठवड्यांत केलेला एकसारखा प्रवास आणि भाषणें यामुळें माझ्या देहालाही शीण आला तर त्यात नवल कसलें ? यामुळें आज लांबलचक भाषण करणें अगदी अशक्य झालें आहे याकरिता आजच्या प्रसगी आपल्या स्वागताबद्दल मी आपले मनःपूर्वक आभार मात्र मानतों. माझी प्रकृति जरा सुधारली म्हणजे अनेक विषयावर सापोपांग चर्चा करण्यास पुढें पुष्कळ वेळ मिळेल. आपल्या या शहराचे सुप्रसिद्ध आणि उच्चकुलीन रहिवासी असे जे रामनदचे महाराज, त्याचें मला या प्रसगीं विशेषेंकरून स्मरण होते मी शिकागो येथें जावे ही कल्पना मूळ त्याचीच होती ही गोष्ट आपणापैकीं बहुतेकास ठाऊक असेलच. या कामीं त्यानींच मला एकसारखें प्रोत्साहन दिलें त्यानीं मला जें मन पूर्वक साहाय्य केलें तें केलें नसतें तर आजचा हा प्रसंगही प्राप्त झाला नसता. याकरितां आपण जो स्तुतीचा वर्षाव मजवर केला आहे, त्यापैकीं बराच मोठा भाग राजेसाहेबांकडे जावा हें योग्य आहे ते महाराज न होतां सन्यासी झाले असते तर मला अत्यत आनद झाला असता, कारण त्याची एकदर वृत्ति राजपदापेक्षा योगिराजपदालाच अधिक अनुकूल आहे.

जगातील एखाद्या भागाला एखाद्या वस्तूची अत्यत जरूरी भासूं लागली म्हणजे ती वस्तु ज्या भागात असेल तेथून ती इच्छित स्थलीं धाव घेते; आणि अशा रीतीनें तेथील उणीव भरून निघते. हा विनिमय केवळ जडपदार्थातच चालू आहे असें नसून अध्यात्मविद्येसारख्या सूक्ष्म वस्तूतही तो चालू असतो. जगांतील एखाद्या भागात अध्यात्मबल फार कमी प्रमाणांत असलें व त्यामुळें तेथें विषमता उत्पन्न होऊ लागली म्हणजे पृथ्वीच्या ज्या भागात अध्यात्मविद्येचा वास असेल, तेथून ती अपेक्षित भागाकडे धाव घेऊं लागते. अध्यात्मविद्येचा प्रवाह योग्य स्थलीं जावा म्हणून आपण प्रयत्न केला अथवा न केला, तरीही हें कार्य अवश्यमेव घडून येतेंच. या गोष्टी केवळ नैसर्गिक नियमानेंच घडून येतात. विनिमय अथवा अदलाबदल हा जगाच्या समावस्थेचा पायाच आहे यामुळें एखाद्या कारणानें जेथें विषमावस्था उत्पन्न

होत असेल, तेथे त्या कारणाचा प्रतिरोध होणे अवश्य असतें, आणि असा प्रतिरोध एखाद्या बाह्य वस्तूच्या आगमनानें होतो एकंदर मानवकुलाचा इतिहास पाहिला तर जगाला अध्यात्मबलाचा पुरवठा भरतभूमीनें एक-दोनदाच नव्हे, तर वारवार केल्याचें आढळून येतें. एक राष्ट्र दुसऱ्याला जिंकतें अथवा एखाद्या राष्ट्राचा निकट सबध दुसऱ्या राष्ट्राशीं व्यापारामुळें होतो, अशा वेळी निरनिराळया मानवकुलाचें एकीकरण सुरू होत असतें. असें एकीकरण होण्यासाठीं प्रत्येक राष्ट्र आपापल्यापरी मदत करीत असतें. एखाद्या राष्ट्राच्या राजकीय सस्था तेथे प्रवेश करतात, दुसऱ्या एखाद्याकडून समाजरचनेला मदत होते, आणि तिसऱ्या एखाद्याकडून अध्यात्म-विद्येची प्राप्ति होते अशा रीतीनें निरनिराळया मानवशाखाचें एकीकरण तेथे घडून येत असतें मनुष्याच्या ज्ञानात याप्रमाणें जी चोहोकडून भर पडत असते, त्यात भरतभूमीनें अध्यात्मज्ञानाची आणि तत्त्वज्ञानाची भर घालावी असा ईश्वरी संकेत दिसतो. इराणी राष्ट्र उदयास आले त्याच्याही पूर्वीपासून भरतभूमीने हे कार्य केलें आहे. त्यानतर इराणी राष्ट्राच्या उदय-कालींही तिनें हे कार्य केलें ग्रीक राष्ट्राचा सर्वत्र विजय झाला, त्या वेळींही भरतभूमींतून आर्यतत्त्वज्ञानाची लाट बाहेर सर्वत्र पसरली होती, आणि आता चवथ्या खेपेला ब्रिटिश राष्ट्राच्या जयजयकाराबरोबरही आर्य-तत्त्वज्ञानाचा प्रवेश सर्वत्र होणार आहे ईश्वरी सकेतास अनुसरूनच ती आपलें कार्य आजपर्यंत करीत आली आहे, व पुढेही त्याच सकेताला अनु-सरून तिचें कार्य सुरू राहील

एकजुटीनें सामाजिक कामे करण्याची आणि मानवी सस्कृतीच्या बाह्याग-रचनेची अशा पाश्चात्य पद्धतीचा प्रवेश आपल्या भूमीत एका बाजूने होत असता, दुसऱ्या बाजूने आपल्या भूमीतून अध्यात्माची आणि तत्त्वज्ञानाची लाट बाहेर जाऊन पसरावी यांत नवल नाहीं, किंबहुना असे होणें अपरि-हार्यच आहे आपली इच्छा असो अगर नसो, ही लाट पाश्चात्यात पसरणें नैसर्गिक असल्यामुळे ते घडून येणारच. आपण उलट दिशेनें कितीही खटपट केली तरी ती अशा प्रसंगी सफल होणार नाहीं. त्याचप्रमाणे पाश्चात्यांच्या जडवादाचा प्रवेशही आपल्या भूमींत झाल्यावांचून राहावयाचा नाहीं आतां परिस्थित्यनुरूप पाश्चात्याच्या जडवादाचें स्वरूप येथे अगदीं निर्भेळ राह-

णार नाही, हे खरे; तथापि कोणत्यानाकोणत्या स्वरूपाचा आणि परिमाणाचा जडवाद येथे आल्यावाचून राहणार नाहीं. जगाचा समतोलपणा कायम राहण्यासाठी अशा गोष्टी होणे अवश्य आहे. पाश्चात्याच्या जडवादाचे अल्प प्रमाणांत मिश्रण होणे हें आम्हास जसे हितावह आहे, त्याचप्रमाणे आमच्या अध्यात्मज्ञानाचें अल्पसे मिश्रण पाश्चात्यास हितावह आहे आपण सर्वच गोष्टी पश्चिमेकडून आणल्या पाहिजेत हे जसें खरे नाही, त्याचप्रमाणे पाश्चात्यानी आमच्या सगळयाच गोष्टी घ्याव्या हेही खरे नाहीं. सर्व राष्ट्रात तालबद्धता उत्पन्न व्हावी हा जो अखिल मानवी कुलाचा अतिम हेतु आहे, त्या हेतूच्या सिद्धीकरिता प्रत्येकाने आपापल्याजवळचा उत्कृष्ट भाग भावी पिढयाच्या हवाली करावा हे रास्त आहे, आज युगानुयुगें मानवजातीनें हे ध्येय आपल्यापुढे ठेवलें आहे आजपर्यंतचा इतिहास पाहता या ध्येयाला स्वप्नातील वस्तूइतकीच किंमत आलेली आहे. पण कधींकाळी हे सुखमय स्वप्न प्रत्यक्ष जागृतीत खरे व्हावयाचे असेल, तर ते याच मार्गानें सिद्ध होईल. ही अभूतपूर्व स्थिति कधींकाळी तरी प्रत्यक्ष अस्तित्वात येईल की नाही, आणि असल्या प्रकारची–केवळ कल्पनेलाच गम्य अशी–समाजरचना निर्माण होईल की नाही, हे मला सागवत नाहीं, किंबहुना याबद्दल मला मोठीच शंका आहे तथापि ही समाजरचना अस्तित्वात येणे शक्य असलें अथवा नसलें, तरी ती जणू काय उद्याच अस्तित्वात येणार आहे अशी श्रद्धा बाळगून तशा प्रकारच्या समाजरचनेला अनुकूल असें कार्य प्रत्येकाने करीत राहिलें पाहिजे, ही गोष्ट मात्र खरी ही समाजरचना उत्पन्न होणे माझ्या एकट्याच्याच कार्यावर अवलबून आहे, असें प्रत्येकाला नित्य वाटत राहिलें पाहिजे स्वत खेरीज जगातील सर्व मनुष्ये आपापली कार्यें उरकून केवळ आपल्याच मदतीसाठी वाट पाहत बसलीं आहेत, अशी आपली पक्की भावना झाली पाहिजे. जगाला पूर्णावस्था प्राप्त होण्याच्या बाबतींत केवळ आपल्याच कार्याची कायती उणीव आहे, अशा भावनेने प्रत्येकाने कार्यरत राहिलें पाहिजे. ही जबाबदारी लक्षात ठेवून आपण आपल्या वाट्याला आलेलें धर्मकार्य करावयास सज्ज झाले पाहिजे बाह्य जगात अशा प्रकारच्या घटना सुरू असतां आमच्या भरतभूमींतही धर्माचे पुनरुज्जीवन होण्याचा रग दिसू लागला आहे. हा पुनरुज्जीवनाचा मार्गही अगदीं निष्कटक आहे असें नाहीं.

त्यात मिळणारें यश जस अत्यंत महत्त्वाचे आहे, तसेंच त्यातील काटेकुटेही अत्यत विषारी आहेत, हे ध्यानात ठेवलें पाहिजे. धर्माच्या पुनरुज्जीवनकाळी धर्मवेडाचाही जन्म होण्याची मोठी भीति असते या धर्मवेडाची मजल कधीं कधी आततायित्वापर्यंत जात असते, आणि शेवटीं तें अनावर होण्याचीही भीति असते. याकरिता हा समध आपणास पछाडणार नाहीं, अशी काळजी आपण आरभापासूनच घेतली पाहिजे जुनापुराणा खुळसट व्यवहारी धर्म-मार्ग एकीकडे आणि पाश्चात्याचा चार्वाकवाद दुसरीकडे अशी आपली स्थिति आजला झाली आहे. या आड-विहिरी चुकवून आपण आपला रस्ता काढला पाहिजे पाश्चात्याच्या हाडीमासीं ज्या प्रकारच्या ‘सुधारणेचा’ पूर्ण प्रवेश झाला आहे, तसल्या प्रकारची सुधारणा (?) इकडे येणार नाहीं अशी खबरदारी आपण घेतली पाहिजे. काही केलें तरी आपण आनख-शिखाग्र पाश्चात्य बनू हे सर्वथा अशक्य आहे. याकरिता पाश्चात्याचे नुसते अनुकरण सर्वथा निरुपयोगी आहे, हे अगदी उघड आहे पाश्चात्याची समाज-स्थिति आमच्यापासून आमूलाग्र भिन्न असल्यामुळें त्याचें अनुकरण करणे म्हणजे आपण स्वत मरून जाणे असेंच झालें नाहीं काय ? पाश्चात्याचें अनुकरण तुम्हीं पूर्णत्वाने केलें अशी घटकाभर कल्पना केली, तर तुमच्यातलें ‘स्वत्व’ नष्ट झाले असेंच म्हटले पाहिजे, म्हणजे त्याच क्षणी तुमच्या समाजाचे स्वतत्र अस्तित्वच नष्ट झालें नाहीं काय ? स्वतत्र अस्तित्व नष्ट होणें हाच राष्ट्राचा मृत्यु होय, पण ही कल्पनाच अशक्य कोटीतली आहे. तिला कधी काळी अस्तित्व येणे शक्यच नाहीं आपल्या उगमस्थानापासून शेकडों मैल लाब आलेल्या व अत्यत विस्तार पावलेल्या अशा गगानदीला मुखापासून हटवीत हटवीत उगमापर्यंत नेण्याचें हे कार्य आहे जणूकाय कालाच्या आरभाबरोबरच ज्या रचनेला आरभ झाला, आणि युगानुयुगें जी प्रसार पावत आपणापर्यंत वाहत आली आहे, त्या रचनेचा ओघ मुळापर्यंत परतविणे कितपत शक्य आहे, याचा विचार आपणच करा ही अघटित घटनाही तुम्ही शक्य कोटींत आणली, तरीसुद्धां तुम्ही निखालस युरोपीय बनून जाणे शक्य नाही थोड्याशा शतकाची आपली ‘सुधारणा’ टाकून देणे युरोपियांस किती अशक्य झालें आहे हे आपणास दिसतच आहे. मग कित्येक शतकाची आपली अत्यत उज्ज्वल सस्कृति आपण क्षणार्धांत टाकून देऊं हें शक्य

आहे काय ? ही गोष्ट सर्वथा अशक्य आहे तसेंच आणखीही एक गोष्ट लक्ष्यात ठेवण्यासारखी आहे. एखाद्या खेड्यांतील म्हसोबा आपला देव आणि बारीकसारीक भोळसट चालीरीती हा आपला धर्म, अशी आपली पक्की समजूत होऊन बसली आहे प्रत्येक ठिकाणचे देशाचार भिन्न भिन्न आहेत. मग त्यात खरा कोणता आणि खोटा तरी कोणता ? त्यातले ग्राह्य कोणते आणि अग्राह्य कोणते ? उदाहरणार्थ, एखाद्या ब्राह्मणाला मासभक्षण करताना पाहून एखाद्या दक्षिणेंतील ब्राम्हणाच्या आंगावर काटा उभा राहील, पण उत्तरेकडील ब्राह्मणाला तेच मांसभक्षण मोठे पुण्यप्रद वाटेल. यज्ञयाग करून शेकडों बकरीं मारण्यात आपण मोठे शतकृत्य करीत आहो अशी त्यांची समजूत असते अमुक रीतीने वागणें हाच आपला सदाचार आहे असें तुम्ही म्हणूं लागला, तर त्याच्या अगदीं उलट वागणें हाच आपला सदाचार आहे असे दुसरा एखादा म्हणेल. आपल्या या विस्तृत देशात परस्पर अत्यत विरुद्ध असे अनेक आचार चालू आहेत, पण ते विशिष्ट भागापुरतेच आहेत, हे आपण लक्षांत ठेवलें पाहिजे. हे आचार म्हणजेच धर्मसर्वस्व अशी जी आपली समजूत झालेली आहे ती सर्वथा चुकीची आहे

पण आपले हाल एवढयानेच सपतात असे नाही याहूनही बलवत्तर अशा आणखी अडचणी आहेत आपलीं शास्त्रे पाहतां त्यात दोन प्रकारच्या गोष्टी आढळून येतात एका प्रकारच्या शास्त्रातील सिद्धाताची उभारणी मनुष्याच्या सार्वकालीन नैसर्गिक वृत्तीवर झालेली आहे. यांत आत्मा, परमात्मा आणि सृष्टि याचे जे नित्य–कालस्थलातीत–सबध आहेत त्याचें उद्घाटन केलेलें आहे दुसरा प्रकार याहून भिन्न आहे. त्यातील सिद्धात विशिष्ट देशाचार, विशिष्ट काळची परिस्थिति, आणि विशिष्ट समाजरचना यास अनुसरून आहेत पहिल्या प्रकारचे सिद्धात वेदांतर्गत आहेत, आणि दुसरा प्रकार स्मृति आणि पुराणें यात आढळून येतो श्रुतीतील सिद्धांत कालस्थलातीत असल्यामुळे त्यांचें सत्यत्व त्रिकालाबाधित आहे विशिष्ट कालानें अथवा परिस्थितीनें त्याचें सत्यत्व बाधित होत नाहीं याकरितां स्मृतिपुराणादि ग्रंथातील सिद्धांत आणि श्रुतींतील सिद्धांत ह्यांत विरोध येत असेल त्या वेळी पुराणादि ग्रंथातील सिद्धातांचा खुशाल त्याग करावा. खुद्द स्मृतींविषयी विचार केला, तर निरनिराळ्या स्मृतींत परस्परविरोधी वचनें आढळून येतात. अमुक

एक आचार अमक्या युगाला उचित आहे असे एक स्मृति सांगते, तर दुसरी स्मृति दुसऱ्याच प्रकारचा आचार विहित आहे असे म्हणते, अमुक एक आचार सत्ययुगापुरता विहित असला, तर त्याहून निराळ्या प्रकारचा आचार कलियुगात विहित ठरतो अशा प्रकारचे परस्परविरोध आढळत असले, तरी आमचे मूलभूत सिद्धांत सृष्टीच्या मूलस्वभावास अनुसरून असल्यामुळें सृष्टीच्या अतापर्यंत त्यांतील सत्य मात्र अबाधित राहाणार, हीच आमच्या सनातन धर्मांची विशेष थोरवी आहे ते सिद्धात सर्व काळीं आणि सर्व स्थळीं एकसारखेच लागू पडावयाचे स्मृतिसिद्धात त्या विशिष्ट कालापुरते आणि त्या विशिष्ट परिस्थितीपुरते मात्र खरे असल्यामुळें काळ आणि परिस्थिति हीं बदलली कीं त्याचें सत्यत्वही संपुष्टात आलेंच एखादी चालरीत बदलली म्हणून धर्म बुडाला अशी ओरड करण्याचें यत्किंचित्‌ही कारण नाहीं. निरनिराळ्या वेळी निरनिराळ्या चाली अस्तित्वात होत्या, तरी त्यांमुळे आमचा धर्म मात्र बुडालेला नाहीं. तो कधींही बुडावयाचा नाहीं हे आपण पक्के लक्षात ठेवा पूर्वीच्या चालीरीती आजला आपल्यांत नाहींत याचा प्रत्यक्ष अनुभव आपण घेत आहोंच, पण त्यामुळे आपला धर्म बुडालेला आहे काय? गोमास न खाईल तो ब्राम्हणच नव्हे, अशीही समजूत आपल्या याच भूमीत एका काळी प्रचलित होती हे आपण लक्षात ठेवा. एखादा सन्यासी, राजा अथवा पूज्य अतिथि आला असता बकरा अथवा बैल याचे मासभोजन त्याला देत असत असा उल्लेख वेदात आहे. यानतर ही पद्धत आत्मघातकी आहे ही गोष्ट कालातरानें आपल्या लक्षांत आली आपला देश मुख्यत्वेकरून शेतकीवर उदरनिर्वाह करणारा असल्यामुळें चागल्या जनावराचा नाश करणे म्हणजे स्वत चाच नाश करून घेण्यासारखें आहे ही गोष्ट आपल्या लक्षांत आली. यामुळें ही चाल आपोआपच बद पडली आणि गोमातेचा वध करूं नये, ही अनुज्ञा प्रचारांत आली. आज आपणास जी चाल अत्यत भेसूर वाटेल, तीच चाल पूर्वकाळी पूर्ण प्रचारात होती असें आपणास आढळून येईल अशाच रीतीने निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या चाली आणि निरनिराळे कायदे अस्तित्वांत आले, आणि अशाच रीतीनें आजच्या चाली कालांतरानें नष्ट होऊन दुसऱ्याच प्रकारच्या चाली अस्तित्वात येतील यात तिळमात्र शका नाहीं. याकरितां आपण एक गोष्ट नित्य लक्षात बाळगली

पाहिजे तो ही कीं, श्रुतिसिद्धात कालस्थलातीत असल्यामुळें ते पूर्वी जितके खरे होते तितकेच आजही आहेत आणि भविष्यत्कालीही त्यातील खरेपणांत उणीव येणार नाहीं, परतु स्मृती मात्र वारवार कालानुरूप बदलत जातील. जसजसा काळ निघून जाईल, तसतसा स्मृतीत बदल होईल. निरनिराळया काळी निरनिराळे ऋषी अस्तित्वात येतील आणि निरनिराळया स्मृतींची रचना करतील त्या त्या काळीं विहित आणि अविहित कर्मे कोणती आहेत, याचा निर्णय करून तदनुरूप ते लोकनियमनाचें कार्य करतील. असे न झालें तर समाज जिवतच राहणार नाही. आतापर्यंत जें काहीं सागितलें त्यावरून आपल्या दोन्ही बाजूस भीतिस्थानें कोणतीं आहेत हे आपल्या लक्षात आलेंच असेल माझ्या म्हणण्याचा मुख्य आशय हाच कीं आपलें सामान्य धोरण संग्राहक असावें, ते विग्राहक असू नये. निरनिराळया परिस्थितीस आणि समाजातील घटकाच्या वाढीला अनुकूल अशा प्रत्येक चालीचा सग्रह आपण करावा, समाज विस्कळित होईल अशी कृति करू नये. एखाद्या आततायी धर्मवेड्यासारखी विग्रहबुद्धि आणि पक्क्या चार्वाकशिष्याची संग्रहबुद्धि याचा सयोग आपण आपल्या ठिकाणी केला पाहिजे आपलें अत करण समुद्रासारखें खोल आणि आकाशवत् विस्तीर्ण असावे. स्वत.ची सुधारणा करण्यात ज्याप्रमाणें आपण इतर राष्ट्राबरोबर चालणे अवश्य आहे, त्याचप्रमाणे आपल्या रक्तात खेळत असलेली पूर्वपरपरा नष्ट न होईल अशी खबरदारी घेणेही अत्यत अगत्याचे आहे. ही खबरदारी कशी घ्यावी हे आम्हा हिदूना तरी कोणी शिकवावयास नको असें मला वाटतें. प्रत्येक वस्तूतील चिरस्थायी भाग कोणता आणि आगतुक कोणता याची योग्य पारख करण्यास आपण प्रथम शिकलें पाहिजे चिरस्थायी भाग हा कालस्थलातीत असणारच. आगंतुक भागाचे महत्व मात्र केवळ तेवढया चालू काळापुरतेच असावयाचे. हें लक्षात ठेवून कालानुरूप त्यात फेरफार करणें अवश्य आहे. तसें न केले तर त्याचे महत्त्व नष्ट होते, इतकेच नव्हे, तर तो भाग आपणास प्रत्यक्ष अपायकारकही होतो. तथापि आपल्या जुन्या चालीरीती आणि सस्था याचा उपहास करा असा मात्र माझ्या म्हणण्याचा आशय नाहीं. मी असें कधींही म्हणणार नाहीं. आज आपणांस एखादी चाल अत्यत अनिष्ट वाटत असली तरीसुद्धां तिचा उपहास आपण करता कामा नये. कसल्याही चालीरीतीं-

विरुद्ध बोटे मोडण्याचें कारण आपणास नाहीं आज आपणांस अत्यत अनिष्ट वाटत असलेल्या चालीच पूर्वकाळीं अत्यत इष्ट होत्या त्याच चालींनी पूर्वकाळीं आपल्या समाजाचें रक्षण केलें आहे. याकरिता त्या चालींचा त्याग करणें आज इष्ट असलें, तरी तसें करतांना त्यांचा उपहास न करता उलट त्यानीं केलेल्या कार्याबद्दल त्याचा गौरव करून त्यास रजा दिली पाहिजे आपलें आर्यकुल याच चालीरीतींनी आजपर्यंत सुरक्षित ठेवलें आहे हे आ-पण विसरतां कामा नये. दुसराही एक महत्त्वाचा मुद्दा आपण लक्ष्यात बाळगला पाहिजे. तो हा की, राजा अथवा सेनाध्यक्ष हा केव्हाही आपल्या समाजाचा शास्ता नव्हता. आपल्या समाजाचें नेतृत्व नेहमीं ऋषीकडे असे ऋषी हे सामान्य पुरुष नव्हते, ते मन्त्रद्रष्टे होते. प्रत्यक्ष धमाशींच ज्याची भेट झाली होती तेच ऋषि ही पदवी पावत असत. पुष्कळशा ग्रथांतील मजकूर डोक्यात साठविण्यानें ऋषि ही पदवी प्राप्त होत नसे कोणी मोठा वादविवाद केला, कल्पनेच्या साम्राज्यांत विहार केला, अथवा पुस्तकातील उताऱ्यांची पुष्कळशी बडबड केली, तर तेवढयावरून तो ऋषि होत नसे इद्रियापलीकडील प्रदेशात असणाऱ्या सत्याची व ज्याची प्रत्यक्ष भेट झाली असेल—किंबहुना, जो स्वत च सत्यरूप झाला असेल—त्यालाच ऋषि ही पदवी मिळे महर्षित्व म्हटलें म्हणजे या प्रकारचे असलें पाहिजे महर्षित्व हे अमुक एका जातीला किवा पथाला आंदण दिलें आहे असे नाहीं. त्याला कसल्याही प्रकारचा निर्बध नाही. काल, स्थल, वय इत्यादि बधने महर्षित्वाला नाहीत. सत्याचा प्रत्यक्ष अनुभवच झाला पाहिजे असे वात्स्यायनांचे म्हणणे आहे. तुमच्या आमच्या सारख्या सामान्य माणसांनाही ऋषि होणें अशक्य नाही. मात्र आपण आत्मविश्वास प्रथम बाळगला पाहिजे. मला या जगात अशक्य असें काही नाहीं ही भावना अत्यंत दृढ असली पाहिजे. आपण सारें जग हालवूं शकू अशी खात्री आपल्या चित्ताला वाटत असली पाहिजे. सर्वेश्वरत्वाचा वास आपल्या हृदयात असता आपणास अमुक एक गोष्ट अशक्य आहे असे कां वाटावें ? धर्माचा प्रत्यक्ष अनुभव आपण घेतला पाहिजे. प्रत्यक्ष अनुभव घेऊनच सर्व शकाची निवृत्ति आपण केली पाहिजे. असें झालें म्हणजे ऋषित्वाचा दिव्य प्रकाश आपल्या भोंवतीं भरून राहील. अशा स्थितींत आपल्या मुखा-तून बाहेर पडणाऱ्या प्रत्येक शब्दामागे अनत सामर्थ्याचा पाठिंबा खडा

असेल. अशुचित्व आपल्या आसमतात् फिरकणारही नाही. अमुक गोष्ट वाईट अथवा अशुभ म्हणून तिजवर आग पाखडण्याचें कारणही आपणांस उरणार नाहीं. तीं बिचारीं आपलीं आपणच पळून जातील. तव्याभाडणावाचून सर्व कारभार आपोआप सुरळीत होईल. हे ऋषित्व आपणापैकी प्रत्येकाला प्राप्त व्हावे व त्यायोगें आपला आणि इतराचा मार्ग सुलभ व्हावा असा आशीर्वाद मी परमेश्वरापाशी मागतो

---

## कुंभकोणम् येथील मानपत्र व त्यास उत्तर.

परमपूज्य स्वामिन्,

पाश्चात्य देशातील आपला प्रवास सपवून, विख्यात देवालयांमुळें व परमपावन अशा सत्पुरुषामुळें पवित्र झालेल्या या भूमीस आपण परत आलां, याबद्दल या पुरातन व महत्त्वाच्या अशा कुभकोण नगरींतील हिंदु रहिवाशातर्फे आम्ही आपलें स्वागत करीत आहो युरोप व अमेरिका येथें जें सनातनधर्मकार्य आपण केलें ही परमेश्वरी कृपाच होय, या कृपेबद्दल नम्र अतःकरणानें आम्ही परमेश्वराचें स्मरण करतों. परमेश्वरविषयक अनेक कल्पना आणि अध्यात्मशास्त्रांतील अनेक प्रमेयें याची एकवाक्यता करून त्यातून उच्च आदर्शाचे दिग्दर्शन करण्याइतकी पात्रता हिंदुधर्माच्या व आर्यतत्त्वज्ञानाच्या अगी आहे, ही गोष्ट शिकागो येथे सर्वधर्माच्या प्रतिनिधीस आपण पटविली. सनातनधर्म आणि तत्त्वज्ञान याचा विकास बुद्धिगम्य मार्गास अनुसरून आहे, त्यांत आकुन्चितपणास थारा नाहीं हे आपण सिद्ध केलें. या गोष्टी परमेश्वराच्या कृपाप्रसादानेंच झाल्या असल्या पाहिजेत.

विश्वाचा उत्पादक व शास्ता जो परमेश्वर तो सत्याचा सदैव पाठीराखा आहे, असा दृढविश्वास युगानुयुगे आमच्या हाडीमासीं खिळलेला आहे हिंदुराष्ट्र हे विशेषेकरून धर्मरक्षक राष्ट्र आहे आणि त्याला धर्माचा ठेवा अनेक पिढ्यापासून वारसदारीच्या हक्कानें मिळत आला आहे. या गोष्टी पाश्चात्याच्या नजरेस पूर्णपणें आणण्यात आपणास यश आलें, हेंच आमच्या आनदाचे व समाधानाचे मुख्य कारण आहे. अगोदरच सर्वतोमुखीं झालेल्या आपल्या गुरूच्या कीर्तीत आपल्या या कृतीनें विशेष भर पडली आहे. जगांतील

संस्कृत राष्ट्रात आमच्या राष्ट्राची कीर्ति आपण वाढविली आहे. तथापि या सर्वांहून विशेष महत्त्वाची अशी दुसरीही एक कामगिरी आपण बजावली आहे. अभिमानास्पद अशा गोष्टी पूर्वकालीं आमच्या राष्ट्राच्या हातून घडून आल्या आहेत. या गोष्टीची जाणीव आपण आमच्या ठिकाणीं उत्पन्न केली ही सर्वांहून महत्त्वाची कामगिरी होय. आमच्या राष्ट्रानें देशामागें देश पादाक्रांत केले नाहीत, हें अवनतीचे व वृद्धत्वाचें चिन्ह नाहीं, ही गोष्ट आपण आम्हास पटविली ही आपली अत्यंत महत्त्वाची कामगिरी होय. आपणासारखे शुद्ध मतीचे, स्वार्थत्यागी आणि स्वकार्यनिरत असे महात्मे आमच्या भूमींत जन्म घेतात, यावरून आमच्या भावी उदयाबद्दल आमच्या अंतःकरणांत पूर्ण आशा उत्पन्न झाली, तर त्यात नवल नाहीं सर्वांतर्यामी परमात्मा आपणास दीर्घायुरारोग्य देवो व सनातनधर्मप्रचारक या नात्यानें आपली कामगिरी करण्यास लागणारें सामर्थ्य तो देवो, हीच आमची त्यास अनन्यभावें प्रार्थना आहे.

## उत्तर.

# वेदान्ताचें कार्य.

"धर्माचे कार्य स्वल्प प्रमाणावर केलें तरी त्याचें मोठें फळ प्राप्त होतें," अशा अर्थाचें एक वाक्य भगवद्गीतेत आहे. या वाक्याच्या सत्यतेचे प्रत्यतर सध्या मला प्रत्यहीं मिळत आहे मी केलेले कार्य पाहिलें तर किती अल्प! पण कोलंबोपासून येथपर्यंत प्रत्येक शहरी लोकाच्या ममतेचा जो लाभ मला झाला, तो किती मोठा! खरोखर, माझें स्वागत इतक्या मन पूर्वक होईल, अशी माझी कल्पनाही नव्हती, तथापि असें होणे हे आपल्या हिंदूच्या शीलाला योग्य असेंच आहे. प्राचीन काळापासून हिंदुकुलाच्या अगीं ज्या मनोवृत्ति दृढ होऊन बसल्या आहेत, त्याचेच हे दर्शक आहे. आम्हा हिंदु-लोकांचा जीव फक्त धर्माच्या बाबतींतच तळमळतो आमच्या जीवितघटका-पैकी धर्म हाच काय तो अत्यंत महत्त्वाचा घटक आहे. धर्म हा आमचा केवळ जीव कीं प्राण आहे. पाश्चात्य आणि पौर्वात्य देशात हिंडून जगाचा थोडा बहुत मासला मीं पाहिला आहे, आणि प्रत्येक मानवकुलाला एखादा तरी जीवितहेतु असतो, असें माझ्या अनुभवाला आलें आहे. एखाद्या कुलाचा सारा हेतु राजकारणांतच गुतलेला असतो; दुसऱ्या एखाद्याचा हेतु सामाजिक

उन्नति हाच असतो, तिसरें एखादें कुल केवळ बुद्धीच्या वाढीच्या मागें लागलेलें आढळतें. अशा रीतीनें प्रत्येक कुलाला कोणताना कोणता एक हेतु असतो आणि त्या हेतूच्या पूर्तीसाठी त्या कुलाची सारी धडपड चाललेली असते, किंबहुना त्या कुलाचे अस्तित्व त्याच हेतूच्या अस्तित्वावर अवलबून असतें. याच रीतीनें धर्म हा हिंदुकुलाचा आदिहेतु आहे आमचें सारे अस्तित्व याच एका हेतूवर अवलबून आहे. हिंदुकुलाच्या इमारतीचा पाया धर्म हाच आहे. मी अमेरिकेंत असता मद्रास येथील लोकानीं एक मानपत्र मला अमेरिकेत पाठविलें होते. त्याचे जें उत्तर मीं दिलें, त्यात मीं असें म्हटलें होते की, हिंदुस्थानातल्या एखाद्या लगोट्या शेतकऱ्याला जे धर्मज्ञान आहे, ते अमेरिकेतल्या एखाद्या ' जटलमन 'लाहि नसेल. हे माझे पूर्वीचे शब्द आजही पुन्हा उच्चारण्यास मला दिक्कत वाटत नाहीं हिंदुस्थानातील सामान्य जनतेत एकदरींत चौकसबुद्धि कमी, आणि ज्ञानलालसाही फारशी नाहीं, या गोष्टीचे पूर्वीं मला फार वाईट वाटे, पण त्याच्या या वर्तनाचे इंगित आता मला कळून आलें. ज्या विशिष्ट बाबीकडे हिंदुजनतेचे चित्त लागलेलें आहे, त्या बाबीसबधीं ती अत्यत चौकस आहे असें मला आढळून आलें. ज्या बाबीसबधीं आमच्या जनतेत चौकसपणा असतो, त्याच बाबीकडे इतर देशातील जनतेचें मुळीच लक्ष नसते युरोपात साप्रत केवढया घडामोडी होत आहेत, अथवा तेथील समाजरचनेची कशी उलथापालथ होत आहे, याचें यत्किंचितही ज्ञान आमच्या सामान्य जनतेस नसते आणि ती त्याची पर्वाही करीत नाहीं. पण हिदुस्थानाशीं ज्याचा फारसा सबध येत नाहीं अशा सिलोनमधल्या शेतकऱ्यालासुद्धा धर्माच्या बाबतीत चाललेल्या घडामोडीची माहिती असते. अमेरिकेत सर्व धर्माची एक मोठी सभा भरली होती आणि तीत एका हिदुसन्याशाने व्याख्यान देऊन थोडीशी वाहवाही मिळविली, ही गोष्ट सिलोन बेटातल्या शेतकऱ्यालाही माहित झालेली आहे, असें मला आढळून आलें यावरून ज्या बाबीचे महत्त्व आम्हा लोकास वाटतें, त्या बाबीत आम्ही फार चौकसही आहो असें दिसून येईल आमच्या दृष्टीने अत्यत महत्त्वाची बाब म्हटली म्हणजे धर्म हीच. आमच्या साऱ्या जीविताचा हा एकच हेतु आहे. हा हेतु बदलणे शक्य नाही, अथवा तो समूळ नष्ट करणे हेंही शक्य नाहीं. याच्या जागी दुसरा एखादा हेतु निर्माण करणे ही गोष्टही

सर्वथा अशक्य आहे. एखादा जुनाट वृक्ष उपटून तो दुसऱ्या जागीं लावणें जसें अगदी अशक्य आहे, तसेंच हिंदुकुलाचा जीवनहेतु बदलणें ही गोष्ट अगदीं अशक्य आहे. आज हजारों वर्षें आमचें मन या एकाच गोष्टींत गुतून राहिलें आहे. हें बरें झालें कीं वाईट झालें हा प्रश्न वेगळा, पण वस्तुस्थिति तशी आहे हें मात्र खोटे नाही कित्येक शतकें हिंदुस्थानांतील वातावरण याच विचाराच्या लाटानीं भरून गेलें आहे. या एकाच जातीच्या वातावरणात आज हजारो वर्षें आम्ही श्वासोच्छ्वास करीत आलो आहो या एकाच ओघाच्या गतीबरोबर आम्ही आज हजारों वर्षें वाहवत आलों आहों. या ओघाची गति एकदम बदलावयाची म्हटलें तर ते शक्य तरी आहे काय ? आज हजारो वर्षें ही एकच गोष्ट आमच्या हाडींमासीं खिळून बसली आहे आमच्या अंगातील रक्ताच्या अभिसरणाबरोबर या एकाच गोष्टीचें अभिसरण होत आहे. यामुळें आमचे सारें जीवित या एकाच गोष्टीवर अवलंबून आहे हें उघड आहे अशा रीतीचा हा ओघ एकदम बदलला तर उलट दिशेने त्याची प्रतिक्रिया केवढी होईल, याचा विचार करा. गंगा नदीनें आपला ओघ बदलून हिमालयातील आपल्या मूळस्थानास परत जावे आणि नव्या दिशेनें पुन्हा वाहू लागावें अशी तुमची इच्छा आहे काय ? कदाचित् ही अघटित घटनाही एक वेळ घडून येईल, पण हिंदुलोक धर्मपराङ्मुख होतील हें मात्र शक्यतेच्या कोटीपलीकडचें आहे कोणतीही गोष्ट करताना तीत तत्वाचे मूळ उपस्थित होऊं द्यावयाचें नाहीं, हा सामान्य नियम आहे असें म्हणावयास हरकत नाही. जी गोष्ट करताना तटेबखेडे अधिक, त्या गोष्टीची सिद्धिही त्याच मानानें लांबणीवर पडणार, हेही उघड आहे. याकरितां ज्या मार्गांत कांटेखळगे कमी, तोच मार्ग स्वीकारणें इष्ट आहे, आणि असा मार्ग म्हटला म्हणजे धर्माचा मार्ग हाच होय. हिंदुस्थानाला हाच मार्ग मोकळा आहे. हाच मार्ग आमच्या जीवितहेतूला धरून आहे, आणि हाच मार्ग आमच्या उन्नतीला आणि सुखासमाधानाला पोषकही आहे. इतर देशात आयुष्यक्रमाच्या अनेक बाबींपैकीं धर्म ही एक बाब आहे, इतकेंच समजलें जाते. उदाहरणार्थ, आपल्या खास खोलींत एखादें मोठे चिनी काचपात्र असावें, अशी इच्छा मेमसाहेबांस झाली, तर कितीही खटपट करून ते मिळविलेंच पाहिजे, असा तिकडील लोकांचा समज आहे, कारण त्या पात्रावांचून राहणें

म्हणजे जीविताच्या एका जरूरीच्या भागाचाच त्याग करणें आहे असें त्यांस वाटतें, याकरितां तें मिळविलेंच पाहिजे. याच रीतीनें अनेक उपाधी त्यांच्या आयुष्यक्रमाच्या घटकरूप होऊन बसल्या आहेत; आणि यांचपैकीं धर्मालाही एक स्थान देण्यांत आलें आहे. त्यांच्या दृष्टीनें धर्म ही मानवी आयुष्य-क्रमांतील विशेष महत्त्वाची बाब नसून इतर सामान्य बाबींपैकींच ती एक आहे. यामुळें पाश्चात्य देशांत धर्माला विशेषसा मान नाहीं.

त्यांची परमेश्वराबद्दलची कल्पनाही सामान्यत याच तत्त्वाला धरून आहे. पृथ्वीवर मनुष्याच्या सुखाला साधनीभूत असे पदार्थ निर्माण करणें आणि त्यांची नीटनेटकी व्यवस्था लावणें इतकीच काय ती परमेश्वराची कामगिरी आहे असे त्यांस वाटतें. या जगांत नाना प्रकारच्या चैनी भोगता न आल्या तर परमेश्वराचें आणि धर्माचें अस्तित्व संपलें असें त्यास वाटतें. गेलीं शंदोनशें वर्षें आपणही अशाच प्रकारच्या गोष्टी वारंवार ऐकत आलों आहों आपणास हिंदु-धर्माचें सागोपांग ज्ञान आहे अशी ऐट मिरविणारे लोकसुद्धा आमच्या धर्मा-संबधीं एक आक्षेप वारवार पुढें आणीत असतात. हिंदु धर्म हा ऐहिक सुखाला पोषक नाहीं असा त्यांचा आक्षेप आहे. याशिवाय आणखीही कित्येक अपराध हे लोक हिंदु धर्माच्या माथीं मारीत असतात. हिदु धर्म द्रव्यसाधनाचा काहीं मार्ग दाखवीत नाहीं. दुसऱ्याची सपत्ति आपली कशी म्हणावी हेंही तो शिकवीत नाहीं दुर्बळाच्या डोक्यावर पाय देऊन आपण नारळ कसा मिळवावा हे तो सागत नाहीं. दुसऱ्याच्या निढळाच्या घामाचा पैसा आपल्या खिशात कसा उतरवावा हेंही तो सागत नाहीं होय. हे सारे आक्षेप आम्ही अक्षरशः कबूल करतों, आमच्या धर्मांत हें सामर्थ्य नाहीं हें आम्हास पूर्णपणें कबूल आहे ज्याच्या पादाघातानें ही सारी भूमि दणाणून जाईल, गावेच्या गांवें बेचिराख होतील व मानवकुलें समूळ नाश पावतील, असे धर्मवेडे निर्माण करण्याचें सामर्थ्यही आमच्या धर्मांत नाहीं असल्या या दुर्बळ धर्मात काय तात्पर्य असणार आहे ? हा धर्म मनगटात अधिक बळसुद्धा निर्माण करीत नाहीं; असला हा नेभळा धर्म काय कामाचा ? यावर आम्ही इतकेंच म्हणतों कीं आमचा धर्म ऐहिकाच्या मागें लागत नाहीं हीच त्याची थोरवी आहे. विद्युज्जिव्हेप्रमाणें क्षणमात्र चमकून नष्ट होणाऱ्या या जगाच्या मागें आमचा धर्म पळत सुटत नाहीं, हाच त्याचा विशेष होय.

या जगांतील क्षणभंगुर सुखें शक्य तितक्या मोठ्या प्रमाणावर आणि शक्य त्या रीतीनें भोगणें हेंच मानवी जीविताचें अंतिम साध्य आहे, असे हिंदु धर्मास वाटत नाहीं. याकरिताच आमचा धर्म हा मिथ्याधर्म नसून सत्यधर्म आहे असें आम्ही म्हणतों. या जगाच्या डबक्याच्या मर्यादेनें आमचा धर्म मर्यादित होत नाहीं. बिंदुमात्र जगातच घिरट्या घालण्याइतका आमचा धर्म बिंदुवत् नाहींच नाहीं आमच्या धर्माची दृष्टि या जगापलीकडे आणि त्याही पलीकडे पोहोंचते इंद्रियगम्य जगापलीकडे, स्थलापलीकडे आणि कालाच्याही पलीकडे त्याची दृष्टि पोहोचते आमच्या धर्माच्या अंतिम मर्यादे-पर्यंत जाऊन आम्ही उभे राहिलों म्हणजे हे जगच काय, पण हें सारें दृश्य विश्व केवळ बिंदुवत् भासू लागतें. आमच्या धर्माची दृष्टि इतक्या अंतरावर पोहोंचलेली आहे. ज्या ठिकाणीं जीवात्म्याचे सर्व दैदीप्यमान वैभव दृग्गोचर झाल्यावर विश्वाचें अस्तित्वही लक्षात येत नाहीं, तेथे आम्हास पोहोचविणे हा आमच्याच धर्मांचा अधिकार आहे, आणि याचकरिता आमचा धर्म हा सत्यधर्म आहे परमेश्वर हीच काय ती सत्य वस्तु असून बाकी सर्व मिथ्या आहे–आभासमात्र आहे–असें आमचा धर्म शिकवितो, म्हणूनच तो सत्य धर्म आहे हें जग मिथ्या आणि क्षणभंगुर आहे, सोनें आणि माती ही सारख्याच योग्यतेचीं आहेत, केवढे मोठें मानवी सामर्थ्य का असेना पण ते मर्यादित आहे, आणि मानवी जीवित हे केवळ दुःखाचे आगर मात्र आहे, असे आमचा धर्म शिकवितो, म्हणूनच तो सत्य धर्म आहे. ' त्यागेनैकेनामृतत्त्वमानशुः । ' असें आमचा धर्म शिकवितो, म्हणूनच तो सत्य धर्म आहे. आमचा धर्म कित्येक युगाच्या अनुभवाने ज्ञानवृद्ध झालेला आहे. इतर धर्म हे त्याचीं नातवंडेंही शोभावयाचीं नाहींत पुरातन ऋषीच्या मुखानें हा सनातन धर्म या अलीकडच्या बालपंडितास कठरवानें काय सांगत आहे पहाः–"बाळांनो तुम्ही इंद्रियजन्य सुखाचे गुलाम आहां, इंद्रिये कितीही विशाल झाली तरी त्यास मर्यादा आहे. इंद्रियाच्या मागें लागून अखेर विनाशाशिवाय दुसरें कांहींसुद्धा पदरी पडावयाचे नाहीं. हीं इंद्रियें आज सुखाची साधने वाटतात, पण हींच अखेरीस घात केल्याशिवाय राहावयाचीं नाहींत, याचा त्याग करा, खरा धर्ममार्ग हाच." इंद्रियजन्य सुखें भोगून अखेर कधींही साधणार नाहीं, केवळ त्यागानेंच अखेरचा मुक्काम गांठता येईल. मानवजातीच्या ज्ञात

इतिहासाकडे पाहतां एक चमत्कारिक गोष्ट आपल्या लक्षांत येते. अनेक मोठीं राष्ट्रे या भूतलावर आजवर अवतीर्ण झालीं आणि क्षणमात्र चमकून व धामधूम करून नामशेष झालीं, पण कालाच्या अनत समुद्रावर त्यांची एखादी रेषाही त्याच्या अस्तित्वाची साक्ष देण्यास जिवत राहिलेली नाहीं आमचें राष्ट्र मात्र काळाचे प्रचड तडाखे खाऊनही आजमितीस अस्तित्वात आहे, हा खरोखर चमत्कार नव्हे काय ? आमचें राष्ट्र जणू काय अजरामर आहे असेच वाटतें ! 'जो जगण्यास योग्य असतो तोच जगतो' (Survival of the fittest ) अशी एक अर्वाचीन शास्त्रांतील कोटी आहे ही उपपत्ति खरी असेल, तर पूर्वीच्या जुनाट राष्ट्रांपैकीं एखादें तरी आजपर्यंत जगावयास हवें होते, एवढेंच नव्हे तर मोठ्या भरभराटीतही असावयास पाहिजे होते, आणि आमच्या दुबळया हिंदूचें राष्ट्र काळाच्या पोटांत जमा व्हावयास पाहिजे होते. आमच्या राष्ट्रानें दुसऱ्या कोणत्याही राष्ट्रावर स्वारी करून त्यास जिकलें नाही, इतके तर तें बलाढ्य ! याकरिता एव्हांना ते नामशेष व्हावयास पाहिजे होतें एकदा एक इग्रज स्त्री मला म्हणाली, " तुम्ही हिंदु लोकानी या जगात येऊन केलें तरी काय ? तुम्हीं एकही देश पादाक्रात केला नाहीं " ही गोष्ट अगदीं खरी आहे, पण आम्ही इतके दुर्बळ असताही आजवर जगलों कसे ? एवढया मोठ्या कालावधीच्या अखेरीस पाहता, तीस कोटी लोक अद्यापि कायमच आहेत, हा केवढा चमत्कार ! बरें, हिंदु लोक निवळ मृत्पिंड आहेत, असेंही म्हणतां यावयाचे नाही. हिंदुराष्ट्रास धनुर्वात झाला आहे असे कोणी म्हणतात, पण तेही खरें नाही. अद्यापि काही जिवटपणा आमच्या अगीं आहे हे खास, आणि आमच्या जिवटपणाची गरज जगाला लागते, तेव्हां तो प्रत्यक्ष रूपाने साऱ्या जगभर वावरतो, हेंही खरे आहे अनत कालापासून एका विशिष्ट गोष्टीबद्दल साऱ्या जगाशी आमचा तटा लागला आहेसें दिसते ' भोग कीं त्याग ' असा प्रश्न कित्येक शतकापासून जगाला आम्ही विचारीत आहो. पाश्चात्य देशात या प्रश्नाचें उत्तर ' भोग ' या शब्दानें सध्या मिळत आहे. मनुष्याला चैनीच्या वस्तूचा केवढा मोठा सग्रह करणें शक्य आहे, या प्रश्नाला पाश्चात्य राष्ट्रें सध्या उत्तर शोधीत आहेत. आमची गोष्ट याच्या अगदीं उलट आहे. किती थोड्या वस्तूनीं मनुष्याच्या गरजा भागतील हें आम्ही पहात आहों. या दोन परस्परविरोधी

दिशा आहेत आणि आणखी काहीं शतकें हा विरोध असाच चालावयाचा आहे, पण इतिहासाचे कथन सत्य असेल आणि भविष्यें कधीं तरी खरीं ठरत असतील, तर ' अल्पसंतोषी मनुष्यांचाच अखेर जय होईल, ' हे भविष्यही खरें ठरलें पाहिजे. स्वत च्या गरजा अत्यत कमी प्रमाणावर आणून ठेवून इद्रियनिग्रह करणारा मनुष्यच या महायुद्धात अखेर जय मिळवील उलट पक्षीं जे कोणी इद्रियजन्य सुखसाधनाच्या मागे एकसारखे धावत सुटले असतील, त्याचा अखेर निःपात होईल हेही निश्चित आहे. चालू क्षणीं भोगी लोक केवढेही बलाढय आणि कितीही जिवट दिसत असले, तरी इद्रियांच्या मागें लागल्यामुळें त्याचा टिकाव अखेरपर्यंत कधींही लागणार नाही. प्रत्येक मनुष्याच्या आयुष्यात एक काळ कसा येऊन जातो कीं त्या वेळीं त्याला ऐहिक वस्तूंची गोडी उरत नाहीं ज्याप्रमाणे एका मनुष्याच्या आयुष्यात असा काळ येतो, त्याचप्रमाणें प्रत्येक राष्ट्राच्या आयुष्यक्रमातही असा एक काळ येत असतो. पाश्चात्य राष्ट्रांत असा काळ सध्या येऊ लागला आहेसें दिसते चित्ताला सर्वथा शाति देण्याचें सामर्थ्य असलेली ऐहिक वस्तु जगतात नाही. असें तिकडे कित्येकास वाटू लागलें आहे अशा प्रकारच्या अनुभवात आरभी बराच कडूपणा असतो. ज्या ऐहिक वस्तूच्या सगतींत सुख भोगलें, त्याचा वीट आला म्हणजे चित्तास जो विषाद उत्पन्न होतो, तो किती कडू असतो ! पाश्चात्य देशात जे कित्येक ज्ञानी पुरुष आज हयात आहेत, त्यास असा अनुभव आजच येऊ लागला आहे. सत्ता आणि सपत्ति याच्या मागें हात धुऊन लागण्यात अखेर तात्पर्य काहीं नाहीं हे त्यांस कळू लागलें आहे. हे सारें मृगजल आहे अशी त्यांची खात्री होऊ लागली आहे सध्याच्या पाश्चात्यांच्या वणिग्वृत्तीचा ज्याना पुरा कंटाळा आला आहे आणि चालू अहमहमिका ज्यास त्रासदायक वाटत आहे अशीं अनेक स्त्रीपुरुषे तिकडे आज आढळू लागली आहेत. चालू घटनेंत कोठें तरी मोठें व्यग आहे अशी त्याची खात्री झाल्यामुळे, याहून उच्चतर अशी स्थिति प्राप्त करून घेण्यास एखादा मार्ग आहे कीं काय, याचा शोध तीं करीत आहेत. सध्या जीं अनेक व्यंगें युरोपीय समाजास गांजीत आहेत, त्याचा उपशम करण्यास राजकीय व सामाजिक उपाय पुरे पडतील, असे समजणारे लोकही तिकडे अद्यापि पुष्कळ आहेत हें खरें; तथापि तेथील विचारी मनुष्यात मात्र पूर्वोक्त स्त्रीपुरुषांचा

वर्ग वाढत्या प्रमाणावर दिसू लागला आहे. मानवी आयुष्यक्रमांत जी अनेक प्रकारचीं संकटे उद्भवत असतात, त्याचे निवारण केवढयाही मोठ्या राजकीय अगर सामाजिक चळवळीनें होणें शक्य नाहीं, हे त्यांस कळून आले आहे. मानवी जीवात्म्याचे सध्या जे घटक आहेत, त्यात बदल होऊन त्यांचे स्वरूप अधिक उच्च झाल्याशिवाय चालू सकटांस आळा पडणार नाही एखाद्या मानवकुलाची जी काहीं मानसिक स्थिति असेल, तिच्यांत बदल करावयाचा म्हटलें, तर केवळ जबरीनें अथवा कायद्याच्या आसुडानें ही गोष्ट होणें शक्य नाहीं मनोवृत्तीचा ओघ एका दिशेकडून दुसरीकडे वळविण्याचे सामर्थ्य फक्त धार्मिक जीवनांत मात्र आहे. एखाद्या मानवकुलाची वृत्ति अधोगामी आहे असे आढळून आल्यास, तिला ऊर्ध्वगामी करावयाचे म्हटलें तर ती गोष्ट धार्मिक आणि नैतिक शिक्षणानें मात्र साध्य होईल. सध्याचीं पाश्चात्य मानवकुलें नव्या विचाराच्या आणि नव्या तत्त्वज्ञानाच्या शोधांत आहेत. पाश्चात्य राष्ट्रें आपणांस ख्रिस्ती धर्मानुयायी म्हणवितात, हें आपणांस ठाऊक आहेच सात्त्विक-दृष्टया ख्रिस्ती धर्म पुष्कळ बाबतींत फार उच्च प्रकारचा आहे यात शका नाहीं, पण त्यांतील पुरे रहस्य तिकडे फारसे आकलन झालेले नाहीं. त्यास केवळ अर्धे कच्चें रहस्य मात्र समजलें आहे, आणि जे काही त्यास समजलें आहे, तेवढे त्याच्या मानसिक गरजा भागविण्यास अपुरे आहे. आमच्या प्राचीन तत्त्वज्ञानांत आणि विशेषत वेदान्तज्ञानांत त्यास तृप्त करणारे रहस्य भरपूर आहे, अशी तिकडील विचारी लोकाची खात्री होत चालली आहे. ज्या ज्ञानजलाच्या पानासाठीं ते अत्यत आतुर झाले आहेत, त्याचा जिवत झरा आम्हांपाशीं आहे. त्याची क्षुधा शमविण्याचें साधन आर्यावर्तांत आहे.

जगात जितके धर्म आज अस्तित्वांत आहेत, त्यांपैकीं प्रत्येकात कांहींना कांही विलक्षण सामर्थ्य आहे, असें अनेकवार माझ्या ऐकण्यांत आलें आहे. 'आमच्या धर्मात काहीं विलक्षण सामर्थ्य आहे' असे सागणारा प्रत्येक धर्माचा एखाददुसरा पुरस्कर्ता असतोच ख्रिस्ती धर्माचा पुरस्कार करणारे डॉ. बॅरोज याच्या मतें ख्रिस्ती धर्म हाच काय तो विश्वव्यापी धर्म आहे. सर्व जगाला अनुसरण्याला योग्य असा एखादा धर्म असेल, तर तो ख्रिस्ती धर्मच आहे असे त्याचें म्हणणें आहे. वेदान्त हाच विश्वव्यापी धर्म होऊं

शकेल असे माझें मत आहे. या माझ्या म्हणण्याचें समर्थन कोणत्या मुद्या-वर करतां येतें, याचा थोडासा विचार आपण करू. सर्व मानव जातीला एकच धर्म ग्राह्य होण्यासारखा असेल, तर तो वेदान्तावांचून अन्य कोणताही धर्म असू शकणार नाहीं असें मला वाटते. इतर कोणत्याही धर्माच्या अंगीं तशा प्रकारची पात्रता आहे, असें मला वाटत नाहीं. हिंदु धर्माशिवाय बाकीचे जे धर्म आज अस्तित्वात आहेत, त्यांच्यासंबंधीं एक विशेष गोष्ट आढळून येते. ती ही कीं, ते सर्व एकएका विशिष्ट व्यक्तीच्या चरित्राशीं निगडित झालेले आहेत त्या धर्मांचे आद्यप्रवर्तक आणि त्यानीं चालू केलेले धर्म यांचा अभेद्य संबंध पडलेला आहे त्या धर्मांतील उपपत्ति, त्यातील तत्त्वमीमांसा त्यांतील मतें आणि त्यांतील नीतिमार्ग या सर्वांचा अत्यत निकट संबध त्या त्या व्यक्तिविशेषाशीं जोडला गेला आहे. त्या धर्मांना जो काहीं विशेष अधिकार आज प्राप्त झालेला दिसतो, तो त्या व्यक्तिविशेषापासूनच उद्भव-लेला आहे. त्यातील साऱ्या सामर्थ्याचे मूळ तो व्यक्तिविशेषच आहे. व्यक्तिविशेष हा पायाच्या जागीं असून बाकीची अंगें इमारतीच्या वरील अंगांसारखी आहेत. यामुळें त्या व्यक्तिविशेषाच्या अस्तित्वावरच जर घाला पडला, तर त्या धर्मांची इमारतही आपोआपच कोसळणार नाहीं काय ? अमक्या धर्माचा अमुक प्रवर्तक अस्तित्वांतच नव्हता असे सप्रमाण सिद्ध करता आलें, तर बाकीच्या धर्मांचे महत्त्व आपोआपच लयास जाणार हें उघड आहे. सध्याच्या काळीं अशा प्रकारच्या खटपटी सुरू असल्याचे आपण पाहतोंच. या आद्यप्रवर्तकाच्या चरित्रात ज्या कथा नमूद करण्यात आल्या आहेत, त्यांपैकीं निम्म्याशिम्म्या गोष्टीवरील पुष्कळांचा भरवसा उडून गेला आहे. अशा रीतीनें आद्यप्रवर्तकाचीच वासलात लागल्यावर बाकीच्या इमारतीचें काय होईल, हें सांगावयास नकोच. वृक्षाचें मूळ उपटलें म्हणजे फांद्या आपोआपच निर्जीव होणार हें उघड आहे आपल्या सनातन धर्माशिवाय बाकीचे सर्व धर्म ऐतिहासिक व्यक्तींवरच उभारले गेले आहेत. आमचा धर्म केवळ त्रिकालाबाधित तत्त्वांवर उभारला गेला आहे. अमक्या एका व्यक्तीनें वेदांची रचना केली आहे असे नाहीं. कालस्थलातीत तत्त्वे वेदांत एकत्र ग्रथित झालीं आहेत. तीं तत्त्वें ऋषींनीं उत्पन्न केलीं नसून तीं त्यानीं निदर्शनास आणलीं. ऋषी हे मन्त्रकर्ते नसून मंत्रद्रष्टे होते. वेदांत मधून मधून या मंत्र-

द्रष्टया ऋषींची नांवें आढळतात; पण नुसत्या नामनिर्देशापलीकडे त्यांजबद्दल अधिक कांहीं आढळून येत नाहीं. त्यांचे वाडवडील कोण होते आणि हे ऋषी स्वतः कशा प्रकारचे होते, याबद्दल कसल्याच प्रकारचा उल्लेख आढळून येत नाहीं त्याचा जन्म कधीं आणि कोठें झाला हे कोणीं सांगितलेलें नाहीं; पण असल्या गोष्टींकडे लक्ष्य देण्याइतका हा ऋषिवर्ग क्षुद्र नव्हता. त्यांना नांवाची काय पर्वा होती ? तत्त्वदर्शन करणें इतकेंच त्याचें कार्य होते. त्याच्या स्वत च्या चरित्रासंबधीं इतकेंच म्हणतां येईल कीं, या तत्त्वांचे मूर्तिमत रूप स्वतःच्या ठायीं प्रकट व्हावें इतकीच खटपट ते करीत होते ईश्वराचे स्वरूप ज्याप्रमाणें साकार असूनहि निराकार आहे, त्याचप्रमाणें आमचा धर्महि केवलरूप आहे. तो तत्त्वविशिष्ट धर्म आहे, व्यक्तिविशिष्ट नाहीं, पण तो तत्त्वविशिष्ट धर्म असला तरी व्यक्तीला त्यात अवकाशच नाही असे नाहीं, हेंही लक्षात ठेवण्यासारखें आहे. त्यांतही पूजनीय व्यक्ती निर्माण झाल्या आहेत आमच्या धर्मांत अनेक अवतार, अनेक गुरूची परंपरा आणि अनेक महात्मे याचा सग्रह एवढा मोठा आहे की, जगात त्यास दुसऱ्या कोणत्याही धर्मांत तोड सापडणार नाही. धर्मतत्त्वाच्या जणु प्रत्यक्ष मूर्तीच अशा अनेक व्यक्ती पूर्वी होऊन गेल्या आणि पुढेही होणार आहेत. 'माझे अवतार असख्य आहेत' असे भगवान् श्रीकृष्णानी गीतेत सांगितलें आहे. या अनेक अवतारापैकीं आणि प्रसिद्ध व्यक्तींपैकीं एक अथवा अनेक व्यक्ती झाल्याच नाहींत असें प्रसगवशात् उद्या सिद्ध झाले, तरी त्यामुळें आमच्या धर्मांत कोणत्याही प्रकारची उणीव येण्याचे कारण नाही. अशा स्थितींतही आमचा धर्म पूर्वीप्रमाणेंच अभेद्य राहील. याचें कारण इतकेच कीं आमच्या धर्माचा अभेद्य सबध व्यक्तींशीं नसून तत्त्वाशीं आहे यामुळे तत्त्वे अभेद्य असेपर्यंत धर्मही अभेद्य राहणारच कोणत्याही एकाच व्यक्तीभोवती साऱ्या जगास जमा करण्याचा यत्न करणें सर्वथा फुकट आहे. त्याचप्रमाणे अनत आणि विश्वव्यापी तत्त्वाची ओळख सर्वांस करून देणे हेही अशक्य आहे. जगातील अनेक प्रकारच्या व्यक्तींस एकाच धर्माकडे वळविणें कधीं काळी शक्य व्हावयाचें असेल, तर विश्वव्यापी तत्त्वेंच ती गोष्ट करू शकतील. अशा प्रकारचें एकीकरण व्यक्ती केव्हांही करूं शकणार नाहींत. अधिकारपरत्वे व्यक्तींचें वजन समाजावर असतें ही गोष्ट खरी; तथापि अनेकाचें एकीकरण व्यक्ती

करू शकत नाहींत त्या त्या कालापुरतें आणि आजूबाजूच्या स्थलापुरतें अधिकारी व्यक्तींचें वजन पडू शकतें. अशा प्रकारच्या अनेक व्यक्ती आणि अवतार आमच्या धर्मात पूर्वी होऊन गेले आहेत, हें मीं नुकतेंच सांगितलें आहे. आमच्या धर्मात 'इष्ट' हें एक मोठे सुंदर तत्त्व ग्रथित झालें आहे यामुळें अनेक अवतारापैकीं अथवा देवदेवतापैकीं आपणास इष्ट असेल अशी देवता शोधून काढण्यास अवसर सांपडतो आपणास इष्ट असेल अशा देवतेचें आराधन करणे व त्या देवतेची आपल्या प्रमुख मार्गदर्शकाच्या जागीं योजना करणें प्रत्येकास सुलभ होते आपली देवता ही सर्व विश्वाची अधिष्ठात्री आहे व सर्व देवतात श्रेष्ठ आहे, अशी पूजकाची भावना झाली तर तशा प्रकारची भावना करून घेण्यास आमच्या शास्त्राची मुळींच आडकाठी नाहीं पण हें करीत असता मूळ विश्वव्यापी तत्त्वाची ओळख मात्र विसरावयाची नाहीं, हें लक्ष्यात ठेविलें पाहिजे. आमच्या अवतारवादासंबंधी एक मुद्दा विशेष लक्ष्यात ठेवण्यासारखा आहे, तो हा की, श्रुतिसिद्धांताचें व्यवहार्यरूप काय असावें, हे समजावून घेण्यापुरताच आम्ही अवताराचा उपयोग आजपर्यंत केला आहे. श्रुतिसिद्धांताचें उद्घाटन करणे व वेदान्ततत्त्वाची सुसंगत मांडणी करणे, हे कार्य भगवान् श्रीकृष्णाच्या अवताराने केले आहे.

सारें जग कधीं काळीं एकधर्मी होणार असेल, तर तो धर्म वेदान्तधर्मच असला पाहिजे, असें म्हणण्याचें दुसरेही एक कारण आहे. जगात सध्याच्या काळीं जितके धर्म उपलब्ध आहेत, त्या सर्वांत ज्याच्या उपपत्ती हल्लींच्या भौतिक शास्त्राच्या तत्त्वाशीं जुळतात, असा धर्म म्हटला म्हणजे वेदान्त हा एकच होय. स्थूल जगाचा शोध करून जो निर्णय अर्वाचीन भौतिक शास्त्रांनीं ठरविला आहे, तोच निर्णय सूक्ष्म जगाचें अवलोकन करून वेदान्तानेंही ठरविला आहे अत्यंत प्राचीन काळचा इतिहास पाहता समावस्थेतल्या व एकाच प्रकारच्या विचारानीं युक्त अशा दोन मन शक्ती दोन निरनिराळ्या मार्गांनीं प्रवृत्त झाल्याचें आढळून येईल. या दोन मन शक्ती ग्रीक आणि हिंदु या होत. हिंदु मन शक्ति सूक्ष्म जगाचे अवलोकन करूं लागली, आणि ग्रीक मन शक्ति स्थूल जगाच्या विवरणाच्या माग लागली या दोन मन शक्ती आपापल्या मार्गांनें जसजशा पुढे जाऊ लागल्या, तसतसा त्याच्यांत कांहीं भेदाचा आभास होऊं लागला ही गोष्ट खरी, तथापि त्याच्यांत साम्याचे भाग नव्हते असे

नाही. सत्य वस्तु ही स्थूल आणि सूक्ष्म या दोन्ही अवस्थांच्या पलीकडची आहे, व या सत्य वस्तूची पुसट पुसट कल्पना या दोन्ही मार्गस्थांस होत होती असें आढळून येईल. अर्वाचीन भौतिक शास्त्रांनीं स्थापिलेल्या सिद्धांतांची एकवाक्यता धर्मतत्त्वांशीं होणे शक्य असेल, तर ती फक्त वेदान्ततत्त्वांशींच होऊ शकेल. उलटपक्षी अर्वाचीन शास्त्रास अत्यत परिणतावस्था संपादन करून सूक्ष्म सृष्टीकडे प्रवेश करावयाचा असेल तर त्यांना वेदान्तमीमांसेची मदत घेतल्यावाचून गत्यंतर नाही. अर्वाचीन शास्त्रानीं जे कांहीं सिद्धात आज सिद्ध केले आहेत, तेच सिद्धात वेदान्तानें अति प्राचीनकाळीं सिद्ध केले आहेत, ही गोष्ट कोणाही चौकस मनुष्याच्या लक्षांत येण्यासारखी आहे. या दोहोंत जो काहीं फरक अथवा भेद आहे, तो फक्त भाषेपुरताच आहे ज्याप्रमाणें या भिन्न मार्गांत स्थूल व सूक्ष्म असा फरक आहे, त्याचप्रमाणे त्याच्या भाषेतही स्थूल व सूक्ष्म असा फरक आहे. आमच्या वेदान्ताकडे पाश्चात्यानी विशेष लक्ष का द्यावे, याचें हे दुसरें कारण आहे भौतिक शास्त्रें ज्याप्रमाणें शुद्ध विवेचक बुद्धीनें दाखविलेले सिद्धात मात्र मान्य करतात, त्याचप्रमाणे वेदान्तही विवेचक बुद्धीच्या मार्गानें जाऊनच आपलें म्हणणें सिद्ध करतो. वेदान्ताचे सिद्धात विवेचक बुद्धीस अत्यत धरून असतात, ही गोष्ट काहीं अर्वाचीन शास्त्रविशारदांनी मजपाशी प्रत्यक्ष कबूल केली आहे. आपल्या रसशाळेंतून जो सहसा कधींही बाहेर पडावयाचा नाही, आणि जेवणासाठीं खर्च झालेला वेळही ज्याला अनाठायीं गेल्यासारखे वाटावयाचें, असा एक पाश्चात्य पडित माझी व्याख्यानें ऐकावयास तासाचे तास बसत असे, हे मीं प्रत्यक्ष पाहिलें आहे याचें कारण आमची पद्धति ततोतत अर्वाचीन शास्त्रीय पद्धतीशीं जुळते, असे या पडितांनीं स्वत च मला सागितले. हल्लीच्या जड शास्त्रांस जें काहीं सिद्ध करावयाची हांव आहे, तेच तुमच्या वेदान्तानें सागितले आहे, असे ते म्हणाले

तुलनात्मक पद्धतीनें सर्व धर्मांचा अभ्यास करून जे काहीं सिद्धात ठरले आहेत, त्यापैकी दोहोचा निर्देश करणें अगत्याचें आहे. सर्व धर्मांचें विश्वव्यापित्व हा एक व अखिल वस्तुजातांचें एकत्व हा दुसरा असे दोन महत्वाचे सिद्धात तुलनात्मक धर्माभ्यासाने ठरविले आहेत. प्राचीन काळच्या यहुदी व बाबिलोनियन धर्मांचा शोध करता, त्यांत एक गोष्ट विशेषेकरून आढळण्यात येते.

या दोन मानवशाखांत अनेक पोटशाखाचा विस्तार होता, व प्रत्येक शाखेची एक एक स्वतत्र अधिष्ठात्री देवता होती किंत्येक वेळा या अनेक पोटशाखापैकीं कित्येकांच्या देवतांचीं नांवेही एकच होती बाबिलोनियन देवतास बाल्स ( Baals ) हें एकच नाव होते; आणि या बाल्स देवतापैकी प्रमुख देवाला बाल मेरोडाक (Baul Merodac) असे नाव होते कित्येक वेळा एखादी शाखा दुसऱ्या काहीं शाखास पादाक्रांत करून त्याजवर आपलें वर्चस्व स्थापीत असे अशा वेळी या जिंकलेल्या शाखाचे व जेत्याचें एकीकरण होऊन जेत्याचा जो प्रमुख देव असे, तोच जिताचाही देव होऊन बसे. अशाच रीतीनें एकेश्वरत्वाच्या कल्पनेचा उदय आरभीं झाला आहे. यहुदी देवतास मोलॉक ( Moloch ) असे नाव होते, हा देव आरभीं इस्राएल शाखेचा मुख्य देव होता यालाच मोलॉक यावा ( Moloch Yava ) असेही नाव होते. पुढे काही काळानें इस्राएल शाखेनें आपल्या कुलातील दुसऱ्या कित्येक शाखांचा पाडाव केला, आणि त्याच्या मोलॉक देवतास नाहीसे करून आपल्या मोलॉक देवाची प्रमुख जागी स्थापना केली. अशा रीतीने या एकेश्वरी कल्पनेचा उदय होत असतां, केवढा मोठा रक्तपात झाला व कशा प्रकारची अमानुष कृत्यें झाली, हें आपणापैकीं कित्येकास माहीत असेलच. अशाच प्रकारच्या गोष्टी हिंदुस्थानच्या सरहद्दीवरही घडल्या असाव्या, असा माझा तर्क आहे. स्वताच्या देवतेची स्थापना मुख्य देवाच्या जागी करण्यासाठीं आर्यकुलातील शास्त्रातही अशाच प्रकारच्या मारामाऱ्या झाल्या असाव्या, परतु यहुदी लोकांची जी दशा झाली तशी आर्यांची व्हावयाची नव्हती, यामुळे त्याच्या भाडणास काहीं निराळेंच वळण मिळाले. आर्यावर्तांत परमतसहिष्णुता आरंभापासूनच आढळून येते. त्याचप्रमाणें सूक्ष्म सृष्टीचा सगतवार अभ्यासही याच भूमींत आढळून येतो यामुळें आर्यशाखांतील भाडणें यहुद्याप्रमाणें विकोपास गेलीं नाहीत. कारण त्या प्राचीनकाळच्या ऋषिवर्यांतूनच एक महर्षी उत्पन्न झाला. हा काळ केव्हाचा होता, याचा शोध अद्यापि इतिहासानें लाविलेला नाहीं, एवढेंच नव्हे तर तेव्हाच्या कांहीं दतकथाही उपलब्ध नाहींत. इतक्या प्राचीन काळीही एका महर्षीनीं एक सूत्र उच्च घोषानें कथन केलें 'एकं सद्विप्रा बहुधा वदंति।' जें काहीं आहे तें एकच असून पंडित त्याला अनेक नावानीं ओळखतात अनतकालापासून आजतागाईत

जे काहीं महत्त्वाचे शोध लागले आहेत, त्या सर्वांच्या आघाडीस या सूत्राची योजना केली पाहिजे. हे अत्यत श्रेष्ठ दर्जाचें सत्यकथन आहे. हें सूत्र म्हणजे आर्यसंस्कृतीचा आधारस्तभच होय आमची सस्कृती अनेक शतकाच्या कालातून अनेक प्रकारच्या परिस्थितीशीं झगडत असता हें सूत्र दिवसेंदिवस अधिक खबीर होत गेलें. कालेंकरून त्याचा प्रवेश आमच्या रोमरोमांत झाला व त्याचें अभिसरण आमच्या प्रत्येक रक्तबिंदूबरोबर होऊ लागलें, व अखेरीस हें तत्त्व आमच्या जीविताशीं एकरूप होऊन बसलें आहे. आमच्या अनेक धार्मिक अगांत व उपागात हे सूत्र ग्रथित झालें आहे यामुळे आमची मातृभूमि ही परमतसहिष्णुतेचे एक आद्यस्थान होऊन बसली आहे. आमच्या धर्माचा उपहास करण्याचाच हेतु बाळगून जे धर्म येथें आले, त्याजकरिताही देवालयें बांधण्याचे कार्य आम्हीं केलें आहे. या सूत्राचा पाठ आम्हाकडून घेण्यासाठीं सारें जग आज शिष्यवृत्ति स्वीकारून बसलें आहे असहिष्णुतेनें साप्रतही जगात केवढे अनर्थ चालविले आहेत, याची आपणास कल्पनाही नाहीं. या असहिष्णुतेस या देहाचा बळी पडून त्यांतील अस्थि परक्या देशांत कोठेतरी पडतील कीं काय, असेही कित्येक वेळा माझ्या मनात येई !! धर्माच्या नावानें एखाद्या परधर्मीयाचा वध करणें हे कांहीं विशेष पापात्मक समजलें जात नाहीं पाश्चात्यांच्या सस्कृतीची बोल-बाला आज सर्वत्र होत आहे, पण त्याच देशात या गोष्टी प्रत्यहीं घडत आहेत. एखाद्या देशानें जो धर्ममार्ग स्वीकारला असेल, त्याच्याविरुद्ध कोणीं एखादा शब्दही उच्चारल्यास त्याजवर बहिष्कारास्त्राचा प्रयोग ताबडतोब व्हावयाचा आमच्या जातीचे जे काही निर्बंध आहेत, त्याजविरुद्ध वाक्पाडित्य करण्यास पुष्कळ पाश्चात्य पडितमन्याची जीभ लाब होत असते, पण आपण पाश्चात्य देशांत माझ्याप्रमाणेंच प्रवास केला, तर एक गमतीची गोष्ट आपणासही आढ-ळून येईल धार्मिक बाबींचा सागोपाग विचार करून त्यातील सत्यासत्याचा निर्णय ज्यानीं आपल्या मनाशीं ठरविला आहे, असे अनेक विद्वद्वर्य आपणास आढळून येतील परतु चारचौघासमक्ष आपल्या मताचे उद्घाटन करण्यास ह्याच पडिताची जीभ कचरते, याचें कारण इतकेंच कीं, तसें करून लोकापवाद सोसण्याची ताकद त्याच्या अगीं नाहीं !

यावरून ‘ एकं सद्विप्रा बहुधा वदंति । ’ या सूत्राच्या अध्ययनाची जगास किती गरज आहे, याचा खुलासा होईल. आजच्या सस्कृतीस या

मोठ्या आधारस्तभाची जोड अवश्य दिली पाहिजे. किंबहुना, या आधारस्त-भावाचून कोणत्याही प्रकारची संस्कृति फार काळ टिकाव धरू शकणार नाहीं, असेही म्हणावयास हरकत नाहीं. धर्मवेड व रक्तपात आणि इतर प्रकारचें अमानुषत्व याचे सर्वथा उच्चाटन झाल्यावाचून सस्कृतीचा वृक्ष कधींही वाढीस लागावयाचा नाहीं. इतराच्या दोषांकडे सानुकप दृष्टीनें पाहण्याची संवय आपणास लागेपर्यंत आपल्या सस्कृतीचें डोके वर निघावयाचे नाही, आणि ही सानुकप दृष्टि उत्पन्न होण्याकरिता इतर लोकांच्या धर्मसमजुती-सबधी सहिष्णुता ठेवणें, ही पहिली पायरी आहे. किंबहुना, नुसती सहिष्णुता ठेवण्यानेच आपलें सर्व काम भागत नसून उलट परधर्मीयास शक्य तो मदतही आपण केली पाहिजे असे माझें म्हणणे आहे. कोणाच्या धर्मसमजुती आप-णाहून कितीही भिन्न असल्या, तरी त्या आड येऊ न देतां इतरांशीं आपण सलोखा ठेवणे व प्रसगीं त्यास शक्य तो मदत करणें, हेच आपणास उचित आहे आपण हिंदुलोक आज याच पद्धतीने वागत आहो, हे मी आपणास नुकतेच सांगितलें आहे. ख्रिस्त्याकरिता देवळे ( Churches ) आणि मुसलमानाकरिता मशिदी बांधण्यात आम्ही हिंदुलोक आनदाने मदत करीत आहो. त्यानी आमचा कितीही द्वेष केला, ते आमच्याशी कितीही वाकडे वागले, त्याचे वर्तन कितीही क्रौर्याचे असलें अथवा जुलमी असलें आणि आमच्या धर्माविरुद्ध बोलताना त्यानी कितीही हलकट भाषा वापरली तरी आम्ही स्वत च्या ब्रीदास पारखे होणार नाही. त्याचे वर्तन गर्हणीय असलें तरी त्याना मदत करण्यास आमचा हात सदोदित पुढेच असेल, आणि हे असेंच असले पाहिजे. आम्हीं अशा रीतीनें वागणे हेंच इष्ट आहे. कोणी आमच्या वाटेत काटे पसरले, तर त्याच्या रस्त्यावर गुलाब पसरून आम्ही त्याचे प्रेम सपादन करू. साऱ्या जगाला एकाच सिद्धांताचें सोदाहरण स्पष्टीकरण आम्हास करावयाचे आहे. ‘जगात चिरकाल टिकणारी वस्तु म्हटली तर प्रेम हीच होय, द्वेष ही नव्हे,’ एवढाच धडा आम्हास जगाला शिकवावयाचा आहे सौजन्य हीच कायती एक टिकाऊ वस्तु आहे, आणि हीच अखेरपर्यंत टिकून अतीं शुभफलदायी होईल. हत्तीचें बळ आणि वाघाचें क्रौर्य ही चिरकाल टिकणारी नव्हत, हेंच पुन पुन्हां आम्हास जगास शिकवावयाचें आहे.

आता याहून आणखीही एका तत्त्वाची ओळख आम्हीं जगास करून दिली पाहिजे. हे तत्त्व युरोपीय पडितांसच सांगावयाचे आहे असें नाहीं;

किंबहुना आजच्या काळांत साऱ्या जगालाच त्याची जरूर भासू लागली आहे. आजची स्थिति इतकी कांहीं चमत्कारिक झाली आहे कीं या तत्त्वाची गरज शिकलेल्यापेक्षा अक्षरशत्रूसच अधिक आहे, सशक्तापेक्षा अशक्तासच त्याची आज अधिक गरज आहे. 'सर्वं खल्विदं ब्रह्म ।' हेंच ते तत्त्व होय. अर्वाचीन शास्त्रांची ज्यांस थोडीबहुत ओळख असेल, त्यास हे तत्त्व तेंव्हाच पटेल. अर्वाचीन भौतिक शास्त्रानीं प्रत्यक्ष प्रयोगानीं या तत्त्वाची सिद्धि कशी केली आहे, हें सुशिक्षितास तरी सागावयास नको. सर्व विश्व वस्तुतः एक-रूपच आहे हे आमचें म्हणणें अर्वाचीन शास्त्रानीं पूर्णपणें मान्य केलें आहे. जडवस्तूचा जो अखड सागर पसरला आहे, त्यातच तुम्ही, आम्ही, चद्र, सूर्य, झाडे इत्यादि लाटा उद्भवल्या आहेत, ही गोष्ट अर्वाचीनानी सिद्ध केली आहे समष्टि एकरूपच असून त्यात या बाह्यतः अनेक रूपें धारण करणाऱ्या व्यष्टी उद्भवल्या आहेत, ही गोष्ट आम्हीं सिद्ध केल्यास आज कित्येक शतके लोटून गेलीं आहेत! आता आमच्या वेदान्तापर्यंत पोहोंचण्यास फक्त एकच पायरी शिल्लक उरली आहे. ज्याप्रमाणें जड सृष्टि वस्तुत एकरूप आहे, त्याचप्रमाणें ज्या अधिष्ठानावर ही जडसृष्टि विराजमान झाली आहे, तें अधिष्ठानही एकच आहे ते अधिष्ठान म्हणजे आत्मा सर्वत्र एकच आत्मा भरून राहिला असून सारें अस्तित्व एकच आहे, हा सिद्धात बुद्धिद्वाराही मनात बिंबण्यास फार कठीण आहे. या साऱ्या दृश्य विश्वात अभेद आहे असें ऐकल्याबरोबर ज्याची गाळण उडते, असे लोक आमच्या देशातही कांहीं थोडेथोडके नाहीत. सध्याच्या काळींसुद्धा या मताला विरोध करणारेच अधिक आढळू लागले आहेत तथापि मी आपणास पुन पुन्हा बजावून सागतो कीं, साऱ्या जगाच्या बऱ्याकरिता जर एखाद्या वस्तूची आज जरूर असेल, तर ती हीच वस्तु होय आमच्या मातृभूमीच्या उद्धारार्थंही याच सिद्धाताची आज जरूर आहे. मूकवृत्ति स्वीकारून बसलेल्या आमच्या लक्षावधि बाधवांचा उद्धार होण्यास याच सिद्धांताच्या प्रत्यक्ष आचाराची जरूर आहे. या सिद्धाताला प्रत्यक्ष व्यावहारिक रूप दिल्यावाचून दुसऱ्या कोणत्याही उपायानें आमच्या मातृ-भूमीची उन्नति कोणी करू शकणार नाहीं पाश्चात्य देश बुद्धीच्या मार्गें लाग-लेले आहेत. कार्यकारणभाव समजल्यावाचून कोणत्याही गोष्टीची शहानिशा ते लावावयाचे नाहींत; कोणत्याही सिद्धांताचे सत्यत्व आपल्या विवेचकबुद्धीच्या

कसोटीवर सिद्ध केल्यावाचून ते ग्रहण करावयाचे नाहींत. तत्त्वज्ञान म्हणा, अथवा नीतिसिद्धात म्हणा, त्यांतील सत्यत्व प्रथम बुद्धिदृष्टया सिद्ध झालेंच पाहिजे, असा त्यांचा हट्ट आहे नीतिसिद्धातांचें सत्यत्व बुद्धीनें सिद्ध होण्यास नुसत्या नांवाचा पाठिंबा उपयोगी पडत नाही. 'अमुक प्रकारचे वर्तन ही नीति' असें एखाद्या महात्म्यानें म्हटलें तरी तेवढयामुळेंच त्याच्या वचनाला सिद्धा-ताची सत्यता प्राप्त होत नाहीं. अशीं वचनें सागणारा मनुष्य परमेश्वराचा अवतार असला तरी तेवढयामुळें बुद्धीचें समाधान होईल असें नाही. नीति-विषयक सिद्धात अमक्यानें सागितले म्हणून ते खरे, असे मानण्याकडे जगां-तील कोणाही तत्त्ववेत्त्याची आज प्रवृत्ति नाही. नीतिसिद्धातानाही त्रिकाला-बाधित सत्याचा पाठिंबा असल्यावांचून त्याची सत्यता ते मानावयाचे नाहींत. तुमच्या नीतिसिद्धांताच्या इमारतीचा पाया कालस्थलातीत तत्त्वावरच उभा-रला असला पाहिजे. असे कालस्थलातीत व सर्वतोपरी अबाधित सत्य म्हटलें म्हणजे तें सर्वत्र एकरूपच असलें पाहिजे. जें तुमच्यात आहे, माझ्यात आहे व सर्व विश्वांतही एकरूप आहे तेच त्रिकालाबाधित सत्य होऊ शकेल. आत्मा सर्वत्र एकरूप व अद्वितीय आहे, हाच सर्व नीतिसिद्धाताचा मूळ पाया आहे याकरिता तुमच्यात व माझ्यात केवळ बधुत्वाचाच सबध नसून तुम्ही व मी एकच आहों आमच्या तत्त्वज्ञानाचा मथितार्थ हाच आहे सर्व धर्मसिद्धातांचें व नीतिसिद्धातांचें बुद्धिद्वारा समर्थन करण्यास हाच मूल सिद्धात उपयोगी पडेल या सिद्धाताची गरज जितकी आज आम्हास आहे, तित-कीच ती युरोपियासहि आहे. इग्लड, जर्मनी, फ्रान्स इत्यादि युरोपीय देशात व अमेरिकेत ज्या राजकीय व सामाजिक खटपटी हल्लीं सुरू आहेत, त्याच्या मुळाशीं हेंच तत्त्व आहे त्याच्या लक्षांत ही गोष्ट जरी अद्यापि आली नसली, तरी त्यास न कळत हें तत्त्व त्याच्या चळवळीत अतर्भूत झालें आहे. मनुष्य-प्राणी स्वातत्र्यासाठीं धडपडत आहे. अनेक वेळा त्याची निराशा होण्याचा प्रसंग आला, तरी पुन:पुन्हा तो खटपट करीत असतोच. सर्व विश्वांत स्वातत्र्य पाहिजे असें त्याला वाटत असते; आणि ही त्याची आकाक्षा ज्या ज्या लेखाच्या अथवा ग्रथांच्या द्वारें व्यक्त होईल, त्या सर्व प्रकारच्या ग्रथात तुम्हांस वेदान्त-तत्त्वें अवश्यमेव आढळून येतील, हें माझें म्हणणें आपण आपल्या हृत्पटलावर पक्कें कोरून ठेवा., अशा, प्रकारच्या साहित्यांत वेदान्ततत्त्वास प्रमुखस्थान

मिळाल्यावाचून राहणार नाहीं. कित्येक लेखकांस स्वत च्या लेखाचा मूळ उगम कोठून झाला हे अज्ञात असेल, अथवा या कल्पनांचे मूळ उत्पादक आपणच आहो असेही म्हणणारे कोणी निघतील. त्याचप्रमाणें आपणास ही कल्पना मूळ अमुक ग्रथांमुळे सुचली असे स्पष्टपणें जाहीर करणारे धीर पुरुषही कोणी होतील, पण ते कसेही असलें तरी आमच्या वेदान्त-तत्त्वांचा अनुवाद सर्वत्र होऊ लागेल यात सशय नाही. मी अमेरिकेंत असता माझ्या व्याख्यानाविरुद्ध एक विशेष तक्रार मला वारवार ऐकू येई. माझ्या व्याख्यानापैकी बहुतेकाचा विषय अद्वैत हाच असतो व द्वैताबद्दल मी कधीं फारसे बोलत नाहीं, अशी तक्रार नेहमीं ऐकू येई, द्वैतमताप्रमाणे परमेश्वर आणि भक्त याजमध्ये जो पूज्यपूजकभाव आहे व त्यामुळें अतःकरणात ज्या भक्तीच्या, प्रेमाच्या व आनदाच्या, अनावर लाटा उसळतात, तो भाव मला समजत नाही असे नाही. द्वैतातील या उच्च भागाचे महत्त्वही पूर्णपणें माझ्या लक्षात आहे. परतु सध्याची वेळ रडण्याची आहे असें मला वाटत नाही. भक्तीने का होईना, पण डोळयास अश्रू आणण्याची आणि अत·करण मवाळ करण्याची वेळ सध्या नाही असेंच मला वाटते पूर्वी आपण आपले अत करण मवाळ केलें तेच बस झालें असें मला वाटते अत करणात मृदुता आणता आणता आपण सध्या कापसाचे गोळे होऊन बसलो आहो. कापसांत मृदुता आणि मृतावस्था ही जशी बरोबरच वास करतात, त्याच-प्रमाणे आपण अगदी नरम असे मृत्पिड बनलो आहो. आपल्याला सध्या लोखडी स्नायूची आणि पोलादी मज्जातंतूची अधिक गरज आहे ज्याना कोणीही वाकवू शकणार नाही, असल्या प्रचड इच्छाशक्तीच्या माणसाची सध्या आपणास जरूर आहे या विश्वात चाललेल्या नानाप्रकारच्या खेळाचे रहस्य हुडकून काढण्यास नेटानें पुढे सरणारी बुद्धिमत्ता आपणास पाहिजे आहे. हे रहस्य हुडकून काढीत असतां रसातळ पाहण्याची वेळ आली अथवा प्रत्यक्ष मृत्यूशीं सामना करण्याची पाळी आली, तरी ज्याची छाती फाटणार नाहीं, असलीं माणसें आपणांस हवीं आहेत. अशी माणसे निपज-विणें हें आपलें सध्याचें महत्त्वाचें कर्तव्य आहे, आणि हें कर्तव्य पार पाडण्यास अद्वैतासारखें दुसरें शास्त्र नाहीं. सर्व विश्वाची एकात्मता आहे हे तत्त्व बुद्धींत पूर्णपणें भिनल्यावांचून निधड्या छातीचीं माणसें निपजावयाचीं नाहींत.

प्रथम आत्मविश्वास. आत्मविश्वासासारखा दुसरा मित्र नाहीं. आत्मविश्वास हा भावी उन्नतीचा मूळ पाया आहे. आपण म्हणू ते करू शकू, अशी स्वत.च्या ठिकाणी पूर्ण श्रद्धा पाहिजे. यानतर परमेश्वरावर विश्वास ही पुढील पायरी आहे. भावी उन्नतीचें मूळ हें आहे. आत्मविश्वास प्रथम आणि परमेश्वरावरील विश्वास पाठीमागून अशी ही श्रेणी आहे. पुराणातल्या सान्या तेहतीस कोटी देवावर तुमचा पूर्ण भरंवसा असला, इतकेच नव्हे तर अलीकडे पाश्चात्यांनीं आणिलेल्या आणखी नवीन देवदेवतावरही तुमचा पूर्ण विश्वास असला, तथापि आत्मविश्वास तुम्हांपाशीं नसेल, तर मुक्तिपथाकडे जाणारी पाऊलवाटही तुमच्या नजरेस पडणार नाहीं, हें तुम्ही पक्के ध्यानात ठेवा. आत्मविश्वास हाच काय तो तुमचा खरा मित्र आहे. त्याची सगत जोडा, त्याची कांस धरा आणि शक्तिमान् व्हा. आम्हांस सध्या कशाची जरूर असेल तर ती आत्मविश्वासाचीच आहे. आज हजारो वर्षे वाटेल त्या परस्थानीं यावे आणि आम्हास तुडवून पुढे सरावें याचें कारण काय? याचे कारण इतकेच कीं त्याच्या ठिकाणीं आत्मविश्वास होता आणि आमच्या ठिकाणीं तो नाहीं, हेच. मनुष्यप्राणी पापी आहे आणि तो पापात इतका बुडालेला आहे कीं, आता त्याच्या तारणाची आशासुद्धा नाही, असें सर्व प्रकारचे ख्रिस्ती धर्मपंथ म्हणत असतात, पण युरोपात मला जें कांहीं आढळून आलें, त्यावरून ही सारी बडबड वायफळ आहे, अशी माझी समजूत झाली आहे. ही केवळ बोलण्याची भाषा आहे. युरोपात जाऊन तेथील मनुष्याच्या अत.करणाची परीक्षा करता, मला असें आढळून आले कीं, त्यांनीं आत्मविश्वासाच्या मत्राचा पूर्ण जप केला आहे. एखादा छोटा इग्रज मुलगासुद्धां तुम्हांला हेच म्हणेल की, ‘ मी इग्रज आहे; मी वाटेल ते करू शकेन. ’ युरोपातील इतर देशांत काय अथवा अमेरिकेंत काय, तुम्हाला सर्वत्र हीच स्थिति आढळून येईल. पापी अंतःकरणांतून असे उद्गार निघू शकतील काय? आमच्या मुलांत तुम्हाला असा मुलगा एखादा तरी आढळतो काय? मुलाचे कशाला, पण त्याच्या बापाचीही स्थिति तीच. जेथें अशा आत्मविश्वासाचे बापच नाहींत, तेथे अशीं मुलें तरी कोठून निपजणार? याकरिता लोकांच्या अत करणांत आत्मविश्वासाचें बियाणें पेरावयाचें असेल, तर तें काम वेदान्तच करू शकेल. स्वत ची वास्तविक योग्यता काय आहे, याची जाणीव मनुष्यमात्रास करून दिली पाहिजे. याकरि–

तांच मी अद्वैतसिद्धांताचा प्रसार सर्वत्र आणि सर्व काळीं करीत असतों. मी अद्वैतपथाचा म्हणवितों म्हणून मी असे करतों, असें आपण समजू नका. मी कोणत्याही विशिष्ट पथालाच वाहून घेतलें नसून, माझे सांगणें सार्वत्रिक उपयोगाचें आणि सर्व पथाच्या व धर्मांच्या माणसांस सारखेंच उपयुक्त असे असतें.

द्वैतवादी अथवा विशिष्टाद्वैती यांचीं चित्तें न दुखवितांही आपणांस आपला मार्ग काढतां येणें फारसें अवघड नाहीं परमेश्वराचा वास प्रत्येक अत करणांत आहे एवढेंच नव्हे, तर तो सर्व चराचरातही भरून उरला आहे, हें मत हिंदुस्थानांतील सर्व प्रकारच्या पथास मान्य आहे. त्याचप्रमाणे जीवात्मा हा वस्तुत अत्यत शुद्ध, पूर्ण आणि सर्वशक्तिमान् आहे, हेही सर्व मतास सारखेंच मान्य आहे. हें पूर्णत्व कित्येक वेळा अशत लोपलेलें असते व नंतर ते पुन्हां विकास पावतें, असें काहींचें मत आहे; पण पूर्णत्व मूलतः आहे हें त्यास अमान्य नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखे आहे. अद्वैतमताप्रमाणें पाहता पूर्णत्व लोपत नसून अथवा विकास पावत नसून त्याजवर कित्येक वेळां आवरण येतें व नतर ते निघून जाते. या दोन मतात वस्तुत· विरोध नसून विरोधाभास मात्र आहे, हें आपल्या लक्षात येईलच. फरक दिसतो तो फक्त भाषेमुळें झाला आहे तत्त्वत त्यांत कांहीं भेद नाहीं फार झालें तर यातील एखादें तर्कशास्त्रदृष्टया अधिक बरोबर भाषेत सांगितलेलें असेल आणि दुसरें कमी बरोबर भाषेंत असेल इतकेच; तथापि तत्त्वत. अखेरीस त्यात काहीं विरोध आढळून येणार नाहीं. मुख्य मुद्दा सर्वांस सारखाच मान्य असल्यावर भाषेच्या फरकासंबधीं विशेष तुषकडन करण्याची आपणास जरूर नाहीं. मुख्य मुद्दा जें आत्म्याचें वास्तविक स्वरूप, त्याची ओळख जगास पटवावयाचें कार्य आपणांस कर्तव्य आहे. माझ्या प्रिय मित्रानो, मला आपणांस चार गोष्टी सागाव्यासें वाटते. हें माझें सांगणें आपणांस कडू लागेल खरें; पण ते खरें आहे याकरिता तें तुम्हास सागणें इष्ट आहे एखाद्या इग्रजानें आपणापैकीं एखाद्या मनुष्याशीं उद्दामपणाचें वर्तन केलें, तर साऱ्या देशभर एकदम मोठा गोंगाट होतो, असें वर्तमानपत्रावरून मला आढळून येतें. अशा प्रकारच्या हकीकती वाचल्या म्हणजे मला रडू येतें, पण त्याच क्षणीं दुसराही एक प्रश्न माझ्या मनांत उभा

राहतो, तो हा कीं, या साऱ्या अनर्थाला कारण कोण ? मीं स्वत वेदान्ती म्हणवीत असल्यामुळें असा प्रश्न माझ्या चित्तात आल्यावाचून राहणें शक्यच नाही आम्हा हिंदूच्या चित्ताला एका विशिष्ट प्रकारचें वळण अनादि काळापासून लागलें आहे कोणत्याही गोष्टीचा कार्यकारणभाव आम्ही पाहू लागलों म्हणजे आमचें मन त्या बाह्य वस्तूशीच जखडून न राहतां ते आंत वळते केवळ बाहेरून दिसणाऱ्या देखाव्यावरूनच कार्यकारणभाव न ठरविता, त्या देखाव्याच्या पडद्याच्या आत काय प्रकार आहे, याचा खुलासा करून घेण्याची सहजगत्या आमची प्रवृत्ति होते. यामुळें आम्हा हिंदूचीं मनें अधिक अतर्वेनी बनलीं आहेत अशाच दृष्टीनें आता सागितलेल्या प्रश्नांचा जेव्हा मी विचार करतों तेव्हा मला असे आढळून येतें की, यांत इंग्रजाचा काहीं दोष नसून साऱ्या दोषाचे माप आमच्याच पदरात पडते याची जबाबदारी इंग्रजाकडे जाऊ शकत नाहीं आमच्या साऱ्या दु खाला आणि अवनतीला कारण आमचे आम्हीच. आमच्या उच्च जातीय पूर्वजानी सामान्य जनतेस एकसारखें पायाखाली तुडविलें. ही त्याची क्रिया इतका काळ चालू राहिली कीं, त्या काळात आमच्या सामान्य जनतेची स्वत च्या माणुसकीची जाणीवही सर्वथा नष्ट झाली. आपण माणसें आहों ही गोष्टसुद्धा आमची सामान्य जनता विसरून गेली. त्याना असें वाटू लागलें कीं, लांकूडतोड्याचे अथवा असलेंच कसलें तरी काम करणे इतकीच जन्मत आपली किंमत आहे. असा प्रकार शतकानुशतकें चालू राहिला आपली योग्यता निवळ गुलामाहून काहीं अधिक नाहीं, हा विचार शतकानुशतकें त्याच्या चित्तात पक्के घर करून बसला. साप्रत काळी आम्ही मोठे सुशिक्षित झालो, अशी घमेंड आपणास वाटू लागली आहे; पण या आपल्या दुबळ्या बाधवासाठीं थोडासाही हात पुढें करण्याची वेळ आली की, आम्ही चपापून मागें सरतो, एवढेंच नव्हे, तर हें आपलें कृत्य योग्य आहे असें सिद्ध करण्याकरिता परंपरेने प्राप्त झालेल्या राक्षसी आणि पशुवृत्तीला साजणाऱ्या विधानाचाही उपयोग आपण मनमुराद करीत असतों. आपल्या पाश्चात्य शिक्षणानेंही असल्या प्रकारच्या आपल्या शास्त्रज्ञानांत थोडीबहुत भर घातली आहे. सामान्य जनतेला आपल्या पायाखालीं सदोदित कसें ठेवावें, याचें पाश्चात्य देशात एक शास्त्रच बनत आहे, आणि आपणही त्याचा थोडाबहुत उपयोग करीत असतो. अमेरिकेंत भरलेल्या सर्व धर्माच्या महा-

परिषदेंत एकदां एका तरुण शिद्दी गृहस्थानें भाषण केलें. हा तरुण शिद्दी थेट आफ्रिकेतला होता. त्याचे भाषण फारच सुरेख झालें. मला त्या तरुण शिद्द्याचें फार कौतुक वाटलें. मी त्याच्याशी केंव्हां केंव्हा भाषण करीत असें; तथापि त्याची एकदर पूर्वपीठिका मला समजली नव्हती. पुढें मी इग्लडात गेलो त्या वेळीं तेथें भेटलेल्या कांहीं अमेरिकनानी त्याची हकीकत मला सागितली त्याच्या सांगण्यात असें आले कीं तो मूळचा मध्य आफ्रिकेचा रहिवासी होता एके दिवशी तेथील दुसऱ्या एका शिद्दी राजाचें व या मुलाच्या बापाचे भाडण होऊन त्या राजानें या मुलाच्या बापाचा व आईचा खून केला आणि त्याना शिजवून मेजवानीच्या प्रसंगी त्याचा उपयोग करण्यात आला या मुलालाही तो जिवे मारणार होता; परतु हा मुलगा पळाला आणि शेकडो मैल रानेवनें तुडवून त्याने कसाबसा समुद्रकिनारा गाठला. तेथे असलेल्या एका व्यापाऱ्याने त्याला जहाजावर घालून अमेरिकेस आणलें याच मुलानें पुढे धर्मपरिषदेंत एक सुदर व्याख्यान दिलें या शिद्द्याच्या बापदाद्यानी पुस्तकाचे तोंडही पाहिलें नव्हते. यामुळें शिक्षणाचे आनुवंशिक सस्कार त्याच्याठायी होते असें म्हणणें शक्य नाहीं. अशा वेळी आनुवशिक सस्काराची महती माझ्या चित्तास कशी पटणार? आनुवशिक सस्काराचे बड आपल्या उपयोगी फार वेळा पडत असते. विद्या शिकणे हे काम ब्राह्मणाचेंच आहे असें आपण म्हणतों, आणि याचें कारण काय, तर आनुवशिक सस्कार हेच विद्या ही ब्राह्मणाच्या रक्तात अनेक शतकें खेळत आली आहे, असें आम्ही म्हणतों. ठीक आहे तुमचें हेही म्हणणे मी मान्य करतो, पण यावर माझें म्हणणें एवढेंच आहे कीं, असें आहे याचकरिता आता महाराच्या शिक्षणासाठीं अधिक द्रव्याचा व्यय करा. ब्राह्मणांसाठी पैसे खर्च करण्याचे कारणच नाहीं ब्राह्मणाच्या ठिकाणीं उपजत सस्कार खरोखरच असतील, तर कोणाच्याही मदतीवाचून ते आपला रस्ता काढल्याशिवाय राहावयाचे नाहींत. याकरिता जेथे तुमच्या दानाची वास्तविक जरूर आहे, तिकडेच त्याचा ओघ वळावा हें इष्ट नाहीं काय? जे कोणी जन्मत च कमी बुद्धीचे असतील, त्यांनाच सर्व प्रकारची मानसिक आणि द्रव्याची मदत मिळणें योग्य आहे. न्याय म्हटला तर माझ्या दृष्टीनें हाच आहे मनुष्यमात्राची वास्तविक योग्यता काय आहे, याची जाणीव आमच्या या दुबळया सामान्य प्रतीच्या जनतेस

प्रथम करून दिली पाहिजे. जातिगोताचा विचार न करतां समस्त आबाल-वृद्धांस आणि सर्व जातींच्या स्त्रीपुरुषांस ही जाणीव झाली पाहिजे. व्यक्तीची दृश्य योग्यता कमी असो अथवा अधिक असो, कोणी मोठा बलवान् असो अथवा अशक्त असो, कोणत्याही स्थितींतल्या व्यक्तीच्या दृश्य रूपामागें अनत आत्म्याचा आहे वासआणि त्याबरोबरच अनत सामर्थ्याचाही वास आहे, याची जाणीव सर्वांस झाली पाहिजे. आज कोणी कितीही कमी दर्जाचा दिसत असला, तरी मोठेपणाचें बीज त्याच्या ठिकाणीं अवश्यमेव आहे, याची ओळख सर्वांस पटली पाहिजे. आपण प्रत्येक व्यक्तीच्या कानात एकाच मत्राचा घोष सतत केला पाहिजे. "उत्तिष्ठत जाग्रत प्राप्यवरान्निबोधत।" उठा, जागे व्हा आणि प्राप्तव्य आहे ते प्राप्त झाल्यावाचून थांबू नका. हाच उपदेश आपण सर्वत्रास केला पाहिजे. आपण अशक्त आहों–दुर्बळ आहो–असा भ्रम तुम्हांस झाला आहे तुम्हांस हें स्वप्न पडत आहे. जागे होऊन डोळे उघडून पहा म्हणजे तुमचें हे दु स्वप्न विलयास जाईल. या जगात खरोखर कोणीही दुबळा नाहीं. आत्मा अनंत, सर्वशक्तिमान् आणि सर्वसाक्षी आहे. मग ज्याला आत्मा आहे तो दुबळा कसा म्हणावा? उठा, आपला हा हक्क पुन्हा सिद्ध करा. आमच्या ठिकाणीं परमेश्वराचा वास आहे असे निश्चयानें उच्च घोषानें जाहीर करा. 'मी दुबळा, मी हीन, मी कगाल' असली भाषा बोलून स्वत च्या ईश्वरत्वास पाठमोरे होऊ नका. आपला सध्याचा आयुष्यक्रम अत्यत निर्जीव झाला आहे. त्यांत कसल्याच प्रकारची चळवळ नाहीं. सर्वत्र दुर्बळपणाचें साम्राज्य पसरलें आहे. एखाद्या भारलेल्या मनुष्याच्या स्थितीसारखी आमची स्थिति झाली आहे. माझ्या बांधवानो, आपल्यावरील हा जादू आतां दूर करण्याच्या उद्योगास लागा. हा प्रयोग कसा करावा याची पद्धत तुमच्याच धर्मग्रथात तुम्हास सांपडेल जीवात्म्याची खरी किमत काय आहे, याची जाणीव प्रत्येकास करून द्या झोंपीं गेलेला जीवात्मा पुन्हां जागा झाला म्हणजे त्याचा प्रकाश सर्वत्र फाकेल. अशा स्थितींत तुमचें गेलेलें सामर्थ्य तुम्हांस पुन्हां पूर्ववत् प्राप्त होईल व अवनति नष्ट होऊन उन्नतावस्था पुन्हा प्राप्त होईल. तुम्ही पुन्हां पूर्वीप्रमाणेंच पुण्य पुरुष व्हाल. तुमचा झोंपीं गेलेला आत्मा जागा झाल्याबरोबर हें सारें स्थित्यतर आपोआप क्रमानें घडून येईल. साऱ्या भगवद्गीतेंत माझे अत्यत आवडते असे दोन श्लोक आहेत. भगवताच्या

मुखांतून निघालेल्या एकदर उद्गारांचें सारसर्वस्व या श्लोकात सांठविलें आहे असे मला वाटतें. "समं सर्वेषु भूतेषु तिष्ठंतं परमेश्वरम् । विनश्यत्सु विनश्यंतं य पश्यति स पश्यति ॥ सम पश्यन् हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् । न हिनस्त्यात्मनात्मानो ततो याति परां गतिम् ॥' सर्व प्रकारच्या प्राण्यांत एकाच परमेश्वराचा वास आहे असें जो पाहतो त्यालाच खरी दृष्टि प्राप्त झाली आहे असें समजावे.

वेदान्ताचे कार्यक्षेत्र अमुक एका विशिष्ट देशापुरते आहे असे नाही आमच्या देशात काय अथवा पाश्चात्यांच्या भूमीत काय, वेदान्ताला अनेक शुभकार्ये घडवून आणण्याचे समर्थ्य आहे. एकच परमात्मा सर्वव्यापी सर्वभूतातरात्मा आहे, या तत्त्वाचा घोष सर्वत्र झाला पाहिजे आमच्या या भूमींत आणि पाश्चात्याच्याही भूमीत हे बीज रुजविलें पाहिजे मनुष्यजातीचे खरें कल्याण करण्याचे सामर्थ्य या तत्त्वात आहे. दुःखकर्दमांत लोळत पडलेल्या सामान्य मनुष्यवर्गास दु खमुक्त करण्याचें सामर्थ्य या मत्रात आहे. ज्या ज्या ठिकाणीं दुष्टत्वाचा वास आहे तेथें मुळात भेदबुद्धि हेच कारण आढळून येतें अमुक लहान आणि तमुक मोठा, अमुक चागला आणि तमुक वाईट ही भेददृष्टि सर्व अनर्थाचे मूळ आहे. समभाव हे सर्व कल्याणाचे मूळ आहे. मुळात सर्व वस्तू एकाच किंमतीच्या आहेत अशी दृष्टि उत्पन्न होणे हे कल्याणप्रद आहे. वेदान्ताचे अतिम साध्य हेच आहे आता येथे आणखी एक प्रश्न उपस्थित होण्याजोगा आहे. एखादें मोठे साध्य–ध्येय–नजरेसमोर असणे ही गोष्ट वेगळी आणि ते साध्य प्रत्यक्ष आचारांत आणणें ही गोष्ट वेगळी अमुक एक गोष्ट उत्तम आहे असे नुसतें तोडानें सागणे सोपे आहे, पण ती साध्य कशी करावयाची याचा काही रस्ता दाखविता येण्यासारखा आहे काय ?

अशा वेळीं जातिभेदाच्या आणि दुसऱ्याही अनेक प्रकारच्या अडचणी उत्पन्न होत असतात. सुधारणेच्या आणि जातिभेदाच्या नानाविध कल्पना आज शेकडों वर्षें आमच्या लोकांच्या मनात घोळत आहेत. माझ्या स्वत -च्या सबधानें म्हणाल, तर मी सबगोलकार करावा या मताचा नाहीं आणि मी नुसता समाजसुधारकही नाहीं, हें तुम्हास स्पष्टपणें कळविणें इष्ट आहे. तुमच्या जातिभेदाशीं अथवा तुमच्या सामाजसुधारणेशीं मला कांहींएक

कर्तव्य नाहीं. तुम्ही कोणत्याही विशिष्ट जातीचे म्हणवीत असाल तर खुशाल म्हणवा, पण त्याकरितां दुसऱ्या जातीबद्दल तुमच्या मनात द्वेष कां असावा हें मला समजत नाही तुमची जात चागली असें तुम्हास वाटत असलें, तरी त्यामुळें दुसऱ्या एखाद्याची जात वाईट असें म्हणण्याचा तुम्हास काय आधार आहे ? सर्वांबद्दल प्रेमबुद्धि–समबुद्धि–बाळगा, एवढाच उपदेश मी सर्वत्र करीत असतों. वेदान्तमतानुसारें सर्वत्र एकाच आत्म्याचा वास असल्यामुळें समबुद्धि राखणें हेच उचित आहे, असें माझें सांगणें आहे. गेलीं शभर वर्षें आमच्या देशात समाजसुधारकाचा नुसता पूर लोटला आहे. यांनीं अनेक प्रकारच्या सुधारणा सुरू करण्याचा घाट घातला आहे. या सुधारक मडळीस नावें ठेवण्याची माझी इच्छा नाहीं. यांपैकीं पुष्कळ माणसें खरोखरच फार सच्छील आहेत. त्यांचा हेतु शुद्ध आहे यात शंका नाहीं. कित्येक बाबींत त्याचे उद्देश उच्च दर्जाचे आहेत हेही खरें आहे, पण जवळ जवळ शतकभर चालू असलेल्या या चळवळीचा टिकाऊ असा परिणाम कोणत्याच प्रकारचा झाला नाही हेंही खोटे नाहीं ही स्थिति कोणासही अगदीं उघड उघड दिसून येण्याजोगी आहे. सर्व देशभर ही एकच स्थिति आढळून येते. हजारों लोकांनीं हजारो सभांतून हजारो भाषणें केलीं. गरीब बिचाऱ्या हिंदुजनतेच्या डोक्यावर चोपड्यांचा आणि पुस्तकाचा नुसता भडिमार उडून राहिला, आणि एवढया प्रचड खटाटोपाचा परिणाम पाहिला तर जवळ जवळ शून्य हाच ! असे का ? अशी स्थिति होण्याला कारण काय असावे ? याचे कारण शोधण्यास मोठे भगीरथ प्रयत्न नकोत. ज्या प्रकारानें हा भडिमार आमच्या जनतेवर आणि आमच्या संस्कृतीवरही करण्यात आला, तो प्रकारच याचें कारण आहे. उठावें त्यानें प्रथम आमची संस्कृति आणि समाजरचना हींच वाईट आहेत असे म्हणत सुटावे. अशा मनुष्यांच्या सागण्याकडे कोणाचें लक्ष्य लागणार ? आमची समाजरचना ही कांहीं आजकालची चीज नाहीं. तिच्या पाठीमागे हजारों वर्षांचा इतिहास मूर्तिमत उभा आहे. विशिष्ट प्रकारचीं तत्त्वें आमच्या समाजरचनेंत गोंवलीं गेलीं आहेत. यामुळे आमच्या रचनेस एक विशिष्ट स्वरूप परंपरेनेंच प्राप्त झालें आहे. ही इतिहासनिर्मित परपरा कायम राखणें हें आपलें पहिलें कर्तव्य आहे. अन्य देशातून आपणांस अनेक वस्तू

घ्यावा लागतील हें मला मान्य आहे. इतरांपासून आपणांस अनेक प्रकारचे धडे शिकावयाचे आहेत हें खरें; परंतु सध्या ज्या गोष्टी आपण सुधारणा म्हणून करीत आहों, त्यांत पाश्चात्यांच्या चालीरीतींचें अनुकरण आपण आंधळ्यासारखे करीत आहों हीच काय ती खेदाची गोष्ट आहे. असल्या प्रकारच्या अनुकरणानें हिंदुस्थानाचें कल्याण होईल असें मला वाटत नाहीं. यामुळेंच या सुधारणांचा काहीं उपयोग न होता त्या मागें पडत गेल्या. दुसरें असें कीं, समाजसुधारणेचें सर्व काम नुसत्या शिव्या देऊनच सपतें असें नाही. आपल्या समाजरचनेंत अनेक प्रकारचीं व्यगें आहेत, ही गोष्ट एखाद्या लहान मुलालाही समजण्यासारखी आहे. परंतु जींत कोणतींही व्यगे नाहींत अशी एकतरी समाजरचना या पृथ्वीतलावर आहे काय ? प्रत्येक प्रकारच्या समाजरचनेंत कोणत्या ना कोणत्या प्रकारचीं व्यगें आढळावयाचींच मी अनेक देश फिरलों आणि समाज पाहिले. अनेक देशांतील अनेक समाजाची चालचलणूक माझ्या अवलोकनात आली. अशा वेळीं सहजगत्या आमची समाजरचना आणि इतर ठिकाणची रचना याची तुलना करण्याची संधि मला सापडली. या अवलोकनावरून माझी अशी खात्री झाली कीं, अनेक समाजाचा सरस निरसपणा ताडून पाहतां एकदरीनें आमचे लोकच अधिक नीतिमान् आणि अधिक धार्मिक असून आमच्या चालीरीतीच मानवजातीला सुखी करण्यास समर्थ आहेत, हे मी आपणास प्रांजलपणें सांगतों. यामुळे अमुक एका प्रकारच्या सुधारणेची गरज आपणास आहे असें मला वाटत नाहीं. मनुष्यानें एकसारखें विस्तार पावावें—मोठे व्हावे—आणि तेंही आपल्या देशाची विशिष्ट परंपरा कायम ठेवून व्हावें हें मला इष्ट वाटतें. आपल्या देशाचा प्राचीन इतिहास अवलोकन करतां माझी अशी खात्री झाली आहे कीं मानवी मन उन्नत दशेस नेण्याकरितां जितक्या योजना आणि खटपटी आमच्या देशात झाल्या आहेत तितक्या त्या इतर कोठेंही झालेल्या नाहींत यामुळें आमचा देश माझ्या दृष्टीनें दूषणास मुळीच पात्र होत नाहीं; याकरितां माझा आपणास उपदेश इतकाच कीं, आजपर्यंत आपण ज्या कांहीं चागल्या गोष्टी केल्या आहेत त्यांहूनही अधिक चागल्या गोष्टी आपण आतां केल्या पाहिजेत. आमच्या पूर्वजानीं अनेक सत्कार्यें या भूमींत केलीं आहेत, आणि अजूनही त्याहून मोठीं सत्कार्यें करण्याची वेळ सध्या आपणांस प्राप्त झाली आहे.

एकाच जागीं सतत उभे राहाणें आपणांस शक्य नाहीं, हें आपणांसही मान्य होईल. एकाच जागीं उभें राहाणें म्हणजे मृत्यूला बोलावणें पाठविण्यासारखेंच आहे. याकरितां आपणांस पुढें तरी सरलें पहिजे अथवा मागें तरी हटलें पाहिजे. उन्नतीचा अथवा अवनतीचा यांपैकीं कोणता तरी एक मार्ग आपण स्वीकारला पाहिजे. आमच्या पूर्वजांनीं उन्नतीचा बराच पथ पूर्वी आक्रमून ठेवला आहे; परंतु आता आपणास पुढें जावयाचें आहे. त्यानीं आक्रमिलेली रेषा ही आपली अखेरची मर्यादा आहे असें नाहीं. आपणांस या रेषेपलीकडे जावयाचें आहे. आपणास अवनतीच्या मार्गास लागावयाचें नाहीं आपण आतां अवनत होऊ लागलो, तर लवकरच आपण नामशेष होऊ याकरितां अवनतीचें आता नावही नको. याकरितां आपण आतां पुढें सरून आपल्या पूर्वजांहूनही अधिक कमाई करून दाखविली पाहिजे. क्षणमात्र टिकणाऱ्या सुधारणेचा मी भोक्ता नाहीं. असल्या दिखाऊ सुधारणा घडवून आणा, असा सल्ला मी आपणांस कधींही देणार नाहीं. पूर्वीच्या एखाद्या वाईट चालींत सुधारणा करा असेंही मी आपणास सांगत नाहीं आपण एकसारखे पुढे चला आणि पूर्वजांनीं आंखून ठेविलेल्या नकाशाबरहुकूम मानवी उन्नतीचें कार्य पूर्णत्वास न्या हेच आपणांस माझें सांगणें आहे. मनुष्य प्राणी हा मूळचाच पूर्ण आहे आणि ईश्वरत्व हा त्याचा जन्मसिद्ध हक्क आहे, या वेदान्तसिद्धाताचा प्रत्यक्ष अनुभव घेण्याच्या रस्त्याला लागा, हेंच आपणांस माझें वारंवार सागणें आहे. तितका वेळ असता, तर आपणास कर्तव्य असलेल्या गोष्टींचा नकाशा आपल्या प्राचीन पूर्वजांनीं कसा पूर्णपणें रेखाटून ठेवला आहे आणि सध्या प्राप्त झालेल्या परिस्थितीचें स्वप्न त्यांस आगाऊच कसें पडलें होते हें मी आपणास विस्तारानें दाखविलें असते. चालू परिस्थिति त्यांस आगाऊ कळली होती, एवढेच नव्हे तर भावी स्थितीची जाणीवही त्यास झाली होती. जातिभेद त्यासही नको होता, परंतु ते आपल्या सध्याच्या सुधारकांसारखे नव्हते. एखाद्या शहरांतील सर्व लोकांनीं एकत्र बसून गोमांसावर हात मारला आणि मद्याचें आकठ पान केलें म्हणजे जातिभेदाचा नायनाट झाला असे त्याना वाटत नव्हते, अगर देशातल्या साऱ्या माथेफिरूनीं आणि बुद्धिभ्रष्टांनीं वाटेल त्याच्याशीं वाटेल तेव्हां लग्नें करून सारा देश म्हणजे एक वेड्याचा बाजार करून सोडावा अशीही त्यांची इच्छा नव्हती; अथवा देशांत होणाऱ्या विध-

वांच्या लमाच्या सख्येवरून देशाची उन्नति ठरविण्याचे मापही त्यास सापडलें नव्हतें. विधवाचे विवाह आणि देशाची उन्नति याचा संबध ज्यानें सिद्ध केला आहे, असा देश अद्यापि माझ्या तरी पाहण्यात आला नाहीं.

आमच्या पूर्वजाच्या मतें मानवजातीला अनुसरण्यास योग्य असा नमुना म्हटला म्हणजे ब्राह्मण हाच होय या नमुन्याची माहिती आमच्या ग्रथांत जागोजाग आली आहे. बाह्यत आमच्या या नमुन्याची जोड युरोपात शोधावयाची म्हटली म्हणजे ती 'कार्डिनल' ही होय. कार्डिनल म्हणजे ख्रिस्ती धर्मांतले महामहोपाध्याय आतां या कार्डिनलाचा उद्योग पाहिला, तर हजारों रुपये खर्चून आणि हाडाची कार्डे करून आपल्या जातकुळीची महती शोधून काढण्याचा असतो एखाद्या जुन्यापुराण्या वाटमाऱ्या, परंतु पैशानें गबर असलेल्या व्यक्तीशी आपला संबध नेऊन भिडविला म्हणजे कार्डिनल साहेबास स्वर्गाचें सुख मिळाल्यासारखे वाटते. युरोपात पूर्वकाळी असे बडे लुटारू अनेक होते आणि हेच अनेकाना सरदारही बनवीत. असल्या महापुरुषाची आणि आपली जातकुळी एकच आहे, असें सिद्ध करणें हाच काय तो मोठेपणा असे या युरोपीय महामहोपाध्यायास वाटत असते. उलट पक्षीं आमच्या देशाकडे पाहिले तर कांहीं वेगळाच देखावा आढळून येतो आपण अमुक एका ऋषीचे वशज असें सागण्यात आमच्या इकडील एखाद्या मोठ्या राजालाही अभिमान वाटतो. या ऋषीचें सारे वैभव म्हटलें, तर वल्कलें आणि रानात एखादी झोपडी इतकेच, आणि त्याचा सारा व्यवसाय म्हटला म्हणजे वेदाध्ययन असल्या दरिद्री आणि इंद्रियजन्य सुखास पारख्या झालेल्या ऋषीच्या कुळाशी सबध जोडणे आमच्या राजासही अभिमानास्पद वाटतें एखाद्या ऋषीच्या कुळाशीं सबध जोडता आल्यावाचून तुमची जात उच्च आहे असे इकडे कोणीही म्हणणार नाहीं यावरून जन्मसिद्ध मोठा कोण हें ठरविण्याचें आमचें माप आणि पाश्चात्याचें माप हीं परस्परापासून अगदीं भिन्न आहेत असें सिद्ध होते आमच्या इकडचें ध्येय ब्राह्मण हे आहे. सर्वसगपरित्याग करून ज्यानें आपली दृष्टि एका धर्मसाधनाकडे मात्र वळविली आहे, असा ब्राह्मण हाच आमचा अनुकरणाचा नमुना होय या नमुन्याबरहुकूम वागण्याचा यत्न करणें हेंच योग्य आहे असें आम्हांस वाटत असते. ब्राह्मणपणा अगीं आणणें हेच आमचे साध्य आहे. ब्राह्मणपणा म्हणजे ऐहिक वस्तूचा त्याग आणि

सत्य वस्तूचा भोग ही जेथें एकत्र नांदतात तो. आमच्या हिंदु कुलाचें अखेरचें साध्य हेच. ब्राह्मण म्हटला कीं त्याला कायद्याचा निर्बंध नाही, त्याला कायदा हा शब्दही ठाऊक नाहीं, राजा त्याचा विग्रह करू शकत नाहीं, आणि त्याला उपसर्ग पोहोचविण्याचा यत्न कोणीही करू नये, अशा प्रकारचे हक्क ब्राह्मणास होते, हें आपल्या ऐकिवांत अनेक वेळा आलें असेल ब्राह्मणास अशा प्रकारचे हक्क होते ही गोष्ट अक्षरश खरी आहे काहीं विशिष्ट हेतूनीं प्रेरित असलेल्या अथवा मूर्ख लोकांनी केलेल्या स्मृतिवचनाच्या अर्थावरून आपण आपला गैर-समज करून घेऊ नका वेदान्तदृष्टया ब्राह्मण ह्या शब्दाचा जो अर्थ आहे तो प्रथम लक्ष्यात घेऊन, त्याच्या अनुरोधानें या स्मृतिवचनाचा काय अर्थ होतो तो पहा. सर्व प्रकारच्या स्वहितबुद्धीस ज्याने तिलांजली दिला आहे आणि सत्यवस्तूच्या शोधात आणि प्रसारांतच ज्याच्या साऱ्या आयुष्याचा व्यय होत आहे, अशाच प्रकारच्या मनुष्यानी एखादा देश भरलेला असेल तर असल्या देशात कायदा कशासाठीं करावयाचा ? अशा प्रकारच्या देशात कसल्याच कायद्याचा निर्बंध नसला, तर ती मोठ्या नवलाची गोष्ट झाली असें म्हणता येईल काय ? अशा प्रकारच्या देशात पोलीस आणि सैन्य याना कामगिरी तरी काय सागावयाची ? अशा प्रकारच्या लोकाचा निग्रह करण्याची जरूर ती काय असणार ? अशा लोकाना एखाद्या सरकाराची तरी आवश्यकता काय आहे ? असलीं माणसे म्हणजे शुद्ध सत्पुरुषाच्या कोटींतलीं माणसे होत. ती केवळ परमेश्वराचीं लेंकरें. आमच्या दृष्टीनें हीच आमची अनुकरणीय ध्येये होत. यानाच आम्ही ब्राह्मण म्हणतो सत्य युगात फक्त एकच जात अस्तित्वांत होती; आणि ती जात म्हणजे ब्राह्मण, असे आमच्या पुराणात सागितलें आहे. आरभी फक्त ब्राह्मणाचीच वस्ती होती असें वर्णन महाभारतात आढळते. ही जात जसजशी अवनत होत गेली तसतसे भेद उत्पन्न होऊ लागले, आणि त्यातून पुढे अनेक जाती निर्माण झाल्या युगातर होऊ लागलें म्हणजे या साऱ्या जाती नाहींशा होऊ लागून पुन्हा ब्राह्मणाचीच एक जात उरेल असे वर्णन ग्रंथातरीं केलेलें आहे. युगातरास आतां आरंभ होत आहे या गोष्टीकडे विशेष लक्ष्य पुरविण्याची विनति मी आपणांस करतो. याकरिता जातिभेद नष्ट करणें म्हणजे उच्च-जातीयानीं भ्रष्ट होणें नव्हे, अथवा अभक्ष्य भक्षण करून अपेय पान करणें.

म्हणजेही जातिभेद मोडणें नव्हे, अथवा वाटेल ती चैन भोगता यावी आणि भडकलेल्या इद्रियाचे चोज पुरविता यावे म्हणून पूर्वनिर्बंध मोडणें म्हणजेही जातिभेद मोडणें नव्हे आपणांस जातिभेद मोडण्याची खरी इच्छा असेल, तर ती गोष्ट वेदान्तधर्माच्या पालनानें मात्र सिद्ध होईल. धर्माच्या प्रत्यक्ष अभ्यासानें मात्र हें कार्य साधण्यासारखे आहे ब्राह्मण्य मिळविण्याचा सतत यत्न करण्यानें मात्र ही सुधारणा सिद्ध होण्यासारखी आहे. आपल्या पूर्वजांनीं आपणा सर्वांस आपलीं विहित कर्मे लावून दिलीं आहेत कोणी आर्य असो अगर अनार्य असो, ऋषि असो, ब्राह्मण असो अथवा अंत्यज असो, सर्वांना मुख्यत्वेकरून त्यानीं एकच कर्म सागितलें आहे. कोणत्याही अडचणीस न जुमानतां तुम्ही आपलें पाऊल एकसारखें पुढें टाका असें त्यांचें तुम्हां सर्वांस एकच सागणें आहे. तुम्हापैकीं प्रत्येकाचें अतिम साध्य ब्राह्मण्य मिळविणें हे असून तें मिळविण्याचा यत्न तुम्हांपैकीं प्रत्येकानें सतत करावा हेंच त्याचे सांगणें आहे वेदान्तानें सागितलेलें हे साध्य केवळ एकट्या हिंदुस्थानापुरतेच आहे असे नाही तें साऱ्या जगाचें साध्य आहे. जातिभेदातही हेच तत्त्व आहे. सावकाश आणि विशेष कष्टाशिवाय अखेर ब्राह्मण्य प्राप्त करून देणें हे धर्माचे कार्य आहे क्षमा, शांति, धार्मिकता, पावित्र्य आणि समाधान हीं जगांतील प्रत्येक व्यक्तीस साध्य करून देणे हे वेदान्तधर्माचें अतिम साध्य आहे

आता हें सारें साधावयाचे कसें असा प्रश्न येथें उपस्थित होतो. शिव्याशापांनीं अगर नालस्तीनें हें कार्य साधावयाचें नाहीं आणि ते साधणें शक्यही नाहीं, हे पुन्हां एकवार मी आपणास सांगतो. वर्षानुवर्ष या पद्धतीचा उपयोग करण्यांत आला आहे, आणि आतांपर्यंत या यत्नाचा उपयोग कितपत झाला आहे, याचा आढावाही काढण्याची जरूर नाहीं. हें साध्य होण्यास दयाशीलता आणि सहानुकपा हीं प्रथम पाहिजेत. हा विषय अत्यत विस्तृत आहे, आणि माझ्या मनात ज्या कल्पना वारंवार आणि एकसारख्या येत असतात व तदनुरूप जो भावी क्रमाचा नकाशा मी रेखाटीत असतों, त्याची कल्पना आपणांस करून देण्यास कित्येक व्याख्यानें द्यावीं लागतील. याकरितां आतां मला आटपतें घेतलें पाहिजे. माझ्या मित्रांनो आणि प्रिय बाधवांनो, आपलें हें जहाज अनेक शतकें कालसमुद्रांत फिरत आहे

आणि आतांपर्यंत त्यानें अनेक प्रकारचीं सत्कार्यें केलीं आहेत. सध्या त्याला कदाचित् एखादें छिद्र पडलें असेल, सध्या कदाचित् ते जीर्ण झालें असेल, असें असेल तर त्याचें छिद्र बद करून त्याची चागली डागडुजी करणे हे कार्य तुम्हाआम्हाकडे आलें आहे. असा यत्न करणें हे आपलें कर्तव्य आहे, आणि यातच आमचा मोठेपणा आहे आपणांवर कोणतें कार्य येऊन पडलें आहे, हे आपण आपल्या भाऱ्या बाधवास सागून त्यांची मदत मागूं या; म्हणजे ते जागे होऊन आपल्या मदतीस खचित धावतील. देशाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत साऱ्याना जागें करण्याकरिता उच्च घोषाने हाका मारीत मी फिरेन सध्याचे कर्तव्य काय आहे याची जाणीव मी त्याना करून देईन कादाचित् त्यांनीं माझें म्हणणे न ऐकलें तरी त्याच्या निंदेचा एकही शब्द या तोंडावाटे बाहेर निघणार नाहीं. त्याच्या विरुद्ध एकही शापाचा शब्द ही जिव्हा उच्चारणार नाहीं. पूर्व काळीं आमच्या मातृभूमीने महत्कार्य केलें आहे, आणि यापुढें आपल्या हातून काही महत्कार्य न झालें, तरी एका विचाराने आपल्या चित्तास शाति प्राप्त होईल तो विचार हा की, आपण सारे परस्परात तटेभाडणे न करता एकत्र राहून सुखानें मरू मित्रानो, आपण सदोदित आपलें स्वत्व कायम ठेवू या. आपण स्वाभिमान बाळगू या ज्या मानवकुळानें पूर्व काळी एवढीं सत्कृत्ये केलीं, त्याची आठवण आपण भक्तिपुरस्सर ठेवू या. अहाहा! बाह्य देशातील लोकाची आणि तुमची तुलना जों जो मी माझ्या चित्तात करतो, तों तो तुमच्याबद्दल माझ्या मनात प्रेमाचे नवे नवे कोंब फुटतात. तुम्ही किती सच्छील, किती पवित्र आणि किती शात! तुमच्या सारख्यावर जुलमानें आपला अमल हजारों वर्षें गाजवावा काय? मायानिर्मित जगात अशा विलक्षण गोष्टी घडावयाच्याच असो. त्याबद्दल अधिक विचार करण्यात फायदा नाहीं. अखेरीस धर्माचा जय होईल. तोपर्यंत आपण आपलें उचित कार्य करीत रहावे हेंच आपणांस योग्य आहे. आपल्या मातृभूमीला व्यर्थ शिव्याशाप देऊं नका. आमच्या अत्यतात्यत पवित्र भूमींत ज्यानीं जन्म घेतला त्या जीर्ण संस्थास शापू नका. अत्यत कार्यव्यापृतत्वामुळें त्या आज वृद्ध होऊन थकलेल्या आहेत. त्याच्याविरुद्ध अपशब्दाची भाषा बोलू नका. एखादी चाल तुम्हांस निवळ मूर्खपणाची वाटत असली, तरी तिजविरुद्धसुद्धां अपशब्द

काढू नका. तुमच्या बुद्धीला एखादी चाल अगदीं वेडगळ वाटली, तरी तिनें पूर्व काळीं तुमची उत्तम सेवा बजाविली आहे हें लक्ष्यात घ्या. आपण एक गोष्ट पक्की लक्ष्यात ठेवा की, ज्या हेतूनें आमच्या देशांतील चालीरीती आणि समाजाची अंगें अस्तित्वात आलीं आहेत, त्याहून अधिक उच्च हेतूकरिता निर्माण झालेली अशी एकही संस्था जगातील कोणत्याही देशात आज अस्तित्वात नाहीं. जगातील प्रत्येक देशांत जातिभेद कोणत्या प्रकारचा आहे याचा प्रत्यक्ष अनुभव मीं घेतला आहे, परंतु आमच्या जातिभेदाचें जें रहस्य आहे व ज्या अति उच्च हेतूकरिता तो निर्माण झाला आहे, तो हेतु व तें रहस्य इतर देशांतील भेदात सापडावयाचे नाहीं कोणत्या ना कोणत्या प्रकारचा भेद असणें हें अनिर्वाह्य असेल, तर संपत्तीच्या विषमतेने उत्पन्न झालेल्या जातिभेदापेक्षां ब्राह्मण्याच्या साध्यासाठीं उत्पन्न झालेला जातिभेद अधिक इष्ट नाहीं काय ? याकरिता आपल्या संस्थाविरुद्ध यापुढें एक शब्दही तोंडावाटे बाहेर काढू नका. आपलीं तोंडे बंद करून आपण आपलीं अंत:करणे खुलीं करूं या आपल्या मातृभूमीच्या उद्धारार्थ आपण खटपट केली तर परंपरेनें तिचा उपयोग साऱ्या जगाला होईल. साऱ्या जगाचें ओझें माझ्या एकट्याच्याच खांद्यावर येऊन पडलें आहे, असें आपणापैकीं प्रत्येकास वाटलें पाहिजे. वेदान्तानें प्रज्वलित केलेला दीप हातीं घेऊन त्याचा प्रकाश प्रत्येक झोंपडीपर्यंत पोंहोंचेसा करणें, हे आपणा सर्वांचे काम आहे. प्रत्येक व्यक्तींत जें ईश्वरत्व आज झोपीं गेलें आहे, त्याला जागें करणें हे आपणापैकीं प्रत्येकाचें कर्तव्य आहे. आपल्या प्रयत्नांस यशापयश किती येते, याचा विचार आपणास कशाला हवा ? यश कितीही थोडेफार आलें, तरी एका महत्कार्यासाठीं आपण जगलो व कार्य करता करता आपला देहपात झाला, हा विचार आपल्या चित्ताला अखेर शांतिदायक होईल. हें महत्कार्य यशस्वी होण्यातच मानवजातीची ऐहिक आणि पारलौकिक उन्नति होणें शक्य आहे.

---

## मद्रास येथील मानपत्र.

परमपूज्य स्वामिन्,

पाश्चात्य देशांतील आपलें धर्मकार्य संपवून आपण येथें परत आलां आहां; याबद्दल मद्रास येथील आपल्या हिंदुबांधवांतर्फे आम्ही आपलें मन:पूर्वक

स्वागत करतों. आपणांस आम्ही जें मानपत्र देत आहों तें केवळ उपचारासाठीं अथवा पैठणी आदर म्हणून नसून त्याच्याद्वारें आम्ही आपलीं अत करणें आपल्या चरणीं अर्पण करीत आहों त्याच प्रमाणे आमच्या अत्युच्च धार्मिक सिद्धांतांची विजयध्वजा आपण पाश्चात्य देशात लावून सत्याच्या कार्यास जी मदत केली, तिजबद्दल आमच्या अतःकरणांत वसत असलेला आदरही या मानपत्राच्या द्वारे आम्ही व्यक्त करीत आहों. चिकागो येथें महाधर्मपरिषद् भरली, त्या वेळीं आपच्या सनातन आणि उच्च धर्माचा एखादा प्रतिनिधी तेथें असावा, असें आम्हापैकीं काहीं लोकास वाटत होते आमच्या प्रतिनिधीनें आमच्या धर्मतत्वाची ओळख तेथील सभासदांस चागल्या प्रकारें करून द्यावी व अशा रीतीनें त्या तत्त्वाचा प्रसार पाश्चात्य देशात व्हावा, अशी आमची इच्छा होती. अशा प्रसंगी पूर्वपुण्याईनें आपला लाभ आम्हास झाला. खरी जरूर भासली म्हणजे सत्कार्यासाठीं योग्य माणसाचा अवतार होतो, असें जें अनेक देशांच्या इतिहासावरून आढळून येते ते या प्रसगीही खरें ठरलें. महाधर्मपरिषदेंत सनातनधर्मातर्फेचें प्रतिनिधित्व आपण स्वीकारलें, त्या वेळी आपली जी माहिती आम्हास होती तीवरून हे महत्कार्य अगदीं योग्य पुरुषाच्या हाती पडलें, अशी आमची खात्री झाली होती. सनातन धर्माचे सिद्धात तेथें आपण इतक्या स्पष्टतेनें, शुद्धतेनें व अधिकारानें विशद केले कीं, केवळ धर्मपरिषदेंतच त्याचा जयजयकार झाला असें नव्हे, तर बाह्य देशांतील अनेक स्त्रीपुरुषाचे लक्ष आमच्या धर्मतत्त्वांकडे वेधले, आणि आर्यधर्माच्या जिंवत झऱ्यांतील जलाच्या प्राशनानें मानवजातीची उत्क्राति अधिक विस्तृत प्रमाणावर आणि अधिक पवित्रतायुक्त होऊन परस्परातील प्रेमभाव अधिक दृढ होईल, अशीही त्याची खात्री झाली. जगातील साऱ्या महाधर्मांची तत्त्वदृष्ट्या एकवाक्यता असून त्यात परस्परविरोध नाहीं असे जें आपण मुख्यत सिद्ध केलें ह्याबद्दल आपला विशेष गौरव करणें युक्त आहे. तत्त्वतः सर्व धर्म सारखेच महत्त्वाचे आहेत असें आम्हां हिंदु लोकांचें मत आहे आणि त्याचे महत्त्व आपण तेथील सभासदांच्या मनावर फारच चांगल्या प्रकारें बिंबविलें. सत्य आणि पावित्र्य हीं काहीं विशिष्ट देशाला अथवा एखाद्या विशिष्ट समाजाला आंदण दिलेलीं आहेत असें म्हणावयास कोणीही विचारी पुरुष यापुढें प्रसिद्ध होईल असें वाटत नाहीं. त्याचप्रमाणें एखादा विशिष्ट धर्म अथवा पथ

मात्र जगणार आणि बाकीचे धर्म नष्ट होणार, असे म्हणणाराही कोणी निपजणार नाहीं. नाना प्रकारचीं स्त्रीपुरुषें आपआपल्यापरी नाना धर्म पाळीत असलीं तरी ते सर्व निरनिराळे मार्ग अखेरीस एकाच मुक्कामास पोहोंचतात, हें जें सार भगवद्गीतेत सांगितलें आहे, तेंच आपणही आपल्या मधुर व सुखद वाणीनें विस्तारानें कथन केलें आहे. धर्मपरिषदेंत आपणावर पडलेली कामगिरी संपवून आपण स्वस्थ बसला असता तरीसुद्धां आपल्या बांधवानीं त्या आपल्या बिनमोल श्रमांचें योग्य चीज खचित केलें असतें; कारण एवढी कामगिरीसुद्धां कमी आहे असें नाहीं परंतु स्वस्थ न बसता पाश्चात्य देशात प्रवास करून ज्ञान आणि शांति याचा संदेश अखिल मानवजातीस आपण पोहोचविला, ही आपली कामगिरी विशेष महत्वाची झाली आहे. अशा रीतीनें आर्यांच्या सनातन धर्माचा संदेश आपण सर्वत्र पावता केला आहे. वेदान्त धर्माची बाजू आपण पूर्णपणे राखिली, या मोठ्या कामगिरीबद्दल आपले आभार मानणें युक्त आहेच, परंतु सनातन धर्माचे कार्य जोरानें चालविण्याकरिता जागोजाग मध्यवर्ती मठ स्थापून आपण धर्मप्रसाराचे कार्य करणार आहा, याबद्दल आम्हास विशेष आनद होत आहे हे आपणास कळविणें जरूर आहे आपण जें कार्य करण्याचें योजिलें आहे, त्यावरून आमच्या देशाची परंपरा योग्य रीतीनें आपण पुढें चालविली असून ही कामगिरी विशेषतः आपल्या गुरुमहाराजाच्या नावास पूर्णपणे साजेशी आहे, असेच म्हटले पाहिजे. आपल्या गुरूनी आपल्या ठिकाणी याच महत्कार्याचें बीजारोपण केलें आहे. आपल्या या कार्यांत आपणास साहाय्य होण्याचा सुयोग आम्हास प्राप्त व्हावा इतकीच आमची इच्छा आहे. त्या जगच्चालक, सर्वज्ञ व दयामय प्रभूनें आपणास दीर्घायु करावे व आपल्या श्रमास योग्य फल मिळावे अशी त्याची आम्ही प्रार्थना करतों

यानतर खेत्रीच्या महाराजांच्यातर्फे पुढील आणखी एक मानपत्र स्वामीजींस अर्पण करण्यात आलें.

स्वामी महाराज,

आपण मद्रासेस परत आलां असून आपलें स्वागत येथील रहिवाशांनीं केलें. अशा प्रसंगीं आपल्या शुभागमनाचा आनद मीही व्यक्त करतों. पाश्चात्य देशांत जी कामगिरी आपण बजाविली आहे व तिला जें योग्य फल प्राप्त

झालें आहे, त्याबद्दल मला मनःपूर्वक आनद होत आहे. अर्वाचीन भौतिक शास्त्रांच्या हल्लयानें धर्माच्या किल्लयाची जी जी जागा सर झाली, ती धर्मानें पुन्हा केव्हाही परत मिळविली नाहीं, असा अभिमान पाश्चात्यास आहे. आपली कामगिरी म्हणजे त्याच्या अभिमानात उणीव उत्पन्न करणारीच झाली असें म्हटलें पाहिजे. वास्तविक पाहता भौतिक शास्त्रें आणि खरें धर्मशास्त्र यामध्यें काहीं परस्परविरोधाचें नाते आहे असें नाहीं. चिकागो येथें भरलेल्या महापरिषदेत आपणासारखा योग्य प्रतिनिधि या पवित्र आर्य-भूमीला प्राप्त झाला हें तिचें मोठे भाग्यच होय. पूर्वकालीन ऋषींच्या तर्फे प्रतिनिधित्व स्वीकारण्यास आपणासारखा दुसरा योग्य पुरुष क्वचित् सापडावयाचा! हिंदुस्थानात ज्ञानाचा अखंड झरा आजही कसा वाहत आहे, याची ओळख पाश्चात्यास पटली, याचें सर्व श्रेय आपलें चातुर्य, धैर्य आणि उत्साह यासच दिलें पाहिजे. या जगात आज नानाविध धर्म दिसत असले, तरी त्यांतील विरोधाभासाची एकवाक्यता वेदान्तधर्मात होते हे आपण नि संशय सिद्ध केलें आहे. विश्वातील दृश्य विविधतेचे अतिम पर्यवसान एकात्मतेत होणें, हाच विश्वनियत्याचा कायदा असून परस्परसहिष्णुता व मदत याच्याच सहाय्यानें मानवजातीचा जीवनहेतु सफल होईल, हेही आपण चागल्या प्रकारे दाखविलें आहे. आपणासारख्या उच्च व पवित्र पुरुषाच्या नेतृत्वाखालीं जगाच्या इतिहासात जें हे एक नवे मन्वतर सुरू होत आहे तें प्रत्यक्ष पाहण्याचें भाग्य आम्हास प्राप्त झालें, याचा आम्हांस मोठा अभिमान वाटतो. या मन्वतरात धर्मवेड, हठवाद, द्वेष आणि विरोध याचा नायनाट होऊन प्रेम व सहानुकपा याचें साम्राज्य होईल, असा भरंवसा आम्हास आहे. परमेश्वराचा आपणास सदोदित आशीर्वाद असावा अशी मी त्याची प्रार्थना करतों.

वरील मानपत्र वाचून झाल्यानतर स्वामीजी सभागृहांतून बाहेर पडले व बाहेर उभ्या असलेल्या गाडींत जाऊन बसले. त्या वेळी जनसमुदाय अत्यत प्रचड जमला असून सर्वत्र आनदाचा व जयजयकाराचा कोलाहल इतका मोठा होता कीं, त्या वेळीं लहानसें भाषण करूनच समारंभाची परिसमाप्ति करणें इष्ट होतें. याकरिता पुढील लहानसें भाषण करून स्वामींनीं विस्तृत उत्तर पुढें देण्याचें अभिवचन दिलें:—

मनुष्याची इच्छा अमुक एक गोष्ट करण्याची असली, तरी ती पुरी होणें अथवा न होणें हे परमेश्वराच्या हातीं असतें, अशा अर्थाची एक म्हण इंग्रजी भाषेत आहे तिचें प्रत्यंतर आता येथेच येऊ पाहत आहे. मानपत्राचा आणि त्याच्या उत्तराचा समारंभ इग्रजी पद्धतीप्रमाणें एखाद्या लहानशा सभागृहांत व्हावा, अशी योजना आरंभीं करण्यांत आली होती, पण परमेश्वराच्या मनास ही गोष्ट आली नाहीं. रथांत उभें राहून भर रस्त्यावर हजारों माणसाच्या प्रचड समुदायात मीं भाषण करावें अशी त्याची इच्छा होती आणि तीमुळेंच हा योग जमून आला आहे. एका अर्थी जें झालें तेंच बरें झालें असें म्हटलें पाहिजे. कारण असा प्रसग भाषणास विशेष उद्युक्त करणारा असून मी जें कांहीं आपणांस सांगणार आहें त्यालाही पोषक असा आहे आपणा सर्वास माझें भाषण ऐकू जाईल कीं नाहीं याची मला मोठी शंका आहे, तथापि तसें होण्याचा शक्य तो यत्न मी करीन. एवढ्या मोठ्या मोकळ्या जागेंत जमलेल्या प्रचड जनसमूहासमोर भाषण करण्याचा प्रसग मला पूर्वी आला नव्हता कोलबोपासून मद्रासपर्यंत माझें स्वागत इतक्या प्रेमानें, मन पूर्वकतेनें आणि उत्साहानें झालें कीं, माझें स्वागत अशा प्रकारचे होईल अशी मला यत्किंचितही कल्पना नव्हती परंतु ही गोष्ट माझ्या कल्पनेच्या बाहेरची झाली असली, तरी तीमुळें माझा आनंद दुणावला हें मात्र खरें, कारण यामुळें माझ्या एका मताला चागली पुष्टि मिळाली प्रत्येक राष्ट्राचा जीवितहेतु वेगवेगळा असतो असें माझें मत आहे, आणि आजपर्यंत अनेक वेळा ते मीं बोलूनही दाखविलें आहे प्रत्येक राष्ट्राच्या वाढीचा मार्ग वेगळा आहे आणि त्या राष्ट्राची वाढ त्याच ठरींव मार्गानें होत असते. आमच्या हिंदु राष्ट्राच्या वाढीचा मार्ग, धर्म हा आहे. धर्म हा आम्हा लोकाचा जीवितहेतु आहे. इतर देशात धर्माला एवढें महत्त्व नाहीं. सामान्य आयुष्यक्रमात ज्या हजारों बाबींचा समावेश होतो, त्यापैकींच धर्म ही एक बाब, इतकाच समज पाश्चात्य देशात प्रचलित आहे. किंबहुना धर्माची बाब ही त्यांच्या दृष्टीने इतर सांसारिक बाबींहूनही कमी दर्जाची आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. उदाहरणार्थ, इग्लडांत धर्म ही एक राजकीय बाब समजली जाते. इग्लड हें अमुक एका विशिष्ट पथाचेंच समजलें जावें असा कटाक्ष धर्माच्या बाबतींत आहे. इग्लंडच्या धर्मपथांचा प्रमुख अधिकार

तेथील गादीच्या हातीं आहे. गादीवर असलेल्या व्यक्तीचा विश्वास त्या विशिष्ट पथावर असला अथवा नसला तरी तख्तनशीन व्यक्तीनें त्या पथाचा पुरस्कार केलाच पाहिजे; आणि असे करणे हे आपलें राष्ट्रीय कर्तव्य आहे असें समजून ती व्यक्तिही त्या पथाचा पुरस्कार अवश्यमेव करते. इग्लडांतील सर्व घरदाज स्त्रीपुरुषाचा पाठिंबा या पथाला असला पाहिजे, असा समज तिकडे सर्वत्र प्रचलित आहे. एखाद्या गृहस्थाचा कुलीनपणा सिद्ध होण्यास ज्याप्रमाणे अनेक बाबी त्याजजवळ असाव्या लागतात, त्याचप्रमाणे स्वत स त्या विशिष्ट राष्ट्रीय धर्मपथाचा म्हणविणें ही एक बाब आहे इग्लडची गोष्ट इतर देशासही लागू पडते. प्रत्येक राष्ट्राच्या महत्वाची एक एक विशिष्ट बाब असते. मोठाले राजकारणी पुरुष निर्माण करणे हाच एखाद्या राष्ट्राचा विशेष असतो दुसरें एखादे राष्ट्र महाबुद्धिमान् पुरुष निर्माण करीत असते. तिसरें राष्ट्र क्षात्रगुणांची परमावधि करण्यातच स्वत स धन्य मानते, आणि चवथें वणिग्वृत्तीच्या पूर्ण वाढींत गुतलेलें असते. प्रत्येक राष्ट्राचे लक्ष आपआपल्या विशिष्ट गुणाच्या वाढीकडे लागलेलें असते हा विशिष्ट गुण वगळून ज्या अनेक कमी दर्जाच्या बाबींचा अतर्भाव राष्ट्राच्या घटनेंत होतो, त्या अनेक बाबींपैकी धर्म ही एक बाब तिकडे समजली जाते. अलकारानीं मूळ सौदर्याचें पोषण होत असलें, तरी अलकाराची योग्यता ज्याप्रमाणें कमी दर्जाची समजली जाते, त्याचप्रमाणें धर्म हासुद्धा एक अलंकार आहे, इतकीच योग्यता पाश्चात्यांच्या दृष्टीनें धर्माला प्राप्त झाली आहे. या बाबतींत आमचा देश इतर देशाहून सर्वथा भिन्न आहे. धर्म हा आमचें जीवनसर्वस्व आहे. धर्म हा आमच्या राष्ट्रीय जीवनाचा मूळ पाया आहे. आमच्या राष्ट्राच्या जीविताचा प्रमुख आधारस्तभ धर्म हाच आहे. आमच्या राष्ट्राचें जें कांहीं बरें वाईट रूप आज दिसत आहे, त्याच्या घटनेंत मुख्यत धर्माचा अतर्भाव झालेला आहे. राजकारण, सत्ता, सामर्थ्य आणि बुद्धि हीं सारीं दुसऱ्या दर्जाचीं आहेत. खऱ्या धार्मिक पुरुषाबद्दल जो आदर आम्हा हिंदु लोकाच्या चित्तांत वसत असतो, तसा आदर अत्यत बुद्धिमान् पुरुषाबद्दलही आमच्या चित्तांत नसतो. यामुळें धर्म ही आमची एक प्रमुख बाब होऊन बसली आहे. आम्हा हिंदु लोकांत चौकसबुद्धि नाहीं, असा प्रवाद हजारो वेळां माझ्या कानावर आला आहे;

आणि सामान्यतः हा आरोप अगदीं खोटा आहे असेंही म्हणता यावयाचें नाहीं मी कोलंबो शहरीं आलों तेव्हां युरोपात ज्या अनेक राजकीय उलाढाली होत होत्या, त्याची यत्किंचित्‌ही माहिती तेथील पुष्कळशा लोकांस नव्हती हें खरें, त्याचप्रमाणें लोकसत्तावाद अथवा त्याचेंच अधिक उग्र स्वरूप समानतावाद ( Socialism ) अथवा अराजकता ( Anarchism ) इत्यादि ज्या अनेक उलाढाली सांप्रत युरोपात सुरू आहेत, त्याचाही मागमूस सिलोनांत पुष्कळास नव्हता हेही खरे, तथापि हिंदुस्थानातला एक सन्यासी अमेरिकेत गेला होता आणि त्यानें तेथें धर्मसभेत कांहीं नाव केलें, ही गोष्ट मात्र तेथील आबालवृद्धांस माहीत होती, असें मला आढळून आलें यावरून आमचे लोक चौकस नाहीतच असे म्हणता यावयाचें नाही जगातल्या कसल्याही विषयाच्या माहितीची आवड त्यांस नाही असें नाहीं, पण मुद्दा इतकाच की, ते आपल्या आवडीच्या विषयाची माहिती मिळविण्यास मात्र उत्सुक असतात आपल्या जीवनाच्या प्रमुख हेतूबद्दल ते कधीही उदासीन नसतात. तेवढया विशिष्ट विषयास अनुलक्षून चाललेल्या घडामोडींची माहिती त्यास पूर्ण असते. राजकारण आणि याच प्रकारच्या इतर गोष्टी यांचा अतर्भाव आमच्या प्रमुख हेतूत पूर्वीपासूनच झालेला नव्हता. आपलें जीवितसाफल्य या विषयाच्या माहितीवर अवलंबून आहे असें आम्हा लोकांस कधीही वाटलें नाही. आमचे जीवितसाफल्य फक्त धर्मसाधनावर आणि आत्मवर्धनावर अवलबून आहे असा आमचा प्राचीनकाळापासून समज आहे, आणि आमच्या राष्ट्राची भावी वाढही याच साधनावर अवलबून आहे. जगातील राष्ट्रापुढें दोन प्रमेये माडलीं गेली असून तीं सोडविण्याच्या खटपटीत तीं गुतली आहेत. हिदुस्थानाने एका प्रमेयाची बाजू उचलली असून जगातील बाकीच्या राष्ट्रानीं दुसऱ्याची बाजू उचलली आहे. जगांत अखेरपर्यंत कोण टिकाव धरून राहणार या प्रश्नाचें उत्तर देण्याच्या खटपटीत जग गुतलें आहे. एक राष्ट्र अनेक आपत्ती भोगूनही जिवत कां राहतें आणि दुसरे राष्ट्र नामशेष कां होतें, या प्रश्नाचें उत्तर जगाला हवे आहे. प्रेम जिवत राहील कीं द्वेष जिवत राहील, त्याग अखेर मारील कीं भोग जिंकील, जडाचा जय होईल कीं चैतन्याचा होईल, या प्रश्नांचीं उत्तरें जगाला हवीं आहेत. इतिहासकालाच्याही पूर्वी आमच्या पूर्वजांनीं या प्रश्नांचीं उत्तरे देऊन ठेवलीं आहेत.

ज्या ठिकाणीं दंतकथांचेही किरण प्रवेश करूं शकत नाहींत, इतक्या प्राचीन काळीं आमच्या पूर्वजांनीं याच प्रश्नांचा खल करून त्यांस उत्तरेंही देऊन ठेवलीं आहेत हीं आपलीं उत्तरें खोटीं आहेत असें सिद्ध करण्यास त्यांनीं साऱ्या जगास आव्हान देऊन ठेवलें आहे " न धनेन न प्रजया त्यागेनैकेनामृतत्वमानशु ।" असें त्याचें स्पष्ट उत्तर आहे. त्याग, दान, निर्भयता आणि प्रेम हीं जिवत राहण्याचीं साधनें आहेत असें त्याचें म्हणणें आहे. इंद्रियजन्य सुखाची वासना टाकून देणें हेंच राष्ट्राच्या चिरजीवितांचें साधन आहे त्यांचें हें उत्तर चुकीचें आहे कीं बरोबर आहे, हे पाहावयास फार लांब जाणे नको. इतिहासाच्या सामान्य अवलोकनानेंही ह्या प्रश्नाचा निकाल लागेल. शतकाच्या आरंभीं एखादे राष्ट्र उदय पावतें, मध्याच्या सुमारास तें विलक्षण भरभराटींत असतें आणि त्याच शतकाच्या अखेरीस त्याचीही अखेर होऊन दुसरेंच एखादें राष्ट्र क्षितिजावर उगवू लागते हा चमत्कार इतिहासात अनेक वेळां घडून आलेला दिसतो. धूमकेतूप्रमाणें एकाएकी उगवावे, चार दिवस जगभर धुमश्चक्री माजवावी आणि अखेरीस एकाएकीं नष्ट व्हावे हा खेळ अनेक राष्ट्रांनीं आजपर्यंत खेळून दाखविला आहे. आमच्या या प्रचंड आर्यकुलावरही अनेक वेळा अनेक आणीबाणीचे प्रसंग आले होते कित्येक वेळां दुर्दैवानें त्याची पुरी पाठ घेतली होती अनेक प्रकारच्या संकटानीं त्याजवर काहूर माजविलें होते. अनेक प्रकारच्या बऱ्या वाईट परिस्थितींचीं वावटळें त्याजवरून वाहवत होतीं. खरोखर अशा प्रकारची अस्मानीसुलतानी जगांतील दुसऱ्या कोणत्याही राष्ट्राने भोगिली नसेल, पण चमत्कार हा कीं, इतक्या आपत्तींतूनही तें अद्यापि जीव धरून आहे याचें कारण काय ? याचें कारण इतकेंच कीं, " त्यागेनैकेनामृतत्वमानशु " हें त्याचें ब्रीदवाक्य आहे. त्यागावांचून धर्म सपादन होणें शक्य नाहीं. भोग किती प्रकारांनी भोगतां येईल याचे कोष्टक आज पाश्चात्य राष्ट्रे तयार करीत आहेत. भल्याबुऱ्या—कसल्याही—उपायानें मनुष्याला अधिकाधिक सत्ता कशी गाजवितां येईल, याचा विचार त्याच्या डोक्यात रात्रदिवस घोळत आहे. युरोपांतील राष्ट्रांच्या घटनेचा मुख्य पाया म्हटला म्हणजे अहमहमिका हीच होय. प्रत्येक गोष्ट या एकाच तत्त्वावर चालावयाची, सव राष्ट्रांची परस्परात चढाओढ आणि प्रत्येक राष्ट्रांत व्यक्तीव्यक्तींत चढाओढ;

मिळून सर्वत्र चढाओढ आणि चुरस याचें साम्राज्य झालें आहे. या चढा-ओढीचा परिणाम सर्वत्र एकाच प्रकारचा असावयाचा हे उघड आहे. चढा-ओढीमुळे दुष्टपणा, सहानुकपेचा अभाव आणि हृदयशून्यता याचें पीक मात्र तिकडे सोळा आणे आलें आहे युरोपातील समाजघटनेचा मूळ पाया या प्रकारचा आहे. आमचा पाया याहून अगदी वेगळ्या प्रकारचा आहे. जातिभेद हा आमच्या समाजाचा एक घटक आहे. यामुळें धद्याची चढाओढ आपोआपच बद झाली. चढाओढींच्या अभावीं तिच्यातील दुष्ट सामर्थ्यही नष्ट झाले; यामुळें पुढील पायरी जी क्रूरता तीही नाश पावली, आणि अशा रीतीनें अज्ञेय जीवनारण्यातून पलीकडे जाण्याच्या वाटेतील निवडुग आणि बाभळी यांचें निर्मूलन झालें.

( इतके भाषण होत आहे तों त्या जागी माणसाची इतकी बेसुमार खेचाखेंच झाली की, स्वामीचे भाषण कोणासच ऐकू जाईनासें झालें. यामुळें पुढील थोडेंसें भाषण होऊन समारंभ पुरा झाला. )

सुहृज्जनहो, तुमचा हा उत्साह पाहून माझें हृदय आनदाने भरून येत आहे हा सारा देखावा मला अभूतपूर्व वाटतो. तुमच्याबद्दल मला अनादर वाटतो ही कल्पनासुद्धा मनात आणू नका तुमच्या उत्साहाचा अतिरेकही मला अत्यत प्रिय आहे. आपणा सर्वांना सध्या विलक्षण उत्साहाचीच जरूर आहे. सर्वत्र भयकर उत्साह पाहिजे आहे. मात्र हीच स्थिति चिरकाल राहील अशी तजवीज केली पाहिजे. असाच उत्साह सदोदित कायम ठेवा. ह्यात उणेपणा येऊ देऊ नका. आपणांस अत्यत महत्त्वाची कामगिरी यापुढे करा-वयाची आहे. या कार्यात आपणा सर्वांची मदत मला हवी आहे आणि त्याक-रिता अशाच प्रकारचा दाडगा उत्साह हवा आहे. आपण सर्वांनीं माझे जें प्रेमपुरस्सर आणि मनःपूर्वक स्वागत केले, त्याबद्दल पुनः एकवार मी आपली कृतज्ञता व्यक्त करतों. पुढे शाततेच्या वेळी आपणास परस्परांशी अनेक गोष्टींची चर्चा करावयाची आहे. याकरिता सध्या आपली मी रजा मागतो. सर्वांस कळेल अशा रीतीनें बोलणें मला शक्य नसल्यामुळें माझ्या दर्शनानेंच सध्या तृप्त व्हा. पुढील एखाद्या प्रसंगी माझे चार विचार मी आप-णांस कळवीन.

---

# भावी कार्याची रूपरेषा.



( व्हिक्टोरिया हॉल, मद्रास. )

आपण सर्वांनीं माझें जें अत्यत उत्साहपूर्वक स्वागत केलें, त्याबद्दल आपले आभार प्रथम मानणें युक्त आहे आपण मला दिलेल्या मानपत्रात जे विचार प्रकट केले आहेत, त्याजबद्दल माझ्या मनांतील भाव कोणत्या शब्दानी व्यक्त करावा, हे मला कळत नाहीं याकरिता त्यात ज्या अनेक गुणांचा आरोप आपण मजवर केला आहे, त्यास साजेशी कृति माझ्या हातून घडो, इतकीच प्रार्थना मी ईश्वरापाशीं करतो. माझा सारा जन्म धर्म-सेवेत जावो आणि माझ्या हातून माझ्या मातृभूमीची सेवा अखंड घडो, इत-केच माझें त्याजपाशीं मागणें आहे

माझ्या अगीं अनेक प्रकारचे दुर्गुण असले, तरी त्यांजबरोबर थोडेंबहुत धैर्यही माझ्या अगी आहे असें मला वाटतें. माझ्या मातृभूमीचा एक निरोप मला पाश्चात्यास पोहोचवावयाचा होता, आणि मोठ्या धीटपणानें तो मी इग्रजांस व अमेरिकनास पोहोचविला. आजच्या माझ्या विषयास आरभ करण्यापूर्वी आपणा सर्वांस मला चार शब्द सागावयाचे आहेत. हे शब्द आपणास विशेष धाष्टर्याचे वाटतील असें मला वाटते. माझ्याभोंवतीं काहीं विशिष्ट परिस्थितीचे जाळे विणलें जात होतें या जाळ्यात गुतून माझे हातपाय पक्के जखडले जाण्याचा सभव होता, आणि तसे झालें असतें तर मी जन्माचा निकामी झालो असतो; पण " समर्थाचिया सेवका वक्र पाहे । असा सर्व भूमंडळी कोण आहे ॥ " ही सत्पुरुषाची वाणी खोटी कशी होईल? अशा प्रकारचे यत्न अती निष्फळ व्हावयाचेच, आणि या वेळींही व्हावयाचें तेंच झालें गेली तीन वर्षे माझ्याबद्दल अनेक प्रकारचा गैरसमज उत्पन्न झाल्याचे मला आढळून आलें, परतु मी परदेशात असल्यामुळे मूग गिळून बसलो होतो. माझ्याविरुद्ध चाललेल्या खटपटीस मीं एका शब्दानेही प्रत्युत्तर दिलें नाहीं, पण आता मी स्वदेशास आलो आहे. याकरिता आता कांहीं विशेष खुलासा करणें इष्ट आहे. माझ्या शब्दांचा जो काय परिणाम होईल त्याबद्दल मला धास्ती वाटते अशातला भाग नाहीं, तसेच माझ्या शब्दांनीं आपल्या मनांत माझ्याबद्दल ज्या कल्पना येतील, त्यांजबद्दलही मला फारशी पर्वा नाहीं; कारण मी पूर्वीप्रमाणेंच आजही खरोखर संन्यासीच

आहें. चार वर्षांपूर्वी दंडकमडलू हातीं घेऊन मी आपल्या नगरीं आलों त्या वेळीं जसा मी होतों तसाच आजही आहें. त्या वेळीं ज्याप्रमाणें अलम दुनिया मला मोकळी होती, त्याचप्रमाणें आजही ती मला मोकळी आहे; पण आतां अधिक प्रस्तावना न करतां मला जे चार शब्द आपणास सांगावयाचे आहेत ते सांगून मोकळा होतों.

प्रथम थिऑसॉफिकल मडळीबद्दल मला बोलावयाचें आहे. या मडळीनें आमच्या बऱ्यासाठीं कांहीं गोष्टी केल्या आहेत याबद्दल कोणाचाही वाद नाहीं; आणि त्या गोष्टींबद्दल प्रत्येक हिंदूच्या मनांत आदर असावा हेंही योग्य आहे. विशेषतः मिसेस बेझट यांजबद्दल योग्य आदर वाटणे स्वाभाविक आहे बेझट बाईबद्दल मला फारशी माहिती नाहीं, तथापि मला जी थोडीबहुत माहिती आहे, तीवरून त्या बाई आमच्या मातृभूमीच्या खऱ्या हितचिंतक आहेत अशी माझी खात्री झाली आहे. आमच्या देशाचें डोके वर निघावें याकरितां त्या मनःपूर्वक खटपट करीत आहेत असें मला खात्रीपूर्वक वाटतें. प्रत्येक खऱ्या दिलाच्या हिंदूनें त्याच्या या कृतीबद्दल कृतज्ञ रहावें. या त्यांच्या सत्कृत्याचें फळ परमेश्वर त्यास देईल यात शका नाहीं, पण बेझटबाईबद्दल कृतज्ञ असणें ही गोष्ट वेगळी आणि थिऑसफीच्या मंडळींत प्रविष्ट होणें ही गोष्ट वेगळी, हें मात्र पक्के ध्यानांत ठेवलें पाहिजे. एखाद्याबद्दल आपल्या मनात योग्य आदर, प्रेम आणि पूज्यबुद्धि असणें वेगळें, आणि त्याचा प्रत्येक शब्द, कांहींही विचार न करता ब्रह्मवाक्य म्हणून चित्तात साठविणें हे वेगळें थिऑसफीच्या मडळीनें अमेरिकेंत मला पुष्कळ साहाय्य केलें आणि इग्लडात व अमेरिकेंत जें मला थोडेंफार यश मिळालें त्याचें श्रेय मुख्यत त्या मंडळीकडेच आहे, अशा प्रकारच्या अफवा पसरल्याचें माझ्या कानावर आलें आहे. याबद्दल मी आपणांस इतकेंच सागतों कीं यांतील प्रत्येक अक्षर साफ खोटे आहे. त्यात कोठें सत्याा अशही नाहीं. “वचने किं दरिद्रता ।” या वाक्याचा प्रत्यय आपणास या जगात पावलोपावलीं येत असतो. कल्पनेचें मानसिक औदार्य आणि कल्पनेंतील उदार बुद्धीचे विचार यांस कधींच वाण पडत नाहीं. कल्पनेच्या साम्राज्यांत आपण प्रत्यक्ष आपल्या शत्रूवरही प्रेम करीत असतों; पण ही गंधर्वनगरी सोडून आपण या सामान्य मृत्युलोकांत प्रवेश केला म्हणजे मात्र सगळें मान बदलतें. दुसऱ्याशीं आपण

नेहमीं सहानुकंपा बाळगतों, पण ती कोठपर्यंत ? जोंपर्यंत दुसरा आपलें सारें म्हणणें बिनतक्रार ऐकतो तोंपर्यंत; पण आपल्या म्हणण्यावर थोडासाही आक्षेप घेण्याचें धाष्टर्य त्यानें केलें कीं, आपल्या हृदयांतील सहानुकंपेचा आणि प्रेमाचा झरा कोरडा झालाच. याशिवाय, जगांत आणखीही एका मासल्याचे लोक असतात हे लोक निवळ स्वकार्यसाधू असतात. एखाद्या ठिकाणीं आपला जम नीटसा बसत नाहीं असे त्यांस आढळून आलें कीं, त्यांच्या तळव्याची आग मस्तकाला जाते, आणि अशा वेळीं त्यांच्या हृदयांतील सारें विष ते ओकीत असतात. प्रतिपक्ष्यास कोणत्या रीतीनें चीत करावें याचा विचार ते करू लागतात. हिंदूनीं आपल्या समाजातील घाण काढून टाकण्याची खटपट केली, तर त्यांत ख्रिस्ती मिशनऱ्यांचें काय वेचते ? ब्राह्मसमाज आणि त्याच प्रकारचे इतर समाज हे आमच्या समाजावर तुटून कां पडतात ? आम्हीं आपल्याच पद्धतीनें आमच्या समाजाची सुधारणा करण्याचा यत्न केला, तर त्यात त्यांचें काय बिनसतें ? त्यानीं सदोदित आमच्या वाटेत आडकाठी कां घालावी ? आमची प्रत्येक चळवळ हाणून पाडण्याचा यत्न त्यानीं का करावा आणि आम्हांस सदोदित शत्रूसारखे का लेखावे ? आमच्याबद्दल त्यांच्या मनांत इतका तीव्र द्वेष आहे कीं या प्रकारच्या प्रश्नांना त्याजकडून उत्तरेंही मिळावयाचीं नाहींत

आतां त्या गोष्टीला चार वर्षांचा काळ लोटला आहे. त्या वेळीं मी एक अकिंचन आणि अशरण असा संन्याशी होतों. त्या वेळची माझी संपत्ति म्हटली म्हणजे चार खुट जहागिरी हीच. त्या वेळी माझा मित्रही मीच मी अमेरिकेस जावयास निघालो. अनंत विस्ताराचा समुद्र ओलांडून अमेरिकेत जावें असा मीं बेत केला. त्या खंडात माझे ओळखीचें असें कोणीही नव्हते. त्यावेळी थिऑसॉफीच्या मंडळीच्या पुढाऱ्यांची भेट मीं घेतली, आणि अमेरिकेंत एखाद्या भल्या गृहस्थाला ओळखपत्र मला द्या, अशी विनति मी त्याजपाशीं केली. त्यावर ते मला म्हणाले ‘ आमच्या मंडळींत तुम्ही नाव घालाल काय ? ’ मी ‘ नाहीं ’ असें उत्तर दिलें, आणि पुढें म्हटलें ‘ आपल्या बऱ्याचशा मतावर माझा विश्वास नाहीं, त्या अर्थी मीं आपल्या मंडळीत सामील कसें व्हावे ? ’ माझें उत्तर ऐकून घेऊन ते म्हणाले ‘ तर मग आपली विनति मला मान्य करतां येत नाहीं याबद्दल मी फार दिलगीर आहें. ’ अमेरिकेत माझा मार्ग

सुलभ करण्याचा आरंभ या रीतीने झाला आहे. यानतर माझ्या काही स्नेह्या-च्या मदतीनें मी अमेरिकेस गेलों हे आपणास ठाऊक आहेच. त्या माझ्या स्नेह्यांपैकीं बहुतेक आज येथे हजर आहेत. फक्त न्या. सुब्रह्मण्य अय्यर मात्र येथे नाहींत. माझ्या आयुष्यात ज्या काहीं खऱ्या अत करणाच्या स्नेह्याचा लाभ मला झाला, त्यापैकीच न्यायमूर्ति हे एक आहेत. हे गृहस्थ अत्यत कुशाग्र बुद्धीचे असून स्वताच्या जन्मभूमीबद्दल त्याच्या मनात खरी भक्ति आहे. असो

मी अमेरिकेत पोहोचलों तेव्हा महाधर्मपरिषद भरण्यास बऱ्याच महि-न्याचा अवकाश होता. माझ्यापाशी जो थोडासा पैका शिल्लक राहिला होता तो केव्हाच सपला पुढें लवकरच हिवाळा सुरू झाला माझ्याजवळ जीं वस्त्रे होतीं ती अगदीं हलकीं व उन्हाळयात मात्र उपयोगीं पडण्यासारखीं होती. थडीच्या दिवसांकरिता लागणाऱ्या कपड्याची काय व्यवस्था करावी हे मला सुचेना अमेरिकेत भीक मागण्याचीही चोरी मी भीक मागितली असती तर ताबडतोब मला बिनभाड्याचे घर पाहावे लागलें असते शेवटीं माझ्या मद्रास येथील स्नेह्यास मी ही हकीकत तारेनें कळविली. माझ्या या स्थितीची हकीकत थिऑसफिस्टाच्याही कानीं गेली, तेव्हा त्यापैकीं एकानें एका पत्रात लिहिलें कीं ‘ हे भूत आता लवकरच गाडलें जाणार, हो आम-च्यावर परमेश्वराची मोठी कृपा होय. ’ अमेरिकेत माझा मार्ग सुलभ केल्याचें थिऑसफिस्ट सांगतात मदत देण्याचे त्याचे मार्ग हेच आहेत काय ? हा पाढा आपल्यापुढे वाचण्याची माझी इच्छा नव्हती, पण माझ्या देशबांधवास खरी हकीकत कळण्याची फार इच्छा होती, आणि आज केवळ त्याऱ्या इच्छेस मान देऊनच मी हे सांगत आहे. गेल्या तीन वर्षात कधी चुकूनसुद्धा या गोष्टीची वाच्यता मीं केली नाही. “ मौनं सर्वार्थसाधनम् ” याच व्रताचा अगीकार मीं केला होता, पण प्रसगानें ओघाला आलें म्हणून आपणास हे थिऑसफि–पुराण सागितलें, पण या पुराणाची समाप्ति एवढयानेंच होते असें नाही. महाधर्मपरिषद भरली तेव्हा कित्येक थिऑसफिस्टाची भेट मीं घेतली. त्याचा स्नेह सपादावा व त्याच्या मडळींत मिळून मिसळून वागावे अशी माझी इच्छा होती. पण भेटीच्या वेळीं त्याच्या चेहऱ्यावर मजबद्दल विलक्षण तिरस्काराची छटा दिसली. ‘ हा क्षुद्र किडा आमच्या या इद्रभुवना-

तील देवांच्या सगतीस कशाला आला ' असेंच जणू काय त्यांस वाटत असावेंसे दिसलें. यानतर परिषदेत मला कीर्तीचा लाभ झाला तेव्हां अनेक प्रकारचीं कार्यें मजकडे चालून येऊ लागलीं, पण प्रत्येक वेळी थिऑसफिस्टाच्या मडळानें माझ्या मार्गांत खो घालण्याचा यत्न सुरू केला. थिऑसफीच्या सभासदानीं माझ्या व्याख्यानास हजर राहू नये अशी द्वाही फिरविण्यात आली. ते हजर राहिले तर त्याजवर मडळाचा बहिष्कार पडेल असेंही त्यास सांगण्यात आले. थिऑसफीच्या सभासदांत दोन मडळें आहेत. एक अतर्मंडळ आणि दुसरें बहिर्मंडळ. या अतरर्मंडळातील सभासदाचा असा कायदा आहे कीं, त्यानीं आपला अभ्यासक्रम फक्त कुतुहुमी आणि मोरया या महात्म्याकडूनच समजावून घ्यावा. आता हे महात्मे अदृश्य असल्यामुळे त्यांच्या प्रतिनिधित्वाचें कर्तव्य मि. जज्ज आणि मिसेस बेझट याजकडे आले आहे. या एकदर प्रकाराचा इत्यर्थ इतकाच कीं जो कोणी या मडळाचा सभासद होईल, त्याने आपलें मन आणि आपली बुद्धि ही या दोन प्रतिनिधीच्या स्वाधीन केली पाहिजेत. अशा प्रकारची गुलामगिरी माझ्या हातून होईल हे तर शक्यच नाहीं, एवढेंच नव्हे, तर जो कोणी हिंदु असल्या प्रकाराला आपली मान वाकवील तो खरा हाडाचा हिंदूच नाही असें मी स्पष्ट म्हणतो. मि जज्ज याच्याबद्दल माझ्या मनात आदरबुद्धि आहे. ते सद्गृहस्थ आहेत, ते खुल्या दिलाचे असून स्वभावाने साधे आणि सरळमार्गी आहेत. खरोखर, थिऑसफिस्टाच्या मडळींत योग्यतेने धुरीणाच्या मालिकेत अग्रस्थानीं बसण्यास हेच काय ते योग्य गृहस्थ आहेत मिसेस बेझट व मि. जज्ज यांचा जो वाद आपसात सुरू आहे, त्याजबद्दल टीका करण्याचा अधिकार मला नाही. आपला महात्माच खरा आहे असे दोघेही अट्टाहासानें प्रतिपादन करीत आहेत, आणि अत्यत नवलाची गोष्ट ही की दोघाचाही महात्मा एकच आहे यात सत्य काय असेल ते एक परमेश्वराला मात्र माहीत. दोन्ही बाजूला बडी बडीं धेंडे असता त्याच्या तट्याचा निकाल लावण्याचें सामर्थ्य फक्त परमेश्वरालाच असणार हे उघड आहे. असो. अशाच रीतीनें त्यांनी माझा अमेरिकेतील मार्ग सुलभ केला. त्याच्या या कार्यात आणखीही एक त्यांचे भाऊ त्यांना भेटले. हे नवे भाऊ म्हणजे ख्रिस्ती मिशनरी. या भल्या गृहस्थांनीं माझा पिच्छा पुरविण्याचा जणूं काय विडा उचलला

होता! माझ्यावर अनेक कृष्णकृत्यें केल्याचे काल्पनिक आरोप लादण्यांत आले शहरोशहरीं फिरून त्यांनीं माझी नालस्ती आरंभिली. मी आधींच परक्या देशांतला, आणि त्यांतून तेथें मला कोणी स्नेहीसोबती नाहीं, या गोष्टीची सुद्धां त्यांनीं पर्वा केली नाहीं अमेरिकेंतील प्रत्येक घर मला पारखे व्हावें अशी खटपट त्यांनीं आरंभिली तसेंच माझ्याशीं मित्रत्व संपादू इच्छिणाऱ्या लोकांत खोट्यानाट्या गोष्टी पसरवून ते माझे शत्रू व्हावे अशीही योजना ते करूं लागले मला खाण्यासही मिळू नये अशी त्यांची इच्छा होती. बांधवहो, या त्यांच्या कृत्यांत माझ्याच देशबांधवापैकीं एक इसम सामील झाला होता, याहून अधिक खेदाची गोष्ट ती कोणती! हे हिंदी सद्गृहस्थ आपणांस सुधारकांचे अग्रणी म्हणवितात! हिंदुस्थानांत ख्रिस्ताचा अवतार झाला आहे असेंही हे म्हणत असतात. ख्रिस्ताला हिंदुस्थानांत आणावयाचा मार्ग हाच काय? हिंदुस्थानाची सुधारणा याच मार्गानें होणार काय? या भल्या गृहस्थाची आणि माझी ओळख लहानपणापासून होती. मी त्याला आपला मित्र समजत होतों. माझी आणि त्याची अमेरिकेत भेट झाली त्या वेळेपर्यंत माझ्या दृष्टीस माझा एकही देशबांधव पडला नव्हता यामुळें त्याला पाहताक्षणींच मला हर्षाचा केवढा उमाळा आला असेल याची कल्पना करा, आणि या माझ्या हर्षाबद्दल मला कसें बक्षिस मिळालें तेही पहा. धर्मपरिषदेंत माझी वाहवा झाली आणि चिकागो शहरांत मी लोकप्रिय झालो, त्या वेळेपासून त्यांची वर्तणूक बदलली आणि हरएक प्रकारें माझी विडंबना करण्याची खटपट ते करू लागले. वीस वर्षें ख्रिस्ताच्या पायापाशीं बसून ते हेच शिकले काय? ख्रिस्ती धर्म आणि ख्रिस्ती सत्ता यांच्या संयोगानें हिंदु लोकांचें कल्याण होणार असें आमच्या सुधारकास वाटते हिंदुस्थानाचे कल्याण याच रीतीने व्हावयाचे काय? आमच्या भावी कल्याणाचा हा एक मासला असेल, तर भविष्यत्काल फारसा आशेचा दिसत नाहीं.

आता आणखी थोडीशीच हकीकत सांगावयाची आहे. सुधारकांच्या पत्रांतून मी शूद्र आहें असे उल्लेख मला आढळून आले, आणि शूद्राला संन्यास-ग्रहणाचा अधिकार आहे काय अशीही पृच्छा केली गेल्याचे मला दिसलें. या त्यांच्या प्रश्नाला मी एवढेंच उत्तर देतों कीं, “यमाय धर्मराजाय चित्र-गुप्ताय व नमः।” असा मंत्र म्हणून ब्राह्मण ज्याच्या पदकमलीं पुष्पांजलि

अर्पण करतात त्याच्या कुळांत या देहाचें जतन झालें आहे, आणि त्याच्याच कुळात अत्यत शुद्ध असे क्षत्रिय निर्माण झाले आहेत. आपला विश्वास आपल्या पुराणग्रथांवर असेल, तर माझ्या सुधारकबांधवांस माझें इतकेच सागणे आहे को, माझ्या जातीनें अर्ध्या हिंदुस्थानावर कित्येक शतके राज्य केलें आहे. याहून त्यानीं ज्या काहीं अधिक मोठ्या गोष्टी केल्या आहेत, त्या वेगळयाच माझी जात आपण इतिहासांतून वजा केली, तर आर्यसस्कृतींत कितीसा भाग शिल्लक राहील? एकट्या बगाल देशापुरताच विचार केला, तर तेथला अत्यत मोठा तत्त्ववेत्ता, अत्यत मोठा कवि, अत्यत मोठा इतिहासलेखक, अत्यत मोठा पुराणवस्तुसशोधक आणि अत्यत मोठा धार्मिक पुरुष माझ्याच जातींत निर्माण झाला असल्याचे आढळून येईल सांप्रतच्या युगातील एक अत्यत मोठा भौतिकशास्त्रविशारदही माझ्याच जातीत पैदा झाला आहे माझ्यावर प्रहार करू पाहणारानीं आमचा पूर्वेतिहास तरी लक्ष्यात घ्यावयाचा होता ! ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य या वर्णत्रयास सन्यासग्रहणाचे समान हक्क आहेत, हे तरी त्यास ठाऊक असावयास पाहिजे होते ! त्रैवर्णिकास वेदाध्ययनाच्या बाबतीत समान हक्क आहेत हे त्यांनीं कधीं ऐकलें आहे काय ? असो. हे केवळ ओघाला आलें म्हणून मी बोललों. त्यानी मला शूद्र म्हटलें अथवा आणखीही काहीं म्हटलें तरी त्याचा मला खेद नाहीं खालच्या जातीच्या लोकावर माझ्या वर्णानें पूर्वकाळी जी अबाधित सत्ता गाजविली त्याचेंच हे एक योग्य बक्षिस मला मिळत आहे असें मी समजतों. मला कोणीं महार म्हटलें तर मला खरोखर अधिकच आनद होईल. कारण ब्राह्मणवर्णातील ज्या खऱ्या ब्राह्मणानें महाराच्या घरची झाडलोट केली त्या विप्रोत्तमाचा मी शिष्य म्हणवितो या माझ्या सद्गुरूनी भर मध्य रात्रीं हळूच उठून एका महाराच्या घरी जावे आणि त्याच्या घरातील शौचकूपाची झाडलोट करावी, आणि आपल्या मस्तकावरील जटाभारानें सर्व जागा झाडून काढावी ! ही गोष्ट एकदोनदाच घडली असेंही नाहीं. कित्येक रात्री त्यांचा हा क्रम सुरू होता. असें करण्यांत त्याचा हेतु हाच कीं, आपल्या हातून सर्वांची सेवा घडावी. आपण सर्वांचे सेवक आहो हा भाव चित्तात पक्का बिंबावा यासाठीं त्यानीं हा अभ्यास केला ! त्याची चरणकमलें मी आपल्या मस्तकीं धारण केलीं आहेत तेच माझें आदिदैवत

आहेत. त्यांच्याच मार्गानें जाण्याचा यत्न मी करीन. मुगी होऊन साखर खावी हाच हिंदूचा स्वोन्नतीचा मार्ग आहे सामान्य वर्गाची सेवा करून त्यांची उन्नति करण्याचा मार्ग आपण स्वीकारिला पाहिजे. परकीयाकडून होणाऱ्या उन्नतीवर अवलबून राहण्यांत फायदा नाहीं. वीस वर्षें पाश्चात्य सस्कृतींत मुरलेला मनुष्य आपल्या मित्रास परदेशात उपाशीं मारण्याची खटपट करतो हे पाहिले म्हणजे पाश्चात्य संस्कृतीचा आम्हास खरोखर कितीसा उपयोग होणार याची शका वाटू लागते. याच्या उलट अस्सल जुनाट हिंदूच्या सस्कृतींत मुरलेल्या माझ्या गुरूचे उदाहरण पहा. लक्षावधि सुधारकानीं आपल्यातून असल्या प्रकारचा एक तरी नमुना उत्पन्न करून दाखवावा म्हणजे मी त्याचा दासानुदास होऊन राहीन आणि त्याच्या पायाशीं बसून भावी आयुष्याचे धडे घेईन, पण असें उदाहरण नजरेस पडेपर्यंत मात्र मी त्यांच्या वाऱ्यासही उभा राहू इच्छित नाहीं. औदार्याच्या लक्षावधि गोष्टी नुसत्या बोलण्यापेक्षां एक पै किमतीची प्रत्यक्ष कृति अधिक इष्टफलदायी आहे

आता मद्रास येथील काहीं सुधारक मडळयाबद्दल चार शब्द सागणें इष्ट वाटतें. माझ्याशीं त्यांची वर्तणूक फारच ममताळूपणाची होती. मद्रास येथील सुधारकात आणि आमच्या बगाली सुधारकात पुष्कळ अतर आहे हे त्याचें म्हणणेंही मला कबूल आहे. सध्याच्या काळी मद्रास येथील परिस्थिति विशेष प्रकारची अनुकूल आहे, असें मी अनेक वेळा म्हटल्याचें आपल्या लक्षात असेलच. कृति आणि प्रतिकृति याच्या प्रचड हेलकाव्यात सांपडलेल्या बगालप्रमाणे येथली स्थिति नाहीं. येथे फार हळूहळू पुढें पाऊल पडत आहे ही गोष्ट खरी, पण येथे खबीरपणा आणि स्थैर्य अधिक आहे हेही खरें आहे. बऱ्याचशा बाबतींत बगाल्यात अशतः तरी उलथापालथ झाली आहे तशी गोष्ट येथें झालेली नाही. येथें हळूहळू पाऊल पुढेंच पडत आहे येथील उन्नतीचा मार्ग अधिक नैसर्गिकपणें आक्रमिला जात आहे. अशी स्थिति असल्यामुळें, बंगाल्यांतील सुधारक आणि येथील सुधारक यांत जें अतर दाखविण्यात येतें तें वास्तविक आहे यांत शंका नाहीं. तथापि येथेही काहीं ठिकाणीं एक गोम मला आढळली. येथील काही मडळ्यांनीं मीं त्यांच्यात मिसळावें अशी खटपट केली, किंबहुना यांत थोडा धाकदपटशाचा प्रकारही आढळून आला; परंतु धाकदपटशाला भीक घालणारा

मी नव्हें हें ते विसरले कडकडीत उपास काढण्याचे प्रसंगही ज्या मनुष्यानें एकदोनदां नव्हे तर सतत चौदा वर्षे निभावून नेले, उद्यांचें जेवण कोठें मिळणार हें देखील ज्याला निश्चयपूर्वक सागता येणें शक्य नव्हतें, आणि कष्टविलेल्या देहयष्टीला रात्रभर निवाऱ्याची जागा कोठें मिळेल हेंही ज्याला ठाऊक नव्हतें, असला मनुष्य धाकदपटशाला बधणार काय ? " दिशोऽपि वसनम् " हें ज्याच्या पाचवीला पुजलेलें आणि अशा स्थितींतही शून्याच्या खालीं तीस अशांवर पारा असतो अशा ठिकाणीं जो राहिलेला, त्याला धाक कोण दाखविणार ? या मडळीला अत्यत नम्रतापूर्वक एकच गोष्ट मला सागावयाची आहे, ती ही की, माझ्या ठिकाणीं थोडेंसें स्वावलबन आहे स्वत च्या बुद्धीनें चालण्याची प्रबल इच्छा माझ्या ठिकाणीं थोडीशी आहे. तसेंच या जगाचा थोडाबहुत अनुभवही मी प्रत्यक्ष घेतला आहे या जगाला एक निरोप पोहोचविण्याचे जें कार्य मजकडे सोंपविण्यात आलें आहे, तें मी कशालाही न भिता पार पाडोन हें माझें कार्य मी करीत असतां उद्या माझें काय होईल हा विचारही माझ्या चित्तास शिवणार नाहीं मी त्यांस निक्षून असें बजावितो की, मी त्याच्याहूनही अधिक सुधारणेच्छु आहें त्याच्या सुधारणेची मजल फारच थोडी आहे सर्व हिंदुस्थान देश आमूलाग्र सुधारला पाहिजे, अशी माझी इच्छा आहे त्याच्यात आणि माझ्यात फरक आहे तो फक्त मार्गाचाच. त्याचे मार्ग आणि माझे मार्ग भिन्न आहेत. त्याचे मार्ग विग्राहक आहेत, माझे मार्ग संग्राहक आहेत. पूर्वीच्या रचनेंत मोडतोड करणे हा त्याचा मार्ग आहे, आणि पूर्वीच्या रचनेंत इष्ट तेवढाच बदल करणें हा माझा मार्ग आहे मोडतोडीनें सुधारणा होते असें मला वाटत नाहीं. मोडतोड न होता समाज वाढीला लागला पाहिजे असे माझें मत आहे. ' तुम्हीं अमक्या मार्गानें जावे आणि अमक्यानें जाऊ नये ' असें सागण्याचा ईश्वरी अधिकार मला नाहीं असा अधिकार बळेंच हातीं घेण्याचें धाष्टर्य मला नाहीं हे मी कबूल करतो भगवान् रामचद्रजींनी सेतु बाधिला त्यात एक खारीनें जशी कामगिरी बजाविली तशीच कामगिरी माझ्या हातून झाली म्हणजे पुरे असें मला वाटते. त्या खारीची योग्यता माझ्या अगीं असावी इतकीच माझी आकाक्षा आहे. वानरसैन्य मोठमोठे डोगर समुद्रांत टाकीत असता एका खारीनें ज्याप्रमाणें आपल्या अगावरच्या मातीची भर

त्यात टाकिली, त्याप्रमाणें माझ्या हातून अल्पस्वल्प सेवा घडली तरी पुरे असें मला वाटतें. त्या खारीशीं समत्व पावण्याची हौस मीं बाळगली आहे. आमच्या समाजरचनेचाही अत्यंत आश्चर्यजनक गाडा कित्येक युगे अनेक खडकाळ रस्त्यातून चालत आला आहे. ही अनत नदी कित्येक युगे वाहत वाहत आपणापर्यंत येऊन पोहोंचली आहे. यात खरोखर बरें काय आहे आणि वाईट काय आहे हे ठामपणानें सागण्याची भलतीच छाती कोणीं करावी! यांतील बरेंवाईट मीं जाणलें असें तरी कोणीं म्हणावे? या गाड्याचा अखेरचा मुक्काम कोठे होणार हे ठरविण्याचें साधन आपणाजवळ काय आहे? हजारो प्रकारच्या परिस्थितीचा वेढा या भूमीभोवती पडला आहे. यांतील कित्येकाचा कल आमची गति थाबविण्याकडे आणि कित्येकाचा कल ती वाढविण्याकडे आहे. अशा स्थितींत आमची गति कशी असावी याचा हुकूम फर्माविण्याची कोणाची छाती आहे? याकरिता गीतेच्या अनुज्ञेप्रमाणें "कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन" हे लक्षात ठेवून चालावे हेच योग्य आहे. आमच्या समाजाला ज्या प्रकारच्या अन्नाची भूक लागली आहे, तें अन्न त्याला देऊन मोकळें होणें इतकेच आपलें कार्य आहे. त्याची वाढ व्हावयाची ती ठरीव मार्गानेंच होईल. 'तू अमुकच मार्गाने वाढलें पाहिजे' असें समाजास सागण्याचा अधिकार कोणासही नाहीं. आमच्या समाजरचनेंत अनेक व्यगें आहेत ही गोष्ट कोणीही नाकबूल करीत नाहीं, पण जगातील प्रत्येक समाजरचनेंत व्यगें आढळत नाहींत काय? आमच्या भूमीला विधवाच्या तप्त अश्रूचें स्नान घडते हे खरे, पण पाश्चात्य देशात कुमारिकांच्या उष्ण श्वासानी हवा तापते हे खोटे आहे काय? आमच्या देशात अठरा विश्वे दारिद्र्य आहे, आणि त्यामुळे समाजाचा नाश होत आहे हें खरे; पण चैनींत लोळता लोळता पाश्चात्यांचे देशही मोडकळीस येत आहेत हे खोटे आहे काय? चैनीची प्रवृत्ति हाच पाश्चात्यांचा मोठा हृद्रोग होऊन बसला आहे, आणि तो त्याचीं जिव्हारे खात आहे. खायाला मिळत नाही म्हणून आत्महत्या करण्याची इच्छा करणारे जसे येथे आहेत, तसे अजीर्ण झालें म्हणून आत्महत्या करणारे तेथें आहेत. अनिष्टपणा जगांत सर्वत्र आहे. तो अमुक एका ठिकाणींच सांपडतो असें नाहीं. जुनाट संधिवाताच्या दुखण्यासारखें हें

अनिष्टत्वाचें दुखणेंही मोठें चिकट आहे. त्याला एका साध्यांतून हाकलून लावलें, तर तें दुसऱ्या साध्यांत पुन्हां तयार आहेच, आणि ते तेथूनही बाहेर काढलें तर तिसऱ्या ठिकाणीं पुन्हा हजर व्हावयाचेंच. त्याला या जाग्यावरून त्या जाग्यावर हटविण्याचा उद्योग आपण एकसारखा करीत असतो, परतु तेवढयानें तें नामशेष होते असें नाहीं. याकरिता अनिष्ट वस्तूचा नाश करण्याच्या मागें लागण्यापेक्षा त्यांचे अनिष्ट परिणाम कमी करू पाहणें अधिक बरे बरें आणि वाईट याचा वास या जगात जोडीनेच असतो असें आपलीं शास्त्रे आपणास सांगत आहेत. यातील कोणतेंही एक निर्भेळ सापडावयाचे नाहीं. यांपैकी एक हजर असलेलें जेथे आढळेल तेथ दुसरेंही अवश्य आहेच म्हणून समजावे. यापैकी कोणतेंही एक तुम्हास हवेंसे वाटलें, तर दुसरेही घेण्याची तयारी तुम्हीं केली पाहिजे. समुद्रांत कोठे एखादी लाट उठली म्हणजे दुसरीकडे तेवढया मानाने खाडा पडतोच. वास्तविक पाहता सारा आयुष्यक्रम म्हणजे केवळ अनिष्टाची परपराच आहे असें म्हटलें पाहिजे. तुम्ही एक श्वासोच्छ्वास करण्याबरोबर हजारों जंतूचा नाश होत असतो. दुसऱ्या कोणाच्या तरी तोडचा घास काढल्याशिवाय तो तुमच्या पोटात जावयाचा नाहीं. दुसऱ्याला उपाशीं मारावे, आणि आपण पोटभर जेवावें, हाच आपला उद्योग अखड चालू आहे. या जगाचा हाच कायदा आहे. तुमचे सारें तत्त्वज्ञान पुनःपुन्हा तुम्हाला हेच सागत आहे. याकरिता अनिष्टत्वाचें निर्मूलन करण्याचा उद्योग करीत असता आपण एक तत्त्व नेहमीं लक्षात बाळगलें पाहिजे; ते हें कीं, आपल्या या साऱ्या उद्योगाची किंमत प्रत्यक्ष नसून परोक्ष मात्र आहे. आपल्या उद्योगानें जगातलें अनिष्टत्व नष्ट होईल असें नाही, तथापि आपल्या त्या उद्योगाचा आपणा स्वत सच अधिक उपयोग होईल हे मात्र खरें. आपल्या उद्योगाने जगातल्या अमुक वाईट गोष्टीचा नाश झाला अशा बढाया आपण कितीही मारल्या तरी उपयोग काय? कारण तसें होणें मूलत:च अशक्य आहे. याकरिता आपल्या उद्योगाचें वास्तविक पर्यवसान कोठे होते हे लक्षांत ठेऊन तदनुसार आपलें कर्तव्य करणें बरें. हे तत्त्व आपल्या लक्ष्यांत पक्कें बाणलें, तर त्यामुळें आपलें आततायित्व नाहींसें होईल. अमुक एक गोष्ट वाईट आहे असें आपल्या मनानें घेतलें, आणि तिचा नायनाट

करण्याचा उद्योग आपण आरंभिला म्हणजे आपण मोठा परोपकार करीत आहों, जगावरील एक आपत्ती आपण दूर करीत आहो असा भ्रम आपणांस होतो, आणि आपल्या मार्गात अशा वेळीं कोणीं अडथळा आणण्याचा यत्न केल्यास आपलें माथें भडकून जातें. आयतायित्व आपल्या अगीं प्रवेश करतें. अशा प्रकारच्या आततायित्वाला बळी पडून अधिकाधिक हट्टानें आपण आपल्या सुधारणा, लोकावर लादण्याचा यत्न करूं लागतों, पण आपल्या या कृतीनें, परिणाम मात्र बरोबर उलटा होतो. ज्या सुधारणा आपण लोकावर लादूं पाहत असतो, त्यानाच लोक अधिकाधिक विरोध करूं लागतात, आणि शेवटीं या तट्याचा परिणाम भलताच होतो. इतिहासात आपणास असे प्रसंग अनेक वेळा घडल्याचें आढळून येते गुलामगिरी बद करण्याकरिता अमेरिकेंत केवढा मोठा खटाटोप झाला होता याची माहिती आपणांपैकीं पुष्कळास असेलच; पण या साऱ्या प्रचड उद्योगाचा आणि रक्तपाताचा अखेर परिणाम काय झाला ते पहा! याचा परिणाम आज इतकाच झाला आहे कीं, पूर्वींची गुलामगिरी ही आता बरी वाटूं लागली आहे. गुलामगिरी प्रचारात होती तेव्हा प्रत्येक गरीब शिद्दयाला एक धनी म्हणून कोणी तरी असेच तो शिद्दी त्याची मालमत्ता समजली जात असे. यामुळें आपल्या या मालमत्तेला सांभाळण्याची आणि त्याची वास्तपुस्त करण्याची जबाबदारी धन्याच्या माथीं अवश्य असे. शिद्दयांच्या आगचे गुण नष्ट होऊ नयेत म्हणून त्याचे धनी अवश्य काळजी घेत असत. आता हे शिद्दी पूर्णपणें स्वतत्र झाले आहेत. त्यांच्या वर कोणाचीही सत्ता उरली नाहीं; पण यामुळें झालें काय कीं त्यांच्या जीविताचीही पर्वा कोणास उरली नाहीं. यामुळें एखादें खरेखोटे कारण पुढे करून शिद्दयाला जिवत जाळण्यासही कोणी मागेंपुढे पाहत नाहीं. शिद्दयाला कोणीं गोळी घालून मारिलें, तर या गुन्ह्याची नुसती चौकशीही कोणी करीत नाहीं. कारण ते म्हणजे केवळ काळे ' निगर ' ऊर्फ शिद्दी. तीं मनुष्येंच नव्हत, मग तीं मेलीं काय अथवा जगलीं काय, त्यांची पर्वा कोणीं करावी? पूर्वींची गुलामगिरी आततायित्वानें नष्ट झाली खरी; पण त्याच्या जागीं त्याच्याहूनही वाईट अशी ' पशुगिरी ' आली याची वाट काय? असल्या प्रकारच्या अनेक प्रसंगाची नोंद इतिहासानें करून ठेविली आहे.

संद्वेतूने पण आततायित्वानें केलेल्या सुधारणाही शेवटीं शापदायी कशा होतात, हे इतिहासानें आपणांस वारंवार सांगितलें आहे. मला स्वतःलाही अशा प्रकारचे अनेक अनुभव आले आहेत असे अनुभव मला प्रत्यक्ष आले असता, आततायी सुधारकांच्या कपूत मिसळून जुन्या लोकास शिव्या देण्याचें धाष्ट्यं माझ्या हातून कसें होईल बरें? अमुक अनिष्ट आणि तमुक वाईट म्हणून सदोदित बोटे मोडण्यानें कोणता कार्यभाग साध्य होणार आहे? प्रत्येक समाजात बरेंवाईट आहे, ही गोष्ट प्रत्येकाला ठाऊक आहेच. ही गोष्ट आबालवृद्धास आता ठाऊक झाली आहे. सध्या स्थिति अशी झाली आहे कीं, एखाद्या शेंबड्या पोराने उठावे आणि ठरींव पद्धतीने आमच्या बिचाऱ्या हिंदुसमाजावर खुशाल तोडसुख घ्यावे! एखाद्याठोंब्या परदेशियानें यावे, आगगाडींतून दिसेल तेवढा येथला भूभाग पहावा, आणि नतर हिंदूच्या अनेक चालीरीतीचे वाभाडे काढीत सुटावे! आमचा समाज सर्वांगसुदर आहे असें आमचे मुळींच म्हणणे नाहीं. त्यांत अनेक प्रकारच्या उणिवा आहेत हेही आम्ही नाकबूल करू इच्छित नाही, पण अडचण आहे ती निराळीच आहे. अमुक गोष्ट वाईट एवढे नुसते तोंडाने सांगण्याचें काम कोणीही करू शकेल, पण ही सारी अडचण दूर कशी करावी, याचा मार्ग जो कोणी दाखवील, तोच मानवजातीचा खरा मित्र म्हणविण्यास पात्र होईल. एकदा एक मुलगा विहिरींत बुडत असता एक तत्त्ववेत्ता काठावर उभा राहून त्याला तत्त्वज्ञान सांगू लागला, तेव्हा मुलगा म्हणाला 'पंडित महाराज, मला प्रथम बाहेर काढा. मी जगलो वाचलो तर तुमचीं व्याख्याने अवश्य ऐकेन.' आम्हा लोकाचीही या सर्व पंडितमन्यास हात जोडून हीच प्रार्थना आहे. व्याख्यानें ऐकून ऐकून आमचे कान किटले आहेत. सभा आणि मंडळ्या तर गल्लोगल्लीं झाल्या आहेत. वर्तमानपत्राचाही पाऊस पडत आहे. या साऱ्या गोष्टी झाल्या आहेत, पण या दुर्गतिपंकातून आमचा हात धरून आम्हास बाहेर काढणारा कोणी आहे काय? आमच्यावर ज्याचे खरोखर मनापासून प्रेम आहे असा कोणी आहे काय? आमच्या हालांकडे पाहून ज्याचा जीव तिळतिळ तुटतो असा कोणी आहे काय? अशाच मनुष्याची आज आम्हांस जरूर आहे. सर्व सुधारक मंडळ्यांशीं माझा जर कांहीं विरोध असेल, तर तो हाच. आज एक शतक सुधारकांचें अस्तित्व आम्हांमध्यें आहे. त्यांनीं आजपर्यंत जे कांहीं उद्योग

केले, त्यांचा प्रत्यक्ष फायदा समाजाला किती झाला याचा आढावा काढला, तर शेंकडो शिव्याशापाच्या चोपड्यांचा मात्र सुकाळ झाल्याचें आढळून येते. हाय ! हाय ! परमेश्वरा, यापेक्षां असली सुधरणा नसती तर बरें होते ! आमच्या जुन्या मडळीला त्यांनीं शिव्याशापाची लाखोली वाहिली आणि आमच्या जुन्या मंडळीनेंही त्याचाच कित्ता गिरवून उलट भडिमार केला. शिव्यानी भरलेल्या चोपड्याचा सुळसुळाट, हाच या साऱ्या प्रकाराचा परिणाम झाला असल्या किळसवाण्या आणि देशाला लांछनास्पद अशा चोपड्याचा भरणा साऱ्या देशी भाषातून झाला आहे. हीच आमची सुधारणा काय? आमच्या देशाची उन्नति होण्याचा मार्ग हाच आहे काय? हा सारा अपराध कोणाचा आहे बरे ?

आता यापुढे आणखीही एका महत्त्वाच्या गोष्टीचा विचार केला पाहिजे. आमच्या समाजरचनेंत राजाला नेहमीं आदिस्थान मिळालेलें आहे राजा समाजावर सर्व प्रकारची सत्ता चालवीत असे सर्व कायदेकानू राजानेच करावयाचे असत, पण आता हा प्रकार साफ बदलला आहे आता समाजाची काळजी घेणारा प्रमुख कोणी उरला नाहीं. समाजानें कोणत्या पद्धतीने चालावे हे आखून देणारा कोणी नाहीं आमच्या सध्याच्या सरकाराला असल्या गोष्टींत पुढाकार घेण्याचा धीर होणे शक्य नाहीं. एकंदर जनतेचा कल पाहून सुकाणू वळविणें, इतकेच सरकारच्या हाती आहे. या पद्धती कालावधीच्या आहेत. आपल्याला खरोखर हवे काय आणि ते मिळविण्याचा रास्त मार्ग कोणता, हे बरोबर कळून त्याप्रमाणें सामान्य जनतेचें ठाम मत बनणे या गोष्टीला कालावधि लागतो. हा मधला काळ म्हणजे निवळ हात जोडून बसण्याचा काळ असतो. या एकदर परिस्थितीचा शांतपणे विचार केला म्हणजे कांही विशिष्ट मुद्दे पुढे उभे राहतात. ज्याना सुधारणा पाहिजे असे लोक किती आहेत? अशाची सख्या प्रथम मुकरर केली पाहिजे. सुधारणा हवी असें म्हणणारी जनता प्रथम अस्तित्वात आहे काय? नाहीं तर मूठभर लोकानीं साऱ्या जनतेची शेंडी आपल्या हातात ठेवावी असें होईल, आणि असल्या प्रकारचा जाच कोणीही सहन करणार नाहीं. मूठभर लोकाना अमुक एक गोष्ट वाईट दिसली म्हणून सारें राष्ट्र त्याच्या डोळ्यानीं पाहील ही गोष्ट घडणें शक्य नाहीं. आमचा सारा समाज एकीकडे आणि

मूठभर सुधारक भलतीकडेच, असा प्रकार कां होतो ? याचें कारण इतकेंच कीं, आमच्या सामान्य जनतेस सुधारकांचे म्हणणेंच कळत नाहीं. त्यांना प्रथम शिक्षण द्या त्यांची चांगली तयारी करा. निरनिराळया सुधारणांना लागणारा लोकमताचा पाठिंबा प्रथम तयार करा, म्हणजे योग्य कायदेही आपोआप निर्माण होतील. जी सारी सत्ता पूर्वी राजांच्या हातांत एकवटली होती, तिला आता कोणी मालक नाहींसा झाला आहे यामुळें तुमच्या कायद्यांना सत्तेचा पाठिंबा नाहीं. याकरितां ही सत्ता लोकाच्या हातात जाईसे केलें पाहिजे. तुम्हांस सुधारणा पाहिजे असतील तर आधीं लोकास शहाणें केलें पाहिजे त्यावाचून सुधारणा घडून येणें शक्य नाहीं. शिक्षणाचा प्रसार सर्वत्र होईपर्यंत तुम्हीं वाट पाहिली पाहिजे सुधारणा या नांवाखालीं आजतागाईत ज्या निरनिराळया शकला सुचविण्यांत आल्या त्यात दिखाऊपणाचा भागच अधिक होता. या सुधारणांचा प्रकार लक्षांत घेतां, त्या फक्त वरिष्ठ वर्गापुरत्याच होत्या असे आढळून येईल. यांतील एकही सुधारणा खालच्या जातींकरिता होती असे म्हणतां यावयाचे नाहीं उदाहरणार्थ, पुनर्विवाहाची सुधारणा घेतली तर या सुधारणेचा उपयोग हिंदुस्थानांतील शेकडा सत्तर स्त्रियास नाहीच असे आढळून येईल. असाच प्रकार इतर साऱ्या सुधारणांचा झाला आहे त्याची जरूर फक्त वरच्या वर्गातील लोकासच आहे. हा सारा वर्ग सुशिक्षित आहे, आणि लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट इतकीच कीं त्यांच्या शिक्षणाचा खर्च मुख्यत्वेकरून खालच्या वर्गानें भागविला आहे ! यावरून एक गोष्ट उघड होते ती हीच कीं, सुधारकांनीं फक्त आपल्या पुरताच विचार केला आहे त्याच्या सुधारणा म्हणजे शुद्ध आपलपोटेपणा आहे ! अशा प्रकारच्या सुधारणांनीं राष्ट्रीय हित ते काय साधणार ? याकरितां या खऱ्या सुधारणाच नव्हत असे म्हटलें पाहिजे. सुधारणा आमूलाग्र झाली पाहिजे. अगदीं तळांतला वर्गच प्रथम सुधारला पाहिजे यालाच मी खरी सुधारणा म्हणतों तुमचें सारें बळ तेथे खर्ची घाला, तेथें प्रथम ठिणगी पडू द्या, म्हणजे तिची आंच आपोआप वर येऊ लागेल व अशा रीतीनें प्रथम राष्ट्र तयार होईल अशा रीतीनें सामान्य जनसमूहाला राष्ट्रीयत्व प्राप्त होईल. अशा प्रकारच्या सुधारणेस आरंभ करावयाचा म्हटलें म्हणजे या सुधारणेचा परिघ किती विशाल आहे हे लक्षांत येईल.

हा परिघ अत्यत विस्ताराचा आहे, एवढेच नव्हे, तर तो अनेक प्रकारच्या अडचणीनीही भरलेला आहे. याकरिता घाई उपयोगाची नाहीं. समाजरच-नेंतील अडचणी, हा प्रश्न काहीं आजकालचा नाही शेकडों वर्षांपूर्वीही अडचणी होत्या, आणि आजही त्या शिल्लक आहेत. बौद्धधर्मानें हिंदुस्थानाचे अनेक प्रकारें कोटकल्याण केलें होतें असें म्हणणें हें सध्या अनेक सुधारकाच्या आवडीचें झाले आहे. विशेषत हिंदुस्थानच्या दक्षिणभागात तर या मताला मोठाच मान आहे, पण सध्याच्या करुणास्पद स्थितीस आम्ही येऊन पोहोचलो आहो, याला कारण बौद्धधर्मच आहे, हे या बिचाऱ्याच्या स्वप्नीही येत नसेल !

आपली सध्याची स्थिति ही बौद्धाची वारसदारी बौद्धधर्माने ही आपली आठवणच जणू काय मागे ठेविली आहे. बौद्धधर्माचा अवतार आणि त्याचे पर्यवसान याचा क्रमश अभ्यास ज्यांनीं केला नाहीं, अशा माणसानी लिहि-लेल्या ग्रथातून या धर्माला मोठें श्रेय दिले गेल्याचे आढळते. बौद्धधर्माचा जो एवढा मोठा प्रसार एका काळीं हिंदुस्थानात झाला होता, त्याचे कारण त्या धर्मातील उदात्त तत्त्वे, आणि गौतम बुद्धाचें तेजस्वी चारित्र्य हीच होत, असे या लेखकांचे मत आहे भगवान् बुद्धाबद्दल मला अत्यत आदर वाटतो, तथापि बौद्धधर्माचा जो एवढा विजय झाला, त्याचें कारण त्याचीं तत्त्वे नव्हत अथवा त्याचे विशुद्धचरितही नव्हे, असे माझे निश्चित मत आहे. या धर्माचे बाह्यस्वरूपच ज्या रीतीनी लोकापुढे माडलें गेलें, त्या रीतीच त्याच्या प्रसाराचे कारण होत असें म्हणणे अधिक सयुक्तिक होईल. भव्य आणि विशाल मदिरे, त्यातील मूर्ती आणि पूजनादिकाचे गभीर प्रकार हीच त्याच्या प्रसाराची खरीं कारणें होती. बौद्धधर्माचा प्रसार याच मार्गाने झाला होता. आमच्या प्राचीन हिदुपद्धतीप्रमाणें घरोघर लहान देवघरे आणि त्यातील पूजनाचा प्रकार ही विशेषशी मनोवेधक नव्हती. यामुळें सामान्य जनतेची मनें या भपकेबाज प्रकारामुळें बौद्धधर्माकडे वळली, पण यानतर बौद्धधर्माला लवकरच उतरती कळा लागली आणि त्यात जे अतस्थ किळसवाणे प्रकार घडूं लागले त्याची कहाणी आपल्यापुढे उघडपणें बोलणेही अशक्य आहे. ज्या कोणाला या प्रकारांची थोडीबहुत माहिती हवी असेल त्यानीं दक्षिणेतील भव्य मदिरांच्या भिंतीवरील कोरींव चित्रें पाहावी म्हणजे त्यास ती माहिती थोडीबहुत मिळेल. बौद्धधर्मानें

जो कांहीं अजब वारसा मागें ठेविला आहे तो हाच यानतर भगवान् श्रीशकराचार्यांचा अवतार झाला, आणि त्या काळापासून आजतागाईत वेदान्तमार्गाकडे सामान्य जनतेचीं मनें हळूहळू वळविण्याचें कार्य चालू राहिलें आहे. पूर्वीच्या काळचे हे मोठे सुधारकच होत असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं, पण त्यानीं शिव्याशापांचा वर्षाव मात्र केला नाहीं हे खरें. समाजात अनेक प्रकारच्या उणिवा आहेत ही गोष्ट ते विसरले होते असें नाहीं; तथापि त्याबद्दल त्यानीं समाजावर कधींही तोंड टाकलें नाहीं. आपल्या पूर्वीच्या सार्‍या चालीरीती मूर्खपणाच्या आहेत आणि त्याचा एकदम त्याग केला पाहिजे, असे त्यानीं कधींही म्हटलें नाहीं. असें होणें शक्यच नाहीं हें त्यास कळत होते ख्रिस्ती धर्मानें तीनशे वर्षात रोमन आणि ग्रीक धर्मांचा मागमूसही नाहींसा करून टाकला असें डॉ बॅरोज म्हणतात; पण युरोपखडातील एकदर जनतेचें सूक्ष्म अवलोकन ज्यानें केलें असेल, तो असें कधीही म्हणणार नाहीं. रोमन आणि ग्रीक धर्म अजूनही जिवत आहेत. ते रोमन क्याथोलिक देशांतच आहेत असेही नाही; तर ते सुधारलेल्या प्रॉटेस्टंट देशातही आहेत. त्यात जो काहीं फरक झाला आहे तो फक्त नावाचा आहे. जुन्या देवदेवता नवीं नावे घेऊन खुशाल सभ्यपणें वावरत आहेत. देवता होत्या त्या 'मराया' झाल्या आहेत आणि देव होते ते 'संत' ऊर्फ 'सेंट' झाले आहेत. तसेंच पूर्वीच्या अर्चनपद्धतीत थोडासा फरक झाला आहे. कित्येक जुनीं नावें आणि जुन्या पदव्या अजूनही शिल्लक आहेत यावरून मुख्य मुद्दा इतकाच ध्यानांत आणावयाचा की, पी हळद आणि हो गोरी असें कधींही होत नाहीं. यक्षिणीच्या काडीनें समाज कधीही उलथापालथा होत नाहीं. त्याला कालावधीच पाहिजे, ही गोष्ट भगवान् शकराचार्यांस पूर्ण अवगत होती. त्याचप्रमाणें भगवान् रामानुजासही हें माहीत होतें. जी काही बरीवाईट रचना प्रत्यक्ष अस्तित्वात होती तीच हाती घेऊन तिची घटना हळूहळू सुधारावयाची असा मार्ग त्यानी स्वीकारिला. शास्त्रीयदृष्ट्या त्याचे हें करणें अगदीं बरोबर होते असें दिसून येईल. याहून अन्य मार्गाचा स्वीकार त्यानीं केला असता, तर आपल्या गृहीततत्त्वापासून पराङ्मुख झाल्याचें पातक त्यांच्या पदरीं पडलें असतें व त्याची गणना दांभिकात झाली असती. उत्क्रांति हा त्याच्या मतसमर्थ-

नाचा मूळ पाया आहे. अनेक प्रकारचीं रूपांतरें पावून व अनेक प्रकारच्या निरनिराळ्या स्वरूपांतून उत्क्रांत होत होत जीवात्मा अखेरच्या पदावर आरूढ होतो, असा या आचार्यांच्या प्रतिपादनाचा मथितार्थ आहे. याकरिता हेंच तत्त्व समाजरचनेसही लागू व्हावें हें योग्य आहे. समाजाला निरनिराळीं अवस्थांतरें प्राप्त व्हावीं हें अनिष्ट नसून इष्टच आहे. कारण अशीं अवस्थातरें अनुभवूनच आत्म्यानें पूर्णत्व पावावे असा सृष्टीचा संकेत आहे अशा स्थितींत ज्या मार्गाचा अवलब त्यानीं केला त्याबद्दल त्यांस दोष देण्याचें धाडस कोण करील ?

मूर्तिपूजा करणें चुकीचें आहे या मताचें सध्या इतकें चर्वितचर्वण झालें आहे कीं, ते मत आता अगदीं शिळें झालें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. या मताबद्दल आता ऊहापोह करण्याचें सुद्धा कारण नाहीं इतकें ते निर्भेळ सत्य आहे असेही पुष्कळास वाटतें माझाही विश्वास या मतावर एका काळीं होता; पण परमेश्वराला जणू काय हा माझा मूर्खपणा सहन झाला नाहीं, आणि मला शिक्षा म्हणूनच कीं काय कोण जाणे, त्यानें एका मूर्तिपूजकाच्या पायांवर मला लोटांगण घालण्यास लाविलें मूर्तिपूजा करतां करतां माझ्या सद्गुरूनीं मुक्तीची प्राप्ति करून घेतली मूर्तिपूजेच्या पापाची अखेर, जर अनेक रामकृष्ण निर्माण होण्यांत होत असेल, तर आपणास मूर्तिपूजा अधिक पसंत पडेल, कीं सुधारकाची सुधारलेली रीत आवडेल याचे उत्तर आपणच द्या. मला या प्रश्नाचे सरळ उत्तर पाहिजे. मी तर स्पष्ट असे म्हणतो की, मूर्तिपूजेंतून असे रामकृष्ण परमहस अनेक निर्माण होत असतील, तर तुमच्या मूर्तींच्या सख्येंत आणखीही हजारो मूर्तींची भर खुशाल घाला या कार्यासाठी नव्या मूर्ती निर्माण करणारास परमेश्वराचा आशीर्वाद खरोखर प्राप्त होईल. रामकृष्णासारखे भागधेय निर्माण करण्यासाठीं कोणत्याही मार्गाचा उपयोग करण्यास तुम्हास पूर्ण मुभा आहे मूर्तिपूजेच्या मार्गांतून अशीं नररत्ने प्रत्यक्ष निर्माण होत असताही मूर्तिपूजा पुन्हा वाईट ती वाईटच ! असें का म्हणून कोणीं प्रश्न केला, तर त्याला काय उत्तर द्यावें ? याचें उत्तर इतकेच कीं कित्येक शतकांमागें एक यहुदी मनुष्यानें मूर्तिपूजा वाईट असे म्हटलें होतें, हेंच. पण त्यांतही एक खुबी होती त्यानें साऱ्या मूर्ती वाईट म्हणून सांगितलें खरें; पण त्यांतून स्वतःची मूर्ति मात्र त्यानें वगळली होती ! परमेश्वराचें अचिंत्य रूप

चिंतनात यावें म्हणून कोणीं कितीही सुंदर मूर्ति बनविली, तर ते पाप आहे, असें त्याचें मत होते; पण लांकडाची एखादी पेटी करून तीवर दोहों बाजूस दोन देवदूत बसविले, तर ते मात्र त्याच्या दृष्टीनें पुण्यकारक दिसत होते ! परमेश्वर कबुतराच्या रूपानें अवतरला, तर त्याला त्याच्या दृष्टीनें हरकत नव्हती! पण तेंच जर का त्याने गाईचें रूप घेतलें तर मात्र बिघडलें. तें अत्यंत पाप. कारण गाय ही मूर्तिपूजकाची आवडती, याकरिता ती त्याज्य, म्हणून तिजवर परमेश्वराचा बहिष्कार पडावा हें अगदीं रास्त आहे. ‘ दुनिया झुकती है ’ ही म्हण अनंत कालापासून एकसारखीच खरी आहे. ‘ दुनिया म्हणजे निवळ मूर्खांचा बाजार ’ असें एका कवीनें म्हटलें आहे, ते किती खरें आहे ! प्रत्येकाला आपली चीज खरी वाटते; इतकेच नव्हे, तर दुसऱ्यानीही थोडा वेळ आपले डोळे उसने घेऊन त्या चिजेकडे पाहावे आणि मान डोलवावी अशीही प्रत्येकाची इच्छा असते. हेच आम्हा मनुष्याचे मोठे पाप होय. जगात जी द्वेषबुद्धि आणि असूया इतकी उतास आली आहे याचे मूळही हेच पाप आहे. अनेक प्रकारचीं तटेभाडणें आणि रक्तपात यांच्या मुळाशी अखेर हेच पाप सापडतें. मद्रासेच्या बाहेर कांही जगाचा भाग आहे कीं नाही, हेसुद्धा ज्यानीं आपल्या नजरेनें पाहिलें नाही, असल्या रागत्या पोरानी—मात्र त्याना मिशाचे झुपके आले आहेत—तीस कोटी लोकास उपदेश करावयास धावावे ही किती आश्चर्याची गोष्ट ! हजारो वर्षांच्या उत्क्रांतीचा पूण पाठिंबा ज्याच्या मागें खडा आहे त्यांना कालच्या पोरानीं शहाणपणा शिकवू पाहणे किती मूर्खपणाचें आहे? असल्या अपराधाबद्दल त्यानीं मानाच खाली घातल्या पाहिजेत. असले घोर पातक करण्याचे यापुढे मनांतसुद्धा आणूं नका. तुमच्या प्राचीनत्वाबद्दल तुमच्या चित्तात इतका अनादर कोठून उत्पन्न झाला ! पाढऱ्यावर काळे करण्याइतकी अक्कल तुम्हांला आहे आणि तुमच्या त्या अकलेचे दिवे जगापुढें पाजळणारे प्रकाशकही तुम्हास भेटतात, एवढयानेंच जगाला शहाणपणा शिकविण्याचा मक्ता तुम्हास मिळाला असें तुम्ही समजता काय ? एवढयानेंच तुमचें मत म्हणजे साऱ्या हिंदुस्थानाचे मत असे तुम्हास वाटते काय ? मद्रासच्या समाजसुधारकास मला जें कांहीं सागावयाचे ते हेंच कीं, माझे तुम्हावर फार प्रेम आहे आणि तुमच्याबद्दल माझ्या चित्तात आदरही आहे तुमचीं अंत.करणे उदार आहेत याबद्दल मी तुम्हास मनापासून चाहतो; तसेच

तुमच्या मनात तुमच्या जन्मभूमीबद्दल जें प्रेम आहे त्याबद्दलही मला तुमचा आदर करावासा वाटतो, तथापि तुमचे मार्ग मात्र चुकले आहेत असेही तुम्हांस स्पष्टपणें कळविणे भाग आहे. आज शभर वर्षे या मार्गाचा अनुभव घेऊन झाला आहे आणि त्याचे फळ काय आलें आहे तें आपणा साऱ्याच्या नजरे-समोर आहेच! आता आपल्या मार्गात थोडातरी बदल करून पहावयास नको काय? आमच्या देशात पूर्वी कधी समाजसुधारक नव्हते असे नाहीं. हिदुस्थानच्या इतिहासाचा आपण अभ्यास केला, तर आपणास असे आढळून येईल कीं, आपल्या देशात समाजसुधारकाचे अस्तित्व फार प्राचीन काळापासून आहे. श्रीरामानुज कोण होते? भगवान् आद्य शंकराचार्य कोण होते? नानक, चैतन्य, कबीर, दादु इत्यादि पुरुष कोण होते? आर्यभूच्या या नील नभोदरात ज्याचा शुभ्र प्रकाश अजूनही पसरलेला आहे असे हे प्रकाशमान तारक कोण होते? खालच्या वर्गाची उन्नति व्हावी असे श्रीरामानुजास वाटत नव्हते काय? महारमागास सुद्धा आपल्या वरच्या मडळात स्थान मिळावे म्हणून सारा जन्म त्यानीं खटपट केली नाहीं काय? फार काय पण मुसलमानासमुद्धा जवळ करण्याची खटपट त्यांनी केली. हिदुमुसलमानाचे ऐक्य होण्यासाठी श्रीनानकांनीं केवढा उद्योग केला! त्या सर्वांनीं आपापल्यापरी आपला कार्यभाग केला आणि अजूनही त्यांचें कार्य पुढे चालू आहेच! या पूर्वीच्या सुधारकाचे उद्योग आणि त्याचे फळ व आमच्या अर्वाचीन सुधारकाच्या उद्योगाचे फळ याची परस्पर तुलना केली, तर आकाशपाताळा इतके अतर दिसून येते. असें का? हा फरक कशाने उत्पन्न झाला? याचे कारण इतकेच की, करणें थोडे आणि वटवट फार हे त्यास ठाऊक नव्हते नुसत्या तोडपाटिलक्या करण्याची विद्या त्या बिचाऱ्यास अवगत नव्हती! अलीकडील सुधारकाजवळ शिव्याशापाचा विश्वकोश आहे तोही त्याजजवळ नव्हता कोणाशी भाषण करण्याचा प्रसग आल्यास त्याची पद्धति अशी होती की, “ पुढा स्नेह पाझरे। माघा चालती अक्षरे। शब्द पाठीं अवतरे। कृपा आधी ॥ तंव बोलणेंचि नाहीं। बोलों ह्मणे जरी कांहीं। तरी बोल कोणाही। खुपेल कां ॥ साच आणि मवाळ। मित आणि रसाळ। शब्द जैसे कल्लोळ। अमृताचे ॥” ही त्याच्या भाषणाची पद्धत! त्यांनीं कधीं कोणाचाही उपहास केला नाहीं. समाजाने एकसारखें उत्क्रांतावस्थेत रहावें—

एकसारखे वाढत असावे–इतकेच लोकास त्याचे सागणे असें. पूर्वी आपण जें काही केलें आहे ते चागलें आहेच, पण याहून अधिक चागलें असे काहीं तरी करण्याची उमेद आपण धरली पाहिजे असें त्यांचे सागणें असे. आता-पर्यंत आपण विलक्षण मूर्खपणा केला असून यापुढें तो सुधारावयाचा आहे असे त्यानी कधीही म्हटलें नाही. पूर्वीच्या चागल्याहून अधिक चागले सपादन करावयाचे आहे असें ते म्हणत. प्राचीन आणि अर्वाचीन सुधारकाच्या मार्गात आरंभींच जो हा फरक पडला तो अती अधिक विस्तार मात्र पावला, आणि दोघाच्याही अतिम फलप्राप्तीत जे अतर पडलें ते यामुळेच. प्रत्येक राष्ट्राच्या वाढीचा मार्ग पूर्वीच आखला गेलेला असतो, आणि त्याची वाढ त्याच मार्गानें व्हावयाची हेही ठरलेलेंच असते कित्येक शतकाच्या सवयीने तो मार्ग त्या राष्ट्राच्या इतका आगवळणी पडून गेलेला असतो कीं, तो त्याच्या स्वभावाशीच एकरूप झालेला असतो मग इतक्या अवधीत वाढलेला स्वभाव एकदम पालटून जाणे शक्य आहे काय? पाश्चात्याच्या देशातली कलमें इकडील बुदक्यावर जगविणे सर्वथा अशक्य आहे, आणि असें आहे हा परमेश्वराचा केवढा मोठा आशीर्वाद आहे बरे! दुसऱ्या राष्ट्राच्या मार्गाचा अवलब करून आपणास त्याजसारखे होता येणें शक्य नाही ही खरोखर भगवताची कृपाच होय यावरून पाश्चात्याचा उपहास मी करीत आहे असें मात्र आपण समजू नका. त्याचे मार्ग त्याना हितप्रद आहेतच, पण आम्हास मात्र ते तसेच फलदायी होणार नाहीत, इतकाच माझ्या म्हणण्याचा आशय आहे त्याच्या प्रकृतीच्या मानानें जो पदार्थ त्याना अमृतासारखा उपयोगी पडतो, तोच आमच्या प्रकृतिविशेषामुळें आम्हास विषासारखा मारक झाला, तर त्यात आश्चर्य वाटण्यासारखें काही नाहीं आपणास प्रथम शिकण्यासारखें जे काही आहे तें हेच. पाश्चात्याचीं शास्त्रे वेगळी, त्याच्या सस्था निराळया प्रकारच्या आणि परंपरेनें चालत आलेल्या त्याच्या पूर्वकुलकथाही वेगळ्या जी काही त्याची साप्रतची समाजरचना आपणास दिसत आहे, ती सारी इतक्या गोष्टीच्या सघटनेचें फळ आहे आमच्या चालीरीती वेगळ्या, आमच्या आकाक्षा त्याच्याहून अगदी भिन्न, आमची कुलपरंपरा आणि आमचें पूर्वकर्म हींसुद्धा अगदी निराळी. अशा स्थितींत पूर्वीच्या कित्येक शतकांचा हा बोजा आम्ही एकदम झुगारून देऊन नव्या युगास सुरुवात करूं हे शक्य तरी आहे काय! पूर्वकर्मानुसार

जो मार्ग आधींच रुळलेला आहे त्यावरूनच आम्ही चालावें हें इष्ट आहे आणि तसें करणें आम्हास भागही आहे.

आतां माझ्या भावी क्रमासबधीं चार शब्द आपणास सांगणें इष्ट आहे. पूर्व कालच्या गुरूनीं दाखविलेल्या मार्गानें जावें असा माझा सकल्प आहे. त्याच्या पद्धतीचा मीं अभ्यास केला आहे, आणि ते कोणत्या मार्गानें गेले याचा थोडा फार बोध मला झाला आहे असें मला वाटतें. समाजाचे ते मोठे शास्ते होते नव्या कल्पनाचा उदय त्याच्या ठिकाणी सतत होत होता. समाजाचे ते खरे आधारस्तभ होते आचारशुद्धता म्हणजे काय आणि मानवी जीविताचे खरे रहस्य काय, याचा प्रत्यक्ष धडा ते आपल्या आचरणानें समाजाला देत असत यामुळें त्यानीं जो कार्यभाग उरकला त्याचें वास्तविक मोल करणेंही कठीण आहे आपणांसही आतां अशाच प्रकारची बिनमोल कामगिरी बजवावयाची आहे सध्या परिस्थिति थोडी बदलली आहे आणि त्या परिस्थितीस अनुकूल अशा मार्गाचा फेरबदलही आता थोडासा करावा लागेल इतकेच.

प्रत्येक व्यक्तीला ज्याप्रमाणें एखादें विशिष्ट साध्य साधावयाचे असतें, त्याचप्रमाणे प्रत्येक राष्ट्रालाही एक विशिष्ट साध्य साधावयाचें असते. प्रत्येक व्यक्तीचा आणि त्याचप्रमाणें प्रत्येक राष्ट्राचा एक अतिम हेतु असतो आणि तो हेतु त्या राष्ट्राच्या जीवनाचा प्रमुख घटक असतो. त्या राष्ट्रानें केलेले बाकीचे पचवीस उद्योग हे त्या हेतूच्या सपादनार्थ केलेले असतात. ते उद्योग म्हणजे अतिम साध्य नव्हे. उदाहरणार्थ, राजकीय सामर्थ्याची प्राप्ति हें इंग्लंड देशाचे ध्येय आहे. इग्लडात ज्या काहीं चळवळी दिसतात आणि ज्या जिवटपणाचा प्रत्यय तेथे येतो, त्या साऱ्या चळवळी आणि तो जिवटपणा या अतिम साध्याकरिताच आहे. याच रीतीनें प्रत्येक राष्ट्राला एक एक जीवनहेतु असतो आमच्या देशाचा जीवनहेतु धर्म हा आहे. आमची सारी समाजरचना या जीवनहेतूभोंवतीं गुफली गेली आहे. कित्येक शतकापासून पोसलेला जीवनहेतु झुगारून देण्याचा यत्न एखाद्या राष्ट्रानें केला, तर ते राष्ट्र लवकरच मृतराष्ट्राच्या मालिकेत जमा होईल यात शका नाहीं. अशा प्रकारची भयकर आपत्ति आपल्या राष्ट्रावर कोसळू नये अशी आपली इच्छा असेल, तर आपल्या साऱ्या खटपटी आपल्या जीवनहेतूस पोषक होतील अशाच

स्वरूपाच्या असल्या पाहिजेत. एखाद्या वाद्यात ज्याप्रमाणे निरनिराळे सूर निघत असले तरी सर्वां मिळून एकच एकतानता निर्माण होते, त्याचप्रमाणें आपल्या अनेक खटपटींच्या पोटीं एकच जीवनहेतु असला पाहिजे. अनेक प्रकारच्या खटपटी आणि भानगडी करीत असता इतर राष्ट्रें आपल्या जीवनहेतूचा विसर कधींही पडूं देत नाहीत. अमेरिकेंत धर्मासबधीही काहीं बोलावयाचे झाले तर समाजरचनेवर कोणकोणते इष्ट परिणाम धर्म घडवून आणील हे सागितल्याशिवाय तुमचें म्हणणें तेथे कोणीही ऐकून घेणार नाहीं. अमुक एका विशिष्ट धर्मतत्त्वानुसार तुम्हीं आचरण ठेविलें, तर तुमच्या समाजरचनेतील अमुक एक विशिष्ट व्यग नाहींसें होईल अशी त्याची खात्री करून दिली पाहिजे. नमुनेदार समाजरचना हा अमेरिकनाचा जीवनहेतु असल्यामुळे सर्व प्रकारच्या विवेचनात या हेतूचा केव्हाही लोप होऊ न देणे इष्ट आहे असें मला तेथे आढळून आलें इग्लडात वेदान्तासबधीं चार शब्द सागावयाचे असले, तर वेदान्ताच्या प्रसाराने कोणकोणत्या राजकीय इष्ट सुधारणा घडून येतील हे दाखविलें पाहिजे. त्याचप्रमाणें आपणास येथे समाजसुधारणेच्या तर्फें बोलावयाचे असल्यास त्यामुळे कोणती धार्मिक सुधारणा घडून येईल हे दाखविणे जरुरीचे आहे. आमच्या राष्ट्राला अखेरीस जें काहीं साधावयाचे आहे ते धार्मिक जीवन हेंच होय. येथे राजकीय बाबीची चर्चा करावयाची झाली तरी हे अतिम साध्य त्यामुळे अधिक सुकर होईल असे दाखविल्यावाचून तुमचें म्हणणे आमच्या सामान्य जनतेच्या गळी कधीही उतरावयाचे नाही आपणांस पुढे आपल्या आयुष्यात काय कर्तव्य आहे हे एखादा मनुष्य प्रथम आपणाशींच ठरवीत असतो, आणि नतर त्याचे सारे उद्योग त्या हेतूच्या सिद्धीकरिताच सुरू असतात. हीच गोष्ट राष्ट्रालाही लागू आहे. आमच्या राष्ट्राने आपलें अतिमसाध्य ठरविल्यास कित्येक शतकाचा काळ लोटून गेला आहे. आता त्या हेतूत फरक करणे शक्य नाहीं. कित्येक शतकांच्या लाबीतून वाहत आलेला हा प्रचंड ओघ आता मागे परतविणें शक्य नाहीं. अनेक गतकालीन राष्ट्राचा इतिहास आपल्या नजरेसमोर आहे त्याचे हेतु कोणते होते आणि त्याचें अखेर पर्यवसान कोठे झालें हेही आपणास अवगत आहे. अशा स्थितींत आमच्या राष्ट्रानें आपल्या हेतूची जी निवड केली ती चुकली असें आपल्याच्यानें म्हणवेल काय ? जड वस्तूंचा नाद सोडून

देऊन चैतन्याच्या मार्गे लागणें म्हणजे मोठी थोरली घोडचूक करणेंच होय असें म्हणता येईल काय ? मानवी अहकाराचा त्याग करून ईश्वराशीं समत्व पावण्याची हाव धरण्यात आमच्या राष्ट्राने मूर्खपणा केला असें म्हणावयाचें काय ? या दृश्य जगाबद्दल अत्यत तिटकारा, पारलौकिकाच्या ठायीं अत्यत श्रद्धा, त्यागाच्या ठायीं अत्यत आतुरता, परमेश्वराच्या ठायीं अत्यत विश्वास आणि अमर आत्म्याच्या ठायी अत्यत आसक्ति हीं सारी आम्हा हिदूच्या हाडीमासी खेळत आहेत. यापैकीं कशाचाही त्याग करण्याची छाती तुम्हास होणारच नाही असें मी तुम्हास निक्षून सागतों. आपण चार्वाकवादाचे मोठे पुरस्कर्ते आहो असें भासविण्याचा कितीही मोठा आव तुम्हीं आणिला, तरी तुमच्या या भेडसावणीनें माझ्यासारखा मनुष्य कधींही फसावयाचा नाहीं कारण तुमच्या पोटी काय आहे हे आम्हास पक्कें ठाऊक आहे. तुम्ही कितीही भडकल्यासारखे दिसत असला, तरी तुमच्या धर्मस्थानीं हात घालताच तुम्ही आपल्या जुन्या रस्त्यावर याल याबद्दल माझी बालंबाल खात्री आहे आपला जन्मजात स्वभाव तुम्ही एकदम साफ विसराल हे शक्य तरी आहे काय ?

याकरिता येथे ज्या काही सुधारणा आपणास घडवून आणावयाच्या असतील, त्याच्या आरभी धार्मिक चळवळीस आपण आरभ केला पाहिजे. सामाजिक अथवा राजकीय कल्पनांचा प्रसार करूं लागण्यापूर्वी धार्मिक कल्पनांच्या लाटा सर्वत्र उसळू लागल्या पाहिजेत.आमच्या उपनिषद्ग्रथात, पुराणांत, मठांत, देवळात, अरण्यात आणि इतरत्र जेथे जेथे सत्यप्रमेये आडोशास लपून बसलीं आहेत, तेथून त्यास बाहेर काढून त्यांचा प्रसार सर्वत्र जारीने करणें हें आपलें सध्याचे आद्य कर्तव्य आहे. हीं आमची सत्यरत्ने सध्या विशिष्ट वर्गाच्या भाडारात कुजत पडली आहेत तेथून त्यास बाहेर काढून हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत तीं सर्वांच्या नजरेस पडेशीं केली पाहिजेत तीं सर्वांच्या मालकीचीं झाली पाहिजेत. या तत्त्वाचे श्रवण सर्वांस झालें पाहिजे. कारण हीं तत्त्वें सर्वांच्या गळी उतरविण्याच्या कार्यांत श्रवण ही पहिली पायरी आहे. प्रथम श्रवण, नतर मनन आणि नतर निदिध्यास या आत्मप्राप्तीच्या पायऱ्या आहेत. हीं तत्त्वें जनतेच्या श्रवणसपुटात घालण्याकरितां जो कोणी यत्न करील, त्यानें खरोखर सत्कर्माचें आचरण केलें असें होईल. कलियुगात एकच कर्म प्रधान आहे असें भगवान् व्यासांनीं सागितलें आहे. यज्ञ आणि महातपस्या

याचा उपयोग या युगांत नाहीं. कर्मांच्या अनेक प्रकारापैकीं सध्या एकाचाच उपयोग आहे. तें कर्म म्हणजे दान हेच होय, आणि दानाच्या अनेक प्रकारांपैकीं अध्यात्मज्ञानदान हे अत्युच्च कोटीचें दान आहे. याच्या खालोखाल योग्यतेचे दान म्हटलें म्हणजे ऐहिक विद्येचे दान हें आहे. यानतर प्राणदान आणि प्राणदानाहून कमी योग्यतेचें दान म्हणजे अन्नदान. आमचा देश हा पृथ्वीवरील सर्व देशात कगाल आहे अशी याची प्रसिद्धी आहे. असें असतांही या देशात होणाऱ्या दानधर्मांकडे पाहिले म्हणजे आमचा देश खरोखर अत्यत दानशूर आहे अशी खात्री झाल्यावाचून राहात नाहीं. उत्तरसीमेपासून दक्षिणटोकापर्यंत तुम्ही कोठेही गेला, तरी मित्राप्रमाणें तुमची बडदास्त सर्वत्र ठेविली जाते. जोपर्यंत भाकरीचा तुकडा मिळण्यासारखा आहे, तोंपर्यंत आमच्या या देशांत एकही भिकारी उपाशी मरावयाचा नाहीं. अशा या दानशूर देशानें आतां आपल्या या सद्वृत्तीचा ओघ अधिक उच्च दिशेकडे वळवून सर्वांत अत्युच्च दान करण्यास सुरुवात करावी हे बरें अध्यात्मविद्येचें दान आता आपण सुरू केलें पाहिजे आपलें हें दान एकटया हिदुस्थानापुरतेंच करावयाचे असें नाहीं. या दानाचा प्रसार साऱ्या जगभर झाला पाहिजे. पूर्वी हा प्रकार अनेक वेळा घडला आहे. बाहेर देशास अध्यात्मविद्या द्यावयाचे कार्य आज नव्यानेच सुरू करावयाचे आहे असें नाहीं. अध्यात्मविद्या हिदुस्थानाबाहेर गेली नाहीं आणि हें कार्य करणारा मीच पहिला संन्यासी आहे, असें जे कोणी समजतात त्याना त्याच्या स्वत च्या देशाचा पूर्वेतिहास ठाऊक नाहीं असे म्हटलें पाहिजे. जगाला ज्या ज्या वेळीं या विद्येची अपेक्षा उत्पन्न झाली, त्या त्या वेळीं या विद्येचा ओघ आमच्या देशातून बाहेर निघून सर्वत्र पसरला आहे. राजकीय ज्ञानाच्या प्रसारासाठी रणशिंगे व तुताऱ्या वाजवाव्या लागतात, सामाजिक आणि ऐहिक विद्येच्या प्रसारासाठीं तरवारीचीं मदत घ्यावी लागते, पण अध्यात्मविद्येच्या प्रसारासाठीं यापैकी एकाही वस्तूची गरज लागत नाहीं. या विद्येच्या प्रसाराचें कार्य अत्यत स्तब्धपणे घडून येत असते. दव पडतांना ज्याप्रमाणें ते कोणास दिसत नाही अथवा त्याचा आवाजही ऐकू येत नाहीं, त्याचप्रमाणे या विद्येच्या प्रसाराचें कार्य चालू असता कसल्याही प्रकारचा गोंगाट होत नाहीं, पण साऱ्या जगभर शातीचीं सुगंधित पुष्प मात्र या प्रसारांतूनच निर्माण होतात. आजपर्यंत अनेक वेळा आमच्या

या देशाने हें दान जगाला दिलें आहे. एखाद्या विजयी राष्ट्राच्या निशाणाखालीं अनेक मानवशाखांचें एकीकरण होण्याची जेव्हा जेव्हा वेळ आली, व प्रवासाच्या साधनास थोडीफार सुरक्षितता मिळाली, तेव्हा तेव्हां आमच्या देशांतून अध्यात्मविद्येचा प्रवाह बाह्य देशीं जाऊन पसरला असल्याचें आढळून येतें. जगाची उन्नति व्हावी म्हणून अनेक राष्ट्रानी ज्या अनेक प्रकारच्या खटपटी केल्या, त्यात आमची खटपट या प्रकारची होती भगवान् बुद्धाचा जन्म होण्यापूर्वीही कित्येक शतके असा प्रकार घडून आला आहे, आणि त्याच्या खुणा चीन देशात, एशिया मायनरमध्ये व मलायाच्या द्वीपकल्पात अजूनही आढळून येतात ग्रीस देशाच्या विजयाच्या वेळी अनेक मानवकुलाचा सबध परस्पराशी येऊ लागला त्या वेळीं वरील प्रकार घडून आला त्या वेळीं जी लाट आमच्या भूमींतून बाह्य देशी गेली तिच्याच अस्पृष्ट खुणा आज पाश्चात्य संस्कृतीच्या रूपाने दिसत आहेत. ज्या सुधारणेबद्दल पाश्चात्यास एवढा अभिमान वाटतो, ती सुधारणा आमच्या पूर्वसस्कृतीची छाया मात्र आहे हीच सधी सध्या प्राप्त झाली आहे. इग्लड देशाच्या निशाणाखाली अनेक राष्ट्राचें एकीकरण होत आहे. अनेक राष्ट्राच्या हितसबधाची सागड जशी सध्याच्या काळीं बाधली जात आहे, तशी ती पूर्वी कधीही बाधली गेली नव्हती. व्यापाराची मध्यवर्ती पीठे जशी सध्या प्रत्येक देशात जागोजाग निर्माण होत आहेत, तशीं तीं पूर्वी कधीही निर्माण झाली नव्हतीं जगाचे एक टोक आज इग्रजानीं दुसऱ्या टोकाशी जोडले आहे. जगभर रस्त्याचें जाळें एकसारखें पसरलें गेलें आहे एकदरीने जगभर पसरलेल्या मानवकुलाचा सबध आजच्या इतका पूर्वी कधीही निकटवर्ती झाला नव्हता. अशा वेळी आपल्या पूर्व ब्रीदास अनुसरून आर्यभूमीही आपला अध्यात्मज्ञानाचा प्रवाह बाहेर सोडात आहे ही गोष्ट आमच्या समजुतींत येत असेल अथवा नसेलही, पण असे घडत आहे हे मात्र खरे. हा प्रवाह आता या सर्व रस्त्याच्या जाळयातून सर्वत्र पसरत पसरत साऱ्या जगभर पसरल्यावाचून राहणार नाहीं. मी अमेरिकेला गेलो हें कांहीं मीं केलें अथवा तुम्ही केले असें म्हणता येणार नाहीं. आपल्या मातृभूमीच्या अधिष्ठात्री देवतेच्या आज्ञेनें हें घडून आलें आहे. या आर्यभूमीच्या भवितव्यतेचीं सूत्रें ज्या देवतेच्या हातीं आहेत त्या देवतेनें माझी रवानगी केली आणि माझ्यासारख्या आणखीही शेकडों हस्तकाची रवानगी ती देवता

बाह्यदेशीं करील. तिच्या या कार्यांत आडकाठी घालण्याचें सामर्थ्य या जगांत कोणालाही नाहीं. आपणांस जीं कांहीं कार्ये या जगात करावयाचीं आहेत, त्यापैकीं हेंही एक आहे. जगांतील सर्व देशांत जाऊन अध्यात्मविद्येचा प्रसार करावयाचा हें आपलें प्रमुख कार्य आहे तुम्ही हे कार्य सर्वत्र करू लागलां म्हणजे तुम्हांला ज्या प्रकारच्या ऐहिक ज्ञानाची आज गरज आहे, त्या ज्ञानाचा प्रवाह तुमच्या देशांत वाहू लागेल; पण येथे आणखीही एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. धर्मज्ञानाला रजा देऊन नुसत्या ऐहिक विद्येचा प्रसार हिंदुस्तानांत करण्याची खटपट तुम्हीं केली, तर तुमच्या तसल्या खटपटीला कधींही यश येणार नाहीं, कारण असल्या कोरड्या ज्ञानाला येथें कोणीही विचारणार नाहीं शुद्ध नीतीच्या मागे लागलेल्या बौद्ध धर्माची डाळ येथें फार काळ शिजली नाहीं याचे हेंही एक कारण आहे

या सर्व मुद्याचा विचार करून माझा पुढील बेत काय आहे, हेही आपणास कळविणें इष्ट आहे आमच्या धर्मग्रथांतील प्रमेयें लोकास सुलभपणें समजावून सांगण्यासाठी तरुण प्रचारक तयार करावे, असा माझा बेत आहे. असे प्रचारक तयार करण्यासाठीं प्रथम एक संस्था निर्माण करावयास पाहिजे. या प्रचारकांची कामगिरी फक्त हिंदुस्थानापुरतीच असावयाची असें नाहीं. त्यांनीं परदेशीही प्रवास करून आमच्या धर्माचा तिकडे प्रसार करावा, अशी माझी इच्छा आहे. याकरिता प्रथम माणसांची मदत मला हवी आहे बाकीच्या साऱ्या गोष्टींची जुळवाजुळव करणे फारसें अवघड नाहीं. त्याची तरतूद आपोआप होईल. पण मुख्य अडचण म्हटली म्हणजे धैर्यशाली आणि जोमदार माणसांची आहे. आपल्या कार्याची अव्यभिचारी भक्ति ज्याच्या चित्तात बाणली आहे आणि ज्यांच्या ठिकाणीं अढळ श्रद्धेचें बळ आहे, असली माणसे मला हवीं आहेत. फार काय सागावें, पण जर असलीं शभर माणसे मिळालीं, तर तीं सारें जग उलटे करून टाकतील, यांत शका नाहीं आपण अमुक एक गोष्ट करणारच अशी अत्यंत दृढ श्रद्धा वाटेल त्या गोष्टी करू शकेल. अशा प्रकारच्या खऱ्या श्रद्धेला अशक्य असे काहीं नाहीं अशा प्रकारची श्रद्धा ही खुद्द भगवंताची देणगीच होय. तिच्या ठिकाणीं खुद्द भगवताच्या सामर्थ्याचा वास असतो. समर्थाच्या सेवकाला वांकड्या नजरेनें पाहण्याची कोणाची छाती होणार आहे ? आपल्या धर्मा-

तील रहस्यें सर्व जगभर प्रसार पावतील असें तुम्ही केलें पाहिजे. जग, या रहस्याच्या प्राप्तीसाठी चातकासारखें वाट पहात बसले आहे. आज कित्येक शतकें आम्ही आमच्या कमीपणाच्याच गोष्टी ऐकत आलो आहों आम्ही अज्ञानग्रस्त झालों आहो, मागसलों आहों, हीच भाषा आमच्या कर्णपटावर एकसारखी आदळत आहे. आमची सामान्य जनता म्हणजे मनुष्येंच नव्हत, असें आम्ही आजवर ऐकत आलो आहो, आणि साऱ्या जगभरही आज हाच प्रकार चालू आहे. पाश्चात्य देशांतली ही सामान्य जनता आज हेंच ऐकत आहे आज कित्येक शतकें हीच गोष्ट ऐकता ऐकता जगांतील सामान्य जनता आतां खरोखरच पशुत्वाच्या मार्गाला लागली आहे. त्यांची खरी योग्यता काय आहे आणि त्यांच्या ठिकाणीं कसल्या प्रकारच्या चैतन्याचा वास आहे, हें त्याना कोणींही सागितलें नाहीं. जे चैतन्य कधी जन्म पावत नाहीं आणि जें कधीं मरतही नाही, ज्याला तरवार तोडू शकत नाही, ज्याला अग्नि जाळू शकत नाही, ज्याला वारा कोरडें करूं शकत नाहीं, जें नित्य आहे, जें अनाद्यनत आहे, जें शुद्ध आहे, जें सर्व शक्तिमान् आहे, आणि जे सर्वव्यापी आहे, त्याच चैतन्याचा वास अत्यत कमी प्रतीच्या वस्तूंतही आहे, ही गोष्ट सामान्य जनतेच्या कर्णसपुटावर कधीही गेलेली नाहीं आमच्या सामान्य जनतेला या साऱ्या रहस्याची पूर्ण माहिती करून दिली पाहिजे. या रहस्याबद्दल पूर्ण श्रद्धा त्याच्या चित्तात बाणविली पाहिजे, म्हणजे आत्मविश्वास तेथे उत्पन्न होईल. मनुष्यमात्राच्या ठिकाणीं आत्मविश्वास प्रथम पाहिजे म्हणजे अशा लोकात आणि आम्हां लोकांत जो काहीं फरक आहे तो हाच. त्याच्या धर्माबद्दल अथवा त्यांच्या कर्तव्यकर्माच्या कल्पनाबद्दल अनेक गोष्टी तुमच्या कानावर आल्या असतील, पण त्यांच्यातील व आमच्यातील हा फरक महत्त्वाचा नाहीं. महत्त्वाचा फरक वेगळाच आहे. पाश्चात्य लोकांत आत्मश्रद्धा आहे आणि आपल्या लोकांत ती नाही, हाच महत्त्वाचा फरक आम्हा दोघांमध्ये आहे. एखाद्या इग्रजाला असें वाटत असतें की, मी इग्रज आहे, त्याअर्थी मला या जगात अशक्य असें कांही नाही. स्वत.च्या 'इग्रजपणावर' त्याची इतकी दृढ श्रद्धा असते. आत्मविश्वास त्याच्या ठिकाणी पूर्ण बाणलेला असतो. या परमेश्वरी देणगीचा विसर त्याला कधींहि पडत नाहीं, आणि यामुळे परमेश्वरी सामर्थ्यापासून तो कधींही

लाब जात नाहीं. अशा स्थितीत तो म्हणेल ते करू शकतो, यांत नवल तें काय? आतां आमच्या लोकांची गोष्ट पहा आमच्या कानींकपाळीं आज कित्येक दिवस एकच ओरड चालू आहे, ती ही कीं, तुम्हा हिंदु लोकाच्या हातून कसल्याच प्रकारची कर्तबगारी होणार नाहीं ही ओरड ऐकतां ऐकता आम्हासख रोखरच स्वत च्या कर्तबगारीबद्दल शका वाटूं लागली आहे यामुळे आज स्थिति अशी झाली आहे कीं, आम्ही केवळ शून्याच्या किंमतीचे होऊन बसलो आहो. याकरिता आमच्या साप्रतच्या स्थितीत आम्हास जर खरोखर कशाची अत्यत जरूर असेल तर ती आत्मश्रद्धेची आहे. आम्ही वाटेल ते करू शकू, असा भरवसा आमच्या ठिकाणीं उत्पन्न झाला पाहिजे धर्माच्या नावाखालीं मोडणाऱ्या नाना प्रकारच्या गारुड्याचे आणि भोंदूचें जें आज येथे एवढें फावते, त्याचेही कारण आमची ही दुर्बलताच होय. आमचे मनोदौर्बल्य आज अशा थराला पोहोंचलें आहे की, कोणी कसल्याही भाकडकथा आम्हास सागितल्या तरी त्याची योग्यता आम्हास वेदवाक्यासारखी वाटूं लागली आहे. या गारुड्याच्या सागण्यातही कदाचित् काहीं तथ्य असेल, पण आज त्यांनी आम्हावर एवढे वर्चस्व स्थापिलें आहे की, त्याखालीं आमचा बहुताशीं चक्काचूर उडून गेला आहे आतां आम्हाला आपले ज्ञानततू अधिक बळकट केले पाहिजेत आता आपल्या देहात लोखडाचे स्नायू आणि पोलादाचे ज्ञानततू निर्माण केले पाहिजेत. रडून रडून आपल्या डोळ्यातील पाणीही सपून गेलें आहे. आतां रडणे बस्स झालें. यापुढें खरे मर्द होऊन तुम्ही स्वावलबनाचा धडा शिकला पाहिजे. आम्हाला खरे मर्द बनवील, आमच्या अगात पौरुषाचा सचार होईल, असा धर्म आम्हाला आज हवा आहे. आमच्या साऱ्या उपपत्तीनी यापुढें एकच गोष्ट आम्हास शिकविली पाहिजे, ती गोष्ट म्हणजे पौरुष. आमच्या साऱ्या शिक्षणाचे ध्येय यापुढे एकच असलें पाहिजे, ते ध्येय म्हणजे पौरुष. ज्या ज्या गोष्टीमुळें तुमच्या ठिकाणीं शारीरिक, मानसिक अथवा आध्यात्मिक दौर्बल्य उत्पन्न होत असेल, त्या त्या साऱ्या गोष्टी एकदम दूर झुगारून द्या असल्या गोष्टी म्हणजे हलाहल विषच होय. विष आणि जीवित ही एकत्र कशीं राहू शकतील? असल्या गोष्टी कधींही खऱ्या मानू नका. सत्याचा अवलब केला तर पौरुषाचा उद्भव झालाच पाहिजे. मग ज्याच्या ग्रहणानें तुमच्या ठिकाणीं दौर्बल्य उद्भवते, ते सत्य कसें म्हणवेल?

सत्य म्हणजे शुचिता; सत्य म्हणजे ज्ञान. सत्याचें काम दौर्बल्याचा विध्वस करावयाचा हें आहे. सत्य प्रकाशमय आहे त्याच्यायोगे बुद्धि प्रकाशमान झाली पाहिजे, आणि तुमच्या ठिकाणीं उत्साहाचा संचार झाला पाहिजे. सध्याचे गारुडी धर्मप्रवर्तक जें काहीं सांगतात, त्यात काहीं सत्यांश आहे हें खरें, पण त्यांच्या धर्मशिक्षणाचा परिणाम तुम्ही भित्रे आणि दुबळे होण्यात होत आहे याची वाट काय? या गारुड्याचा अनुभव घेतां घेता माझा जन्म आतां सपत आला; आणि या अनुभवा अतीं माझी अशी पक्की खात्री झाली आहे कीं, असल्या धर्मशिक्षणाचा जर कांहीं टिकाऊ परिणाम होत असेल तर तो तुमच्या ठिकाणीं अपौरुषाची स्थापना होत आहे, हाच होय. मीं साऱ्या हिंदुस्थानभर प्रवास केला आहे या देशांतील सारीं दरींखोरीं मीं धुडाळलीं आहेत आणि हिमालयांत जाऊन राहिलोंही आहें हिमालयांत ज्यानीं आजन्म वास केला, अशा लोकाच्याही मीं भेटी घेतल्या आहेत. माझ्या या मातृभूमीसंबधीं माझ्या हृदयांत जो उमाळा उठतो, त्याचें वर्णन कोणत्या शब्दानीं करू? तुमची अवनति होत आहे, हें पाहून माझे हृदय तिळतिळ तुटते. आता तुमच्या पुरुषत्वाचा अधिक अधिक भग होत आहे, हे माझ्या डोळयांनी मला पाहवणार नाहीं. यामुळें तुमच्या बऱ्यासाठीं आणि सत्यासाठीं उच्च घोषानें 'थांबा' एवढाच शब्द उच्चारणें मला भाग पडत आहे. आता यापुढें आणखी एकही खालची पायरी तुम्हीं उतरू नये म्हणून कठशोष करणे मला भाग आहे. ज्या मानवकुलात माझा जन्म झाला, त्या कुलाची अवनति स्वत.च्या डोळयानीं पहात असता मी स्वस्थ कसा बसेन? याकरिता पुन पुन्हा तुम्हा सर्वास हीच विनति मी करितों कीं, असल्या दौर्बल्यदायक गारुडीविद्येचा त्याग करा, आणि समर्थ व्हा पौरुषाचा सचार तुमच्या अगीं होऊ द्या. उपनिषद्ग्रथात काय सांगितलें आहे, हे जरा डोळे उघडून पहा. त्या प्रकाशमय, ज्ञानदायी आणि बलदायी ग्रथरत्नाकडे वळा असल्या गारुडीविद्येला यापुढें चिकटून बसू नका सत्याला इतके आडपडदे आणि इतकी चोरी असण्याचें यत्किंचित् तरी कारण आहे काय? सत्य अगदी साधेभोळें आहे. ज्याचा अनुभव तुम्हांला नित्यश वाटेल तितका होतो, तेंच सत्य. आम्ही जिवत आहो ही गोष्ट जितकी उघड आणि जितकी साधी आहे, तितकेंच सत्यही उघड आणि साधें आहे. उपनिषद्ग्रथानीं तुमच्यापासून कांहीं

सुद्धां चोरून ठेविलेलें नाहीं. मग तुम्हांला जें काहीं हवें असेल तें त्यांजपाशींच कां मागत नाहीं ? त्याच्याच पायीं लागा, त्यांचेच आराधन मनोभावें करा म्हणजे हिंदुस्थानच्या उन्नतीचा काळ खास अगदीं नजिक येईल.

आता आणखी दोनच शब्द बोलून मी आपली रजा घेतो देशभक्ति हा शब्द सध्या आपल्या बऱ्याच परिचयाचा झाला आहे. याचा घोष बऱ्याच ठिकाणाहून आपल्या कर्णपथावर येत असतो देशभक्ति मलाहि प्रिय आहे, आणि देशभक्तीची खरी व्याख्या काय, याचाही थोडाबहुत विचार मी आपल्या मनाशीं केला आहे जगात ज्याला काहींतरी पुरुषार्थ संपादावयाचा असेल, त्याला तीन गोष्टींची आवश्यकता आहे. पहिली गोष्ट म्हणजे अंतःकरणजागृति ही होय. अमुक एक गोष्ट करावीशी वाटली तर त्या वाटण्याचा उमाळा थेट अंतःकरणाच्या तळापासून निघाला पाहिजे. अशा कामी विवेचक बुद्धि लंगडी आहे अमुक एक गोष्ट केवळ विवेचक बुद्धीला पटली म्हणून ती करावयाची असें होता कामा नये. कारण बुद्धीचा प्रदेश फार आकुंचित आहे. याकरितां कोणत्याही कार्याला अंतःकरणाचा उमाळा पाहिजे अंतःकरणांत खरा उमाळा उत्पन्न झाला, तर कार्याची सहज स्फूर्ति निर्माण होते खऱ्या प्रेमाच्या उमाळ्याचा जोर असा विलक्षण आहे कीं, अशक्य वाटणाऱ्या गोष्टीही सहजासहजी होऊन जातात. या विश्वात जीं अनंत रहस्यें भरलीं आहेत, त्या साऱ्यांच्या किल्ल्या एका प्रेमाच्या-भक्तीच्या-हातीं साठविलेल्या आहेत. माझ्या भावी सुधारक बंधूनो, प्रथम अंतःकरण जागृत करा. माझ्या प्रिय देशभक्तांनो, तुम्हीही प्रथम अंतःकरणजागृतीच्या मार्गे लागा. तुम्ही तोंडानें ज्या काही गोष्टी बोलता त्यांचा प्रतिध्वनि तुमच्या अंतःकरणाच्या खोल दरींत कोठेंतरी उठत आहे काय ? देवांचे आणि ऋषींचे वंशज आज पशूंच्या राज्यांत सामील व्हावयास योग्य झाले आहेत, असें तुम्हांस खरोखर अंतःकरणपूर्वक वाटतें काय ? लक्षावधि लोकांच्या पोटाच्या दामट्या वळल्या आहेत, याबद्दल तुमच्या अंतःकरणाला थोडातरी ओलावा येतो काय ? कित्येक शतकें लक्षावधि लोक एकसारखे कंगाल स्थितींत राहिले आहेत, याबद्दल तुमच्या अंतःकरणाला कांहीं द्रव येतो काय ? काळ्याकुट्ट ढगांनीं आकाश भरलें म्हणजे ज्याप्रमाणें उदासीन अंधकार सर्वत्र पसरतो, त्याप्रमाणे अज्ञानाच्या उदासीन काळोखांत आमची मातृभूमि बुडून राहिली आहे, याबद्दल तुमच्या अंतःकर-

णांत कांहीं कालवाकालव होते काय ? या साऱ्या परिस्थितीमुळें तुमच्या अतःकरणात विलक्षण अस्वस्थता उत्पन्न होते काय ? यामुळें तुमची कधीं झोंपमोड झाली आहे काय ? या साऱ्या स्थितीची कहाणी तुमच्या रक्तांत भिनून साऱ्या देहभर फिरत आहे काय ? तुमच्या हृदयाच्या प्रत्येक ठोक्या-बरोबर या दुर्दैवाच्या कहाणीचा ध्वनि उमटत आहे काय ? अद्यापि तरी तुम्हीं जवळजवळ वेडे होण्याच्या मार्गास लागला आहा काय ? आपल्या मातृभूमीच्या अवनतीशिवाय बाकीच्या साऱ्या कल्पना तुम्ही विसरला आहां काय ? कीर्ति, बायकापोरें, घरदार,—फार काय पण प्रत्यक्ष आपला देहसुद्धा—तुम्ही विसरलां आहा काय ? तुम्हांस या साऱ्यांचा पुरा विसर पडला आहे काय ? तुम्हास देशभक्त व्हावयाचें असेल, तर त्या मार्गातली ही पहिली पायरी आहे, पण ही अगदी पहिलीच पायरी आहे हे विसरू नका. महाधर्म-परिषदेंत भाषण करावे म्हणून मी अमेरिकेस गेलों नाही, हें तुम्हापैकीं पुष्कळास ठाऊक असेल, पण माझ्या छातीवर आतांच सागितलेल्या विचाराचें विल-क्षण दडपण पडलेलें होते, आणि ते कमी करण्याचा कांही उपाय पाहावा म्हणून मीं देशातर केलें हिंदुस्थानात बारा वर्षें मी फिरलों या अवधीत माझ्या देशबाधवांच्या उपयोगीं पडण्याचा कांही मार्ग मला दिसेना. हा मार्ग शोधण्यासाठीं मी अमेरिकेस गेलों त्या वेळीं मला जे ओळखीत होते, त्याना ही गोष्ट खास आठवत असेल. महाधर्मपरिषदेची पर्वा मला काय आहे ? माझ्याच हाडामासाचे माझे बाधव प्रत्येक दिवशीं अधिकाधिक खाली जात आहेत, हे पाहत असता अमेरिकनासबधीं नुसता विचारही माझ्या चित्तात येणार नाहीं मी अमेरिकेला गेलो त्याचे खरें कारण हे आहे तिकडे जाण्यात माझ्या कार्याची पहिली पायरी मी चढलों

याकरिता अत करणाची तयारी प्रथम पाहिजे; पण सध्या नुसती बडबड करण्यात जो कालाचा अपव्यय तुम्ही करीत आहां, त्यापेक्षा चालू स्थितींत बदल पाडण्याचा एखादा प्रत्यक्ष मार्ग तुम्ही शोधून कां काढीत नाही ? आपल्या देशबांधवांचीं अत करणें दुःखाच्या डागण्यानीं पोळलीं आहेत, हे पाहून त्याजवर अपशब्दाचे आणखी डाग देण्यापेक्षां गोड शब्दांच्या अमृ-ताचा वर्षाव करणें अधिक युक्त नाहीं काय ? मृत्यूच्या दाराशीं बसलेल्या, आपल्या बांधवांवर तरवार उगारण्यापेक्षां त्यांना हातीं धरून जिवंत सृष्टींत

परत आणणें तुम्हाला बरें वाटत नाहीं काय? नुसतीं शब्दाचीं रणें माजविण्यापेक्षां असें करण्याचा काहीं प्रत्यक्ष मार्ग तुम्हीं शोधून का काढू नये? इतके तुम्हीं केलें तरी तुमचे घोडे गंगेस न्हाले असें तुम्ही समजूं नका पर्वतप्राय अडचणीही उल्लंघून जाण्याची तुमची तयारी आहे काय? सारे जग हाती तरवार घेऊन उभें राहिलें तरी आपल्या चित्ताला जें बरें वाटेल, तेंच करण्याची तुमची तयारी आहे काय? बायकापोरानी सोडिलें, घरादाराचें वाटोळें झालें, कीर्ति बुडाली आणि भीक पदरी पडली तरी स्वतःच्या अंतःकरणप्रवृत्तीलाच चिकटून बसावयाची छाती तुम्हांस आहे काय? काही झालें तरी आपल्या सध्याच्या अव्यभिचारी भक्तीत अंतर पडूं द्यावयाचे नाहीं असा तुमचा दृढ निश्चय आहे काय? राजा भर्तृहरी म्हणतो, "वानोत निंदोत सुनीतिमंत। चलो असो वा कमला गृहात। हो मृत्यु आजीच घडो युगांतीं। सन्मार्ग टाकूनि भले न जाती॥' हे भलेपण तुमच्या अंगीं दृढ झालें आहे काय? हे गुण तुमच्या अंगी खरोखर बाणले असतील, तर तुमच्यापैकी प्रत्येकाच्या हातून खरोखरच चमत्कार घडतील मग तुम्हाला वर्तमानपत्रात चऱ्हाटे वळण्याचें कारण नाहीं, आणि व्याख्यानें देत फिरण्याचेंही कारण नाहीं. तुमच्या चेहऱ्यावर उमटलेलें नुसते तेजच तुमचे सारें काम करील. अशा स्थितींत तुम्ही एखाद्या डोंगराच्या दरींत जाऊन बसला तरी तुमचे विचारतरंग ती दगडी कपाटे फोडून साऱ्या जगभर प्रवास करतील. त्यांना रहावयास योग्य असे मेंदूचें वसतिस्थान मिळेपर्यंत ते प्रवास करीत राहतील, आणि योग्य स्थान सापडतांच तेथें शिरून तेथून प्रत्यक्ष कार्यास सुरवात करतील. अत्यंत विशुद्ध मनोभावाच्या ठिकाणी एवढे सामर्थ्य असतें

मित्रहो, माझे हे लांबलचक चऱ्हाट ऐकतां ऐकता तुम्ही कंटाळला असाल, अशी मला भीति वाटते. तथापि आणखी क्षणभरच कळ काढा सज्जनहो, देशबांधवहो, माझ्या लाडक्या लेंकरानो, आपलें हे राष्ट्रीय जहाज कोट्यवधि जीवास आपल्या पोटात घेऊन कालसमुद्रातून प्रवास करीत आहे. आज कित्येक शतके त्याचा प्रवास अखंड चालू आहे त्याच्या पोटातून लक्षावधि जीवानीं सुखरूपपणें प्रवास केला आहे आणि ते परतीरीं आनंदभूमीवर जाऊन बसले आहेत. सध्या कदाचित् तुमच्याच गुणांमुळें हें जहाज थोडें

खिळखिळे झालें आहे. त्याला एक लहानसें छिद्र पडून गळते झालें आहे, पण याकरितां त्याला शाप देणें तुम्हास उचित आहे काय ? जगात जें कार्य कोणीं-ही केलें नाही, ते कार्य आजपर्यंत ज्यानें बिनबोभाट बजाविलें, त्याला शिव्या देणें उचित आहे काय ? या जहाजाला भोके पडलीं असतील तर तीं बुजविण्याचें काम तुमचे आहे. आपण हीं भोकें बद करू या. आमच्या हृदयाच्या रक्तानें हीं भोके बद होण्यासारखीं असली, तरी ते रक्त देऊनही ती बंद करण्याचें आपलें काम आहे. हे काम करण्यात आपणाला आनद वाटला पाहिजे. आमच्या हातून हे कार्य होण्यासारखें नसेल तर आपण सुखाने देहपात करू या. काही झालें तरी शिव्याशाप देण्याचें साहस मात्र यापुढे करणें नको आपल्या समाजाबद्दल वाईट अक्षरही तोडावाटे काढू नका. पूर्व काळच्या त्याच्या वैभवाबद्दल माझ्या अत करणांत अपूर्व भक्ति वसत आहे. मित्रानो, तुम्हा सर्वांवर माझे इतके प्रेम आहे, याचें कारण हेच कीं, तुम्ही देवदेवताचीं लेंकरे आहा तुम्ही आपल्या महानुभाव पूर्वजाचे वशज आहा. अशा तुम्हाला शाप देण्याचे भलतेच धाडस मी कसें करू ? छे ! छे ! कधीही मी असें करणार नाही. परमेश्वराचा तुम्हा सर्वांवर वरदहस्त असो. बाळानो, माझे पुढील बेत काय आहेत, हे सांगण्यासाठीच मी येथे आलो आहे. तुम्हांला ते पसत पडले तर तुमच्याबरोबर कबर बाधून काम करण्यास मी तयार आहे तुम्हाला ते पसत न पडले आणि लाथा मारून तुम्हीं मला येथून घालवून दिलें, तरी पुन परत येऊन पुन्हा हेच सागेन कीं, ' बाबानो, तुम्ही बुडत आहा ' मी आता कायमचा तुमच्यांत येऊन बसलो आहे. आपण बुडावे अशीच भवितव्यता असेल, तर आपण सारे बरोबरच बुडू या, पण बुडत असताही अपशब्द मात्र तोंडावाटे काढू नका.



# ईश्वराचे अवतार.



भरती आणि ओहटी ही या विश्वाच्या मुळाशीं आहेत, असे आर्यतत्त्वज्ञांचे मत आहे. प्रथम विश्व प्रतीत होतें अथवा दिसू लागतें. नतर त्याची उत्क्राति होत होत ते काही काळ पूर्ण स्थिर अशा अवस्थेस प्राप्त होते व नतर काहीं काळ तें अपक्रात होत जाते अपक्रातीची क्रिया पूर्ण झाली म्हणजे काही काळ ते अगदी निष्पदावस्थेत असते व त्यानतर ते पुन्हां उत्क्रात होऊ लागते. अशा रीतीनें उत्क्रातीच्या व अपक्रातीच्या लाटा एकसारख्या चालू आहेत, असें आर्यतत्त्वज्ञाचें म्हणणें आहे. उत्क्रातीमागून अपक्राति व अपक्रातीमागून उत्क्राति अशा रीतीने विश्वाच्या भरतीओहटीचे हे राहाटगाडगें अखड चालू आहे. विश्वाच्या घडामोडींत ज्याप्रमाणें ही भरतीओहटी चालू आहे, त्याचप्रमाणें या विश्वातील प्रत्येक घटकातही तशाच प्रकारची भरतीओहटी चालू आहे आपणा मनुष्याच्या सामान्य जीवितक्रमातही हीच भरतीओहटी चालू असल्याचे आढळून येते या भरतीओहटीच्या रहाटमाळेत मोठमोठी राष्ट्रेंही गोवलीं असल्याचें प्रत्यतर इतिहासांतरी आढळून येते. चढ आणि पड अथवा भरती आणि ओहटी यांच्या तडाक्यातून कोणतेही राष्ट्र सुटलेले नाही राष्ट्राच्या उदयानंतर त्याला उतरती कळा लागते व ते पूर्णपणे पश्चिम क्षितिजावर गेले म्हणजे काहीं काळानें त्याचा पुन्हा उदय होऊ लागतो व या उदयाच्या वेळीं त्यानें काही अधिक सामर्थ्य कमाविलें असल्याचाही प्रत्यय येतो. अशा रीतीनें ही सारी घडामोड अखंड चालू आहे. धर्माच्या बाबतीतही याच प्रकारची भरतीओहटी आढळून येते. प्रत्येक राष्ट्राची धार्मिक बाजू पाहिली, तर ती बाबही या नियमास अपवाद नाही असें आढळून येईल. राष्ट्राची अवनति झाली कीं, तिजबरोबर त्या राष्ट्राच्या साऱ्या घटकात विस्कळितपणा येतो. कांहीं काळानें सघटनक्रियेस सुरवात होते व या क्रियेबरोबरच राष्ट्राच्या उदयासही सुरुवात होते. अशा वेळीं या सघटनात एखाद्या प्रचड लाटेचें अस्तित्व प्रत्ययास येतें. भरतीच्या लाटा ज्याप्रमाणें एकाहून एक मोठ्या येतात व भरती पूर्ण होण्याच्या वेळी ज्याप्रमाणें एक लाट सर्वांहून मोठी येते, त्याचप्रमाणें उद्यो-

न्मुख राष्ट्रांत नानाप्रकारच्या संघटनात्मक लाटा येऊ लागतात या सर्वांत जी लाट प्रचड असते, तिच्या शिखराच्या मध्यबिंदूवर एक अत्यत तेजोमय असा जीवात्मा विराजमान झालेला असतो व आपण त्याला अवातरी पुरुष असें म्हणतों त्या राष्ट्राचा व त्या अवतारी पुरुषाचा परस्पर जन्यजनक-संबध असतो. एका अर्थी त्या राष्ट्रानें तो अवतार निर्माण केलेला असतो म्हणून त्याच्या पितृत्वाचा मान त्या राष्ट्राकडे जातो. पण उलटपक्षीं त्या राष्ट्राला पूर्णत्व देण्याचें कार्य तो पुरुष करीत असतो त्या अर्थी तो त्या राष्ट्राचा जनक आहे, असे म्हणावयास हरकत नाहीं. राष्ट्राचा आणि त्याच्या अवतारी पुरुषाचा जन्यजनकसबध परस्परावलबी असतो ज्या ज्या प्रकारच्या निरनिराळया लाटांनीं त्या राष्ट्राची संघटनात्मक क्रिया पूर्णत्व पावावयाची असते, त्या त्या लाटाचे प्रवाह सुरू होण्यास अवतारी पुरुषाच्या मदतीची अपेक्षा असते. त्याचें सामर्थ्य समाजात सचार करू लागते व समाजाच्या व्यवस्थित घटनेस सुरवात होते. उलटपक्षीं व्यवस्थित घटनेबरोबर जे सामर्थ्य आपोआप निर्माण होत असते, ते त्या अवतारी पुरुषात सचरते अशा रीतीनें अवतारी पुरुष आणि समाज ही परस्परांचें पोषण करीत असतात हेच पुरुष जगाचे शास्ते असतात परमेश्वराकडून सदेश घेऊन आलेले महात्मे अथवा जगाचे नेते हेच पुरुष होत

एकच धर्म, एकच महात्मा आणि परमेश्वराचा एकच अवतार असणे या जगात शक्य आहे, अशी कल्पना मनुष्याच्या मनांत असते, पण ही कल्पना चुकीची आहे. आजपर्यंत झालेल्या महात्म्याच्या चरित्रांचें आपण अवलोकन केलें, तर एकेकाकडे एकेक विशिष्ट कामगिरी सोपविली होती असें आपणास आढळून येईल या अनेक प्रकारच्या कामगिऱ्याचें योग्य मिश्रण होणें हेंच अखेरच्या एकतानतेस कारणीभूत असतें यापैकीं कोणत्याही एकामुळेंच सकलित कार्य निर्माण होत नाही ज्याप्रमाणे अनेक मानवी वशांपैकीं कोणत्याही एकाच वशाला पृथ्वीवरील भोग भोगण्याचा ताम्रपट कोणी दिलेला नाही, त्याचप्रमाणें हें आहे. ‘या साऱ्या जगाचे भोक्ते आम्हीच’ असे म्हणावयाची छाती कोणाही एकाच मानवी वशास होणार नाहीं प्रत्येक मानववशाला निरनिराळया प्रकारचा कार्यभाग करावयाचा असतो आणि ईश्वरी हेतूची सार्थकता होण्यासाठीं या प्रत्येक कार्याची आवश्यकता असते.

अनेक प्रकारच्या मानववंशांनीं केलेल्या अनेक कारणामुळेंच एक ईश्वरी हेतू साध्य होत असतो.

याचप्रमाणें कोणत्याही एकाच महात्म्याचें साम्राज्य जगावर सर्वकाळ चालूं शकणार नाही. आजपर्यंत ही गोष्ट शक्य झाली नाहीं आणि यापुढेंही ती शक्य होणार नाहीं, कारण प्रत्येक महात्मा हा संकलित कार्यांपैकीं एखाद्या अंशाचाच प्रवर्तक असतो, आणि या दृष्टीने पाहिलें म्हणजे तो अंश जगाच्या पोषणासाठी सर्वकाल आवश्यक असल्यामुळें, प्रत्येक महात्मा हा जगाचा सार्वकालिक शास्ताच आहे असें म्हणावयास हरकत नाही

आपणापैकी प्रत्येक जण वैयक्तिक धर्माचा जन्मादारभ्य अनुयायी आहे, असें म्हणावयास हरकत नाही आपण तत्त्वाविषयीं आणि उपपत्तींविषयीं बोलत असतो, व ते सर्व ठीकही आहे, पण आपला प्रत्येक विचार, आपली प्रत्येक हालचाल आणि आपलीं सर्व कर्में याचे अवलोकन केल्यास आपणास असें आढळून येईल की, हीं तत्त्वे व या उपपत्ती एखाद्या व्यक्तीकडून आलेल्या असल्यामुळेच आपणास त्या ग्राह्य झाल्या आहेत कोणा प्रत्यक्ष व्यक्तीनें याचें कथन केल्याशिवाय त्या आपणास ग्राह्य होत नाहीत प्रत्यक्ष सृष्टीत वावरणाऱ्या एखाद्या महात्म्याकडून एखादें तत्त्व प्राप्त झालें म्हणजेच आपल्या मनात ते बरोबर उतरतें. प्रत्यक्ष उदाहरण पाहिल्यानतर त्या उदाहरणाच्या पोटी असलेल्या तत्त्वाचें आकलन आपल्या बुद्धीस करता येते. प्रत्यक्ष उदाहरणाशिवाय अथवा प्रत्यक्ष सृष्टीतील एखाद्या देहधारी महात्म्याच्या सांगण्याशिवाय हीं तत्त्वे आपणास आकलन करितां आली असती, तर खरोखर फार बहार उडाली असती, पण दु खाची गोष्ट इतकीच कीं, आपलीं मने अद्यापि अशा प्रकारच्या परिणतावस्थेस पोचलेलीं नाहींत; आणि यामुळेंच आपणांपैकीं बहुतेकानीं आपलीं मने या महात्म्याच्या चरणीं वाहिली आहेत. ख्रिश्चन काय, बौद्ध काय अथवा हिंदु काय यापैकीं प्रत्येकानें कोणाना कोणा महात्म्याच्या चरणीं आपलें मन वाहिलें आहे. अशा प्रकारें एकाच व्यक्तीस परमेश्वराचा अवतार मानून त्याची पूजा करूं नये असा अट्टाहास महमदी धर्मप्रवर्तकानी आरंभापासूनच केला आहे महात्म्याची अथवा अवतारी पुरुषाची पूजा करू नये अगर त्यांच्या चरणीं लीन होऊ नये असें त्यांचें म्हणणें होते, पण यामुळें एकाच अवताराच्या अथवा महा-

त्याच्या जागीं संत आणि महत निर्माण झाले, हें कांहीं खोटें नाहीं मुसलमानी धर्माचे अनुयायी एकाच अवतारी पुरुषाच्या अभावीं हजारों संतमहतांची पूजा करूं लागले ही गोष्ट मानवी मनाच्या घटनेविरुद्ध आहे असें म्हणता यावयाचें नाहीं. आपल्या मनाची सामान्य घटनाच अशी असल्यामुळें जें झालें तें युक्तच झालें, असे म्हटलें पाहिजे व्यक्तीच्या चरणीं मन वाहणें हें आपणांस अपरिहार्य आहे, आणि हें आपल्या बऱ्यासाठींच आहे "परमेश्वराची भेट करून दे" असें येशू ख्रिस्ताला कोणीं म्हटलें तेव्हां तो म्हणाला, "ज्यानी मला पाहिलें, त्यानीं परमेश्वरालाच पाहिलें" येशू ख्रिस्त हा मानवदेहधारी होता, इतकीच गोष्ट आपल्या लक्षात राहिली आहे. तो देहधारी होता, ही गोष्ट त्यानें शिकविलेल्या तत्त्वापासून आपणास वेगळी करता येत नाही आपल्या मनाची घटनाच अशी आहे कीं, तत्त्वें आणि तत्त्वदर्शी यांची जोडी फोडणें आपणास शक्यच नाहीं. या खोलींत उजेडाच्या किरणाचे स्पद सर्वत्र व्यापून आहेत असे असतां आपणांस ते सर्वत्र का आढळत नाहींत? हे स्पद आपणास पहावयाचे असले, तर ते फक्त दिव्याच्या रूपानेंच दिसतात असें का? याचें कारण इतकेच कीं, आपल्या डोळ्याची रचनाच अशी आहे. परमेश्वर सर्वव्यापी आहे, तो नाहीं असें ठिकाण या जगात कोठेंही नाहीं, पण आपली मनोभूमिकाच अशा प्रकारें रचली गेली आहे कीं, त्याची ओळख आपणास अवतारी पुरुषाच्या ओळखीनेंच होते ज्या ज्या वेळीं हे अवतारी पुरुष निर्माण होतात, त्या त्या वेळींच ईश्वराच्या अस्तित्वाची साक्ष मानवी मनास पटते. जन्मापासूनच या अवतारी पुरुषाची आणि आपणा सामान्य मनुष्याची दिशा वेगवेगळी असते. आपण या जगात जन्म घेतो तेव्हा केवळ भिकाऱ्यासारखे असतो. महात्मे हे बादशहाप्रमाणें असतात. आपण एखाद्या पोरक्या पोराप्रमाणें असतों वाट चुकलेला मनुष्य ज्याप्रमाणें इतस्ततः भटकत असतो, व कोणत्या दिशेनें जावें याचा उमज त्यास न पडल्यामुळें तो भांबावून गेलेला असतो, तशीच आपणा सामान्य मनुष्याची स्थिति आहे. आपण जन्म का घेतला, आपलें कर्तव्य काय आहे, इत्यादि अनेक प्रश्नांस आपल्याच्यानें उत्तर देववत नाहीं. आमच्या जन्माचा आणि आयुष्यक्रमाचा अतिम हेतु काय, हें आपणांस सागता येत नाहीं. आज आपण एका प्रकारें वर्तत असतों आणि उद्यां पहावें तों कांहीं भलताच प्रकार आढळून येतो. एखादी

गवताची काडी समुद्रांत पडली असतां, ज्याप्रमाणें ती प्रत्येक लाटेबरोबर वर खालीं होत असते, त्याचप्रमाणें आपलीही गोष्ट आहे. वावटळींत सापडलेलें एखादें पीस ज्याप्रमाणें कुठें तरी वहावलें जातें, त्याचप्रमाणें संसाराच्या वावटळींत सांपडलेले आपले जीव कोठेंतरी वाहवत आहेत मानवी जातीचा इतिहास आपण अवलोकन केला तर आपणास असें आढळून येईल कीं, हे अवतारी पुरुष नेहमीं जन्म घेत असतात, आणि त्यांच्या जन्मापासूनच त्यांच्या कार्याची दिशा ठरलेली असते. त्याचें कार्य आणि त्यांचे मार्ग हीं सारीं आखून पूर्णपणें तयार केलेलीं असतात, आणि या आंखलेल्या रेषेबाहेर एक तसूभरसुद्धां हे महात्मे पाऊल टाकीत नाहींत, असेंही आपणांस आढळून येईल. कारण, या महात्म्यांचा जन्म एका विशिष्ट हेतूच्या साध्यासाठींच असतो. परमेश्वराचा एखादा विशिष्ट संदेश सगळया मानवी जातीस पोंचवावा, हेंच यांचें कार्य असतें. कडाक्याचे वादविवाद करावे, अथवा बुद्धिवादानें आपलें म्हणणें सिद्ध करावें, हा याचा हेतूच नसतो यामुळें बुद्धिवादाच्या भरीस ते कधींही पडत नाहींत. त्यांना जीं काही प्रमेयें सांगावयाचीं असतात, त्यांचें सत्यत्व त्यानीं बुद्धिवादानें सिद्ध केल्याचे कोठेंही ऐकिवात नाहीं. यांपैकीं एकाही महात्म्यानें कधींही बुद्धिवाद केलेला नाही, आणि त्यांनीं बुद्धिवाद तरी का करावा? कारण जीं प्रमेयें ते प्रत्यक्ष अवलोकन करतात आणि ज्याचा प्रत्यक्ष अनुभव त्यास घडत असतो, तेवढींच तत्त्वे ते लोकाना सांगत असतात सत्याशीं त्यांची प्रत्यक्ष भेट झालेली असते, इतकेंच नव्हे, तर इतराची भेट करून देण्याचीही त्याची तयारी असते. " परमेश्वर आहे काय?" असा प्रश्न तुम्हीं मला विचारला आणि " होय " असें त्याचें उत्तर मीं दिलें, तर ताबडतोब तुम्ही मला " असे कशावरून ?" असा दुसरा प्रश्न करतां हा तुमचा प्रश्न माझ्या कर्णसपुटांत आदळल्याबरोबर माझी जी त्रेधा उडते, तिचें काय वर्णन करावे? कसल्यातरी प्रकारची कारणपरंपरा तुमच्यापुढें उभी करून माझें म्हणणें तुम्हाला पटवावे, याकरिता माझ्या बुद्धीची विलक्षण धडपड सुरू होते, पण एखाद्या अवतारी पुरुषाला तुम्ही असाच प्रश्न केला तर प्रत्यक्ष परमेश्वराचीच भेट करून देण्याचे सामर्थ्य त्याला असते. " परमेश्वर आहे कशावरुन ?" या प्रश्नाला त्याचे उत्तर "हा पहा!" हेंच. त्याची व परमेश्वराची भेट बुद्धिगम्य मार्गानें झालेली नसते. बुद्धीच्या

घटपटाची खटपट करून परमेश्वराचें अस्तित्व त्यानें सिद्ध केलेलें नसते परमेश्वराचे अस्तित्व प्रत्यक्ष भेटीनेंच त्याला पटलेलें असतें. तो कोठेंतरी अधारात चाचपडत नसतो प्रकाश त्याच्या दृष्टीसमोरच असतो. हे टेबल माझ्या नजरेनें मला दिसत आहे, आणि त्याचे अस्तित्व नाही असें कोणी कसल्याही प्रकारच्या बुद्धिवादाने मला सागू लागला तरी त्याचे म्हणणे मला पटेल काय? मी ज्या अर्थी तें प्रत्यक्ष पहात आहे, त्या अर्थी विरुद्धपक्षी केवढाही पुरावा असला तरी तो मला ग्राह्य होणार नाही. हीच गोष्ट महात्म्यासही लागू आहे. त्याचें अवतारकार्य, त्याचे मार्ग आणि अतिम हेतू ही सारीं त्यांच्या नजरेसमोर असतात यामुळें इतर प्रकारच्या कोणत्याही परिस्थितीने त्याचे चित्त भ्रम पावत नाही. आत्मविश्वास त्याच्या ठिकाणीं पूर्णपणे असतो अशा प्रकारचा आत्मविश्वास कोणत्याही प्रतीच्या सामान्य मनुष्यात आढळावयाचा नाही "परमेश्वराचें अस्तित्व तुम्हास मान्य आहे काय?" "पुनर्जन्म तुम्हास मान्य आहे काय?" अथवा "अमुक एक जन्म तुम्हाला मान्य आहे काय?" इत्यादि प्रश्न आपण एकमेकास विचारीत असतों; पण या प्रश्नाची निश्चित उत्तरें मिळण्यास जो मूळ आधार लागतो, त्याचीच वाण आपणापाशीं आहे. मूळ पायाच आपण विसरलों आहों. हा पाया म्हणजे आत्मविश्वास. ज्याला आत्मविश्वास नाही, त्याच्या ठिकाणी इतराविषयी विश्वास कसा उत्पन्न होणार? माझे अस्तित्व तरी निश्चित आहे कीं नाही, याचीच मला खात्री नाही माझे अस्तित्व सर्वकालीन आहे असें एका क्षणी वाटत असता, दुसऱ्या क्षणीं मृत्यूच्या भीतीनें मी थर थर कापू लागतो 'मी अमर आहे' असें मला वाटत असते आणि दुसऱ्या क्षणी एखाद्या यत्किंचित कारणानें मी कोण आहे आणि कोठे आहे, याचें भान मी विसरून जातो. मी जिवत आहे कीं मेलेलो आहे हेसुद्धा मला समजत नाही. एका क्षणी मी परमेश्वराचा अश आहे, मी मोठा धार्मिक पुरुष आहे, असें मला वाटत असते आणि दुसऱ्या क्षणीं मला अशी एखादी थप्पड बसते कीं, मी अगदीं चित होऊन जातों असे का व्हावे? याचे कारण इतकेच कीं आत्मविश्वास माझे ठिकाणी नाही. ज्या मूळ पायावर पुढील इमारत उभारावयाची तो पायाच उखडून गेलेला आहे, हे या परिस्थितीचे कारण होय. महात्मे आणि आपण सामान्य मनुष्ये याजमध्ये जो फरक आहे, तो हाच. त्यांच्या ठिकाणीं

आत्मविश्वास पूर्ण असतो, असें आपणास नेहमीं आढळून येईल. इतका पूर्ण आत्मविश्वास कसा उत्पन्न होतो, हे आपणांस सांगता येत नाहीं. महात्मे स्वत विषयीं जें कांहीं सागतात, त्याची उपपत्ति आपण अनेक मार्गांनी लावण्याची खटखट करीत असतो, याचेही कारण हेंच महात्म्याच्या एका वचनावर हजारोजणाच्या हजारों उपपत्ति बाहेर पडतात, याचेही कारण हेंच. त्याना त्याचा अनुभव कसा मिळाला, याची किल्ली आपणास ठाऊक नसते, आणि यामुळे त्याचें वचन ताबडतोब आपल्या गळीं उतरत नाही मग त्यासाठी हजारो प्रकारच्या उपपत्ति बसविण्याची खटपट आपण करूं लागतो. महात्मे बोलू लागले म्हणजे सारें जग एकतानतेने त्याचें भाषण ऐकू लागते. त्यांच्या भाषणातील प्रत्येक शब्द शुद्ध अनुभवाचा असल्यामुळें तो प्रत्येकीं एकेक बाणच असतो त्याच्या प्रत्येक शब्दाच्या पाठीमागे विश्वशक्ति उभी असते अशा शक्तीच्या सहाय्याशिवाय नुसत्या फुसक्या शब्दाला काय किंमत आहे? पण तुमच्या भाषणाला पाठिंबा असला म्हणजे तुम्हीं कसलीही भाषा वापरली आणि कसल्याही प्रकारची वाक्यरचना तुम्ही केली तरी काय हरकत आहे? व्याकरणदृष्ट्या तुम्ही शुद्ध बोलता कीं नाही, अथवा तुमची भाषा सुदर आहे कीं नाही, असल्या प्रश्नाना काय महत्व आहे? तुम्हाला जें काहीं सागावयाचें आहे, त्यांत वास्तविक तात्पर्य काय आहे, हाच काय तो महत्वाचा मुद्दा आहे! इतर आनुषगिक गोष्टीना काडीचेही महत्व नाहीं. जर तत्त्व तुम्हापाशीं असेल तर तें कोणत्याही वेड्या वांकड्या रूपानें तुम्हीं द्या. रूपाचा प्रश्न यत्किंचितही महत्त्वाचा नाही तुम्हास जें काही दान करावयाचे आहे, तें करण्याचा शब्द हा एक मार्ग आहे. अनेक प्रकारच्या मार्गापैकीं हासुद्धां एक मार्ग आहे. केवळ मौन धरून सुद्धां आपलें विशिष्ट कार्य साध्य होण्यासारखें असते. सस्कृतांत पुढील अर्थाचा एक श्लोक आहे. "सद्गुरु वृक्षाखालीं बसलेले मी पाहिले. त्यांचे वय सोळा वर्षांचें होते त्याच्या सन्निध त्याचा शिष्य बसला होता. तो ८० वर्षांचा होता. सद्गुरु अगदीं स्तब्ध बसले होते आणि याच मार्गानें त्यांचे अध्यापन सुरू होते. याच मार्गानें त्यानीं शंकिताच्या सर्व शकाचें निवारण केलें."

कित्येक वेळा हे महात्मे अगदीं मूकवृत्तीने राहणारे असतात, तथापि केवळ मनावर आघात करून ते सत्याचा प्रसार करीत असतात. लोक-

शिक्षणाचें त्यांचें कार्य केवळ मनोद्वारा घडत असतें हें कार्य करण्यासाठींच त्यांचा अवतार असतो संदेश पोहोंचविणें हेच त्यांचें कार्य असते शांतपणें ते हुकूम करीत असतात आणि ते हुकूम आपण मान्य करीत असतों. "जा आणि मी तुम्हांस जें काहीं सागितलें आहे, तें सर्व जगास जाऊन सांगा. तुम्हास जे काहीं हुकूम मीं केले आहेत, ते त्यांसही पाळण्यास सागा." अशा अर्थाचें एक वाक्य बायबलांत तुम्हास आढळलें असेलच. स्वत चें अतिम कार्य काय आहे, याचा विसर ख्रिस्ताला कधींही पडला नव्हता, आणि त्या कार्यावरील त्याचा विश्वास अढळ होता. हा मुद्दा त्याच्या एकदर जीवन क्रमांत अनेक वेळा आढळून येतो महात्मे म्हणून ज्यांची पूजा जग करीत असतें, त्या सर्वांच्या ठिकाणीं अशाच प्रकारचा आत्मविश्वास आपणांस आढळून येतो.

असे महात्मे हे पृथ्वीवरील जिवत परमेश्वरच होत. अशांच्या चरणीं आम्हीं आपलीं मनें वाहूं नयेत तर तीं वहावी तरी कोठें ? परमेश्वर कसा असावा याची कल्पना मी आपल्या चित्ताशीं ठरवू लागतो, आणि असा विचार करतां करतां शेवटी एखादी क्षुल्लक आणि खोटी कल्पना माझ्या चित्तांत उद्भूत होते. असल्या क्षुद्र कल्पनेच्या मागें लागून परमेश्वर शोधण्याचा यत्न करणें म्हणजे खरोखर महा पातकच होय डोळे उघडून मी महात्म्याच्या चारित्र्यांकडे पाहू लागलो म्हणजे माझें मन आश्चर्यानें थक्क होऊन जाते. परमेश्वराच्या विशालत्वाचा प्रत्यक्ष अनुभव त्याच्या ठिकाणीं मी घेऊ लागतों. माझी स्वत.ची कल्पनाशक्ति केवढीही विस्तृत करून मी परमेश्वराविषयी जीं अनुमानें बांधलेलीं असतात, त्यांहून कितीतरी पटीनें अधिक विशालत्व महात्म्याच्या ठिकाणीं मला दृग्गोचर होते उदाहरणार्थ –दयेचीच कल्पना घ्या माझें स्वत चें दयालुत्व इतके विशाल असतें कीं, माझ्या खिशांतून एखादी पई कोणी काढून घेतली, तर त्याच्यामागें लागून त्याला तुरुगात बसविण्याची खटपट मी प्रथम सुरू करतों. असल्या विशाल दयालु बुद्धीच्या पुरुषाच्या ठिकाणीं दयालुत्वाची कल्पना कितपत विशाल असेल, याचा तुम्हीच विचार करा क्षमेविषयीं तरी माझ्यासारख्या क्षुद्र मनुष्याची कल्पना कितपत मोठी असेल ? ती कितीही विशाल झाली तरी माझ्या स्वत.च्या बाहेर ती असू शकणार नाहीं, हें उघडच आहे, आणि माझें

अस्तित्व म्हटलें तर ते केवळ एकाच शरिराने बांधलेलें, तेव्हा त्यांतील कल्पना किती विशाल होतील, याचा निराळा हिशोब करण्याचें कारण नाहीं. स्वतःच्या शरिराबाहेर भराऱ्या मारण्याचें सामर्थ्य आपणापैकीं कितीकांस आहे ? स्वत च्या मनाबाहेर उड्डाण करण्याचें सामर्थ्य कितीकांस आहे ? आपणापैकी एकातही हे सामर्थ्य नाहीं, अशी माझी खात्री आहे आपल्या चालू आयुष्यक्रमात ज्या काहीं प्रेमाशाचा अनुभव आपणास होतो, त्याबाहेर परमेश्वरी प्रेमाची कल्पना आपणांस करता येणें शक्य आहे काय ? ज्याचा आपणास कधींही अनुभव आलेला नाहीं, अशा प्रकारच्या कोणत्याही वस्तूची कल्पना करणें आपणास शक्य नाहीं. यामुळें परमेश्वराविषयीं काहीं कल्पना करण्याचा केवढाही मोठा यत्न मीं केला, तरी तो फुकट जाणार हे निश्चित आहे. प्रेम, दया, क्षमा आणि पावित्र्य इत्यादि गोष्टी महात्म्याच्या ठिकाणी मला प्रत्यक्षच आढळून येतात. त्यांजविषयीं केवळ कल्पना करून माझ्या चित्ताला रिझविण्याचें मला काम पडत नाहीं. या सर्व गोष्टी त्याच्या ठिकाणीं प्रत्यक्ष रूपानें अवतरलेल्या मला आढळतात. ज्याच्याबद्दल मला कल्पना करणेही शक्य नसते, अशा अनेक गोष्टी मला त्यांच्या ठिकाणीं प्रत्यक्ष आढळून येतात. मग, त्यांना प्रत्यक्ष परमेश्वर समजून त्याच्या चरणीं मीं अगदी लीन होऊन जावे यात आश्चर्य तें काय ? कोणीही झाला तरी त्याची स्थिति अशीच होणार तोंडाने तो कितीही बडबड करीत असला, तरी महात्म्यांच्या दर्शनाबरोबर त्याची स्थिति अशीच होणार, यात तिलप्राय शका नाहीं. तोंडाची वायफळ बडबड म्हणजे कांहीं प्रत्यक्ष कृति नव्हे. परमेश्वर आणि त्याचें निराकारत्व इत्यादि अनेक गोष्टींविषयी केवळ बडबड करणें ठीक आहे, पण हे अवतारी परमेश्वर हेच जगाचे खरे परमेश्वर होत. जगातील सर्व राष्ट्रें आणि सर्व मानव वश यांची पूजा करीत असतात. मनुष्याच्या मनाची घटना आहे अशीच राहील, तोपर्यंत या अवतारी पुरुषाची पूजा करण्याची बुद्धि त्याला सोडून जाणार नाहीं. आजपर्यंत हे पुरुष वदनीय समजले जात आहेत आणि पुढेंही ते तसेच समजले जातील. याच्या ठिकाणीं आपला विश्वास असणे, हाच आपल्या भावी अभ्युदयाचा आशातंतु आहे. सत्याची व आपली भेट कधींकाळीं होणे शक्य असलें, तर ती याच मार्गानें होईल. अमूर्त तत्त्व कितीही

उच्च असलें, तरी आपल्या सामान्य दृष्टीनें आपणांस तें धुक्यासारखें भासतें. मग असल्या धुक्याच्या मागें लागून खरी यश प्राप्ति कशी होणार ?

मला जें काहीं तुम्हांस सांगावयाचें आहे, त्यांतला मुद्दा इतकाच कीं, पूर्वी होऊन गेलेल्या अनेक प्रकारच्या महात्म्यांची पूजा करणें शक्य आहे. इतकेंच नव्हे, तर भावी महात्म्यांसही पूज्य मानणें शक्य आहे, हा माझा प्रत्यक्ष अनुभव आहे. एखाद्या आईच्या पुढें तिचा मुलगा कसल्याही प्रकारच्या पोषाखांत आला, तर ती त्याला ओळखणार नाही असें होईल का ? तिनें ओळखलें नाहीं तर ती त्याची आईच नव्हे, असें मी नि.संशय म्हणतों. त्याचप्रमाणें सत्य आणि परमेश्वर यांचें अस्तित्व एखाद्या विशिष्ट पुरुषाच्याच ठिकाणीं आहे आणि दुसऱ्या कुठेंही तें नाहीं, असें तुम्हीं म्हणू लागलां तर परमेश्वराच्या अस्तित्वाची ओळखच तुम्हास नाहीं, असें निःसंशय सिद्ध होतें. एखाद्या पथाच्या प्रवर्तकाचे नुसते शब्दच तुम्हीं आपल्या चित्तांत सांठविले आहेत, एवढेंच त्यावरून दिसून येतें, पण हा कांहीं खरा धर्म नव्हे. आपल्या पूर्वजांनीं खणलेल्या कूपांतील खारें पाणी पिऊन, दुसऱ्याच्या शुद्ध जलाचा त्याग करणारे मूर्ख पुरुष जगात पुष्कळ असतात. धर्माच्या नांवाखालीं जे अनेक अत्याचार जगात आजपर्यंत घडून आले आहेत, त्यांच्या उगमाचा आरोप धर्मावर करणें युक्त नाहीं, असें मी माझ्या अनुभवानें म्हणतों. मला जो कांहीं थोडासा अनुभव प्राप्त झाला आहे, त्यावरून माझी अशी खात्री झाली आहे कीं, एखाद्याचा छळ करणें किंवा एखाद्या बाईला डाकीण म्हणून जाळणें, असल्या प्रकारच्या अत्याचारास कोणत्याही धर्मानें अनुमति दिलेली नाहीं असले अत्याचार करण्यास लोक प्रवृत्त झाले, याचें मूळ कारण धर्म नसून, त्या वेळची राजकीय परिस्थिति हेंच त्याचें कारण होय. ही राजकीय परिस्थिति धर्माच्या नांवाखालीं खपली तर तो अपराध कोणाचा ?

" माझा महात्मा हाच एक खरा महात्मा आहे " असें ज्या वेळीं एखादा मनुष्य म्हणत असतो, त्या वेळीं तो खोटे बोलत असतो, असें म्हणावयास हरकत नाहीं. धर्माच्या बाबींत त्याला मुळाक्षरांचीही ओळख नाहीं, असें खुशाल समजावें. धर्म ही काहीं वायफळ बडबडीची गोष्ट नव्हे. तसेंच ती केवळ उपपत्तीची अथवा बुद्धिगम्य मार्गाचीही गोष्ट नव्हे. अतरात्म्याच्या अत्यत गूढ भागांतील प्रत्यक्ष अनुभवाची ती गोष्ट आहे. परमेश्वराच

प्रत्यक्ष अनुभव होणें हाच धर्म. या विश्वाला व्यापून राहिलेल्या आदितत्वाचा अश मी आहें आणि त्याचप्रमाणें त्या आदितत्त्वाचीं जीं जीं भव्य दृश्य रूपें आहेत, त्यांचाही मी अश आहें, असा प्रत्यक्ष अनुभव होणें याचें नाव धर्म. जर परमेश्वराच्या अतर्गृहांत तुमचा खरोखर प्रवेश झाला असेल, तर परमात्मा आणि त्याची सर्व लेंकरें यांची व तुमची ओळख झाली असली पाहिजे. त्याच्या घरांत जाऊन त्याच्या मुलांची ओळख नसणें, हे कसें सभवेल? त्याच्या मुलाची ओळख नसणें, याचा अर्थ त्याच्या अतर्गृहात तुमचा प्रवेश झाला नाहीं, हाच होय. परमेश्वराचे अवतार कोणत्याही युगात आणि कोणत्याही देशात झाले असले तरी मूलतः त्या सर्वांची एकवाक्यता आहे, असे आपणांस आढळून येईल. त्याच्या अतरात्म्याची व आपली खरी ओळख झाली, म्हणजे त्या सर्वांच्या ठिकाणीं अभेद आहे, असें आपल्या प्रत्ययास येईल ज्या ज्या वेळी आपली अशा महात्म्यांशीं भेट होते, त्या त्या वेळीं त्याच्या अमृतस्पर्शानें आपलें मन ताबडतोब प्रकाशित होते व सर्वत्र असलेला प्रकाश त्याला दिसू लागतो. या बाबतींत महमदी धर्मांचे अनुयायी अत्यत आकुचित बुद्धीचे आहेत, असें म्हटलें पाहिजे. परमेश्वर एकच आहे आणि महंमद हाच त्याचा दूत आहे, हें त्यांचें आद्यसूत्र आहे. याबाहेर जें कांहीं असेल तें सर्व वाईट आहे, इतकेच नव्हे, तर त्याचा नाश केला पाहिजे, असें त्याचें मत आहे. कोणीही स्त्री अथवा पुरुष या आदिसूत्रावर भरंवसा ठेवणारा नसला तर त्याचा खुशाल वध करावा. त्याच्या पूजामार्गांत ज्या ज्या वस्तूचा अतर्भाव होत नाहीं, ती वस्तु त्याज्य समजावी. तिची मोडतोड करण्यास यत्किंचितही हरकत नाहीं. या आदिसूत्राहून भिन्न मतांचें प्रवर्तन जे जे ग्रथ करीत असतील, ते सर्व जाळून टाकावे. महमदीयांच्या असल्या प्रकारच्या धर्ममतामुळें पासिफिकपासून अटलांटिक महासागरापर्यंत पांचशें वर्षेपर्यंत सर्व जगभर रक्ताचे पूर वाहत होते. महमदी धर्म म्हटला तर इतकाच! असे असलें तथापि मुसलमान लोकांत जे काहीं खरे तत्त्ववेत्ते निर्माण झाले, त्यानीं असल्या अत्याचारांचा निषेधच केला आहे. असा निषेध करण्यानें परमेश्वराची व त्याची पुसट तरी ओळख झाली आहे; व सत्याचा अश तरी त्यांच्या पदरीं पडला आहे, असें उघड दिसते. धर्म म्हणजे पोरखेळ नव्हे, ही गोष्ट त्यांना समजली होती. केवळ बापदायांनीं धर्म

म्हणून जीं कांहीं कर्में केलीं, तींच आपणही करावयाचीं, असा या तत्त्ववेत्याचा बाणा नव्हता त्यांच्या बुद्धीस जें सत्य म्हणून वाटलें, तें त्यांनीं स्वतःच्या पौरुषाला उचित अशा रीतीने स्पष्टपणे बोलून दाखविलें

मनुष्यप्राणी दिवसेंदिवस उच्चतर स्थितीस जात आहे, अशी उपपत्ति साप्रतच्या उत्क्रांतिवादाने सूचित केली आहे. पण याबरोबरच दुसरीही एक परिस्थिति निर्माण होऊ पहात आहे. ही स्थिति म्हणजे परिवर्तन. धर्माच्या बाबतीत जुनाट समजुतींकडे हळूहळू परत जाण्याची बुद्धि साप्रतच्या समाजात निर्माण होऊ लागली आहे. ही स्थिति चागली आहे असें म्हणता यावयाचे नाहीं. आपण स्वतः अगदीं नव्या विचाराची दिशा का पत्करू नये? आपल्या विचारपरपरेत चुकीचाही अंश असू शकेल, पण तसें असलें तरी आपण नवाच मार्ग शोधीत असावे, असें माझें मत आहे केवळ जुन्या अधपरपरेने चालण्यापेक्षा चुकीचा असला तरी नवा मार्ग शोधणे, आपणांस अधिक श्रेयस्कर आहे आपण आपल्याच बुद्धीनें अखेर गाठण्याचा यत्न कां करू नये? आपणास पुष्कळशा ठेंचा लागल्या, तरी प्रत्येक ठेचेचे वेळीं आपण अधिक शहाणे होत जाऊ यात सशय नाही. काल अनत आहे. स्वतन्त्रपणें मार्ग आक्रमीत असता केव्हा ना केव्हा आपण अखेर गाठूच या समोरच्या भिंतीकडे पहा. या भिंतीनें खोटे बोलण्याचे पाप कधींतरी केलें आहे काय? कधीच नाहीं. तथापि भिंत ती भिंतच. खोटे बोलण्याचे पाप कधी न करताही कालाच्या अखेरपर्यंत ती भिंत भिंतच रहावयाची. मनुष्यप्राणी पुष्कळ वेळा खोटे बोलतो, पण नारायण होण्याचे सामर्थ्यही नरालाच आहे, हेंही खरें आहे याकरिता अनेक चुका आपल्या हातून घडत असल्या, तरी नव्या मार्गाचे संशोधन पुनः पुन्हा करीत राहणें यातच पुरुषार्थ आहे काही न करता शुद्ध दगड होऊन बसणें, यापेक्षा चुका करणेही अधिक श्रेयस्कर आहे, याकरिता सदोदित कार्यव्यापृत रहा. कसल्यातरी विचाराची परंपरा चित्तात एकसारखी घोळत राहू द्या तुम्ही सरळ रस्त्याने जात आहा कीं चुका करीत आहा, याकडे लक्ष देऊ नका. असल्या कुशकाना थारा न देता अट्टाहासानें धर्ममार्ग आपणास धुडाळिले पाहिजेत. माझ्या बापदाद्यानी या बाबतींत कधी विचार केला नाहीं, म्हणून मींही हात जोडून स्वस्थ बसावे, आणि अखेरीस स्वतःच्या विचारशक्तीचीही ओळख विसरावी, हे योग्य आहे काय? असा

मृतपिंड होऊन बसण्यापेक्षा मी मेलों तरी पुरवलें. जर आपल्या ठिकाणीं जिवत कल्पनाचा वास नसेल आणि धर्माच्या बाबतींत आमच्या स्वत.च्या बुद्धीला पूर्णपणें पटलेलीं अशी तत्त्वे आम्हांपाशीं नसतील, तर आमच्या या जीविताची खरी किंमत तरी काय ? या बाबोंत शुद्ध नास्तिकही अधिक चागले असें म्हणावयास हरकत नाही इतरांशीं त्याचा मतभेद असला तथापि ते स्वतः स्वतत्र विचाराचे असतात, हे लक्षात ठेविलें पाहिजे जे लोक धर्माच्या बाबतींत कसलाही स्वतत्र विचार करीत नाहीत, त्याचा धार्मिक जगांत अद्यापि जन्मच झाला नाही, असें म्हणावयास हरकत नाही. या बाबतींत त्याचें अस्तित्व किड्यामुगीच्या अस्तित्वाहून अधिक किमतीचें नाही. धर्माच्या बाबतींत ज्याना विचार सुचत नाहींत, त्याना धार्मिक जीवनाची फारशी पर्वाच नाहीं असे समजावे. अधपरंपरेवर विश्वास न ठेवणाऱ्या नास्तिकास धार्मिक जीवनाची अधिक चाड आहे, असें म्हटलें पाहिजे. कारण ते चुकत असले तरी पुढे सरण्याची खटपट ते करीत असतात व त्याच्या विचाराची धडपड बद पडलेली नसते. याकरिता सदोदित काहीतरी विचार करा परमेश्वराकडे जाणाऱ्या मार्गावर आरूढ होण्याची निदान धडपड तरी सदोदित सुरू असूंदे. तुम्हीं चुका केल्या तरी हरकत नाही. एखादी विचित्र उपपत्ति तुमच्या डोक्यात घर करून बसली तरी हरकत नाहीं लोक आपली चेष्टा करतील अशी भीति तुम्हांस असली तर आपली विचारपक्ति आपल्यापाशींच ठेवा तिचा उच्चार करूं नका म्हणजे झालें. कसेंही असले, तरी मार्गावर आरूढ होण्याची तुमची धडपड कमी करू नका इतकाच माझ्या म्हणण्याचा मुख्य आशय आहे या मार्गावर आरूढ होण्याची तुमची धडपड अखड सुरू राहिली, तर तुमचा मार्ग केव्हा ना केव्हा प्रकाशित होईलच. मला कोणी जन्मभर भरवू लागला तर हातानें खाण्याची अक्कल मला कधीही यावयाची नाही. मेंढरासारखें गतानुगतिक मार्गानें चालणें म्हणजे आपल्या धार्मिक जीवनाच्या भोंवतीं कालपाश गुडाळणेंच होय अशा प्रकारची स्तब्धता म्हणजे तो मृत्युच. ज्या ज्या ठिकाणीं जिवत विचारांची धडपड सुरू असेल, त्या त्या ठिकाणीं मतभेदही असावयाचेच असे मतभेद हे आपल्या आयुष्यात मिठासारखे उपयोगी आहेत. मीठ ज्याप्रमाणे रोगकारक जतूचा संहार करते, त्याचप्रमाणें अशा बाबतींतील मतभेद हे आपल्या विचारपरंपरेंतील

रोगजतू नष्ट करीत असतात. असे रोगजतू नष्ट झाले म्हणजे आपली विचार-पक्ति अधिक शुद्ध, अधिक सुदर आणि अधिक संग्राह्य होते असे मतभेद असणें हें जिवतपणाचें लक्षण होय. मग त्यांना आपण का भ्यावें ?

एथपर्यंत केलेलें विवेचन नीट लक्षांत धरलें, म्हणजे अवतारी पुरुषाच्या कार्याविषयीं विचार करण्यास आपणांस ठीक पडेल. इतिहासदृष्ट्या या गोष्टीचाच विचार केला, तर आपणांस असे आढळून येईल की, ज्या वेळीं स्वतत्र धार्मिक विचाराची उत्पत्ति होत असे, आणि ज्या वेळी परमेश्वराच्या भेटीविषयीं खरी आतुरता उत्पन्न होत असे, त्याच वेळी जीवात्मा परमेश्वराकडे जाणाऱ्या मार्गावर आरूढ होत असे. अशा रीतीनें तो आरूढ झाला म्हणजे केव्हातरी क्षणमात्र कां होईना, सत्याच्या प्रकाशाचा अनुभव त्याला प्रत्यक्ष होत असे. अशा वेळीं सर्व संशयाचें पटल गळून पडलें, कर्माचा आणि त्यांच्या फलभोगाचा नि पात झाला, असा अनुभव त्या जीवात्म्याला होत असे. जो अत्यत दूर पदार्थांहूनही दूर आणि अत्यत निकटवर्ती पदार्थांहून निकटवर्ती अशा परमेश्वराची व त्याची प्रत्यक्ष भेट होत असे. धर्म या शब्दाचा खरा अर्थ हाच धर्म या शब्दाच्या पोटीं जी कांहीं असंख्य ग्रथसंपत्ति निर्माण झाली आहे, तिच्या सारातील सार हेच यावाचून जें कांहीं शिल्लक राहिलें ती नुस्ती शाब्दिक उपपत्ति, किंवा फार झालें तर परमेश्वराकडे जाणाऱ्या अनेक मार्गांपैकीं एक मार्ग होय. आपली सध्याची परिस्थिति पाहिली तर फळें खाडयांत पडलीं असतां आपण टोपलीसाठीं हिसकाहिसक करीत आहो असें आढळून येईल. दोन मनुष्ये धर्माविषयी भांडण करीत असलीं तर आपण त्यांना इतकेंच विचारावें कीं, तुम्हीं परमेश्वरास पाहिलें आहे काय ? ज्या गोष्टीविषयीं तुम्हीं तंटे करीत आहां, त्या गोष्टी तुम्ही प्रत्यक्ष पाहिल्या आहेत काय ? यावर एक उत्तर देईल कीं, ‘येशू ख्रिस्त हाच खरा परमेश्वराचा दूत आहे,’ पण त्यानें ख्रिस्ताला तरी पाहिलें आहे काय ? इतकाच आमचा प्रश्न आहे. त्यानेंच काय, पण त्याच्या बापानें अथवा आजानेंही ख्रिस्ताला पाहिलें नाहीं, ही गोष्ट त्याला कबूल करावी लागेल. अशा स्थितींत आंतील फळें पडून गेलेल्या रिकाम्या टोपलीची ओढाताण हे लोक करीत आहेत, असें म्हणणें चुकीचें होईल काय ? अक्कलवान् स्त्रीपुरुषांस अशा बाबतींत भांडणें करण्याची खरोखर लाज वाटली पाहिजे.

हे सारे परमेश्वराचे दूत आणि संदेशवाहक सारख्याच दर्जाचे महापुरुष होते. यांपैकीं प्रत्येकजण एकएका महत् प्रमेयाचा प्रवर्तक होता. उदाहरणार्थ हिंदुस्थानांतील महापुरुषांचीच गोष्ट घ्या. अनेक धर्मप्रवर्तकांपैकीं हे प्रवर्तक अत्यंत जुनाट होत. प्रथम भगवान् श्रीकृष्ण यांचेंच उदाहरण घेऊ. भगवद्गीता तुम्हांपैकीं ज्या कोणीं वाचली असेल, त्यांना तींतील अनासक्ततेची सर्वत्र ओळख पटली असेल. अनासक्ततेचा एकच सिद्धांत सर्व ग्रंथभर ठिकठिकाणीं दृग्गोचर होत आहे. जगांतील सर्व वस्तुजातापासून अनासक्त रहा, हा गीतेचा मुख्य उपदेश आहे. तुमच्या चित्तातील सर्व आसक्ति ही फक्त परमेश्वराकरितांच असली पाहिजे. जो केव्हांही बदलत नाहीं, अशा सर्वकाल सम राहणाऱ्या परमेश्वरालाच ती सारी आसक्ति अर्पण करा. जें कांहीं बदलत असेल–परिस्थितीप्रमाणें ज्याच्या स्वरूपात फेरफार होत असेल–अशा कोणत्याही वस्तूला आपलें अंतःकरण अर्पूं नका. कारण, हें समर्पण शेवटीं दुःखास मात्र कारणीभूत होईल. आपलें अंतःकरण तुम्हीं एखाद्या मनुष्याला अर्पण केलें आणि कांहीं कारणानें तो मृत्युवश झाला तर दुःख मात्र तुमच्या पदरीं पडेल. मित्र म्हणून आज एखाद्यास तुम्हीं आपलें अंतःकरण अर्पण केलें आणि दैववशात् तोच उद्यां आपला शत्रु झाला तर आपल्या प्रेमाची वाट काय होईल बरे ? तुम्हीं आपल्या पत्नीला अथवा पतीला हें प्रेम अर्पण केलें आणि तो अथवा ती उद्या मरण पावली, तर तुमच्या प्रेमाचा मोबदला तुम्हांस कोणत्या प्रकारचा मिळेल ? सारें जग याच परंपरेनें चालत आहे. याकरितां भगवान् श्रीकृष्ण म्हणतात, " परमेश्वर हाच एक स्थिर आहे तो केव्हाही बदलत नाहीं. त्याच्या प्रेमांत केव्हाही व्यत्यय येत नाहीं. आपण कोठेंही असलो आणि काहींही करीत असलों, तरी त्याची दया कमी होत नाहीं आणि त्याच्या प्रेमांत उणेपणा येत नाहीं. तो कधींही बदलत नाहीं अथवा क्रुद्धही होत नाहीं. आपल्या कृतीनें त्याच्या अंतःकरणांत बदल होत नाहीं. परमेश्वरानें आम्हांवर कोप का करावा ? आपलीं मुलें पुष्कळ वेळां अनेक प्रकारच्या खोड्या करीत असतात, म्हणून आपण त्यांचा कधीं-तरी खरोखर राग करतो काय ? आपलें स्वरूप अखेरीस काय होणार आहे, हें परमेश्वराला माहित नाहीं काय ? लवकर अथवा उशिरां पण अखेरीस आपण पूर्णरूप होणार हें तो जाणून आहे. परमेश्वराच्या ठिकाणीं अमर्याद

धीर आहे. याकरितां आपलें सारें प्रेम केवळ त्याच्याकरितांच राखून ठेविलें पाहिजे. तो आहे म्हणूनच आपलें अस्तित्व आहे. प्रेमार्पणाची हीच खरी गुरुकिल्ली आहे. पत्नीवर तुम्ही प्रेम करा, पण ते प्रेम खरोखर केवळ पत्नीसाठीं नव्हे हें मात्र विसरू नका. त्या पत्नीच्या ठिकाणीं परमेश्वराचा जो अंश असतो, त्यावरच तुमचें प्रेम आहे, ही गोष्ट कधींही विसरू नका पतिपत्नीमधील प्रेम अथवा मायलेंकरांमधील प्रेम हें वस्तुत याच स्वरूपाचें आहे, असें वेदान्त मत आहे. आपलें प्रेम नवऱ्यावर आहे असे एखाद्या स्त्रीस वाटत असलें, तरी तिचें प्रेम खरोखर तिच्या पतीत जो ईश्वरी अंश असतो, त्यावरच जडलेलें असते. अत्यत लोभनीय असा परमेश्वर मात्र आहे त्याहून अन्य कोणीही आपल्या प्रेमास योग्य नाही अज्ञानामुळें त्या स्त्रीला या गोष्टीची ओळख पटलेली नसते. तथापि अज्ञानाने झाले तरी तिचें प्रेम वस्तुतः परमेश्वरालाच अर्पण केलेलें असते आणि अज्ञानाचा पडदा मध्यतरीं असल्यामुळें हें प्रेमार्पण अतीं दु.खास कारणीभूत होते. हा पडदा दूर झाला आणि हें अर्पण सम्यग्ज्ञानानें झालें म्हणजे तीच मुक्ति यात्रमाणें आमच्या धर्मग्रथाचें कथन आहे. ज्या ज्या ठिकाणी प्रेम आहे आणि ज्या ठिकाणीं आनदाचा अंश आहे, त्या त्या ठिकाणी परमेश्वराचाही अंश निश्चितपणें आहे. कारण तोच आनदरूप आणि प्रेमरूप आहे. त्याच्यावांचून प्रेमाचा आणि आनदाचा सभवच नाहीं.

भगवान् श्रीकृष्णानीं जें काहीं सागितलें आहे, त्यांतील मुख्य आशय हाच. हिंदु मानववशाच्या चित्तावर त्यानीं याच आशयाचा ठसा उमटविला आहे. एखादा हिंदु पाणी पिण्यासारखे क्षुल्लक कर्म करीत असला तरी तें करताना “कृष्णार्पण” म्हणतो. एखाद्या बुद्धानुयायानें एखादे सत्कार्य केलें तर तो म्हणतो, “माझ्या कृत्यात जो काहीं चागला भाग असेल, तो जगाकडे जावो, माझें कर्म सत्कर्म असेल तर त्याचा उपयोग जगाला होवो आणि जगात जे काहीं वाईट असेल ते मजकडे येवो.” हिंदु लोकांचा परमेश्वराच्या अस्तित्वावर फार भरंवसा आहे परमेश्वर सर्वशक्तिमान् आहे आणि तो सर्व आत्म्यांचा अतरात्मा आहे, असें हिंदूचें मत आहे. याकरितां सर्व सत्कार्यें त्याला अर्पण करणें, हाच महायज्ञ होय. कारण या यज्ञाच्या द्वारे तीं सत्कार्यें सर्व विश्वाला उपयुक्त होतात.

भगवान् श्रीकृष्ण आणखी म्हणतात " या जगांत राहत असतां आणि कर्मे करीत असतां त्यांचें फलार्पण जो कोणी परमेश्वराला करील त्याला जगांतील वाईट वस्तूचा उपसर्ग लागणार नाहीं. कमळ पाण्यांत उगवलें असतांही पाण्यापासून वर फुटून उमलतें, आणि त्याच्या संसर्गापासून अलिप्त राहातें. त्याचप्रमाणें कर्मफलाचें अर्पण परमेश्वरास करणारा मनुष्य जगाच्या संसर्गदोषापासून अलिप्त राहतो.

' एकसारखे कार्यरत रहा ' असा भगवान् श्रीकृष्णांचा आणखीही उपदेश आहे. अहोरात्र आपण कार्यरत राहिलें पाहिजे असे त्याचें सांगणें आहे. यावर कोणी असा प्रश्न करील कीं, " सदोदित कर्मरत असल्यावर चित्ताला विश्रांति कुठली ? गाडीला जुपलेल्या बैलाप्रमाणें जर मी कार्याशीं एकसारखा जन्मभर जखडला गेलो, तर या जगात जन्म घेतल्याचा मला काय उपयोग ? यावर भगवान् उत्तर देतात, " तुम्हाला शांति मिळेल, हाच या मार्गाचा मुख्य उपयोग आहे. कर्मविमुख होणें हा शांतीचा मार्ग नव्हे आपलीं कर्तव्ये झुगारून देऊन दरीखोऱ्याचा आश्रय आपण केला तरी काय उपयोग ? कारण, आपलें मनही तेथे आपणाबरोबर येईल आणि एकसारखें परिभ्रमण करीत राहील. " कोणी एकानें एका सन्याशाला विचारलें, "स्वामीमहाराज, आपणांस एखादें चांगलें स्थळ या हिमालयात आढळलें आहे काय ? हिमालयात किती वर्षें आपण परिभ्रमण करीत आहा ? " सन्याशानें उत्तर दिलें, " मी चाळीस वर्षें इथें फिरत आहे येथे अनेक सुंदर स्थळें आहेत, तथापि कोणत्याही स्थळीं मी कायमचा वास केला नाही कारण, माझें चित्त एकसारखें परिभ्रमण करीत असल्यानें नुस्ते शरीर एका ठिकाणीं ठेवून काय उपयोग ? " आपण सर्व शांतीच्या पाठीमागें लागलों आहो. शांति मिळविणें हा आपला सर्वांचा हेतु आहे, पण चित्ताच्या सतत परिभ्रमणामुळें तो असाध्य झाला आहे.

गाईचें वासरूं चोरण्याकरिता गोठ्यांत शिरलेल्या इसापनीतींतील चोराची गोष्ट तुम्हास आठवत असेलच. एक चोर चोरी करण्यासाठीं रात्रीच्या वेळी एका गोठ्यांत शिरला, तेथें एक आस्वल येऊन बसलें होते. चोराने त्याला हात लावला तोच त्या आस्वलानेंही त्याला मिठी मारली. चोराचा बाहेर उभा असलेला सोबती त्याला हाक मारू लागला; तेव्हा चोर म्हणाला, " हें

वासरूं बाहेर येत नाहीं आणि मलाही बाहेर येऊ देत नाहीं. ” अशीच गोष्ट आपल्या मनाचीही झाली आहे. आपण आस्वलास मिठी मारून बसलों आहों. आपलें चित्त आपणास आवरत नाहीं, आणि आपण स्वतःच आवरू लागलों तर तसेंही ते करूं देत नाहीं. आपण सर्व सध्या आस्वलाच्या मिठींत सांपडलों आहों. ‘ शांत असावे, ’ अशी इच्छा आपणा सर्वांच्या ठिकाणीं आहे. शांतिस्तोत्राचा पाठ आपण नित्य करीत असतों. अशा प्रकारें नुसता पाठ करण्याचें काम एखादें पोरही करू शकेल, पण नुस्त्या पाठाचा काय उपयोग? आपण नुस्ते कार्यविमुख झालों तर तेवढयानें शांतीचा लाभ होणार नाहीं. सर्व कर्तव्यें झुगारून देऊन पृथ्वीवरील सर्व पर्वताचा आश्रय आपण केला तरी या आस्वलाच्या मिठींतून आपली मुक्तता कशी होणार ? आपलें मन जोंपर्यंत जगाला मिठी मारून बसलें आहे, व प्रत्यहीं नवा नवा संसार रचण्याचें ते कार्य करीत आहे, तोंपर्यंत शरीर स्तब्ध ठेवण्यानें आपला अंतिम हेतु सिद्ध होणार नाहीं याकरिता जगापासून त्रास होत असेल अशा वेळी, सभोवतालच्या परिस्थितीस दोष देण्याचें कारण नाहीं. अस्थिरतेचे वास्तव्य जोपर्यंत आमच्या मनातच आहे, तोपर्यंत बाह्य जगाला दोष देण्यात काय अर्थ आहे ? अमुक परिस्थिति चांगली आहे, आणि अमुक परिस्थिति वाईट आहे, असें म्हणून आपण आनंदाच्या अथवा दुःखाच्या लहरीबरोबर हेलकावे खात असतो. यामुळें शांति आपणांपासून सदोदित दूर असते मनाचें स्थैर्य स्थापित झाल्याशिवाय हे हेलकावे थाबणार नाहींत. प्रथम मन स्थिर करा म्हणजे सर्व मार्ग सुकर होईल.

‘ कधींही कर्तव्यविमुख होऊ नका ’ असें भगवान् श्रीकृष्णाचें सांगणें आहे. प्रत्येक कर्तव्याला धैर्यानें तोंड द्या आणि त्याच्या फलाचे अर्पण परमेश्वराला करा. आपली वृत्ति सदोदित एखाद्या नोकरासारखी असली पाहिजे. धन्याचें काम ज्याप्रमाणे नोकर निमूटपणें बजावीत असतो, त्याचप्रमाणें आपण सदोदित निमूटपणें कार्यरत असले पाहिजे. हें असें कां ? आणि ते तसे का ? असले निरर्थक प्रश्न विचारण्याचें आपलें काम नाहीं. सेनापतीचा हुकूम एखादा शिपाई ज्याप्रमाणें बजावतो, त्याचप्रमाणें कर्तव्यकर्माचा हुकूम आपणही बजाविला पाहिजे. कार्य किती कठीण आहे, अथवा सोपें आहे, हा विचार आपल्या चित्तास शिवूं देऊं नका. चित्त अलिप्त करा,

आणि एकदम कार्यरत व्हा. तुमचें चित्त अलिप्त असेल तर कर्मांच्या भर समुद्रात तुम्ही उडी घेतली तरी तुम्हाला कशाचीही भीति नाहीं. जें जें कर्तव्य प्राप्त झालें असेल, त्याला प्रथम तोड द्या. अशा रीतीनें तुम्ही अनासक्त चित्तानें कार्यरत राहिला, म्हणजे तुम्हांस तुमचा योग्य मार्ग दिसू लागेल. अत्यत कार्यव्यापृत असताही, अत्यत शातीचा लाभ ज्याला होतो आणि अत्यत शात असतांही कार्यव्यापृती ज्याला सोडीत नाही, तोच योगी, तोच महापुरुष, तोच पूर्णत्वाच्या मार्गास लागलेला आहे असें समजावें.

अशा रीतीनें या जगातील सर्व कर्तव्यास पवित्रता प्राप्त होते. फलाचें अर्पण केल्याने बाह्यत अपवित्र दिसणारें कर्मही अतीं पवित्ररूप होतें. अमुक एक कार्य कमी दर्जाचें आहे, असें म्हणण्याचा अधिकार आपणास नाहीं. प्रत्येकाची कर्तव्यें त्याच्या परिस्थित्यनुरूप योग्यच असतात. या करितां केवळ कर्तव्यदृष्टीनें सिंहासनावरील चक्रवर्ती राजा आणि रस्त्यातील भिकारी, याच्या कर्तव्याची योग्यता वस्तुत एकसारखीच आहे, असें म्हटलें पाहिजे.

भगवान् बुद्ध म्हणतात 'मी' आणि 'माझें' ही कल्पना चित्तांतून प्रथम हद्दपार करा. ज्या ज्या कर्मांपासून 'मी' आणि 'माझें' या कल्पनेचा उद्भव होत असेल तीं कर्मे त्याज्य समजावीं. याकरिता पुत्रकलत्राचा अथवा कुटुबाचा संग्रह त्याज्य समजावा. या जगात अडकून राहू नका. आत्मत्याग करावा, अशी इच्छा पुष्कळ ससारी मनुष्याच्या चित्तात उद्भवते, पण स्त्रीच्या मुखाकडे पहिल्याबरोबर ती तितक्याच लवकर मावळतेहि. त्यागाची इच्छा करणारा मनुष्य पत्नीमुखदर्शनाने तावडतोब पुन्हां भोगी होतो. लौकिक वस्तूचा लोभ सोडावा, असे एखाद्या स्त्रीला वाटते, पण स्वत च्या लेंकराचा चेहरा दृष्टीस पडतांच लौकिक वस्तूंविषयींचा तिचा लोभ अनावर होतो. हीच साऱ्या जगाची राहटी आहे. लौकिक वस्तूंच्या लोभानें आपण त्यांच्यामागें लागलों कीं, आपल्या स्वत्वाचा लोप होतो. आपल्यातील खरा 'पुरुष' मरण पावतो. 'मनुष्य' या पदवीपासून आपण पतन पावतों अशा स्थितींत आपण एखाद्या पशूची बरोबरी पावलेले असतों. आपलीं कर्मे आपले धनी, आणि आपण त्यांचे गुलाम हे नातें येथें उत्पन्न होतें पौरुष विसरल्यामुळें आपण इतर मनुष्येंही विसरून जातों. आपणाप्रमाणें इतरांसही कांहीतरी

मनुष्यत्वाचे हक्क आहेत ही गोष्ट आपण पार विसरून जातो. 'जो तो आपापल्यापुरता' हेंच आपलें आदिसूत्र होऊन बसतें. आपलपोटेपणा विसरून परक्याच्या उपयोगीं पडावे, ही बुद्धि नष्ट होते.

भगवान् श्रीकृष्णानी जें काय सांगितलें आहे, त्याचा आपणांस फार उपयोग आहे त्याच्या या संदेशाच्या अभावीं आपणांस कोणतेंही कर्तव्य करतां आलें नसतें या उपदेशाचे ग्रहण केल्यावाचून आनदानें आणि शात चित्तानें कोणतेही कर्तव्य आपणास हाती घेता यावयाचें नाहीं. एखादें कर्तव्य अकार्य आहे, अशी शका चित्तात आल्याबरोबर आपलें चित्त बावरून द्विधा होतें, शांति नष्ट होते आणि आनंद मावळून जातो. पण भगवान् श्रीकृष्ण म्हणतात, 'एखाद्या कर्मात वाईटाचा अश असला, तरी घाबरू नका, कारण ज्यांत वाईटाचा अश नाहीं असें एकही कर्म नाहीं फलासक्ति चित्तात ठेवू नका, आणि सर्व कर्मफलें बरीं अथवा वाईट असली तरी तीं भगवतास अर्पण करा, म्हणजे त्यांच्या ससर्गाचा दोष तुम्हांस लागणार नाहीं.

कर्मण्यकर्म य पश्येदकर्मणि च कर्म यः ।
स बुद्धिमान् मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥

—गीता, अ० ४.

काल एकसारखा धावत आहे, आणि जगात सर्वत्र दु ख भरून राहिलें आहे या जगातील प्रत्येक वस्तूला अत आहे. तुम्हीं कितीही चागले चागले पदार्थ भक्षण केले, व भपकेदार पोषाख केले, तरी या सर्वांचा शेवट केव्हा ना केव्हा होणारच. गुढघाभर उच गादीवर झोप घेणाऱ्या स्त्रीपुरुषांनो, लक्षावधि लोक या जगात 'अन्न,' 'अन्न,' करीत आहेत आणि क्षुधेने व्याकुल होऊन प्राण सोडीत आहेत, याचा विचार तुमच्या चित्तास कधी स्पर्श तरी करतो काय ? जगात दु ख किती भरून वाहत आहे, याचा विचार तुम्हीं कधीं केला आहे काय ? मूल जन्मास आल्याबरोबर प्रथम रडू लागते. मूल रडते, ही गोष्ट अक्षरश खरी आहे, कारण हे जग म्हणजे खरोखर रडण्याचीच जागा आहे. याकरिता अवतारी पुरुषानीं आत्मत्यागाचा—आपलपोटेपणा विसरण्याचा—जो उपदेश आम्हास केला आहे, तो चित्तात साठवून त्याप्रमाणें आचरण करावें, हेच आपणास उचित आहे. भगवान् ख्रिस्त म्हणतात, "स्वर्गाचें राज्य जवळ आहे. तें मिळविण्याची तयारी करा.' भगवान् श्रीकृ-

ष्णांच्या उपदेशाप्रमाणें अनासक्त चित्तानें कर्में करीत असतांही कित्येक वेळा त्या उपदेशाचें आपणास विस्मरण होतें, आणि कर्मांच्या ठिकाणी आपलें चित्त गुरफटून जाते अशा वेळीं भगवान् बुद्धाचा उपदेश आठवतो बुद्ध म्हणतात या जगांतील वस्तूत क्षणोक्षणी बदल होत आहे, आणि त्या नाश पावत आहेत. हे सारें जग दु खाने भरलें आहे. ' हा उपदेश आठवल्याबरोबर आपलें चित्त पुन बावरतें या अस्थिर जगातील दु:खें उत्पन्न करणारीं कर्में करावीं कीं करू नयेत, असा भ्रम आपल्या चित्तांत उद्भवतो इतक्यात आणखी एका तिसऱ्या उपदेशाचा आघात आपल्या चित्तावर होतो. 'स्वर्ग जवळ आहे, तो प्राप्त करून घेण्याची तयारी करा.' एक क्षणही वाया न घालविता सत्कार्य करीत रहा उद्याकरितां म्हणून एकही सत्कार्य आज शिल्लक ठेवू नका मृत्यु केव्हा झडप घालील याचा नियम नाहीं.

मुसलमानी धर्माचा आद्यप्रवर्तक महमद हाही एक संदेशवाहक होता महमदी धर्मांत चांगलें तें काय असणार ? अशी शका तुमच्या चित्तात उद्भ-वेल, पण इतका काळ तो जिवत का राहिला, याचा विचार करा जे चागलें असतें, तेच पुष्कळ काळपर्यंत टिकून राहते चागल्या कर्मातच जिवटपणा असतो पावित्र्य ही मोठी शक्ति आहे. पवित्रपणा असल्यावाचून जिवटपणाही असू शकणार नाहीं भगवान् महमदाच्या उपदेशात चांगल्याचा अश नसेल तर महमदीधर्म इतका काल टिकून राहिला नसता. सर्व मनुष्यप्राणी एकाच ईश्वराचीं लेंकरे असल्यामुळें सर्वात समता आहे, व सर्व मनुष्यात परस्पर बधुत्वाचें नाते आहे, असा महंमदाचा उपदेश आहे. या विवेचनाचा एकदर विचार करता, आपणांस एक गोष्ट मुख्यत्वानें आढळून येते, ती ही की, प्रत्येक अवतारी पुरुषाला एकेक विशिष्ट कार्य करावयाचें होते एका विशिष्ट गोष्टीचा उपदेश त्यास करावयाचा होता. त्यांनी केलेला उपदेश चित्तांत धरून त्या-च्या चारित्र्यक्रमाकडे तुम्हीं पाहिलें म्हणजे तो सर्व क्रम स्पष्टपणे तुम्हास दिसू लागतो त्याच्या आयुष्यक्रमांतील सर्व खाचाखोचा तुमच्या नजरेस येतात. या महात्म्यांच्या उपदेशावर स्वत.च्या मनाप्रमाणें अनेक उपपत्ती रचून, महा-त्म्याच्या नावावर त्या विकूं पाहाणारे हजारों मूर्ख या जगांत आहेत. त्यानीं केलेल्या उपदेशावर स्वत:चें वेडेवाकडें भाष्य रचणारे अनेक लोक आहेत. वास्तविक पहाता या अवतारी पुरुषाच्या उपदेशाचे रहस्य अवगत करून

घ्यावयाचें असेल, तर त्यांच्या आयुष्यक्रमाचें सूक्ष्म अवलोकन करणें हाच राजमार्ग होय स्वतः उपदेशिलेल्या सूत्रांवर स्वतःच्या चारित्र्यरूपानें अवतारी पुरुषांनीं भाष्यें रचिलीं आहेत. भगवान् श्रीकृष्णांचा चारित्र्यक्रम आपण अवलोकन केला, तर गीतेंतील तत्त्वरहस्याचें उद्घाटन त्यात पूर्णपणें झाले असल्याचें आढळून येईल.

भगवान् महमदाचा आयुष्यक्रम पाहिल्यास त्यांत सर्वत्र समता आणि बधुभाव हीं तत्त्वे प्रथित झाल्याचें आढळून येईल. कुल, जात, पथ, वर्ण इत्यादि कोणत्याही उपाधि महमदी धर्मांत लक्षात घेतल्या जात नाहींत. तुर्कीच्या सुलतानानें आफ्रिकेंतील एखादा शिद्दी विकत घेऊन त्याला गुलाम करून आपल्या देशीं नेलें, तरी त्यानें मुसलमानी धर्माचा स्वीकार करतांच त्याचें दास्य नष्ट होते. त्याच्या ठिकाणीं योग्य गुण आणि सामर्थ्य असलें तर प्रत्यक्ष सुलतानाच्या मुलीबरोबरही तो विवाह करू शकतो. अमेरिकेतील ताम्रवर्णी इडियन लोकास अमेरिकन लोक कसे वागवितात याचा विचार करा, म्हणजे भगवान् महमदाच्या उपदेशाची खरी किंमत तुम्हांस कळून येईल. आम्हा हिंदू लोकाचीं तत्त्वें, कितीही उदार असली तरी प्रत्यक्ष आचारांत आम्हीं हिदुलोक अत्यत संकुचित वृत्तीचे झालेले आहोत. आमच्या अन्नाला एखाद्या ख्रिश्चनानें स्पर्श केला तर आमच्या दृष्टीनें तें अन्न ताबडतोब त्याज्य ठरतें. अशा दृष्टीनें विचार केला म्हणजे समता आणि बधुभाव याचा जो उपदेश भगवान् महंमदानें केला आणि तो स्वत आचरून आपल्या अनुयायांस आचरावयास लाविला, त्याची खरी किंमत कळून येते.

'यापुढेंही असेच महापुरुष निर्माण होतील काय?' असा प्रश्न कोणी करील. "होय. ते निर्माण होतील" असें उत्तर स्पष्टपणे द्यावयास हरकत नाहीं; पण भावी पुरुषांच्या अवताराकडे डोळे लावून बसणें हे मात्र शहाणपणाचें नाहीं. पूर्वी होऊन गेलेल्या सर्व उपदेशाचें रहस्य एकत्र करून व त्यांतून नवीं सूत्रें निर्माण करून आपणांपैकीं प्रत्येकानें स्वतःच महापुरुष बनण्याची खटपट करावी, हे उचित होय. पूर्वीच्या उपदेशांचें सार आपल्या स्वत.च्या चारित्र्यात उतरवून व स्वत.च्या अनुभवाचें संमीलन त्यांत करून भावी पिढीचा मार्ग प्रकाशित करून ठेवणें, हेंच आपणांस भूषण आहे. आजपर्यंत जितके अवतारी पुरुष होऊन गेले, ते सर्वच मोठ्या योग्यतेचे

पुरुष होते. त्यांनीं आपणा सर्वांसाठीं कांहीं ना कांहीं ठेवा मागें ठेविला आहे. हेच पुरुष आपले देव होत; तथापि त्यांस नमन करीत असतांही आपली स्वत:ची योग्यता विसरण्याचें कारण नाहीं. त्यांस नमन करीत असतांही आपण स्वत:सही नमन करावें; कारण ते ज्याप्रमाणें परमेश्वराचीं लेंकरें होते, त्याचप्रमाणें आपणही त्याच परमेश्वराचीं लेंकरें आहोंत. ते पूर्णत्व पावले होते, आणि आपण पूर्णत्व पावण्याच्या मार्गांत आहों. याकरितां मी अवतारी पुरुष होईन, मी परमेश्वराचें लेंकरू होईन—नव्हे नव्हे, मी प्रत्यक्ष परमेश्वरच होईन—असा निश्चय याच क्षणीं आपण करू या.



# भगवान् बुद्ध.



केवळ अहेतुक कर्मे करून आत्मनिरत राहणाऱ्या पुरुषांचा एक वर्ग प्रत्येक धर्मांत निर्माण होत असतो, असे आढळून येते अशा वर्गांत भगवान् बुद्धाची मुख्य स्थानीं योजना केली पाहिजे. तितकी आत्मनिरतता इतर कोठेही आढळून यावयाची नाहीं. भगवान् बुद्धानीं स्थापिलेला धर्म आणि ब्राह्मणधर्म याजबद्दल अनेक प्रकारचे चुकीचे समज आहेत विशेषतः अमेरिकन लोकाचा या बाबतींत गैरसमज होण्याचा बराच सभव आहे बौद्ध धर्म हा सनातन धर्माचा एक पथ अथवा ही एक शाखा आहे, असे म्हणणें युक्त होईल. गोतम नावाच्या महापुरुषाने या धर्माची स्थापना केली आहे. गौतमाच्या वेळीं निवळ घटपटाची खटपट फार वाढली होती, व त्याचप्रमाणें कर्मकाडाचाही फार प्रसार झाला होता. यज्ञयागादि कर्मांचा व कोरड्या बुद्धिवादाचा गौतमास वीट आला होता. जातिभेदाचे बडही त्या वेळीं फारच बळावलें होते अमुक एका विशिष्ट परिस्थितीत आमचा जन्म झाला, म्हणूनच इतरापेक्षा आम्ही मोठे, असा भ्रम कित्येक जातींस झाला होता. अशा प्रकारच्या जातिभेदाचा व हा भेद बळावण्यास मूळ कारणीभूत होणाऱ्या भिक्षुकवर्गाबद्दल गौतमाच्या मनात तिरस्कार उत्पन्न झाला होता गौतमानें ज्या धर्माचा उपदेश केला, त्यात त्याचा स्वत.चा असा कोणताही हेतु नव्हता. त्याला स्वत.ला कोणताही लाभ करून घ्यावयाचा नव्हता. त्याचप्रमाणे परमेश्वराचे अस्तित्व आणि सृष्टिरचना इत्यादि स्थूलेंद्रियबाह्य विषयाचीही वाटाघाट गौतमानें आपल्या धर्मात केली नाहीं परमेश्वर आहे कीं नाही, असा प्रश्न त्याला कोणीं केला, तर 'मला माहित नाही' एवढाच जबाब तो देत असे. मनुष्याची योग्य वर्तणूक म्हणजे कशी, या प्रश्नाला उत्तरादाखल तो म्हणे, 'चागले व्हा, आणि चागली कर्मे करा.' एके वेळीं पाच ब्राह्मण त्याच्याकडे आले, व आपला तटा मिटविण्याविषयीं त्याला सागू लागले. एक ब्राह्मण म्हणाला, "परमेश्वर अमुक अमुक प्रकारचा आहे, व त्याच्याकडे पोहोचण्याचा मार्ग अमुक आहे, असे माझ्या या ग्रथात सागितले आहे." यावर दुसरा म्हणाला, "याचें हें म्हणणें चुकीचें आहे, कारण

माझ्या ग्रंथांत निराळ्याच मार्गाची उपपत्ति सांगितली आहे. याचप्रमाणें बाकीचे तिघेही ब्राह्मण बोलू लागले. त्याचे म्हणणें गौतमानें शांतपणें ऐकून घेतलें आणि नतर प्रत्येकास तो म्हणाला, " तुम्हा साऱ्याजवळील कोणत्याही पुस्तकांत परमेश्वर दुष्ट आहे, तो कोणाचाही घातपात करतो, अथवा तो अपवित्र आहे, असे सागितलें आहे काय ? " ब्राह्मण म्हणाले, " नाहीं; परमेश्वर पवित्र आणि चागला आहे, याबद्दल सर्वांची एकवाक्यता आहे. " हे उत्तर ऐकून गौतम म्हणाला, " तर मग माझ्या मित्रानो, तुम्ही स्वत ही चांगले आणि पवित्र व्हा, म्हणजे परमेश्वर कसा आहे, याची प्रत्यक्ष ओळखच तुम्हास होईल. "

भगवान् बुद्धानीं सागितलेलीं सर्व तत्त्वे मला मान्य आहेत असें काहीं मी म्हणत नाहीं. पुष्कळ बाबींत माझा मतभेद आहे. तथापि त्याच्याशीं माझा मतभेद असला म्हणून त्या पुरुषात जें सौंदर्य व्यक्त झाले आहे, त्याजकडे मीं पाहू नये काय ? मीपणा अथवा अहकार ज्याच्यातून समूळ नष्ट झाला, असे पुरुष भगवान् बुद्ध हेच होत. दुसरेही अनेक महापुरुष निर्माण झाले. ते स्वत स परमेश्वराचे अवतार म्हणवीत, आणि जे कोणी आपणावर विश्वास ठेवतील त्यास स्वर्गप्राप्ति होईल असेही ते म्हणत; पण भगवान् बुद्धानीं अशा प्रकारची आत्मश्लाघा यावज्जन्म कधींही केली नाहीं. अगदीं देहपाताच्या वेळीही ते म्हणाले, " तुमच्या मार्गांत तुम्हास कोणीही मदत करू शकणार नाहीं मुक्तीकरिता तुम्हीं स्वत· खटपट केली पाहिजे. आपला स्वत चा मोक्ष आपण स्वत च साधला पाहिजे " स्वतःविषयीं ते म्हणाले, " आकाश ज्याप्रमाणें अनत आहे, त्याचप्रमाणें ज्ञानही अनत आहे; आणि त्या अनत ज्ञानाला बुद्ध असे नाव आहे मी गौतम त्या ज्ञानस्थितीला पोहोचलो आहें आणि तुम्ही अविरत श्रम कराल तर तुम्हीही सर्व त्याच स्थितीला पोहोचाल. भगवान् बुद्धाच्या ठिकाणीं अहकाराचा लेशही नव्हता. यामुळें त्यांस स्वर्गही नकोसा होता, कारण, मला अमुक पाहिजे ही भावनाही त्याच्या ठिकाणी नष्ट झाली होती त्यास द्रव्याची जरूर नव्हती सिंहासनाचा आणि सर्व प्रकारच्या मोठेपणाचाही त्यांनीं त्याग केला होता ते दारोदार भीक मागत असत आणि समुद्राप्रमाणें विशाल आणि उदार अत करणानें मनुष्य आणि पशु या दोघाच्याही बऱ्यासाठीं उपदेश करीत असत. यज्ञात मारल्या

जाणाऱ्या एखाद्या पशूचा जीव वांचविण्यासाठीं आपल्या जीवितावरही पाणी सोडण्याची त्यांची तयारी होती एकदां एका राजाला ते म्हणाले, "पशूचा वध करून जर तुम्हांस स्वर्गप्राप्ति होते, तर मनुष्यवधानें त्याहून एखाद्या मोठ्या लोकाची प्राप्ति तुम्हांस होईल. याकरिता माझा वध करा." भगवान् बुद्धाचीं सर्व कर्में अगदीं अहेतुक होतीं. स्वत च्या गौरवासाठीं अथवा स्वत चा अमुक एक हेतु साधावा यासाठीं त्यानी कोणतेंही कर्म केलें नाहीं. अहेतुकपणें एकसारखें कर्तव्यरत कसें राहतां येईल याचा नमुना पहावयाचा असेल, तर तो भगवान् बुद्धाच्या ठिकाणींच सांपडेल. त्याचप्रमाणें केवळ अहेतुक कर्में एकसारखीं करीत राहिल्यानें मनुष्यास कोणती पदवी प्राप्त करून घेतां येईल, याचाही बोध त्यांच्या चरित्रापासून घेण्यासारखा आहे. केवळ अहेतुक कर्में करून भगवान् बुद्ध हे अवतारी पुरुषांच्या पदवीला पावले होते.

परमेश्वराच्या ठिकाणीं ज्यांचा परमावधीचा विश्वास आहे, अशा मनुष्याचा मार्ग अधिक सुखकर होतो हें खरें; तथापि परमेश्वरावर विश्वास नसताही, कोणत्याही प्रकारच्या तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांचा अभ्यास न करतां, स्वत ला कोणत्याही पथाचा न म्हणवितां, एखाद्या देवळांत पाऊलही न ठेवतां आणि शुद्ध जडवादी असताही एखाद्या मनुष्याला अत्यत उच्च पदवी कशी प्राप्त करून घेतां येते, हे भगवान् बुद्धाच्या चरित्रावरून स्पष्टपणें दिसून येईल. भगवान् बुद्ध कसे होते, हें सागण्याचा अधिकार आपणास नाहीं. भगवान् बुद्धांच्या अत करणाचा एक लक्षाश भागही मला प्राप्त होईल तर मी स्वतःस धन्य समजेन, इतकेच मी म्हणतों. भगवान् बुद्धाचा विश्वास परमेश्वरावर असेल अथवा नसेल, त्याशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं निस्सीम भक्तीनें, योगानें अथवा ज्ञानानें जी पूर्णावस्था प्राप्त होते, तीच पूर्णावस्था बुद्धानीं मिळविली होती. अमुक एका मार्गावर विश्वास ठेवला एवढयानेंच पूर्णत्व प्राप्त होत नाहीं. मोक्षाच्या मार्गांत नुसत्या वायफळ बडबडीला कांहींच किंमत नाहीं. नुसती बडबड पोपटही करतात. स्वत्व विसरून अहेतुकपणें केलेलीं कर्में हींच मोक्ष मिळविण्याचीं साधनें होत.



# भगवान् येशू ख्रिस्त.



समुद्रावर एका ठिकाणी एका क्षणीं उच लाट उठते, आणि दुसऱ्या क्षणीं तेथेंच मोठा खाडा आढळून येतो. पुन्हां थोड्या वेळानें कदाचित् पहिल्यापेक्षांही मोठी अशी लाट तेथें उठते आणि काहीं काळानें ती नष्ट होते. अशाच रीतीने चढतीपडतीचा खेळ एकसारखा सुरू आहे. कालाच्या परिभ्रमणात ज्या लाटा उमटतात आणि जे खाडे पडतात, त्यापैकीं उच लाटा मात्र विशेषपणें आपल्या अवलोकनांत येतात; आणि खाड्याचा विसर आपणास पडतो; पण विश्वरचनेसाठी या दोहोंचीही आवश्यकता आहे याकरितां चढती आणि पडती हीं दोन्हीही मोठीं आहेत, असे म्हणावयास हरकत नाहीं विश्वाचे अस्तित्व या दोहोंच्याही अस्तित्वावर अवलंबून आहे चढतीपडतीचा हा क्रम आपणास सर्वत्र आढळून येतो. आपल्या विचाराच्या साम्राज्यांत, आपल्या ससारांत, आपल्या समाजांत आणि आपल्या धार्मिक जीवनांतही अशाच प्रकारची चढतीपडती आढळून येते. जगाच्या सर्व प्रकारच्या व्यवहारात चढतीपडतीचें हें रहाटगाडगे अखड चालू आहे उदार मतांची एखादी लाट काहीं काळ एकदम उठते आणि थोड्या वेळाने नष्ट होते मधल्या शांततेच्या काळात ते विचार जणू काय, पूर्वजगाची पाहणी करीत असतात. जणू काय ते आपल्या विस्कळित झालेल्या शक्तीची पुन्हां संघटना करण्याचा यत्न करीत असतात व हा यत्न सिद्ध होऊन त्याची शक्ति एकवटली म्हणजे लाटेच्या रूपानें ते पुन्हां उद्भवतात, एवढेंच नव्हे, तर त्याची उची पूर्वीपेक्षाही अधिक झालेली असते.

राष्ट्राचा इतिहास आपण अवलोकन केला, तरीही अशी स्थिति आढळून येते. येशू ख्रिस्त ज्या मानवकुलांत जन्मला, त्या कुलाचा त्या वेळीं पडतीचा काळ होता येशू ख्रिस्ताच्या जन्माच्या वेळीं त्या कुलाला उतरती कळा लागली होती. येशू ख्रिस्ताचीं वचनें आणि त्याचीं कृत्यें यांचे विस्कळित आणि लहानसे टिपण मात्र आज आपणांस उपलब्ध आहे. त्याचीं सर्व कृत्यें आणि सर्व सभाषणें कोणीं पूर्णत्वानें लिहून ठेविलीं असतीं, तर स्वत.-च्या विस्तारानें त्यांनीं जग व्यापिलें असतें. त्यानें तीनच वर्षे उपदेशाचें कार्य केलें, पण त्या तीनच वर्षांत ज्ञानदृष्टीनें जणू काय एक सबध युग

साठविले होतें. सबध युगांत उपलब्ध होणाऱ्या ज्ञानाचा अर्थ जणू काय या तीन वर्षांच्या अवधींत साठविला गेला. जें ज्ञान त्या तोन वर्षांत साठविलें गेलें, त्याचा अशत विस्तार व्हावयास आज १९०० वर्षें लागलीं, आणि आणखी किती वर्षे पुढे लागतील हें कोणीं सांगावे ! तुमच्या आमच्या सारख्या सामान्य मनुष्यात ज्ञानाच्या जोमाचा अत्यत अल्प अश साठविलेला असतो. काहीं थोडीशीं मिनिटे, थोडेसे तास अथवा फारच झालें तर थोडीशी वर्षें तो जोम खलास करण्यास पुरेशी होतात. तेवढया कालात त्या सर्व जोमाची इतिश्री होते, आणि नतर आपण एकदा जे नष्ट होतो ते अखेरचेच. उलटपक्षीं या महात्म्याकडे पहा. कित्येक शतके आणि युगे लोटून जातात, तथापि त्यानें सांगितलेल्या ज्ञानाचा जोम अद्यापिही पूर्णपणें विस्तार पावलेला नाहीं, व अद्यापिहो त्याच्या सामर्थ्याचो परमावधो झाली आहे असे नाहीं. सामान्य मनुष्याच्या जोमाची परमावधी फारच झालें तर काहीं थोड्याशा वर्षांत होते, पण कित्येक युगाचा काळ लोटून गेला तरी महात्म्याचा जोम परमावधीस पोचत नाहीं, एवढेच नव्हे, तर युगें जशी एकामागें एक लोटत जातात, तशी त्या जोमात आणखी भरच पडते. ख्रिस्ताच्या चरित्राचा आपण विचार केला तर आपणास असें आढळून येईल की, त्याच्या जीवनात, त्या युगाच्या समवायी जोवनाचे रहस्य साठविलें गेले होते त्या एकदर काळात व एकदर जगात जे ज्ञान साठविलें गेले, ते अर्करूपानें त्याच्या ठायी वास करीत होते. एका अर्थी प्रत्येक मनुष्याच्या जोवनात असाच प्रकार आढळून येतो. मनुष्यप्राणी जन्म घेतो, त्या वेळी स्वत च्या कुलाचे सर्व पूर्वसस्कार तो बरोबर आणतो भोवतालच्या परिस्थितीच्या रूपानें आणि शिक्षणाच्या रूपानें हे पूर्वसस्कारच त्याच्या ठिकाणी पुन्हा दृग्गोचर होऊ लागतात. प्रत्येक जीवात्म्याभोवतालच्या छायेत त्याच्या पूर्वीचे सारें जग प्रतिबिबित झालेलें असते "आपण स्वत आज कोण आहो ?" असा प्रश्न केला तर गत झालेल्या अनत कालाचें आपण व्यक्तरूप आहो, हेंच उत्तर या प्रश्नास देता येईल अनेक परिस्थितींच्या अनंत समुद्रावरील तरंगासारखे आपण आहो. समुद्रावरील लाटा ज्याप्रमाणें अनिवार्यपणें इकडून तिकडे फेंकल्या जातात व ज्याप्रमाणे त्यांस विश्रांति कशी ती कधींच मिळत नाही, त्याचप्रमाणे आपणही अनत काला-

च्या परिस्थितिरूप समुद्रावरील तरंग असल्यामुळें अनिवार्यपणें इतस्ततः फेकले जात आहो व आपणास विश्रांति कशी ती ठाऊकच नाहीं. तुमच्या आमच्यासारखे सामान्य लोक हे या समुद्रावरील लहानशा बुडबुड्याप्रमाणें आहेत कित्येक वेळां या विशाल समुद्रावर डोंगराएवढ्या लाटाही उठत असतात. तुमच्या आमच्यासारख्या क्षुद्र बुडबुड्यांत पूर्वज्ञानाचा अत्यंत अल्प अंश मात्र साठविलेला असतो, पण या डोंगराएवढ्या लाटात पूर्वानुभवाचा बहुधा सर्व अंश आलेला असतो. या पूर्वानुभवाचा जोम या प्रचंड लाटांत एवढा मोठा असतो कीं, त्या जागच्या जागींच विराम न पावता पुढे सरकण्याचा यत्न करीत असतात. बंदरावरील दिवा नाविकास ज्याप्रमाणें मार्गदर्शक होतो, त्याचप्रमाणें आम्हा सामान्य मनुष्यांस आमच्या प्रवासांत या प्रचंड लाटा मार्गदर्शक होतात या लाटा इतक्या उंच असतात कीं, त्यांच्या छायेंत सर्व पृथ्वी झांकली जाते आणि मार्गदर्शकाचें काम या लाटा अनंत कालपर्यंत करीत राहतात. येशू ख्रिस्त एका ठिकाणी म्हणतो, "पवित्र परमेश्वराची भेट त्याच्या पुत्राच्या साह्यावाचून कोणत्याही काली कोणासही झाली नाहीं" हे म्हणणें सर्वस्वी खरें आहे 'सद्गुरूवांचोनी सांपडेना सोय' असा अनुभव सर्वत्रास आणि सर्व कालीं आलेला आहे. आपणास परमेश्वराचें प्रत्यक्ष रूप पहावयाचे असलें तर तें त्याच्या पुत्रावांचून दुसऱ्या कोठें सापडणार ? आपण सर्वच त्या परमेश्वराचे अंश आहोंत, इतकेच नव्हे, तर अत्यंत क्षुद्र जंतूतही त्याचें रूप व्यक्त झालें आहे ही गोष्ट खरी, प्रकाशाचे तरंग सर्वत्र सारखे भरून राहिले आहेत हेंही खरें, तथापि तो प्रकाश आपल्या दृष्टिपथांत येण्यास आपणास काडी ओढून दिवा लावावा लागतो. अत्यंत गाढ अशा अंधकारांतही प्रकाशकिरण नाहींत असें नाहीं, पण त्या प्रकाशाचा आपणांस अनुभव होण्यास दिवा लावावा लागतो. त्याचप्रमाणे सर्वत्र भरून उरलेल्या परमेश्वराचें व्यक्तरूप आपणांस पाहावयाचें असेल, तर तें या अत्यंत उज्ज्वल दीपांच्या ठिकाणींच आपणास दृग्गोचर होईल. हे पुरुष परमेश्वराचे अवतार होत. परमेश्वर यांच्या रूपानें जणू काय प्रत्यक्षच अवतरला आहे.

परमेश्वर आहे हें आपणां सर्वांस ठाऊक आहेच. तथापि आपण त्याला पाहू शकत नाहीं, अथवा जाणूंही शकत नाहीं, ही गोष्टही खरी आहे. परमे-

श्वराचें स्वरूप कसें असावें, याविषयी जें काहीं चित्र आपण आपल्या कल्पनेनें आपल्या चित्तपटावर रंगविलेलें असते, त्याशी या अवतारी पुरुषाची तुलना केली, तर त्यांच्या तेजापुढें आपलें चित्र अगदींच फिके पडते, असे आपणास आढळून येईल. आपली कल्पनाशक्ति कितीही उज्वल झाली तरी ती इतकी अधुक असते की, परमेश्वराची अंशत ही कल्पना तिला करवत नाहीं. या अवतारी पुरुषानीं ज्या स्वरूपाचा अनुभव स्वत. घेतला व आपणांपुढे मांडिला, त्या अनुभवाचा अत्यंत अल्प अंशही आपल्या स्वत च्या कल्पनेंत प्रविष्ट होत नाही अशा अवतारी पुरुषांत आणि आपणासारख्या सामान्य मनुष्यात इतकें अतर असता, त्यांस परमेश्वर मानून आपण त्यांची पूजा केली, तर त्यांत वावगे ते काय झालें ? परमेश्वराचें इतकें व्यक्तरूप आपणास या जगात दुसऱ्या कोठें आढळणार ? आपल्या अत्यंत विशाल कल्पनेंतही जें येत नाही, असे स्वरूप जर त्याच्या ठिकाणीं प्रत्यक्ष व्यक्त झाले असेल, तर त्यांची पूजा करण्यात वाईट ते काय ? यात वाईट काहीच नाही इतकेंच नव्हे, तर परमेश्वराच्या पूजनाचा हाच काय तो शक्य आणि प्रत्यक्ष मार्ग आहे आपण कितीही खटपट केली आणि कोणत्याही मार्गाने परमेश्वराचे स्वरूप जाणण्याची धडपड केली, तथापि जोंपर्यंत आपण मनुष्यें आहोंत, आणि जोंपर्यंत आपण मानवी जगात बांधले गेलों आहोत, तोंपर्यंत आपलें जग मानवी, आपला धर्म मानवी आणि आपला परमेश्वरही मानवीच असणार. असें असणें ही गोष्ट निसर्गसिद्धच आहे. तत्त्वे कितीही सुदर असलीं तरी ती अमूर्त असणार, आणि तीं अमूर्त असल्यामुळें आपणांस तीं आपल्या आटोक्यात आणतां यावयाचीं नाहीत. त्यांचे प्रत्यक्ष रूप कोठे पहावयास मिळेल तर ती आपल्या आटोक्यात येतील. अशा स्थितींत प्रत्यक्ष रूपाचा त्याग करून परोक्ष तत्त्वाच्या मागे लागणारा कोण असू शकेल ? याच कारणाकरितां सर्व देशांत आणि सर्व युगात या अवतारी पुरुषांची पूजा सामान्य लोक आजपर्यंत करीत आले आहेत.

येशू ख्रिस्ताचा जन्म यहुदी वंशांत झाला. ख्रिस्ताचा जन्म झाला त्या वेळीं या वंशाला उतरती कळा लागली होती, हें मीं पूर्वी सांगितलेंच आहे. ही उतरती कळा म्हणजे अखेरचीच उतरती कळा आहे, असें मानण्याचें कारण

नाहीं. पूर्वीची लाट उतरून गेल्यानतर नवी लाट उठण्यापूर्वी ज्याप्रमाणें तेथें काहीं काळ समता असते, त्याचप्रमाणे ही स्थितिही होय. उच्चतमावस्थेस जाऊ पाहणारें मानवी मन जणू काय येथे कांहीं वेळ स्थिरावलेलें असते. या स्थितींत पूर्वसंग्रहाचा साठा तें स्थिर करीत असते पूर्वी जो कांहीं संग्रह केला, त्यांतील सर्व वस्तूंची निवडानिवड करून त्यातील बारीकसारिक गोष्टी वेंचावयाचें त्याचें काम सुरू असतें ते सर्वत्र आणि सर्व कालीं लागू होणाऱ्या सिद्धातांच्या मागें लागलेले नसते विशिष्ट परिस्थिति आणि विशिष्ट सस्कार एवढयापुरताच विचार तें त्या कालीं करीत असते. अशा कालीं पुढें सरण्यापेक्षा आहे तेच कायम राखण्याकडे त्याचा ओढा असतो. अविरत श्रम करावयाचा नाद अशा काळी त्याला नसून फक्त स्वस्थ राहून जगाचे आघात सोसावे, इतकीच स्थिर बुद्धि त्याच्या ठिकाणी अवतीर्ण झालेली असते. या स्थितीला दोष देण्याची माझी इच्छा आहे असें आपण समजूं नका. अशा स्थितीची निवडानिवड करून तिच्यातील बरेवाईटपणा पाहण्याचा आपणांस अधिकारच नाहीं, कारण, हें कुल या स्थितीस पोंचलें नसतें—अशी अवनतावस्था त्याला प्राप्त झाली नसती—तर त्याचे जें उन्नतरूप ख्रिस्ताच्या रूपानें उद्भवलें, तेंही उद्भवलें नसते अशा अवनतावस्थेच्या अभावीं त्या उन्नतरूपाचा जन्म होणे अशक्यच झालें असते. त्या वेळीं यहुदी लोकात अनेक ढोगी जन्मास आले होते. न करण्यासारख्या अनेक गोष्टी त्यानी केल्या हें खरें, आणि ते अत्यंत दाभिक होते हेंही खरें, तथापि अशा प्रकारची परिस्थिति भोंवतालीं नसती, तर ख्रिस्ताचा जन्मही झाला नसता. त्याच्या जन्माला ही परिस्थिति कारणरूप असून तो स्वत त्या परिस्थितीचे कार्य होता. समाजाच्या एका टोंकाला हे लोक ओढू लागल्यामुळें दुसऱ्या टोंकाला ख्रिस्ताच्या रूपानें उलट शक्तीचा जन्म झाला. पूजेचे बाह्यविधी व धर्माच्या नांवाखाली मोडणाऱ्या त्या विधीतील बारीकसारीक गोष्टी आणि यज्ञयागादि प्रकार हे आपल्या दृष्टीनें कितीही हास्यास्पद वाटत असले, तरी त्यात एक प्रकारच्या शक्तीचा वास आहे, ही गोष्ट विसरतां येत नाहीं. आपण पुढें धांवत असतां आपल्या शक्तीचा बराच क्षय होत असतो. मनानें जो जों आपण पुढें धावू लागतों व अधिक विशाल होण्याचा यत्न करू लागतों, तो तो आपल्या मनाची शक्ति पुष्कळ

वेळा क्षीण होऊ लागते. धर्माच्या बाबतींत विचारौदार्य ज्याच्या ठिकाणीं आहे, त्याच्यापेक्षां एखाद्या धर्मवेड्याजवळ अधिक मनोबल असतें, ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. या दृष्टीनें विचार करतां धर्मवेडांतही एक मोठा गुण आहे असें म्हटलें पाहिजे. धर्मवेडे लोक पुष्कळसा जोम साठवीत असतात. एक धर्मवेडा ज्याप्रमाणें हा जोम सांठवीत असतो, त्याप्रमाणें एखादा सारा मानववंशही या जोमाची संघटना करीत असतो. ख्रिस्ताच्या जन्माच्या वेळीं यहुदी लोकांची परिस्थिति कशी होती तें पहा. चोंहों-बाजूनीं ते शत्रूनीं वेढले गेले होते. इराण, हिंदुस्थान आणि अलेक्झांड्रिया यांजमधून निघणाऱ्या लाटा त्याजवर जाऊन आदळत होत्या कायिक, वाचिक आणि मानसिक अशा त्रिविध आपत्तींनी त्यास पूर्णपणें घेरून टाकलें होतें अ शा स्थितींतही या कुलानें जो जोम सांठविला होता, तोच जोम त्या कुलाच्या वशजाच्या ठिकाणी आजही दृग्गोचर होत आहे जरूसलेम आणि यहुदी धर्म या स्वरूपानें त्यांनी हा जोम साठविण्याचे कार्य केलें. जें कांहीं सामर्थ्य त्यांच्या ठिकाणीं अशा परिस्थितींत उरलें होते ते स्वत च्या धर्म-रूपानें सांठविण्याचा यत्न त्यांनीं केला विस्तार पावलेली शक्ति अत्यत सूक्ष्म अशा एका केंद्रात साठविली गेली, म्हणजे फार काळ ती तशीच आकुंचित स्थितींत राहू शकत नाही असा नियम आहे. अशी केंद्रीभूत शक्ति विस्तार पावण्याची खटपट पुन्हा करू लागते लहानशा केंद्रात पुष्कळ काळपर्यंत सामाऊन राहील अशी एकही शक्ति या विश्वात नाहीं. भविष्यकाळीं जिचा स्फोट होणार नाहीं, अशी एकही केंद्रीभूत शक्ति नाहीं

यहुदी लोकानीं जी शक्ति त्या वेळीं एका केंद्रांत आणून ठेविली होती, तिचाच स्फोट पुढें ख्रिस्ती धर्माच्या रूपानें झाला, त्या शक्तीचे जे लहान लहान झरे सर्वत्र वहात होते, ते एकत्र झाले. हळूहळू त्या लहान ओढयां-ची एक मोठी नदी झाली आणि त्या नदीची जी प्रचड लाट उद्भवली, त्या लाटेच्या टोंकावर येशू ख्रिस्त उभा असल्याचें आपणांस आढळून आलें. अशाच रीतीनें प्रत्येक अवतारी पुरुष हा स्वतःच्या पूर्ववशाचा प्रतिनिधि-रूप असतो. त्याच्या वशानें जो कांहीं जोम पूर्वकालीं साठविलेला असतो, त्याचें समवायी मूर्तस्वरूप त्याच्या ठिकाणीं उद्भवलेलें असतें. या एकवट-लेल्या पूर्वकालीन शक्तीच्या जोरावर भविष्यकाळाची रचना तो करू लागतो.

तो भविष्यकाळाचा शास्ता होतो. पूर्वी जें कांहीं कारणरूप होते, तेच त्याच्या ठिकाणीं आज कार्यरूप झालेलें दिसतें; व हें कार्यरूप स्वतः भावी कार्याचें कारणरूप होते. हीच या साऱ्या अवतारी पुरुषाची स्थिति असते. एखादा अवतारी पुरुष ज्या मानवकुलांत जन्म पावतो, त्या कुलाच्या ठिकाणीं जें काही पावित्र्य आणि जो काहीं मोठेपणा असतो, तो सारा त्याच्या ठिकाणीं एकवटलेला असतो कित्येक युगेंपर्यंत तें कुल ज्या ज्ञानाचा संग्रह करण्यास धडपडत असतें, तें सारें ज्ञान त्या अवतारी पुरुषाच्या ठिकाणी एकवटलेलें असतें, आणि या एकवटलेल्या ज्ञानाच्या जोरावर तो अवतारी पुरुष केवळ स्वत च्याच कुलास नव्हे, तर पृथ्वीवरील दुसऱ्या अमित मानवी कुलास पुढे ढकलीत असतो

या विवेचनांत आणखीही एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती गोष्ट अशी कीं, येशू ख्रिस्ताबद्दल जे कांहीं विचार मी प्रकट करणार आहे, ते पौर्वात्याच्या दृष्टीनें करणार आहें. खुद्द येशू ख्रिस्त हा पौर्वात्य होता, एवढेंच नव्हे, तर पौर्वात्याचा अगदीं अक होता, ही गोष्ट आपण पुष्कळ वेळा विसरत असता. त्याचे चित्र काढताना त्याच्या केसाचा रग तुम्हीं पिवळा आणि डोळयांचा रग निळा दाखविला तरी तेवढ्याने त्याचा पौर्वात्यपणा जात नाहीं. बायबलांत वारवार येणाऱ्या कल्पना, त्यात वर्णन केलेले देखावे, त्यांतील स्थलें, त्यातील पात्रें, त्यातील आवेश, त्यांतील कवित्व आणि त्यातील चिन्हें हीं सारीं शुद्ध पौर्वात्य आहेत. त्याच्या वर्णनात येणारें निरभ्र आकाश, त्यांतील उष्ण हवेचीं वर्णनें, त्यांत असलेले सूर्याविषयींचे उल्लेख, अरण्याचीं वर्णनें आणि तान्हेलेल्या माणसांचीं व पशूंची वर्णनें हीं सारीं त्याच्या पौर्वात्य स्वरूपाचें उद्घाटन करीत आहेत. विहिरीवर घागरी भरून त्या मस्तकावर वाहून नेणाऱ्या स्त्रीपुरुषांचीं वर्णने त्यांत आहेत. पशूच्या खिल्लाराचीं, शेतकऱ्यांचीं आणि शेतकीची वर्णनेंही त्यात आहेत. पाणचक्क्या आणि दगडी जातीं यांचींहीं वर्णनें तेथे आढळतात. या सर्व वस्तू त्या पूर्वीच्या स्वरूपांत आजही आशियाखडात आढळून येतात

आशिया खडानें जेव्हां जेव्हां बोलण्यासाठीं आजपर्यंत तोंड उघडलें, तेव्हां तेव्हां धर्माचा उपदेशच त्याने केला आहे. युरोप खंडाने फक्त राजनीतीचा उपदेश केला आहे. हे दोन्ही उपदेश आपापल्यापरी मोठेच आहेत.

युरोप खड जें काहीं ज्ञान आज सागत आहे, ते ग्रीक ज्ञानाचा परिपाक होय. ग्रीक लोकांची दृष्टि फक्त स्वत·च्या समाजापुरतीच होती. स्वतःच्या समाजाबाहेरील मानवक्षेत्र अवलोकन करण्याइतकी ती विशाल नव्हती. ग्रीक लोक कायतेच परमेश्वराचे लाडके व या सृष्टीचा उपभोग घेण्यास योग्य असून इतर सारे लोक रानटी आहेत, अशी त्यांची भावना होती ग्रीक मनुष्य जें जें कांही करील ते सर्व यथायोग्य आणि बरोबर असावयाचेच. याखेरीज जगांत जें कांही उरलें, तें सर्व चुकीचें आणि त्याज्य. याकरिता स्वत वांचून इतरांस जगण्याचाही अधिकार नाही असें त्यांस वाटत होतें. यामुळे ग्रीक लोकाच्या विचाराशांत मनुष्यत्व अधिक आढळून येतें कारण, त्यांची दृष्टि अत्यत आकुचित असल्यामुळें तिच्यांत परमेश्वराचे विशालत्व भरू शकलें नाही. त्याचें सारे ज्ञान अत्यत ऐहिक आहे, आणि त्यातले सौंदर्यही ऐहिक आहे. ग्रीक मन ऐहिक विषय सोडून बाहेर गेल्याचें केव्हाही आढळून येत नाहीं. ते केवळ कल्पनाविवश झालें आहे व कल्पनातरंगाबरोबर उच्छृखलपणे वहावत आहे, असें कधींही दिसून येत नाही. ग्रीकाचे कवित्वही ऐहिक विषयापलीकडे भराऱ्या मारीत नाहीं. त्याच्या देवताही मनुष्यप्राणीच आहेत. ही देवतेंसुद्धा मनुष्यत्वाचे पलीकडे गेल्याचे दिसून येत नाहीं. सामान्य मनुष्याला ज्याप्रमाणें अनेक विकार असतात, त्याचप्रमाणे या देवतांच्या ठिकाणीं तेच विकार आत्यतिकपणे आढळून येतात. आपणासारखीं सामान्य मनुष्ये क्रोधलोभादि विकारास ज्याप्रमाणे बळी पडतात. त्याचप्रमाणें ग्रीक देवताही या मानवी विकारास बळी पडल्या असल्याचें आढळून येतें ग्रीक लोक सृष्टिसादर्याचे भोक्ते होते, ही गोष्ट खरी, तथापि त्यातही त्यांची दृष्टि केवळ जडसृष्टीमध्येच गुतून राहणारी होती. सूक्ष्मसृष्टीतील सौंदर्य पाहाणारीं अतर्वर्ती दृष्टि त्याजपाशीं नव्हती. पर्वताचें सौंदर्य, शुभ्र बर्फाचे सौंदर्य आणि फुलांचे सौंदर्य पाहाणारी दृष्टि त्याजपाशीं होती. सुदर मानवी चेहरा आणि शरिराचा सुदर आकार याचा उपभोग घेणारी दृष्टि त्याजपाशीं होती. हेच ग्रीक लोक त्यानतर झालेल्या युरोपीय सस्कृतीचे आद्यगुरु होत. याकरिता सध्यांचे त्यांचे शिष्य जे काहीं ज्ञान आज सागत आहेत, ते त्यास ह्याच गुरूच्या मुखानें प्रथम प्राप्त झालें आहे.

आशिया खंडांत याहून निराळ्या प्रकारची विचारपरंपरा निर्माण झाली आहे. आशियाखडाचें विशालत्व मेघांच्याही वर गेलेलीं आणि प्रत्यक्ष आ-

काशास स्पर्श करू पाहणारीं त्यांतील उत्तुंग पर्वतशिखरें, कित्येक मैल विस्तृत असलेले वालुकामय प्रदेश, कीं ज्यांत पाण्याचा थेंबही प्राप्त व्हावयाचा नाहीं, अथवा गवताची एक पातीही उगवावयाची नाहीं, त्यांतील अत्यंत विशाल आणि घोर अरण्यें आणि समुद्राकडे धावत जाणाऱ्या लांबच लांब नद्या या साऱ्या गोष्टींचे अवलोकन आपण मनोमय दृष्टीनें करा अशा प्रकारे सर्व सृष्टि सभोंवार नटली असता, पौर्वात्यांचें मन तींतील सौंदर्य आणि उदात्तपणा याजकडे वेधलें गेलें आणि त्यामुळे त्याची वाढ निराळयाच दिशेनें झाली ते अधिक अंतर्वर्ती बनलें. सृष्टीच्या भव्यतेचा आणि उदात्ततेचा ठसा त्याजवर उमटल्यामुळें त्याचे बाह्यवर्तित्व जाऊन त्याला अंतर्वर्तित्व प्राप्त झालें सृष्टि-सौंदर्यावलोकनाची आवड तुम्हांप्रमाणें पौर्वात्यांसही आहे. तुम्हाप्रमाणें साम-र्थ्याची आवडही त्यास आहे. स्वतःच्या मोठेपणाच्या कल्पना आणि इतरा-बद्दल तुच्छ बुद्धि ही ग्रीक लोकाप्रमाणेंच पौर्वात्यातही आहेत, पण यातही एक भेद आहे ग्रीक लोकाची दृष्टि आकुंचित होती केवळ स्वत च्या समा-जापलीकडे ती वावरत नव्हती. पौर्वात्याची दृष्टि केवळ ऐहिक आणि आकु-चित असली, तरी ती अधिक विस्तृत आहे. तिच्या अवलोकनात येणारा परिघ ग्रीक लोकाच्या परिघाहून मोठा आहे. केवळ जन्म, वर्ण अथवा भाषा एवढया त्रयीनेंच तेथे मानववंश निश्चित होत नाही. तर तो धर्माच्या कसो-टीवर ठरविला जातो. अनेक वर्णांचे अथवा अनेक भाषा बोलणारे लोक एकच धर्माचे म्हणवीत असले, तर ते एकाच मानववंशातले म्हणविले जातात ख्रिस्ती धर्म पाळणारे, महमदी धर्म पाळणारे, अथवा बौद्ध धर्म पाळणारे हे सर्व त्या त्या मानववंशांतले समजले जातात. बुद्धाचा धर्म पाळणारा कोणी चिनी असला अथवा तोच धर्म पाळणारा दुसरा कोणी इराणी असला, तथापि ते आपणास बंधु बंधु समजतात. एकच धर्म पाळीत असल्यामुळें एकाच कुलात उत्पन्न झालेल्या बंधुत्वाचे नातें त्याजमध्ये जडते. त्यांस एकत्र बांध-णारा प्रमुख तंतु म्हणजे धर्म. सर्व मानवजाती कधी काळीं बंधुभावानें वागण्याचा काळ येईल, तर तोही धर्माच्या पायावरच येईल, असें पौर्वा-त्यांचें मत आहे. सर्व मानवजाती एका सूत्रात बांधावयाची असली तर तें सूत्र धर्मसूत्रच होय. याच कारणाकरिता पौर्वात्य मनुष्य पाश्चात्यापेक्षा अधिक कल्पनाविवश असतो. विचारसृष्टींत अथवा स्वप्नसृष्टीत वाहावण्याची

त्याला अधिक चटक असते. हा गुण पौर्वात्याच्या ठिकाणीं जन्मादारभ्यच आलेला आहे. धबधब्यातून उडणाऱ्या व शुभ्र मोत्यांच्या सराप्रमाणें शोभणाऱ्या जलधारा, पक्ष्यांची मंजुल गाणीं, चंद्र, सूर्य आणि तारामय आकाश हीं सारीं आनंददायी आहेत ही गोष्ट खरी; पण पौर्वात्याच्या मनास आनंदाचा पूर आणण्यास एवढींच साधनें पुरेशीं नाहींत यांपलीकडेही कांही असल्यास पहावें, या विचाराने तो स्वप्नसृष्टींत शिरण्याची इच्छा करीत असतो केवळ वर्तमानकाळ त्याला पुरेसा वाटत नाहीं. त्या पलीकडे उड्डाण करण्याची तो इच्छा करीत असतो. पौर्वात्यभूमि ही मानवी प्राण्याचे आद्यक्रीडाभुवन होय. कित्येक युगेपर्यंत या आंगणात मानवी प्राणी आपले खेळ खेळला आहे दैवाचे विचित्र खेळ येथे आढळून आले आहेत. येथे अनेक राज्ये निर्माण झालीं आणि रसातळास गेली, सामंतचक्राचा येथे उद्भव आणि विलय झाला सामर्थ्य, संपत्ति आणि विजय यांच्या पताकाही येथे फडकल्या, विद्येचेही अनेक झरे येथें निर्माण झाले पौर्वात्यभूमीचें स्वरूप या प्रकारचें आहे सामर्थ्य, सत्ता आणि संपत्ति या त्रयीचा उपभोग अनेक काल घेऊन पौर्वात्य मन आता त्याच्या सौंदर्याला विटले आहे यामुळे ऐहिक वस्तूविषयीं तुच्छता बुद्धि त्याच्या ठिकाणी निर्माण होणें हे साहजिकच आहे अशा रीतीनें बाह्यजगविमुख झाल्यानंतर ते अंतर्मुख व्हावे हें रास्तच आहे. जगातील सौंदर्य नष्ट होणारें आहे असा अनुभव आल्यानंतर, ज्यांत कालत्रयींही बदल होणार नाहीं, अथवा जें मृत्युवश नाहीं, अशा चिरस्थायी तत्त्वाच्या शोधामागें ते लागलें दुःखानें भरलेल्या व मृत्यूला वश असणाऱ्या या जगांत चिरस्थायी आणि सदोदित आनंददायी असें तत्त्व कांहीं असेल काय? असा प्रश्न येथे आपोआपच उपस्थित झाला "या जगाच्या बाहेर चला, आणि ऐहिक वस्तूंचा त्याग करा" या उपदेशाचे पुनः पुन्हां चर्वण करण्यात कोणाही पौर्वात्य महापुरुषाला कंटाळा येत नाहीं आजपर्यंत जितके म्हणून अवतारी पुरुष निर्माण झाले, तितके सारे एकजात पौर्वात्य होते ही गोष्टही लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

आपण ज्याबद्दल सांप्रत विचार करीत आहों, त्याच्या आयुष्यक्रमांतही एक तत्त्व मुख्य सूत्र म्हणून आढळून येतें. "या जगांत राहू नको; याहून उच्चतर अशा जगांत जावयाचें आहे." पौर्वात्यांच्या स्वभावास अनुरूप अशी

त्याची वागणूक याच तत्त्वास धरून होती. तुम्हीं पाश्चात्य लोकही स्वत च्या तत्त्वांस मूर्तरूप देण्यात असेच उत्सुक असता. तुमच्या सैन्यरचनेंत, तुमच्या राजकीय कारभारात आणि लौकिक गोष्टींत स्वत च्या तत्त्वास प्रत्यक्ष अथवा मूर्तरूप देण्याची तुम्हीही नित्य खटपट करीत असता या गोष्टीत तुमच्यासारखी पौर्वात्याची तयारी नाहीं, पण आपल्या स्वतःच्या क्षेत्रात आपल्या कल्पनास मूर्तरूप देण्याची त्याची तयारी आहे. धर्मतत्त्वे रोजच्या व्यवहारात कशीं उतरतील या विचारात पौर्वात्य मन गुतलें आहे. आज कोणीं एखाद्या तत्त्वाचा उपदेश त्यास केला, तर त्याचा प्रत्यक्ष आचार करावयास शेकडों लोक उद्या तयार होतील. एका पायावर उभे राहिले असता मोक्षप्राप्ति होते असें कोणीं त्यास सागितलें, तर तसे करावयास निदान पाचशे माणसे आज सिद्ध होतील. या गोष्टी तुमच्या दृष्टीने अत्यत हास्यास्पद दिसत असतील, पण यातील रहस्य तुम्ही लक्ष्यात घ्या. धर्मतत्त्वाचा प्रत्यक्ष आचार करावयाची त्याची किती तयारी आहे, हे यावरून लक्ष्यात आणा. उलटपक्षीं तुम्हा पाश्चात्याचा तत्त्वाभ्यास म्हणजे केवळ बुद्धीच्या पकडी असतात हेही लक्षात आणा. धर्मतत्त्वे अमुक आहेत आणि तमुक आहेत अशी बडबड तुम्ही करता, पण यातील एकाही तत्त्वाचा प्रत्यक्ष आचार कसा करावा हे कोणी सागत नाहीं, अथवा प्रत्यक्ष करूनही दाखवीत नाहीं. विचारसृष्टीतील तत्त्वे आचारसृष्टीत उतरल्याचा प्रत्यय तुम्हा पाश्चात्याच्या बाबतीत कधींही येत नाही. केवळ उच्च विचार जो कोणी तोडाने अघळपघळ बोलेल तोच तुम्हा पाश्चात्याच्या दृष्टीनें मोठा तत्त्वदर्शी म्हणविला जातो. विचार आणि आचार याची सागड असण्याचे कारण नाही

या दृष्टीनें ख्रिस्तचरिताचा आपण विचार केला, तर तो अत्यंत पौर्वात्य होता आणि स्वत च्या तत्त्वाचा आचार करण्यास अत्यत उत्सुक होता, असें आढळून येईल. क्षणोक्षणीं बदलणाऱ्या या जगावर आणि त्यातील वस्तूवर त्याचा लोभ नव्हता. ग्रथातील पाठाची गुडिका करावी आणि त्यांतील अर्थाचा कीस पाडावा, असेही त्यास वाटत नव्हते तुम्हा पाश्चात्यात सध्या याच गोष्टीची आवड अधिक उत्पन्न झाली आहे. ग्रथातील मूळपाठाची एवढी ओढाताण करावयाची कीं, त्यापुढें अधिक ओढाताण करणें शक्यच नाहीं. ग्रथातील पाठ म्हणजे रबर नव्हे, आणि रबर झाला तरी

त्याच्याही ताणलें जाण्याच्या शक्तीला काहीं सीमा आहेच. ही सारी खटपट धर्मतत्त्वें स्वत:च्या आचारास व विचारास अनुरूप करून घ्यावीं यासाठीं केलेली असते स्वत:चें आचरण त्या तत्त्वास अनुरूप नसलें तरी चालेल; एवढेंच नव्हे, तर त्या तत्त्वानीं आपल्या आचारास अनुरूप असावें, हीच इच्छा या खटपटींत दृग्गोचर होते इंद्रियसुखलालसेच्या तृप्तीकरितां धर्मतत्त्वाची अशी ओढाताण करण्याचें आतां तरी सोडून द्या. अधिक प्रामाणिकपणा तरी आपण आपल्या ठिकाणीं जागृत करू या धर्मतत्त्वांनी सागितलेल्या आदर्शास अनुसरण्याचें आपणांस साधत नसलें, तर आपला दुर्बळपणा कबूल करणे, हेच योग्य आहे त्या आदर्शास खालीं ओढणें हें आपणास उचित नाहीं त्या आदर्शास तुम्ही पोहोंचूं शकत नसलां, तर निदान त्याला पदच्युत तरी करू नका. येशू ख्रिस्ताच्या चरित्राचे जे वाभाडे तुम्हीं पाश्चात्य लोकांनीं काढिले आहेत, ते पाहून एखाद्याच्या अंत करणास खरोखर पीळ पडेल. ख्रिस्त अमुक प्रकारचा होता अथवा अमुक प्रकारचा नव्हता, हे ठरविण्याचा अधिकार मला नाहीं. तो मोठा राजकीय पुरुष होता, असा निष्कर्ष त्याच्या चरित्रातून कोणी काढतील, तो मोठा योद्धा होता अथवा मोठा देशभक्त यहुदी होता असेंही कोणी ठरवू पाहतील, पण असें म्हणावयास ग्रथांतरी यत्किंचित् तरी आधार आढळतो काय? एखाद्या महापुरुषाचे चरित्र अवलोकन करावयाचें असलें तर तसें करावयास मुख्य आधार म्हटला म्हणजे त्याचे स्वत चें चरित्र हाच होय. येशू ख्रिस्त म्हणतो, "कोल्ह्यांस रहावयास गुहा असतात आणि पक्ष्यांना घरटी असतात, पण मानवी प्राण्याला डोकें टेकावयास जागा नाहीं." ख्रिस्त म्हणतो, "मुक्तीचा मार्ग हाच." पूर्ण त्यागी बनणें, हाच ख्रिस्ताच्या दृष्टीने मुक्तीचा राजमार्ग होय. दुसरा कोणताही मार्ग त्यानें सागितला नाहीं. आपणांस हा मार्ग अवलबणें शक्य नाहीं असें नाक मुठींत धरून आपण कबूल करू या. मी आणि माझें ही कल्पना आपल्या चित्तातून अद्यापि गेलेली नाहीं. घरदार, जमीनजुमला आणि पैका आपणास पाहिजे. ख्रिस्तानें सांगितलेला मार्ग अनुसरण्याचें सामर्थ्य आपणांत नाहीं, असें आपण अत्यत खेदानें पण स्पष्टपणें कबूल करू या. त्याच्या विचारांची ओढाताण करून त्याला लाज येईल असें कृत्य करण्याचें पातक तरी आपण टाळू या. येशू ख्रिस्ताला कसल्याही प्रकारचा ससारबध नव्हता. देहविषयक कल्पना त्याच्या

चित्तांत होत्या असें तुम्हांस वाटतें काय? शुद्ध प्रकाशरूप असा अवतारी पुरुष एखाद्या पशूची बरोबरी करण्यासाठीं जन्म पावला असें तुम्हांस वाटतें काय? तथापि ख्रिस्तानें अमुक अमुक प्रकारचा उपदेश केला, असा आरोप त्याजवर करणारे लोकही पुष्कळ आढळतात. हा पुरुष आणि ही स्त्री अशा प्रकारचा लिंगभेदही त्याजपाशीं नव्हता. अशा प्रकारच्या कल्पनाच तो विसरला होता तो केवळ आत्मरूप झाला होता. मनुष्यमात्राच्या कल्याणासाठीं हा विशुद्ध आत्मा देहबधांत राहून कार्य करीत होता. मनुष्यमात्राच्या कल्याणाचें साधन इतक्याच अर्थानें त्यानें जडदेहाशीं संबध राखिला होता आत्म्याचे ठिकाणीं लिंगभेद नाहीं, त्याचप्रमाणें आत्म्याचे ठिकाणीं विकारही नाहींत आणि त्याचा व जडदेहाचा नित्य संबंधही नाहीं. आपणांस ज्या ठिकाणास पोहोचावयाचें आहे, तें फार दूरवर असेल; पण तसें असलें तरी एकसारखें त्या दिशेनेंच चालत राहिलें पाहिजे. ते आपलें साध्य आहे, तोच आपला अखेरचा हेतु आहे, इतकें तरी निदान आपण चित्तांत वागवू या. आज आपणांस तेथें पोहोंचण्याची शक्ति नाहीं ही गोष्ट वेगळी

आपण शुद्ध आत्मरूप आहों, यावांचून अन्य कोणतीही भावना ख्रिस्ताच्या चित्तात वागत नव्हती. त्याच्या ठिकाणीं जडदेहाचा आणि आत्म्याचा सबध तुटला होता. तो केवळ मुक्त आत्मा होता, इतकेच नव्हे, तर सर्व देहधारी हे वस्तुत. आत्मरूपच आहेत, असाही प्रत्यय त्याला आला होता कोणी स्त्री असो अगर पुरुष असो, यहुदी असो अगर इतर कोणत्याही जातीचा असो, श्रीमत असो अगर गरीब असो, सत्पुरुष असो अगर दुर्जन असो, तोही आत्मरूपच आहे असें दाखविणारी दिव्यदृष्टि त्याला प्राप्त झाली होती. आपण गरीब आहों अथवा आपण हलक्या दर्जाचे आहों, असल्या प्रकारच्या खोट्या भावनांचा त्याग करण्याविषयीं त्याने वारंवार उपदेश केला आहे. आपण गुलाम असून आपणांवर इतर लोक जुलूम करतात, असल्या प्रकारच्या विचारांस चित्तांत थारा देऊ नका, असे त्याचें वारंवार सांगणें असे. वस्तुमात्राच्या ठिकाणीं ज्या तत्त्वाचा वास आहे, ते तत्त्व पायाखालीं तुडविलें जाणारें नव्हे अगर मारलेंही जाणारें नव्हे. तुम्ही सर्व अमर आणि परमेश्वराचे पुत्र आहां, स्वर्गाचें राज्य तुमच्या अतरात्म्यांतच आहे, असें ख्रिस्त म्हणत असे. मी आणि माझा पिता हे एकच आहों, मी परमेश्वराचा पुत्र आहें, एवढेंच नव्हे

तर मी आणि माझा पिता एकच आहो, असा अनुभव माझ्या अंतरात्म्याच्या ठिकाणी मला येईल असे तो म्हणत असे. येशू ख्रिस्ताचा उपदेश या प्रकारचा होता. ऐहिक वस्तु आणि संसार याविषयीं तो कधींही भाषण करीत नसे. संसारविषयक बाबतींशीं त्याचा कोणताही संबंध नव्हता. जगाला हातीं धरून त्याला पुढें सरकवावे व प्रकाशमय परमेश्वरापर्यंत त्याला पोहोचवावे, याच शुद्ध हेतूनें तो जगात वावरत होता. आपण आत्मरूप आहो, आपण अमर आहों आणि सदैव आनंदरूप आहो, असा अनुभव प्रत्येकास यावा याच हेतूने त्याने जगाशी संबंध ठेविला होता.

त्याजविषयी लिहिलेल्या निरनिराळ्या गोष्टी आपल्या वाचनात आल्या आहेत. विद्वानानीं त्याजविषयी काय लिहिलें आहे आणि त्याच्या वचनांवर कशीं भाष्ये लिहिलीं आहेत, हेंही आपणास अवगत आहे. नवा करार खरा की खोटा, याजविषयीं वादविवाद करण्याचा आपला उद्देश नाहीं ख्रिस्ताच्या चरित्रापैकी किती भाग खरा आणि इतिहासाशी सुसंगत आहे, हेही आपणास ठरवावयाचे नाही. येशू ख्रिस्ताच्या जन्मानंतर नवा करार लिहिला जाईपर्यंत पाचशे वर्षांचा काळ लोटला की नाहीं, हा आपल्या दृष्टीनें महत्त्वाचा मुद्दा नाहीं फार काय, पण त्याच्या चरित्रात खरा भाग किती आणि खोटा भाग किती, हा भागसुद्धा आपल्या दृष्टीने महत्त्वाचा नाहीं. या साऱ्या वादविवादाच्या अंतर्भागी जें तत्त्व आहे, तेंच आपणास पहावयाचें आहे त्याच्या चरित्रापैकीं आपणांस कोणत्या भागाचे अनुकरण करता येईल, हे आपणास पहावयाचें आहे आपणास खोटे बोलावयाचें असलें तरी त्याजवर सत्याचा आरोप केल्यावाचून भागत नाहीं. जिला कधी अस्तित्वच नव्हतें अशा कोणत्याही गोष्टीचें अनुकरण आपण करू शकत नाहीं. जी गोष्ट आपल्या दृष्टिपथांत कधींही आली नाही, अशा गोष्टीचें अनुकरण आपण कधीही करू शकत नाही. ख्रिस्ताच्या चरित्रात कितीही खोटा भाग असला तथापि प्रचंड शक्ति तेथे उत्पन्न झाली होती ही गोष्ट निर्विवाद आहे ज्या आत्मिक शक्तीचा तेथे अवतार झाला होता, तिजविषयींच आपणास बोलावयाचें आहे. त्या शक्तीचें अस्तित्व जोपर्यंत आहे, तोंपर्यंत पंडितानीं केलेल्या प्रखर टीकेलाही भीक घालण्याचें कारण आपणास नाहीं. ख्रिस्ताची पूजा आम्ही करतो ती तो परमेश्वरस्वरूप होता इतक्याच नात्यानें करतो. अशा प्रकारें त्याचें पूजन

करण्याचा अधिकार आपणांस नाहीं असें तुम्हांस वाटतें काय ? त्याच्या उच्चासनावरून त्याला खालीं ओढणें व तो एक थोडासा मोठा मनुष्य होता असें समजण्यापेक्षा त्याचा एकदम त्याग करणेच अधिक चांगलें. जे प्रकाशमय आहेत, जे इतरास प्रकाश देतात, किंबहुना जे स्वत च प्रकाशरूप आहेत, त्याचें पूजन तुम्हीं केलें तर ते तुमच्याशी एकरूप होतील व तुम्ही त्यांशीं एकरूप व्हाल, असें आमच्या शास्त्रात सांगितलें आहे.

परमेश्वराची ओळख मनुष्याला तीन मार्गांनीं होते. ज्याची बुद्धि असंस्कृत आहे, अशा आडमुठ्या मनुष्याला परमेश्वर अत्यंत दूर आहे असें वाटते. तो आकाशांत कुठें तरी सिंहासनावर बसला असून आपल्या बऱ्यावाईट कृत्याचा निवाडा करतो, अशी त्याची कल्पना होते. त्याच्या दृष्टीनें परमेश्वर रुद्ररूप आहेसा भासतो. त्याचे स्वरूप भयकर आणि भीति उत्पन्न करणारें आहे, असा त्याचा समज असतो. ही कल्पनाही काहीं वावगी आहे असे नाहीं. मानवी प्राणी असत्यातून निघून सत्याकडे धाव घेत आहेत. ही कल्पना चुकीची आहे, हें आपण लक्षांत ठेवा. अधुक सत्यातून उज्वल सत्याकडे त्याचा प्रवास चालला आहे, अथवा कमी प्रतीच्या सत्यातून अधिकाधिक वरच्या दर्जाच्या सत्याकडे तो धाव घेत आहे, असेंही पहिजे तर म्हणा, पण तो मूळ असत्यातून निघाला आहे, असें मात्र कधींही म्हणू नका आपण येथून सूर्याकडे जाण्यासाठीं सरळ रेषेनें निघालों आहो अशी कल्पना करू. येथून सूर्य लहानशा गोळ्याएवढा दिसतो आपण येथून दहा लक्ष मैलावर गेलों, तर तोच हल्लींच्याहून बराच मोठा दिसेल आपण जो जो जवळ जाऊ, तो तों तो अधिकाधिकच मोठा होत जाईल. अशा निरनिराळ्या जागाहून आपण सूर्याचे वीस हजार फोटो घेतले व त्याची एकमेकाशीं तुलना केली, तर ते प्रत्येकीं एकमेकाहून भिन्न आहेत असे आपणास दिसून येईल. हे निरनिराळे फोटो त्या एकाच सूर्याचे आहेत, ही गोष्ट आपण नाकबूल कराल काय ? अशाच रीतीनें धर्मांचे निरनिराळे प्रकार हे एकाच परमेश्वराकडे जाण्याचे मार्ग आहेत. त्यात काहीं कनिष्ठ असले अथवा काहीं श्रेष्ठ असले तरी त्या सर्वांचें अतिम साध्य एकच आहे त्यात जो फरक आहे तो फक्त श्रेष्ठपणाचा अथवा कनिष्ठपणाचा आहे. सत्य अथवा असत्य असा फरक त्यात नाहीं यामुळे परमेश्वर सृष्टिबाह्य आहे असें आडमुठ्या

लोकांचा धर्म सागतो कमी प्रगल्भबुद्धीच्या लोकात सर्व जगभर हाच प्रकार आढळून येतो परमेश्वर आकाशांत राहतो व तेथून या पृथ्वीचें शासन करतो. तो दुष्कृत्ये करणारास शिक्षा करतो व सत्कृत्यें करणारास बक्षिस देतो असें या असस्कृत धर्मात सागितलें आहे. मनुष्याची बुद्धि जसजशी अधिकाधिक सस्कृत होत चालली, तसतशी परमेश्वराचे सर्वव्यापित्व ती पाहू लागली. परमेश्वर सर्वत्र आहे, तो कोठे लाब नाहीं आणि तो सर्व आत्म्याचा अतरात्मा आहे असें तिला दिसू लागलें. ज्याप्रमाणें माझा आत्मा माझ्या शरिराचा चालक आहे, त्याचप्रमाणे तो महदात्मा आम्हा सर्वांच्या आत्म्याचा चालक आहे, असें या बुद्धीला वाटू लागते. जे थोडे भाग्यवान् पुरुष याच्याही पलीकडे गेले आणि पवित्र झाले, त्याना परमेश्वराचें प्रत्यक्ष दर्शन झालें. " जे कोणी पवित्र आहेत ते परमेश्वरास पाहतील," असें नव्या करारात सांगितलें आहे प्रत्यक्ष दर्शनाबरोबर आपण व परमेश्वर वस्तुत एकरूपच आहो असा अनुभव त्यास अखेर आला.

याप्रमाणें परमेश्वराला पोचण्याच्या मार्गांत तीन पायऱ्या आहेत. या तिन्ही पायऱ्यांचें वर्णन येशूख्रिस्तानें नव्या करारात केलें आहे. एका स्तोत्रात तो म्हणतो, " हे परमेश्वरा, जो तूं आकाशात राहतोस, त्या तुझ्या नांवाचा जयजयकार असो " ही प्रार्थना केवळ बालबुद्धीची दर्शक आहे. हीत साधेपणा ओतप्रोत भरून राहिला आहे हिला सामान्य प्रार्थना असें नाव त्याने दिलें आहे, कारण सामान्य लोकाच्या उपयोगाकरिता ती आहे. याहून जे वरच्या दर्जाला गेले आहेत, त्याना ख्रिस्त म्हणतो, " माझा वास माझ्या पित्याच्या ठिकाणीं आहे; आणि तुम्ही मजमध्ये असून मी तुमच्या ठिकाणीं आहें " ही दुसरी पायरी झाली. " तू कोण ? " असा प्रश्न यहुदी लोकांनीं त्याला केला, तेव्हा तो म्हणाला, " मी आणि माझा पिता हे एकच आहो त्याचें हे भाषण परमेश्वराचा अपमान करण्यासारखें आहे, असें यहुदी लोकाना वाटलें, पण असे म्हणण्यात ख्रिस्ताचा काय आशय होता, हेही आपण पाहिलें पाहिजे " तुम्ही सर्व परमेश्वर आहांत आणि परमेश्वराचीं लेंकरें आहात ' असें इतर भविष्यवाद्यानीही म्हटलें आहे अशा रीतीनें या भविष्यवाद्यानी या तीन पायऱ्या सागितल्या आहेत, असें आपणास आढळून येईल. त्याचा आश्रय क्रमाक्रमानें करून अखेरीस शेवटच्या पायरीवर पाय टेवणें, हेंच आपणांस सुखावह आहे.

परमेश्वराला पोहोचण्याचा मार्ग दाखविण्यासाठीं हा दूत जगावर अवतीर्ण झाला होता. केवळ बाह्यस्वरूपांत धर्म नाहीं असें त्यानें सांगितलें. तत्त्वग्रथां-तील कूट प्रश्नांचा काथ्याकूट करणे हा आत्मदर्शनाचा मार्ग नव्हे, हे त्यानें स्पष्ट केलें. असें करण्यापेक्षा तुम्ही अशिक्षित राहिला तरी पुरवलें. ग्रथ वाचून त्यावर कोरडा वादविवाद करण्यापेक्षां कांहीं न वाचणें हे अधिक चागलें. मुक्तीसाठी ग्रथवाचनाची आणि वादविवादाची मुळींच आवश्यकता नाहीं. त्यासाठीं संपत्ति नको, मानपान नको, सामर्थ्य नको, अथवा मोठी विद्वत्ताही नको. जें काय हवे आहे तें एकच म्हणजे पावित्र्य "ज्याची अतःकरणें पवित्र असतील ते धन्य होत" असें येशू ख्रिस्त म्हणतो कारण, पावित्र्य हेच अतरात्म्याचें स्वरूप आहे पावित्र्य हे परमेश्वराचा अश आहे तें खुद्द परमे-श्वराकडूनच प्राप्त झालें आहे. 'आत्मा हा परमेश्वराचा श्वास आहे,' असें बाय-बलात सागितलें आहे. 'तो परमेश्वराचा अश आहे ' असे कुराणात म्हटलें आहे. परमेश्वराचा आत्मा अथवा परमेश्वराचा अश हा कधींतरी अप-वित्र असेल अशी कल्पना तरी तुमच्या चित्तात येते काय ? आमच्या स्वत -च्याच बऱ्या वाईट कर्मांने त्याजवर कित्येक युगाच्या धुळीचें आणि घाणीचें पटल बसलें आहे, हे मात्र मोठ्या दु.खानें कबूल करणे भाग आहे जीं हजारों कुकर्मे आमच्या हातून घडली व त्याजमुळें जें अज्ञान उत्पन्न झालें, त्याचा पडदा आमच्या अतरात्म्यावर पडला आहे ही घाण काढून टाकणें इतकेच कार्य करण्याची आवश्यकता आहे हा मळ दूर झाला म्हणजे तो स्वत च्या प्रकाशानें प्रकाशू लागेल. याच करिता "जे पवित्र आहेत ते परमेश्वरास पाहतील" असे बायबलात म्हटलें आहे. "स्वर्गाचें राज्य तुमच्या अतरात्म्यात आहे, मग त्याचा शोध बाहेर कोठे करता ?" असा प्रश्न येशू ख्रिस्त तुम्हास विचारीत आहे. आत्म्यावर चढलेलें पटल तुम्ही काढून टाका म्हणजे तेथेच स्वर्गाचें राज्य तुम्हांस मिळेल. 'मिळेल' असे म्हणण्यापेक्षा तें अगोदरच तुमचे आहे असें म्हणणें अधिक युक्त आहे. जे पूर्वी तुमचे नव्हते ते तुम्हास कसे मिळेल ? तुमचा त्याजवर पूर्वीचाच हक्क होता, आणि जे तुम्हास मिळावयाचे तें पूर्वीच्याच हक्कानें मिळावयाचे. अशा प्रकारचा उपदेश येशू ख्रिस्ताने केला आहे. या साध्या उपदेशातील मुख्य सार म्हणजे त्याग हेंच होय. हाच उपदेश इतरांनीही केलेला आहे. अतरात्मा शुद्ध

करण्यास मार्ग कोणता? या प्रश्नाला, 'त्याग' हेंच उत्तर सर्व धर्मांनीं दिलेलें आहे. "त्यागेनैके अमृतत्वमानशुः" हेंच सर्व धर्मांचें सांगणें आहे. एका श्रीमत तरुण पुरुषानें ख्रिस्ताला विचारलें, "सद्गुरु, अमृतत्व मिळण्याचा मार्ग कोणता?" यावर ख्रिस्तानें उत्तर दिलें, "याला एकाच गोष्टीची जरूर आहे. आल्या मार्गानें परत जा, आणि तुजजवळ जें कांहीं असेल, तें सर्व गरीब लोकास वांटून टाक, म्हणजे तुला स्वर्गात खजिना सापडेल. नतर परत येऊन माझ्या मागोमाग चालू लाग." हे उत्तर ऐकून त्या तरुण पुरुषास मोठें दु.ख झालें व तो तेथून चालता झाला. त्याजजवळ विपुल संपत्ति होती म्हणून तिचा त्याग करण्याचें त्याच्या जिवावर आलें. कमी अथवा अधिक प्रमाणानें आपण सर्व या तरुणासारखेच आहो. परमेश्वराचा हा संदेश अहोरात्र आपल्या कानात घुमत आहे. जगांतील सुखाच्या भोवऱ्यात आपण सापडलो असता, या उपदेशाचा विसर आपणास पडतो, पण क्षणभर विश्रांतीचा काल आपणांस मिळाल्याबरोबर हा उपदेश आपल्या कर्णसपुटांत घुमू लागतो. "तुजजवळ जें कांही असेल ते गरिबांस देऊन टाक आणि माझ्यामागें ये." "जो कोणी संग्रह करील त्याचा नाश होईल, आणि जो कोणी मजसाठीं सर्व अर्थ दान करील, त्याला सर्व पुन्हां प्राप्त होईल." परमेश्वरासाठीं जो कोणी आपल्या आयुष्यावर पाणी सोडतो, त्याला अमर जीविताची प्राप्ति होते या संसाराच्या चक्राकार परिभ्रमणात आपण सांपडलो असतां एखादा तरी विश्रांतीचा क्षण आपणांस प्राप्त होतो; आणि त्या वेळीं आपणास हा उपदेश पुन्हां ऐकू येऊ लागतो. "सर्वस्वाचा त्याग कर, आणि माझ्यामागें ये." 'त्याग' हे एकच साध्य येशू ख्रिस्तानें सांगितलें आहे. जगात अवतीर्ण झालेल्या सर्व भविष्यवाद्यांनीं 'त्याग' हें एकच साध्य सांगितलें आहे. आतां त्याग म्हणजे काय याचा विचार केला पाहिजे. त्याग म्हणजे स्वत्व विसरणें सर्व नीतीच्या मुळाशींही त्याग हीच कल्पना मुख्यत्वाने आहे. आपलपोटेपणा साफ विसरून जाणें हाच सर्व नीतिमार्गाचा मूळ पाया आहे त्यागी पुरुषाचा आंगरखा कोणीं घेतला तर आपली बंडीही तो त्याला देतो.

उच्चतमावस्थेस पोहोचलेल्या या मार्गदर्शकांस पदच्युत न करतां, आपण शक्य त्या मार्गानें त्याजकडे जाण्याचा यत्न करीत राहणें, हें आपणांस योग्य

आहे. पूर्णत्याग हें आपलें अखेरचें साध्य आहे. ज्या वेळीं आपण स्वत्व विसरून जातों, ज्या वेळीं 'मी' आणि 'माझें' म्हणावयास आपणापाशीं कांहीं उरत नाहीं आणि ज्या वेळीं केवळ स्वत.बद्दलची अशी एकही कल्पना आपल्या चित्तांत उमटत नाहीं; अशा वेळीं परमेश्वर आपणांमध्यें प्रगट होतो. अशा प्रकारच्या मनुष्यांत त्याची स्वत·बद्दलची इच्छा पूर्णपणें नाश पावलेली असते. हेच पुरुष आपले मार्गदर्शक होत त्यांच्या पायरीस पोंचणें, हें आपलें साध्य आहे. सध्या आपणास ती स्थिति प्राप्त होणें शक्य नाहीं; तथापि त्या स्थितीचें मनोमय पूजन आपण केलें पाहिजे. त्या स्थितीस आपणास पोहोंचावयाचें आहे, हे निरंतर चित्तात वागविलें पाहिजे; आणि अनेक अडचणी आल्या तरी हळू हळू का होईना, पण त्या साध्याकडे जाण्याचा यत्न सदोदित सुरू ठेविला पाहिजे. हें साध्य कदाचित् उद्यां सिद्ध होईल अथवा कदाचित् हजार वर्षांनीं सिद्ध होईल, पण अखेरीस हेच साध्य आपणांस साधावयाचें आहे. 'त्याग' हे केवळ अखेरचें साध्य आहे असें नाहीं, तर तें सिद्ध करावयाचें साधन म्हणजेही त्यागच. त्यागानेंच त्याग सिद्ध करावयाचा आहे. पूर्णपणे स्वत्व विसरणे आणि अहंकार पूर्णपणें नष्ट करणें म्हणजे आपलें मनुष्यत्व मारणें होय. आपलें मनुष्यत्व मेलें म्हणजे ईश्वरच तेथें प्रगट होईल. "मरण माझें मरूनि गेले, मज केलें अमर।" असें त्या वेळीं आपणांस म्हणतां येईल.

आजपर्यंत जितके अवतारी मार्गदर्शक पुरुष होऊन गेले, ते सारे स्वत्व विसरलेले होते. आपण अशी कल्पना करू कीं, येशू ख्रिस्त उपदेश करीत असता कोणी मनुष्य त्याजकडे आला आणि म्हणाला, "तुझा सर्व उपदेश उत्तम आहे. या उपदेशाप्रमाणें वागल्यास मला पूर्णत्व प्राप्त होईल, याबद्दल मला शंका नाहीं. याकरिता या मार्गानें जाण्याची माझी तयारी आहे; पण तुला परमेश्वराचा एकच पुत्र मानून तुझी पूजा करण्याची माझी इच्छा नाहीं." यावर ख्रिस्तानें काय उत्तर दिलें असतें? तो खरोखर असेंच म्हणाला असता कीं, "ठीक आहे; कोणत्याही रीतीनें त्या साध्याला तू पोहों-चावेंस इतकीच माझी इच्छा आहे. तू कोणत्याही मार्गानें तें सिद्ध केलेंस तरी माझी हरकत नाहीं. तुला योग्य वाटेल त्या मार्गानें तू ते साध्य सिद्ध कर. हा मार्ग दाखविण्याचें श्रेय तुझ्या मनांतून मला देण्याचें नसेल तर तें

तू देऊं नको. तुला मार्ग दाखवावा आणि त्याच्या मोबदल्यांत मोठेपणा मिळवावा, अशा रीतीचा वाणीपणा मजपाशीं नाहीं. धर्माचें मी दुकान घातलेलें नाहीं. सत्य काय आहे, इतकेंच सांगण्याचें माझें काम आहे. सत्य हें कांहीं कोणाचें बांधलेलें नाहीं. त्याजवर कोणाही विशिष्ट व्यक्तीचा वारसदारीचा हक्क आहे असें नाहीं. सत्य आणि परमेश्वर हीं एकरूपच आहेत. याकरिता पुढें सर, आणि कोणत्याही मार्गानें आपलें साध्य सिद्ध कर " आतां याच येशू ख्रिस्ताचे हल्लींचे शिष्य काय सागतात तें पहा ते म्हणतात कीं, " ख्रिस्तानें दाखविलेल्या मार्गानें तुम्ही गेलां नाहीं, आणि त्यानें सांगितलेल्या तत्त्वांचा प्रत्यक्ष आचार केला नाहीं तरी हरकत नाहीं. फक्त त्याजवर विश्वास ठेवा, म्हणजे तुम्ही मुक्त व्हाल. जर तुमचा त्याजवर विश्वास नसेल तर तुम्हांस मुक्तीचा लाभ होणार नाहीं. " अशा रीतीनें ख्रिस्तानें सांगितलेलें उच्च ध्येय पदच्युत झालें आहे. ते पायांखालीं तुडविलें गेलें आहे, आणि आता जीं भांडणे सुरू आहेत, तीं ख्रिस्तावर विश्वास ठेवावा कीं, नाहीं याबद्दलचींच आहेत. ख्रिस्त हा अवतार होता कीं नाहीं, व तो पूजनीय होता कीं नाहीं, हाच काय तो आतां मोठ्या कडाक्याच्या वादविवादाचा विषय शिल्लक उरला आहे. त्यानें काय प्रतिपादन केलें हा मुख्य मुद्दा विसरला गेला आहे यामुळें या ख्रिस्तशिष्यांची अशी फसगत झाली आहे कीं, आपल्या गुरूचा मान वाढवावा म्हणून जी खटपट ते करितात, ती सारी फुकट जाते ज्या साधनांनीं ते त्याचा मान वाढवू पाहातात, तींच साधनें उलट त्या सद्गुरूला कमीपणा मात्र आणतात. ज्या प्रकारच्या कल्पना येशू ख्रिस्ताच्या चित्तात आल्या असत्या तर त्याला लाज वाटली असती, तशा प्रकारच्या कल्पनांचा प्रसार त्याचे शिष्य करीत आहेत. आपणा स्वत ला कोणी मान देतो कीं नाहीं, याबद्दल ख्रिस्तानें कधीं पर्वासुद्धां केली नाहीं. परमेश्वराचा संदेश पोहोंचविणें इतकेंच त्याचें कार्य होतें आणि तें त्यानें केलें. त्याला जर हजार जीव असते तर जगांतल्या अत्यत क्षुद्र मनुष्यालाही वांचविण्याकरितां ते त्यानें मोठ्या खुषीनें अर्पण केले असते. त्याच्या शत्रूंनीं एक लक्ष वेळ त्याचे हाल केले असते, तरी स्वत.च्या शत्रूचाही उद्धार करण्याकरितां त्यानें आपला जीव एक लक्ष वेळा अर्पण केला असता. असें करण्यांत कांहीं कीर्ति संपादन करावी आणि मोठें नांव मिळवावें ही

कल्पनाही त्याच्या चित्तात खचित आली नसती कोणत्याही प्रकारची अपेक्षा चित्तांत नसतां परमेश्वर ज्याप्रमाणे सदैव कार्यरत असतो, त्याच-प्रमाणें कीर्तीची अथवा दुसरी कसलीही अपेक्षा चित्तात न ठेवतां आपलें कार्य करावें, हीच ख्रिस्ताची इच्छा होती. आता त्याचेच शिष्य काय म्हणत आहेत पहा. ते म्हणतात, "तुम्ही कितीही निरपेक्ष व्हा, अथवा तुम्ही पूर्णत्व पावलेले असा, पण जर तुमचा ख्रिस्तावर विश्वास नसेल, तर तुम्हास मुक्ति मिळणार नाहीं." असल्या मूर्खपणाच्या कल्पनांचा उगम कसा झाला असावा? परमेश्वर फक्त एकदांच अवतार घेऊं शकतो, या मूलकल्पनेपासूनच हें सारें अज्ञान निर्माण झालें आहे ही आरंभींची चुकीची कल्पना भावी अनर्थपरपरेस कारणीभूत झाली आहे, पण एकंदर सृष्टीचा विचार करतां ही कल्पना सर्वथा चुकीची आहे, असें उघड दिसून येईल. सृष्टींत जें काहीं आज निर्माण झालेलें दिसते, तें पूर्वी निर्माण झाले होते आणि ते पुढेंही निर्माण होईल. याबद्दल शका घेण्याचे कारण नाहीं. ही गोष्ट निसर्गसिद्ध असल्यामुळें तिच्या सिद्धीचें निराळें प्रयोजन नाही मग एखादा अवतार आज झालेला दिसत असला तर तसा अवतार पूर्वी झाला नव्हता अथवा पुढें होणार नाहीं असें म्हणण्यास काय जागा आहे? असें म्हणणें हें निसर्ग-नियमाच्या विरुद्ध आहे सर्व सृष्टि कायद्यानें बाधली गेली आहे. तीत कोणतीही गोष्ट अनियमितपणें घडत नाहीं. मग या एकाच बाबतींत सृष्टि अनियमित झाली असे का म्हणावें? अवतार वारंवार होत असतात, असा आम्हां हिंदू लोकांचा सिद्धात आहे. भगवान् श्रीकृष्ण हेही एक अवतारी पुरुषच होते. ते म्हणतात,

अजोपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोपि सन् ।
प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥ ६ ॥
यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ ७ ॥

भगवद्गीता, अ० ४.

ज्या ज्या वेळीं पृथ्वीवर अधर्म माजतो त्या त्या वेळीं लोकांचा मार्ग सुरक्षित करण्याकरिता परमेश्वर अवतार घेतो. तो अमुक एका स्थलींच अथवा अमुक एका कालींच अवतार घेतो असे नाहीं, तर निरनिराळ्या

जागीं आणि निरनिराळ्या कालीं आवश्यकतेप्रमाणे तो अवतार घेतो. दुसऱ्या एका स्थलीं भगवान् श्रीकृष्ण म्हणतात, " ज्या ज्या ठिकाणीं एखादा मोठा शक्तिमान् व पवित्र महात्मा मनुष्यांचा मार्ग प्रज्वलित करीत असल्याचे तुला दिसून येईल, त्या ठिकाणीं माझेच तेज निर्माण झालें आहे आणि त्या महात्म्याच्या निमित्ताने मीच तें कार्य करीत आहे असे तू समज. "

याकरिता परमेश्वर फक्त ख्रिस्ताच्या रूपाने अवतरला होता, या चुकीच्या कल्पनेचा त्याग केला पाहिजे. त्याच्यापूर्वी जे अवतार होऊन गेले व त्याच्या नतर जे झाले आणि यापुढेही जे होतील, त्या सर्वांचे पूजन करावयास आपण सिद्ध असलें पाहिजे. एखाद्या विशिष्ट स्थलीच अथवा एखाद्या विशिष्ट व्यक्तीचेंच पूजन करावयाचें, ही कल्पना अत्यत आकुंचित आहे या कल्पनेंत बद्ध झालेलें आपलें मन आपण मोकळें केलें पाहिजे. सर्व अवतार हीं त्या एका परमेश्वराचीच स्वरूपें होत. तीं सर्वच शुद्धरूपे होतीं. सर्व अवतारी पुरुष स्वार्थ विसरले होते आपणासारख्या क्षुद्र मनुष्यास मार्ग दाखवावा एवढयाच हेतूने त्यानीं अनेक खटपटी केल्या. याच हेतूने प्रेरित होत्साते त्यापैकी कित्येकानी आपला जीवही गमावला केवळ आपणासाठीच नव्हे तर आपणानतर जी मनुष्ये जन्मास येणार आहेत, त्याच्याकरिताही त्यानीं खटपट केली आहे आणि हाल भोगिले आहेत.

एका पक्षी पहाता तुम्ही सर्वच भविष्यवादी आहा, असें म्हणावयास हरकत नाहीं. जगाचे बरें करण्याचे ओझें एखाद्या महात्म्याप्रमाणेंच तुम्हापैकीं प्रत्येकाच्या खाद्यावर आहे. केवळ ससार करीत असताही अनेक प्रकारची ओझीं आपल्या खाद्यावर असत नाहीत काय ? आपल्या सबंध्यासाठी आणि पुत्रकलत्रासाठी आपण ओझी वाहात नाही काय ? आपले प्रत्येक कार्य केवळ स्वार्थाचेच असते असें नाहीं. आपण आपल्या परी परक्याचें ओझें वाहात असतो अशा रीतीने परक्याचे ओझें शातपणे आणि धैर्यानें वाहणारीं स्त्रीपुरुषें आपणास नेहमीं आढळतात. अवतारी पुरुष साऱ्या जगाचें ओझे वाहतात. त्याची शक्ति प्रचड असल्यामुळें सारे जग हेच त्यांचें कुटुब असतें आणि त्या कुटुबाचे ओझें ते वाहतात. त्याच्याशी तुलना करता आपण केवळ जंतु आहोंत ही गोष्ट खरी, तथापि अत्यत अल्प प्रमाणावर तरी आपण तेच कार्य करीत आहो. अत्यत अल्प प्रमाणात आणि अगदीं लहा-

-नशा परिघांत आपण कार्य करीत आहों, तथापि त्या कार्यांचें मूलरूप तेंच आहे. असें कार्य मुळींच न करण्याइतका अधम आणि निरुपयोगी प्राणी कोणीही नाहीं. यच्चयावत् प्राणिमात्र अल्पस्वल्प प्रमाणावर हें कार्य करीत आहेत. आपण कितीही चुका करीत असलो, कितीही दुष्टपणाचे विचार आपल्या चित्तांत येत असले, आणि काहीं दुष्कर्मे आपल्या हातून घडत असलीं तरी भावी आशेचा एखादा सुवर्णतंतू आपणापाशीं शिल्लक असतोच. एखाद्या प्रसंगी तरी आपण स्वार्थ विसरत असतो याच तंतूच्या द्वारें आपण परमेश्वराशीं संबंध जोडीत असतों. याच तंतूवर आपलें जीवन अवलंबून आहे. परमेश्वराशी संबंध तुटला कीं, त्याच क्षणीं आपण पूर्णपणें नाश पावूं आणि ज्या अर्थी आपण कधीही नाश पावणे शक्य नाहीं, त्या अर्थी आपल्या अंतर्यामींच्या अत्यंत गूढ भागांत कोठे तरी या सुवर्णतंतूचे अस्तित्व असलें पाहिजे, हे उघड होय. आपण कितीही क्षुद्र असलो-कितीही हलक्या दर्जाचे असलो, तथापि आपल्यांत जो लहानसा प्रकाशकिरण आहे, त्याच्या द्वारें परमेश्वराशीं आपला अखंड संबंध चालू आहे. ज्या अवतारी पुरुषांचीं वचने आणि ज्यांचा आयुष्यक्रम आज आपणास प्राप्त झाला आहे, त्या सर्व अवतारी पुरुषांच्या चरणीं शतशः प्रणाम असोत! त्यांचा जन्म कोणत्याही देशांत, कोणत्याही जातींत अथवा कोणत्याही धर्मांत झालेला असो, ते सारे आम्हास सारखेच माननीय आहेत. मनुष्यजातीस साह्य करण्याकरिता जी स्त्रीपुरुषें स्वार्थत्याग करीत आहेत, तीं कोणत्याही जातीची, वर्णाचीं अगर धर्माची असोत, त्यांना आम्ही प्रणाम करतो. आमच्या भावी वंशजांकरिता जे अवतार भविष्यत् कालीं होणार आहेत, त्यांच्या चरणींही आम्ही वंदन करितों.



# माझे सद्गुरु.

— ० —

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥

असें भगवान् श्रीकृष्णानीं गीतेत म्हटलें आहे. जगात नित्य घडून येणाऱ्या अदलाबदलीमुळें आणि भिन्नभिन्न परिस्थिति उत्पन्न झाल्यामुळें, जेव्हा त्याची घडी बिघडते, त्या वेळी ती नीट बसविण्याकरितां एखाद्या अवतारी पुरुषाचा जन्म होत असतो. या अवतारी पुरुषाचे स्वरूप दोन प्रकारचे असते एका पक्षीं दैवीसंपत्तीनें तो परिपूर्ण असतो. या दृष्टीनें पाहता तो त्यागी असतो, आणि दुसऱ्या पक्षी त्याला लौकिक रूपही असते. या दृष्टीनें पाहता तो सामान्य मनुष्याप्रमाणें शुद्ध व्यवहारी आहेसा भासतो केवळ व्यवहाराच्या दृष्टीनें पाहतां या बाजूचें धुरीणत्व सांप्रत युरोपखंडाकडे असून उलट म्हणजे धार्मिक बाजूचे धुरीणत्व आशिया खंडाकडे आहे. जगाचा आजपर्यंतचा उपलब्ध इतिहास पहाता धार्मिक बाजूचें धुरीणत्व एकसारखें आशियाकडेच आहे असें दिसून येते. धार्मिक बाजूची विस्कटलेली घडी सध्या पुन्हा बसविण्याची आवश्यकता उत्पन्न झाली आहे. सांप्रत काळी शुद्ध व्यावहारिक कल्पनानाच मोठें महत्त्व आणि सत्ता हीं प्राप्त झालीं आहेत. आपण परमेश्वराचे अंशभूत आहो, ही कल्पना मनुष्यप्राणी सांप्रत अगदीं विसरून गेला आहे. त्याचें जीवित जड वस्तूवर अधिकाधिक अवलंबून राहू लागलें आहे. यापुढें मनुष्यप्राणी म्हणजे केवळ पैसा उत्पन्न करणारें यंत्रच होऊन बसेल, असें सांप्रत दिसू लागलें आहे. अशा काळीं ही विस्कटलेली घडी पुन्हा बसविण्याची आवश्यकता भासू लागली आहे. ही घडी बसविणारी शक्ति लवकरच निर्माण होणार, असा ध्वनी उमटला आहे. जडवादाच्या मेघांस इतस्तत उडवून लावणारा प्रचंड वारा लवकरच निर्माण होणार, असा ध्वनी झाला आहे मनुष्य प्राणी जें आपलें मूळचें रूप विसरला आहे, त्या मूलस्वरूपाची आठवण देणारी शक्ति लवकरच हालू लागेल ज्या ठिकाणाहून या शक्तीचें कार्य सुरू होईल, तें ठिकाण पुन्हा आशियाखंडच असेल. श्रमविभागाचें तत्त्व

ार्व जगाच्या व्यवहारात भरून राहिलें आहे. सर्व कामे एक मनुष्य करू ाकेल अथवा सर्व वस्तूचा तो एकटाच मालक होऊ शकेल, हें म्हणणें चुकीचें ाहे, पण आपण किती बालिश बुद्धीचे लोक आहोंत! या साऱ्या विश्वात ार काहीं लोभनीय वस्तु असेल, तर ती आपली बाहुलीच असें लहान मुलास ाटत असतें. त्याचप्रमाणें ऐहिक वस्तूचा मोठा सांठा ज्या राष्ट्रानें जमविला ाहे, त्या राष्ट्राला तेवढीच कायती लोभनीय परिस्थिति आहे असे वाटत असते. तीच काय ती मानवी प्रगतीची उच्च दशा आहे, असें त्यास वाटत असते. सर्व संस्कृती या जडवस्तुसंग्रहात साठविली आहे आणि ज्या राष्ट्रा-ाशीं या वस्तूचा सग्रह नसेल अथवा तो करण्याचे सामर्थ्य नसेल, त्या राष्ट्राचें जीवित फुकट असून तीं जगण्यासही योग्य नाहीत, असा भ्रम त्या राष्ट्रास झाला आहे या आकाशाच्या छताखाली उत्पन्न झालेल्या अखिल वस्तुजाता-वर तुमची सत्ता असली, पण धर्म तुमच्यापाशीं नसला तर तुमची ती सत्ता कवडीच्याही किंमतीची नाहीं, असे सागणारा एक ध्वनी पूर्व दिशेस उमटला होता. त्याग हा पूर्वेचा प्रमुख हेतु असून, भोग हा पश्चिमेचा प्रमुख हेतु आहे

हे दोन्हीही हेतू आपापल्यापरी मोठेच आहेत या दोन्हीही हेतूत निर-निराळे विशिष्ट प्रकारचें मोठेपण आहे. या दोन्हीही हेतूचे एकीकरण करून व त्यातील वितुष्ट नाहींसे करून त्यातून एकतानता उत्पन्न करणें, हे प्रस्तु-तच्या अवताराचें कार्य आहे पौर्वात्याच्या दृष्टीने धार्मिक जीवनाला जितके महत्त्व आहे, तितकेच पाश्चात्यांच्या दृष्टीनें व्यावहारिक जीवनाला आहे. आपल्या सर्व इच्छा कधी तृप्त व्हावयाच्या असतील, तर त्या धार्मिक जीव-नानेंच होतील, अशी आशा पौर्वात्यांस वाटत असते धार्मिक जीवन हा आपल्या जन्माचा आदिहेतू आहे, असें त्यास वाटत असते. पौर्वात्यांच्या या धार्मिक जीवनाच्या कल्पनेस पाश्चात्य लोक स्वप्नसृष्टि असे नाव देत अस-तात. त्यांच्या दृष्टीनें पौर्वात्य मनुष्य म्हणजे स्वप्नातल्या स्वर्गामागें धांवणारा प्राणी होय. उलटपक्षीं पाश्चात्य लोक म्हणजे मृगजलाच्या मागें धावणारे प्राणी आहेत, असें पौर्वात्यांस वाटत असते. मायावी जगांतील खेळणीं प्राप्त करून घेण्याचा उद्योग पाश्चात्य लोक करीत असतात, असें त्यास वाटतें वयो-वृद्ध स्त्रीपुरुषांनींही या असल्या तुच्छ खेळण्यामागें लागावें आणि केवळ

क्षणैक टिकणाऱ्या वस्तूचा सग्रह करण्याची धडपड करावी, या गोष्टीचें आम्हां पौर्वात्यांस मोठें आश्चर्य वाटतें. अशा रीतीनें पौर्वात्य आणि पाश्चात्य हे एकमेकास स्वप्नसृष्टींतील प्राणी समजत आहेत. जगाची वाढ होण्यास पाश्चात्य ध्येय जितकें उपयुक्त आहे, तितकेंच पौर्वात्य ध्येयही आवश्यक आहे. किंबहुना पौर्वात्य ध्येयाचीच आवश्यकता मनुष्यजातीच्या वाढीस अधिक आहे. नुसत्या यात्रिक साधनानीं मनुष्यजातीला आजपर्यंत सुखाची प्राप्ती कधींही झाली नाहीं आणि पुढेंही ती कधीं होणार नाहीं. सुखाची कल्पना ही यत्रात नसून मनांत आहे ज्यानें आपल्या मनाचे धनीपण प्राप्त करून घेतलें आहे, तोच मनुष्य सुखी होऊ शकेल. त्यावाचून दुसऱ्या कोणालाही सुखाची प्राप्ति होणार नाही. यत्राचें सामर्थ्य ही चीज तरी काय आहे ? तारेतून विद्युत्प्रवाह लाबवर पाठविणाऱ्या मनुष्यास मोठा आणि बुद्धिवान् का समजावें ? याहूनही हजार पटीनें मोठ्या अशा गोष्टी निसर्ग निर्माण करीत नाहीं काय ? मग निसर्गाचीच पूजा आपण का करू नये ? सर्व जगावर तुम्हीं आपली सत्ता स्थापिली आणि विश्वांतील प्रत्येक परमाणु तुमचे स्वामित्व कबूल करू लागला, तरी त्याचा काय उपयोग ? सुखाची किल्ली तुमच्या अतरगात असल्यावाचून या विश्वसत्तेचाही तुम्हास उपयोग नाहीं. सृष्टीवर प्रभुत्व गाजवावें, हा मानवी जीविताचा हेतु आहे, असें पाश्चात्य लोक म्हणतात आणि ते खरेंही आहे, पण सृष्टि म्हणजे केवळ जड अथवा बाह्य जग इतकाच अर्थ त्याच्या मनात असतो. भव्य पर्वत, विशाल समुद्र, लाबचलाब नद्या आणि सृष्टीत दिसून येणारें वैचित्र्य आणि सामर्थ्य ही सारीं उदात्त आहेत हे खरें; तथापि मनुष्याच्या अतर्गत भावना जड सृष्टीहूनही अधिक उदात्त आहेत सूर्य, चद्र, तारे आपली ही पृथ्वी आणि बाह्य दृष्टीला दिसणारे हे सारें विश्व या सर्वाहून वरिष्ठ प्रतीच्या भावना मानवी अतरगात आहेत. या भावनाचा अभ्यास करणें, हे मानवी प्रगतीचे आणखी एक नवेच साधन आहे. जड साधनाची पूर्तता करण्याकरितां पाश्चात्य लोक ज्याप्रमाणें जड सृष्टीच्या पाठीमागें हात धुऊन लागले आहेत, त्याचप्रमाणें सूक्ष्म साधनें पूर्ण करण्यास, सूक्ष्म सृष्टीच्या मागें पौर्वात्य लोक लागले आहेत. पाश्चात्य लोक ज्याप्रमाणें आपल्या मार्गात पूर्णत्व पावले आहेत, त्याचप्रमाणें पौर्वात्यही स्वतःच्या मार्गात गुरुपदीं विराजमान झाले

आहेत. याकरितां धार्मिक जीवनाची घडी नीट बसवावयाची असेल, त्या वेळी तें काम करावयास पौर्वात्यांची योजना व्हावी हे रास्तच आहे. एखादें यत्र तयार करावयाचे असेल, त्या वेळीं ती कला शिकण्यासाठी पश्चात्याच्या पदीं लीन व्हावें हें पौर्वात्यांस युक्त आहे. त्याचप्रमाणें आत्मा, परमात्मा आणि धर्म यांचा अभ्यास एखाद्या पाश्चात्यास करावयाचा असेल आणि विश्वांतील अनेक कूटाचा उलगडा करून त्याचा अर्थ समजून घ्यावयाचा असेल, तेव्हां पौर्वात्याच्या पायापाशीं त्यानीं शिष्यत्व पत्करिलें पाहिजे

हिंदुस्थानात धर्माची नवी लाट ज्यानें उठविली, अशा एका पुण्य पुरुषाचें चरित्र आज मी आपणास कथन करणार आहें, पण असें करण्यापूर्वी हिंदुस्थान देशाचे वास्तविक स्वरूप काय आहे, हे मी आपणास प्रथम सागणार आहें जडसृष्टींतील वस्तूंच्या लखलखाटानें ज्याचे डोळे दिपले आहेत, खावें, प्यावे आणि मजा करावी, हीच ज्याची इतिकर्तव्यता, पैसा हाच ज्यांचा परमेश्वर, लौकिक भोग भोगणें हीच ज्याची आयुष्यातील कर्तव्यसीमा, याहून अधिक पलीकडे ज्याची नजर पोहोचूं शकत नाहीं आणि स्वत च्या परिघाभोवतालच्या बाहेर दुसऱ्या काहीं उच्चतर वस्तू असूं शकतील अशी कल्पनाही ज्यास शिवत नाही, अशा मनुष्याच्या दृष्टीने हिंदुस्थानचे स्वरूप कसें दिसेल ? दारिद्र्य, धर्मभोळेपणा आणि अज्ञान याचें साम्राज्य त्याच्या दृष्टीनें येथे सर्वत्र दिसेल, कारण, त्याच्या दृष्टीनें उची उची कपडे, बौद्धिक शिक्षण आणि व्यावहारिक सौजन्य हेच काय ते ज्ञान आणि हाच काय तो प्रकाश ! आपली व्यावहारिक परिस्थिति नीट नेटकी करावी, याकरिता पाश्चात्यानीं आटोकाट श्रम केले आहेत, पण हिंदुस्थानाने निराळाच रस्ता आंखला आहे इतर देशास जिकण्याकरितां ज्यानीं आपली मरहद्द कधींही ओलाडली नाहीं, असा मानववश साऱ्या जगात फक्त हिंदुस्थानातच आढळून येतो. मानवी सृष्टीच्या आजतागायतच्या इतिहासांत असा वश हा एकच आहे परकीयांच्या वस्तूचा लोभ या वशानें कधींही धरला नाहीं त्यांनीं जो काय अपराध केला तो इतकाच कीं, आपल्या सुपीक भूमीवर स्वहस्ते श्रम करून त्यानीं आपली सपत्ति जमा केली, आणि अशा रीतीने परकीयांच्या लोभास चालन दिले. त्यांनीं उत्पन्न केलेल्या सपत्तीमुळें दुसऱ्याचा लोभ चाळवला. स्वतःची संपत्ति गेली तरी तिचीही त्यांस पर्वा

नाही. त्यास कोणी रानटी म्हटलें तरीही त्याचा राग त्यास नाहीं. अशा प्रकारच्या किंमतीच्या मोबदल्यात धर्मविषयक ज्ञान ते जगाकडे पाठवीत आहेत. मानवी अतरंगांतील रहस्ये जगास ते उघडीं करून दाखवीत आहेत. या जड देहाच्या आत वावरणाऱ्या पुरुषाचें खरे रूप काय आहे हे ते जगास दाखवीत आहेत. या खऱ्या स्वरूपावर असलेला पडदा दूर करण्याचा उद्योग ते करीत आहेत. कारण, ही सृष्टि स्वप्नवत् आहे, अशी त्याची खात्री झाली आहे. या जड स्वरूपाच्या मागे सत्य अस्तित्व आहे व ज्याला कोणतेही पातक स्पर्श करू शकत नाहीं असें पुण्यरूप या बाह्य आकाराच्या मागें आहे, अशी त्याची खात्री झाली आहे या स्वरूपाला पातक कलकित करू शकत नाहीं, त्याला अग्नि जाळू शकत नाही, पाणी विझवू शकत नाहीं, अथवा मृत्यु मारू शकत नाहीं. ज्याप्रमाणे बाह्य देह पाश्चात्यास सत्य आहेसा भासतो, त्याचप्रमाणे मनुष्याचें हे अतर्गतरूप सत्य आहे, अशी पौर्वात्याची खात्री आहे. ज्याप्रमाणे तोफेच्या तोंडावर उडी घेण्यास तुम्ही आनदाने धाऊन जाता, ज्याप्रमाणे स्वदेशाच्या नावाने तुम्ही मोठमोठीं शौर्याची कृत्ये करता आणि ज्याप्रमाणें स्वदेशासाठीं तुम्ही प्राणही मोठ्या आनंदानें वेचता, त्याचप्रमाणे परमेश्वराच्या प्राप्तीसाठीं देहपातही करण्यास पौर्वात्य लोक सिद्ध असतात. बाह्यसृष्टि केवळ कल्पनामय आहे आणि ती केवळ स्वप्नातील सृष्टि आहे, अशी जेव्हा एखाद्या मनुष्याची खात्री होते, त्या वेळी दिगबर बनून आपल्या सर्व वित्तावर त्यानें पाणी सोडावे, यात काहीं नवल नाही. स्वत.च्या म्हणण्याचे सत्यत्व तो या मार्गाने सिद्ध करीत असतो. मनुष्याचा आत्मा अमर आहे अशी खात्री एक वेळ झाली म्हणजे नदीतीरीं बसून आपला देह तिथे तो खुशाल अर्पण करतो. तुम्ही जितक्या लीलेनें गवताची काडी फेंकून देता, तितक्याच लीलेनें देह फेंकून देणारे पुरुष हिदुस्थानात आहेत. असें करण्यातच त्याचे शौर्य आढळून येतें. सख्खा भाऊ म्हणून प्रत्यक्ष शत्रूला मिठी मारण्यात त्याचे धैर्य उघड होतें. कारण आपणाला कोणीही मारूं शकत नाहीं, याबद्दल त्यांची पूर्ण खात्री झाली आहे. परकीयाच्या स्वाऱ्या आणि त्यांजबरोबर उत्पन्न होणारा जुलूम आणि यातना याच्या प्रचड चक्राखालीं शेंकडो वर्षे भरडले जात असतांही हिंदुस्थानातील लोकाचा जिवटपणा कायम आहे, याचेंही कारण हेंच होय. हिंदुस्थान आज

जीवत आहे आणि प्रचंड आपत्तीच्या काळीही अवतारी पुरुष त्यांत निर्माण झाले आहेत. पाश्चात्त्य देशात ज्याप्रमाणें भौतिक, शास्त्रें आणि राजनीति यांचे प्रवर्तक असे महाबुद्धिवान् पुरुष निर्माण होतात, त्याचप्रमाणें आशिया खडात मोठे धर्मप्रवर्तक निर्माण होतात. चालू शतकाच्या आरंभीं पाश्चात्य सस्कृतीचा प्रवेश हिदुस्थानात होत असता, ज्या वेळीं पाश्चात्य लोक हातात तरवार घेऊन हिंदुस्थानात आले आणि तेथील लोकास तुम्ही शुद्ध रानटी आहां, तुमचा धर्म म्हणजे शुद्ध भाकडकथा आणि हजारों वर्षे पूर्ण त्यागी बनून ज्या ज्ञानासाठीं तुम्हीं धडपड केली तें सर्व ज्ञान पोकळ आहे, हिदुलोक हे निवळ स्वप्नसृष्टीतील लोक आहेत, असे सागू लागले, त्या वेळी आमचा आम्हासच भ्रम पडू लागला. हजारो वर्षाचे आमचे सारे परिश्रम फुकट गेले की काय, असें आम्हास वाटू लागलें आमचे जुने ग्रथ आणि जुने तत्त्वज्ञान भस्मसात् करून जुन्या पडितास रजा देऊन आणि जुनीं देवळे मोडून टाकून पाश्चात्य पद्धतीने नव्या राज्यास पुन्हा सुरवात करावी कीं काय, असा खल अमच्या विश्वविद्यालयीन तरुणात होऊ लागला. पाश्चात्य लोकानीं आम्हास जिंकलें होते. स्वतःच्या धर्माची सिद्धि तरवार आणि बदूक याच्या जोरावर केली होती. अशा विजयी लोकानीं ज्या अर्थी आमचा धर्म अगदीं पोकळ आणि मूर्खपणाचा ठरविला, त्या अर्थी तो खरोखरच पोकळ असेल काय, असा आम्हास भ्रम झाला. नवीन शिक्षणांत पाश्चात्य पद्धतींत तरबेज झालेले व पाश्चात्य कल्पनाचें ज्यानीं आकठ पान केलें होतें अशा तरुणात अशा प्रकारचा वादविवाद होऊ लागला. या एकंदर शिक्षणपद्धतीचा आणि परिस्थितीचा विचार करितां असे झालें यांत आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं, पण भ्रामक कल्पनांचा त्याग करून सत्याच्या शोधार्थ निघावयाचें, या युक्त मार्गाचा अवलब या तरुण बाडानीं केला नाही. सत्य म्हणजे पाश्चात्य लोक जें म्हणतात तेच, असा त्यानीं कायमचा समज करून घेतला. भिक्षुक वर्ग नामशेष झाला पाहिजे, वेद ग्रथ जळून गेले पाहिजेत असें ते म्हणू लागले, आणि याला कारण काय, तर पाश्चात्य लोक तसे म्हणतात म्हणून. सत्याचा मार्ग शोधण्याची त्याची ही पद्धत होती. अशा स्थितींत आणि अशा प्रकारे उसळलेल्या अस्वस्थतेंत हिदुस्थानात "सुधारणेची" लाट उसळली. जर तुम्हांस खरोखर सुधारक बनावयाचें असेल तर तसें व्हावयास

तीन गोष्टींची आवश्यकता आहे. प्रथम तुमच्यांत अंतःकरण निर्माण झालें पाहिजे खरी सुधारणा व्हावी अशाविषयीं तुमच्या अतःकरणास पीळ पडला पाहिजे. आपल्या बाधवांची स्थिति अनुकपनीय आहे, आणि ती सुधारली पाहिजे असे तुम्हास खरोखर अत करणपूर्वक वाटतें काय? जगात खरोखर निवळ दुःख, अज्ञान आणि धर्मभोळेपणा यांचा पूर आला आहे, अशी भावना तुमच्या अत करणात जळू लागली आहे काय? सर्व लोक म्हणजे खरोखर आपले बधु आहेत, अशी तीव्र भावना तुमच्या चित्तात उद्भवली आहे काय? या भावनेनें तुमचें सर्व जीवन व्याप्त झालें आहे काय? तिचें अभिसरण रक्ताच्या प्रत्येक थेबाबरोबर होत आहे काय? तुमची प्रत्येक धमनी आणि शीर याच भावनेनें उडत आहे काय? असें होत असेल तरच तुम्ही सुधारक होण्यास योग्य आहा. सुधारक होऊ इच्छिणाराची ही पहिली तयारी आहे ही पहिली पायरी आक्रमिल्यानतर उपाय शोधून काढणें ही दुसरी पायरी आहे. समाजाला झालेल्या रोगाच्या निवारणासाठीं योग्य औषध आपणापाशीं आहे कीं नाही, याचाही विचार तुम्हीं केला पाहिजे. जुन्या कल्पना केवळ धर्मभोळेपणाच्या असतील, पण या कल्पनांच्या पोटीं सुवर्णाचा आणि सत्याचाही अश आहे, ही गोष्ट विसरतां उपयोगी नाहीं. या कल्पनातील भोळेपणा जाळून टाकून व त्यातील सत्य शोधून तें निराळें काढावयाचे याला काहीं युक्ति आम्ही शोधली आहे काय? अशी युक्ति तुम्हांस सांपडली म्हणजे दुसऱ्या पायरीवर तुम्ही आरूढ झाला. या नतर तुमचा हेतू काय, याचाही विचार केला पाहिजे. असें करण्यात तुमचा कांहीं स्वार्थ आहे काय? सपत्तिमान् होण्याची, कीर्तीची अथवा सत्तेची अपेक्षा तुमच्या चित्तांत आहे काय? याचाही विचार तुम्हीं केला पाहिजे. सर्व जग तुम्हावर उलटलें आणि तुमच्या नाशास प्रवृत्त झालें, तरीही आपला मार्ग सोडावयाचा नाही अशी चिकाटी तुमच्यापाशीं आहे काय? स्वत चा जीव गमाविण्याची पाळी आली तरी आपणास जें काय हवे आहे, ते सिद्ध करावयाचे आणि कोणाच्याही मदतीची अपेक्षा न करता केवळ एकाकीच हा कार्यभार उचलावयाचा, असा तुमचा पक्का निश्चय झाला आहे काय? हृदयाचें शेवटचें उडणें चालू असेपर्यंत आणि रक्ताच्या शेवटच्या बिंदूचें अभिसरण सुरू असेपर्यंत हेंच कार्य करावयाचें, असा निश्चय तुम्हीं केला

आहे काय ? या सर्व गोष्टींची सिद्धता ज्या वेळीं तुमच्यापाशीं होईल, त्याच वेळीं तुम्ही खरे सुधारक होऊ शकाल. त्याच वेळीं मानवजातीच्या सद्गुरूच्या ठिकाणीं तुमची योजना होईल त्याच वेळी मानवजातीचें कल्याण तुम्ही साधूं शकाल, पण मनुष्यप्राणी किती अधीऱ्या स्वभावाचा आणि किती कोत्या दृष्टीचा आहे पहा. त्याला धीर कसा तो ठाऊकच नाहीं दूरवर दृष्टि पोचविण्याचें सामर्थ्य त्याला नाहीं. मनुष्यजातीनें आपल्यापुढे नमून असावें, अशी त्याची इच्छा आहे. कार्याला आज सुरवात झाली कीं फलप्राप्ति त्याला उद्या पाहिजे. "पी हळद आणि हो गोरी" अशातला त्याचा प्रकार आहे. याचे कारण इतकेच की सपत्तीची, कीर्तीची अथवा दुसऱ्या कसल्या तरी विषयाची तीव्र लालसा, हीच त्याच्या कार्याची प्रवर्तक असते. परक्याच्या बऱ्याविषयी खरी आस्था त्याच्या अत करणात यत्किंचितही नसते एखादे कार्य केवळ कर्तव्य या दृष्टीनें करावे, अशी बुद्धि त्याच्या ठिकाणी उत्पन्न झालेली नसते. " कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन " या सिद्धांताची त्याला यत्किंचितही ओळख नसते. केवळ कर्तव्य करणें व फलाची यत्किंचितही अपेक्षा न बाळगणे हेच आपलें काम आहे, अशी भावना आपल्या चित्तात आपण बाळगिली पाहिजे पण ही भावना उत्पन्न होण्यास लागणारा धीर मनुष्यापाशीं नसतो. यामुळे कसल्याही प्रकारच्या कल्पनेमागे लागून कसल्याही प्रकारच्या कार्यास तो प्रवृत्त होतो. सुधारक या नावाखालीं मोडणारे जितके प्राणी आज जगात वावरत आहेत, त्यापैकीं बहुतेक याच वर्गात मोडणारे आहेत.

पूर्वकाली ऋषीनीं जें काहीं ज्ञान साठवून ठेविलें होते, त्याजवर पाश्चात्य जडवादाची लाट येऊन आदळली, आणि तिच्या तडाक्यात ते ज्ञान धुऊन जाण्याच्या मार्गास लागलें अशा वेळीं सुधारणेच्या कल्पनेचा उदय हिंदुस्थानांत झाला, पण अशा प्रकारच्या हजारो लाटाचे तडाखे निमूटपणे गिळण्याची सवय आम्हा लोकास कित्येक शतकापासून झाली होती याहूनही प्रचंड लाटा पूर्वी आम्हीं गिळून टाकिल्या होत्या. पूर्वीच्या लाटाच्या तुलनेनें साप्रतची लाट अगदीं अल्प आहे. पूर्वकाली लाटामागे लाटा आमच्या समाजावर येऊन आदळत होत्या. एका हातात तलवार आणि दुसऱ्या हातात कुराण असा प्रकारही आम्हीं पूर्वी पाहिला होता. " अल्ला हो अकबर "

अशा प्रचड आरोळ्यानीं आमचें आकाश दुमदुमून गेलें होते. पण कांहीं काळानें या लाटा ओसरल्या आणि आम्ही जसेच्या तसेच आहोत असें दिसून आलें.

हिंदुस्थानचें राष्ट्र नामशेष करणें शक्य नाहीं. मृत्यु त्याला मारू शकत नाहीं आणि जोंपर्यंत त्याचा अतरात्मा कायम आहे, तोपर्यंत ते कायम राहीलच. जोंपर्यंत त्याचें धार्मिक जीवन नष्ट झालें नाहीं तोपर्यंत ते राष्ट्र नष्ट होणार नाहीं. हिदुस्थानातील लोक कगाल असतील, अठरा विसवे दारिद्र्य त्यांच्या घरीदारीं लोळत असेल, पण जोपर्यंत परमेश्वराचा विसर त्यांस पडला नाही आणि आपण ज्ञानवान् ऋषीचे वशज आहो, याची ओळख ते विसरणार नाहीत तोपर्यंत तें जिवत रहावयाचेंच एखाद्या लुटारू पण श्रीमत सरदाराचे आपण वशज आहो, असें म्हणविण्यात ज्याप्रमाणें एखाद्या पाश्चात्यास भूषण वाटते. त्याचप्रमाणें फलमूलावर उपजीविका करणाऱ्या एखाद्या कंगाल ऋषीचे आपणास वशज म्हणविणें, एखाद्या हिदू राजासही भूषणास्पद वाटते झाडाच्या साली नेसणारा, अरण्यात वास करणारा, आणि परमेश्वराचें चिंतन करणारा अशा प्रकारचा आपला पूर्वज होता, असे सागण्यात एखाद्या महाराजासही भूषण वाटतें ही बुद्धि हिदु लोकात कायम आहे आणि पावित्र्याबद्दलचा खरा आदर त्याच्या चित्तात वास करीत आहे, तोपर्यंत हिदुस्थान नामशेष होणे शक्य नाही

"एक खरा महात्मा" या मथळ्याखाली "नाइन्टीन्थ सेंच्युरी" नांवाच्या मासिकात प्रोफेसर मॅक्समुल्लर यानीं लिहिलेला लेख तुमच्यापैकीं पुष्कळांच्या अवलोकनात आला असेलच श्रीरामकृष्ण याचे एकदर चरित्र फार उज्ज्वल आहे; कारण, ते तोडानें जे कांहीं बोलत त्याचप्रमाणें ते ततोतत वागणूकही करीत. "बोले तैसा चाले," या उक्तीत त्याच्या जीवनक्रमाचें सारें रहस्य साठविले आहे. हिंदुस्थानाहून अत्यंत भिन्न अशा परिस्थितींत वाढलेल्या तुम्हा पाश्चात्याच्या दृष्टीनें त्याच्या चरित्रात तुम्हास थोडा विक्षिप्तपणा आढळून येईल. तुमच्या चालीरीती आणि तुमच्या जीवनक्रमांतील अखड धडपड याचा मेळ हिदुस्थानातल्या चालीरीतींशीं कधींही पडावयाचा नाही. यामुळें त्याच्या चरित्रातील कित्येक गोष्टी तुम्हांस विलक्षण वाटण्यासारख्या आहेत. तथापि यामुळेंच त्याचें चरित्र तुम्हास मनो-

रम वाटेल, कारण, ज्या अनेक गोष्टींविषयीं तुमच्या चित्तात भ्रम आहे, त्याजवर एक नवाच प्रकाश पडला असल्याचें तुम्हास आढळून येईल.

एका बाजूस अनेक प्रकारच्या सुधारणाचा जन्म होत असता, याच वेळीं दुसऱ्या बाजूस बंगाल्याच्या एका कोपऱ्यातल्या खेड्यात एका गरीब ब्राह्मणाच्या पोटी इसवी सन १८३३ च्या फेब्रुवारी महिन्याच्या विसाव्या तारखेस एका मुलाचा जन्म झाला या मुलाचीं आईबापे अगदी जुन्या पद्धतीची माणसे होती खऱ्या जुन्या पद्धतीने वागणाऱ्या ब्राह्मणाचा जीवनक्रम म्हटला म्हणजे केवळ त्यागी होण्याचा असतो. लौकिक व्यवहारापैकी पुष्कळशा गोष्टी त्याच्या दृष्टीने त्याज्य असतात केवळ ऐहिक असा कोणताही धंदा करणे जुन्या पद्धतीच्या ब्राह्मणाच्या दृष्टीने युक्त नसते आणि असे असनाही भिक्षावृत्तीचा अवलंब करणें हेही त्याला योग्य नसते. अशा स्थितीत सारा संसार किती अडचणीचा होत असेल, याचा तुम्हीच विचार करा ब्राह्मण आणि भिक्षुकवर्ग याबद्दल अनेक प्रकारच्या गप्पा तुमच्या कानावर आल्या असतील, पण असल्या प्रकारचा हा कंगाल वर्ग साऱ्या समाजाच्या शिरोभागीं कसा आरूढ झाला, असा प्रश्न तुमच्या चित्तात कधीही उद्भवला नसेल. साऱ्या देशात हा वर्ग म्हणजे अत्यंत दरिद्री अशा स्थितींत तो सर्व समाजाचा शास्ता व्हावा, ही गोष्ट आश्चर्योत्पादक नाही काय? हे सामर्थ्य त्यास कोठून प्राप्त झालें? त्याग हेच त्याच्या सामर्थ्याचें रहस्य आहे. संपत्तीची पर्वा त्याने कधीही केली नाही. भिक्षुकवर्ग साऱ्या जगात आहे, पण त्याच्या इतका दरिद्री भिक्षुकवर्ग अन्यत्र कोठेंही आढळणार नाहीं. पण यामुळेंच हिंदुस्थानातील भिक्षुकवर्ग सर्वांत अत्यंत शक्तिमान झाला आहे घरात असें दारिद्र्य असताही दारावरून जाणाऱ्या एखाद्या भिकाऱ्याला गोळाभर अन्न घातल्यावाचून ब्राह्मण स्त्री त्याला पुढे जाऊ देणार नाहीं बुभुक्षितास अन्नदान करणें हें गृहमातेचें पहिलें कर्तव्य आहे, असा आम्हां हिंदुलोकाचा समज आहे सर्वांचे भोजन झाल्यावाचून गृहमाता भोजन करणार नाही. तिची पाळी सर्वांच्या शेवटीं असावयाची. याचकरिता परमेश्वर आणि माता याची योग्यता हिंदुस्थानात सारखीच समजली जाते. आमच्या पूजनीय दैवतापैकीं मातृदैवत फार श्रेष्ठ समजलें जाते. आपल्या चरित्रनायकाची माता ही या मातृवर्गापैकींच एक प्रमुख स्त्री होती. हिंदु-

स्थानात जो जो अधिक उच्च जात तों तो तिला निर्बंधही अधिक असतात हलक्या वर्गाच्या लोकानी कसल्याही प्रकारचे पदार्थ खुशाल भक्षण करावे. पण जातीची पायरी जसजशी उच्च होत जाईल, तो तो खाद्यपेयाचे तिचे निर्बंधही अधिक कडक होत जातात. ब्राह्मणाची जात ही सर्व वर्णांत उच्चतम असल्यामुळे तिचे निर्बंधही सर्वांत अत्यत कडक आहेत. तुम्हा पाश्चात्याच्या चालीरीतीशी तुलना करता, त्यांचा जीवनक्रम एकसारखा त्यागाचा असतो असे म्हटलें पाहिजे. हिंदुलोक हे साऱ्या जगाहून विभक्तपणे राहणारे लोक आहेत. इग्रजाप्रमाणेंच त्याच्या ठिकाणी अत्यत स्थैर्य आहे, पण ते इग्रजांहून अधिक विस्तृत आहे. ते अधिक दूरवर पोचणारे आहे. ते एखाद्या कल्पनेच्या मागे लागले तर अखेरची फलप्राप्ति होईपर्यंत मध्ये कोठेही न थाबता त्यांचा उद्योग एकसारखा सुरू असतो अपेक्षित फलाची प्राप्ति होईपर्यंत पिढीमागे पिढी त्या कल्पनेच्या मागे लागलेली असते एखादी नवी कल्पना त्याना द्या, म्हणजे ते तिला इतकी बळकट मिठी मारतील कीं ती त्याच्यापासून परत हिरावून घेणें अशक्य होईल, पण नवी कल्पना त्याच्या चित्तात रुजविणे हेच फार दुरापास्त आहे

जुन्या पद्धतीचे हिंदू लोक जगापासून अलिप्तपणें राहतात, हे पूर्वी सागितलेच आहे. स्वत च्या विचाराच्या आणि भावनाच्या क्षितिजापलीकडे ते पाऊलही टाकावयाचे नाहीत. त्याचा सारा आयुष्यक्रम जुन्या ग्रथात आखून दिलेला आहे. त्यात अत्यंत बारीकसारीक बाबीचाही विचार पूर्णपणे केलेला आहे. अत्यंत क्षुल्लक गोष्टीतही या ग्रथातील आधाराप्रमाणे चालावयाचे असा या जुन्या वर्गाचा बाणा आहे. आपल्या स्वत च्या जातीच्या मनुष्याने न शिजविलेले असे अन्न खाण्यापेक्षा ते एकवार मृत्युही पत्करतील त्याचे वर्तन कितीही सदोष असलें, तथापि त्यात अत्यत चिकाटी आणि अत्यत मन पूर्वकता ही आढळून येतात, त्याच्या या वर्तनात ढोगाचा अशही नसतो ग्रथांवर अत्यत विश्वास आणि धर्माचरणाचा कडकपणा ही या जुन्या पद्धतीच्या ब्राह्मणातच नेहमीं आढळून येतात; कारण आपला मार्ग बरोबर आहे अशी पूर्ण खात्री त्याच्या चित्तांत उत्पन्न झालेली असते, आणि या खात्रीमुळेच हा वर्ग जुन्याचा पूर्ण अभिमानी बनलेला असतो. त्याच्या मार्गात अनेक गोष्टी चुकीच्या आहेत अशी आपली खात्री झाली असली, तरी त्याच्या दृष्टीने तो

मार्ग सर्वथा बरोबरच असतो. कसलीही विपत्ति प्राप्त झाली तरी मनुष्यानें दातृत्व सोडू नये, असे आमच्या ग्रंथात सागितलें आहे बुभुक्षिताला अन्नदान करण्याकरिता स्वत च्या तोडचा घासही द्यावा व बुभुक्षिताचे प्राण रक्षण करावे, अशी आमच्या धर्मग्रथाची आज्ञा आहे धर्मग्रथाच्या आज्ञा ब्राह्मणवर्गानें पाळल्या पाहिजेत, अशी सामान्य अपेक्षा असते. महाभारत ज्यानी वाचलें असेल, त्याना याविषयीची त्यातील एक गोष्ट स्मरत असेलच एका भिकाऱ्याचा प्राण वाचविण्याकरिता स्वत चें सर्व अन्न त्याला देऊन, एका साऱ्या कुटुबानें प्राणत्याग केला, अशी एक कथा महाभारतात आहे ही केवळ फुगवून सागितलेली गोष्ट आहे असे तुम्ही समजू नका, कारण अशा गोष्टी साप्रतही घडतात माझ्या सद्गुरूचीं मातापितरें ही जवळ जवळ अशाच प्रकारची माणसे होती. विपन्नावस्थेनें त्याना ग्रासिलें होते, तथापि आपलें ताट एखाद्या भिकाऱ्याला देऊन माझ्या सद्गुरूची माता स्वत. कित्येक वेळा सारा दिवस उपाशीं रहात असे अशा प्रकारच्या मातापितराच्या पोटी हे मूल जन्मास आलें. बालत्वापासूनच या मुलातील विशिष्टपणा आढळून येऊ लागला होता. जन्मादारभ्यच आपल्या पूर्वचरित्राचे त्याला स्मरण होते आपण ह्या जगात जन्म का घेतला, हे तो विसरला नव्हता. ज्या कारणाकरिता आपण जन्म घेतला, त्या कार्याच्या पूर्तीकडे त्यानें आपली सर्व शक्ति लहानपणापासून वळविली.

हा मुलगा लहान असताच त्याचा बाप वारला, आणि याच सुमारास तो शाळेत जाऊ लागला. ब्राह्मणाच्या मुलानें विद्याध्ययन करणें अत्यावश्यक मानलें जाते वर्णनियमाप्रमाणे अध्ययन हे ब्राह्मणाच्या प्रमुख कर्तव्यापैकी एक आहे जुन्या चालीची शिक्षणपद्धति अद्यापिहि हिदुस्थानात पुष्कळ ठिकाणी चालू आहे. ही पद्धति अर्वाचीन पद्धतीहून भिन्न आहे या पद्धतीप्रमाणें आपल्या गुरूला कांहीं वेतन देणें शिष्यास भाग पडत नाही ज्ञान ही पवित्र वस्तु असल्यामुळे तिचा क्रयविक्रय करणे योग्य नाहीं, अशा समजुतीवर ही पद्धत रचिली गेली आहे. कोणत्याही प्रकारचा मोबदला न घेतां ज्ञानदान सढळ हातानें केलें पाहिजे. कोणत्याही प्रकारचा मोबदला न घेतां शिक्षक आपल्या घरीं शिष्यांस बाळगीत असत, इतकेच नव्हे, तर कित्येक वेळा त्यांस अन्नवस्त्रही पुरवीत असत. या गुरुवर्गाचा योगक्षेम चालावा

म्हणून लग्नासारख्या उत्सवप्रसंगी श्रीमत लोक त्यास पारितोषके देत असत. कित्येक देणग्यावर त्याचा प्रथम हक्क आहे, अशी समजूत होती, आणि या देणग्याच्या मोबदल्यात ते शिष्यास विद्यादान करीत असत. लग्नासारखा एखादा प्रसग विशेषत श्रीमंत कुटुबात प्राप्त झाला असतां या गुरूस बोलविण्यात येते, आणि तेही अशा प्रसगास हजर राहून अनेक प्रकारच्या विषयावर सभाषणें करीत असतात. अशा प्रकारच्या गुरूंकडे या मुलास पाठविण्यात आलें होते हे गुरू आपल्या नेहमींच्या पद्धतीस अनुसरून न्याय, ज्योतिष इत्यादि गहन विषयांवर वादविवाद करीत असत या वादविवादाचें रहस्य समजण्याइतके या मुलाचें वय नव्हते. लहानपणापासूनच या मुलात काहीं विशिष्ट गुण होते, हे मीं अगोदरच सागितलें आहे, आणि अशा प्रकारचे वादविवाद ऐकून त्यानें त्यांतील इतकेच सार काढलें की, या पडिताच्या साऱ्या ज्ञानाचे पर्यवसान केवळ वादविवादात होतें केवळ पैशाकरिता हे लोक इतक्या अटीतटीचीं भाडणे करतात. वादविवादात यापैकी जो कोणी अत्यत नैपुण्य दाखवील, त्याला भारी किंमतीची शालजोडी मिळणार असल्यामुळे, एवढया अट्टाहासानें ते लोक वादविवाद करीत असतात यापुढे याच्या शाळेत जाणार नाही, असा निश्चय या मुलाने केला आणि तो निश्चय त्याने पाळलाहि. या मुलाच्या शिक्षणाची इतिश्री अशा प्रकारे झाली तथापि त्याचा वडील बधु हा स्वत. फार विद्वान् होता आणि शिक्षणाकरिता त्याने त्याला कलकत्त्याला नेलें. ऐहिक शिक्षणाचा हेतु केवळ ऐहिक विषयाची प्राप्ति करून घेण्याचा आहे, अशी या मुलाची काहीं काळानें खात्री झाली व असल्या प्रकारचे शिक्षण न घेता केवळ धर्मज्ञान सपादन करावयाचे, असा त्यानें निश्चय केला वडील वारले असल्यानें व कुटुबाची सांसारिक स्थिति ओढाताणीची असल्याने या मुलाला प्रथम स्वत च्या उदरभरणाचा उद्योग करावा लागला. कलकत्त्याजवळील एका देवळाचे पुजारीपण त्याने पत्करिलें. देवळांतील पुजारी होणें हे कमीपणा आणणारें आहे, असा समज आहे. आमचीं देवळे आणि ख्रिस्ती लोकांची चर्चें यात बराच फरक आहे. सर्व लोकांनीं जमून प्रार्थना करावी, याकरिता ख्रिस्ती देवळें उभारण्यांत येतात. सर्व लोकानीं जमून प्रार्थना करण्याची चालच हिदुस्थानात नसल्यामुळें, या हेतूनें कोणी देवळेंही बांधीत नाहींत. देऊळ

बाधणें हे एक मोठें धार्मिक व पुण्याचें कृत्य आहे, असें समजून श्रीमत लोक देवळें बाधीत असतात.

एखाद्या मनुष्याजवळ पुष्कळ पैसा असला तर तो एखादें देऊळ बाधतो. त्या ठिकाणीं तो परमेश्वराच्या एखाद्या प्रतिमेची स्थापना करितो व त्या प्रतिमेच्या पूजेअर्चेची व्यवस्था करितो. आमचा हा प्रतिमापूजनाचा प्रकार रोमन कॅथोलिक पथातील पूजनप्रकारासारखाच आहे धूप, दीप, नैवेद्य व आरति इत्यादि प्रकार या पूजनांत आहेत. एखाद्या महापुरुषाची सभावना आपण ज्या रीतीने करतो, त्याच रीतीनें या प्रतिमेचीही सभावना होत असते, देवळांतील पूजा एवढयानेंच सपते. एखादा मनुष्य देवळांत नित्य जाणारा असला तर तेवढयानेच तो मोठा पुण्यात्मा आहे, असे कोणी समजत नाहीं. देवळांत न जाणाराहून त्याची योग्यता काही विशेष आहे, असें कोणासही वाटत नाहीं. धर्मबधनाचे स्वरूप आमच्या दृष्टीने खासगी रीतीचें आहे. हिंदुस्थानातील प्रत्येक घरात देवघर म्हणून एक स्वतत्र जागा असते या जागीं कुटुबातील पुरुष जातो आणि तेथे देवपूजा करितो. या जागी तो बहुधा मानसिक पद्धतीनें पूजा करितो व तो काय करीत आहे अथवा तोंडानें काय म्हणत आहे, याचा बोध कोणा दुसऱ्यास होत नाही. तो तेथे बसला असतां दुसऱ्या कोणीं त्यास पाहिलें, तर त्याचे नुसते ओठ हालत आहेत अथवा त्याच्या हाताचीं बोटे हालत आहेत अथवा नाक धरून तो प्राणायाम करीत आहे, इतकेच त्यास आढळून येईल यापलीकडे तो काय करीत आहे याचा मागमूस त्याच्या प्रत्यक्ष भावाला अगर बायकोलाही लागावयाचा नाहीं. अशा रीतीने पूजेचे अथवा प्रार्थनेचें काम अगदी खासगी पद्धतीने चालत असते. कित्येक लोक संध्यावदनादि प्रार्थनाकार्यासाठी नद्या, तळी अथवा समुद्र याच्या काठीं जातात. तसेच कित्येक लोक देवळात जाऊन मूर्तीस वंदन करितात. देवळाचा पुजारी होणे ही गोष्ट ब्राह्मणत्वास कमीपणा आणणारी आहे, असा समज मनूच्या काळापासून आहे हे कर्म ब्राह्मणाला दूषणीय आहे, असें कित्येक ग्रथांत स्पष्टपणे सागितलें आहे. या समजाला आणखीही एक कारण आहे. देवळातील पुजाऱ्याला त्याच्या कामाबद्दल वेतन मिळत असतें आणि वेतन घेऊन पूजा करणें हे वेतन घेऊन शिक्षण देण्यापेक्षांही अधिक दोषास्पद मानलें जातें. पूज्य वस्तूचा अशा

रीतीनें क्रयविक्रय करणें अत्यंत अनुचित मानलें जाते. यामुळें केवळ पोटासाठी असल्या प्रकारचा धंदा आपणास पत्करावा लागला, याबद्दल त्या मुलास किती खेद झाला असेल, याची तुम्हीच कल्पना करा.

बगाल्यांत अनेक कवी आजपर्यंत होऊन गेले असून, त्यांनीं रचिलेली पद्यें अत्यत लोकप्रिय झालीं आहेत रस्त्यातून जाणाऱ्या येणाऱ्या सामान्य लोकाच्या तोडूनही ही पद्यें ऐकू येतात हीं पद्ये बहुधा धार्मिक विषयांवर असतात, आणि यात परमेश्वरभक्ति अथवा परमेश्वरविषयक अनुभव हा एकच विषय बहुधा असतो जितके धर्मग्रथ आजवर हिदुस्थानांत प्रसिद्ध झाले आहेत, त्या सर्वात हा स्वानुभवाचा उल्लेख सापडतो मनुष्याने परमेश्वराची भेट घेतली पाहिजे, त्याला प्रत्यक्ष जाणलें पाहिजे, पाहिलें पाहिजे आणि त्याच्याशी सभाषण केलें पाहिजे, याचेंच नाव खरा धर्म. ज्यांनीं परमेश्वराची प्रत्यक्ष भेट घेतली आहे, अशा सताच्या कथानी हिदुस्थानांतील वातावरण भरून गेलें आहे यातून प्रसार पावणाऱ्या मतानीच हिदुस्थानातील धर्माचे स्वरूप सिद्ध केलें जात असते जुने धर्मग्रथ ज्यानी लिहिले ते सर्व स्वानुभवी पुरुष होते ज्याचा अनुभव स्वत च्या अत.करणात त्यानी घेतला, अशाच गोष्टी त्यानी आपल्या ग्रथांत लिहून ठेविल्या आहेत हे ग्रथ केवळ बुद्धिवादी लोकांकरितां लिहिले गेले नसून, केवळ बुद्धीच्या अभिमानी लोकानी ते वाचिले तर ते त्यास समजावयाचेही नाहीत. स्वानुभवी लोकानी लिहिलेल्या ग्रथातील रहस्य दुसऱ्या स्वानुभवी पुरुषांसच समजावयाचे. ज्या उच्च वातावरणांत असतां हे ग्रथ त्या पुरुषानीं लिहिले, त्या उच्च वातावरणात प्रवेश झाल्यावाचून त्यांतील रहस्य समजावयाचे नाहीं, हे उघड आहे याच आयुष्यात परमेश्वराची भेट होणे शक्य आहे, आणि ही गोष्ट प्रत्येकास साध्य होण्याजोगी आहे, असे या स्वानुभवी पुरुषाचे म्हणणें आहे स्वानुभवाच्या मार्गास लागणें हाच खऱ्या धर्ममार्गाचा आरभ होय. जगातील सर्व धर्मातही हीच कल्पना प्रामुख्याने आढळून येते. एखादा मोठा वक्तृत्ववान् पुरुष न्यायशास्त्राच्या कसोटीला पूर्णपणें उतरणारे आणि ज्यात उच्च तत्त्वे गोंविलीं आहेत, असें भाषण करीत असतां त्यास वेळीं एकही श्रोता मिळत नाहीं आणि उलट पक्षीं ज्याला व्याकरणशुद्ध भाषाही बोलता येत नाही, अशा एखाद्या सामान्य मनुष्याभोंवतीं अर्धेंमुर्धे राष्ट्र

जमा होते आणि त्याला परमेश्वर समजून त्याची पूजा करिते. यातील रहस्यही हेंच की, एकाची बडबड कोरडी असून दुसरा पुरुष स्वानुभवी असतो. एखाद्या मनुष्यास अनुभव प्राप्त झाला आहे, तो निवळ बुद्धीच्या पलीकडे गेला आहे, अंधारातील आपला प्रवास संपवून तो पूर्ण प्रकाशात आला आहे, आणि परमेश्वराचें स्वरूप व आत्मानुभव याची प्राप्ति त्यास झाली आहे, अशी कुणकुण लागताच देशाच्या सर्व भागांतून हजारो लोक त्याजकडे धांव घेऊ लागतात आणि काही काळानें परमेश्वरस्वरूप म्हणून त्याची पूजा करू लागतात !

ज्या देवळात आपला चरित्रनायक पुजारी म्हणून राहिला, त्यात जगन्मातेची मूर्ति बसविली होती त्या ठिकाणीं हा मुलगा सकाळ संध्याकाळ पूजा करीत असे. हळू हळू एका विशिष्ट कल्पनेचा उदय त्याच्या चित्तात होऊ लागला. "या पाषाण प्रतिमेच्या अंतरंगीं दुसरी काही वस्तु असू शकेल काय ? जगाचे कल्याण करणारी माता या विश्वात खरोखरीच असू शकेल काय ? या विश्वात राहून ती या विश्वाचे नियमन करिते, ही गोष्ट खरी असू शकेल, की हे सारें स्वप्नच ? धर्मात काहीं शक्यता असेल काय ?" अशा प्रकारचे संशय हिंदु मुलाच्या मनांत नेहमीं येत असतात आमच्या देशाच्या वातावरणाचा हा एक विशिष्ट गुणच आहे. आपण जे काय करतो ते बरोबर आहे की नाहीं, असा संशय त्यांना नेहमी येतो, आणि केवळ शाब्दिक उपपत्तींनी त्यांचें समाधान होत नाहीं. परमेश्वरविषयक अनेक उपपत्तीच्या जत्री आमच्या देशात पूर्वीच सिद्ध करून ठेविल्या आहेत, तथापि केवळ ग्रंथांनी अथवा त्यांतील उपपत्तीनीं आमचें समाधान होत नाही. या ग्रंथात सांगितलेल्या उपपत्तींचा प्रत्यक्ष अनुभव कसा येईल, हीच कल्पना आम्हापैकीं हजारो लोकांच्या चित्तात नित्य घोळत असते परमेश्वराचें अस्तित्व खरोखरच आहे काय ? आणि जर असेल तर त्याचा अनुभव आपणास कसा होईल आणि सत्याची व आपली भेट कशी होईल, हीच चिंता हजारो लोकांस सदैव पोळीत असते हे सारें मृगजलवत् आहे असे तुम्हा पाश्चात्य लोकास कदाचित् वाटेल, पण आमच्या दृष्टीनें हा मृगजलाभास नसून, त्यात पूर्ण सत्य आम्हास दिसत असते. तुमच्या दृष्टीनें या गोष्टी तुम्हांस असाध्य कोटींतल्या वाटतात आणि आम्हास त्या साध्य दिसतात. स्वानुभवाकरिता प्राण-

त्यागास सिद्ध होणारीं माणसेही हिंदुस्थानात आहेत. सर्व लौकिक सुखावर पाणी सोडून दऱ्याखोऱ्याचा आश्रय करणारीं अथवा पवित्र सरितांच्या कांठीं स्वानुभवासाठी अश्रु ढाळणारीं माणसें हिंदुस्थानात आहेत. त्याचा हेतु परमेश्वराचे ज्ञान केवळ बुद्धीनें करून घेण्याचा नसतो. विवेचक बुद्धीनें वादविवाद करावा हा त्याचा हेतु नसतो. बुद्धीच्या मार्गे लागून अधारात चाचपडत पडावे हें त्यांस प्रिय नसते ज्या इद्रियानीं आपणास जगाचा अनुभव होतो, त्या इद्रियाच्या आटोक्यापलीकडे असणाऱ्या मार्गानें जाऊन परमेश्वराची प्रत्यक्ष भेट घ्यावी, हा त्याचा हेतु असतो. यासबधी कोणताही विशिष्ट सिद्धात सागण्याचे सध्या प्रयोजन नाहीं; पण ही गोष्ट अशा प्रकारच्या लोकाच्या चित्तावर पक्की बिंबलेली असते, हे मात्र खरे अशा प्रकारच्या यत्नात हजारो लोक मृत्युमुखी गेले तर दुसरे हजार त्याची जागा पटकाविण्यास सिद्ध होतात या एकाच कल्पनेच्या मार्गे लागून हजारो वर्षे सबध राष्ट्रानें सन्यस्तवृत्तीचा व त्यागाचा धडा गिरविला आहे या एकाच कल्पनेच्या नादानें हजारो हिदुलोक प्रतिवर्षी आपलीं घरेदारे सोडीत आहेत व अनेक प्रकारच्या आपत्ति भोगाव्या लागल्यानें प्राणत्याग करीत आहेत. तुम्हा पाश्चात्याच्या दृष्टीने हे सारे मृगजलाचें शोधन आहे आणि असे तुम्हाला का वाटते, याचेही कारण मला समजते, पण पाश्चात्य देशात वास केल्यानंतरही ही गोष्ट साध्य कोटींतील आहे, अशी माझी अद्यापही समजूत आहे.

इतर कोणत्याही गोष्टींच्या विचारात जो क्षण जातो तो फुकट जातो असे मला वाटते भौतिक शास्त्रातील चमत्कारही माझ्या दृष्टीनें तुच्छ होत. परमेश्वरविषयक विचारावाचून अन्य कोणत्याही गोष्टीचा विचार करण्यात माझें जितके आयुष्य जाते, तितकें आयुष्य मी फुकट घालविलें असे मला वाटतें. मानवी जीवित क्षणभगुर आहे तुम्ही अत्यत ज्ञानी झाला अथवा एखाद्या पशूप्रमाणे अज्ञानी राहिला, तरी तुम्हावर मृत्यु केव्हा झडप घालील याचा नियम नाहीं अगावर चिंध्या पाघरण्याइतके दारिद्र्य तुम्हापाशी असलें अथवा चक्रवर्ती राजाचे ऐश्वर्य तुम्हास प्राप्त झालें असलें, तरी कालाच्या जबड्यांत तुम्ही केव्हां जाल हें सागतां येत नाहीं. एखाद्या भिकार झोंपडीचें छत तुमच्या मस्तकावर असलें अथवा लक्षावधि लोकांवर प्रभुत्व गाजविणाऱ्या राजाचा मुकुट

तुमच्या मस्तकीं असला, तरी मृत्यु तुमचें केव्हा हरण करील, याचा नियम नाहीं तुम्ही भीमाप्रमाणें सशक्त असलां अथवा हजारो व्याधींनीं तुमचे शरीर पोखरून टाकिले असले, तरी मृत्यूला या दोहींची किंमत सारखीच. तुम्ही स्वभावानें कितीही आनदी असला अथवा कितीही दु खी असला, तरी मृत्यु तुम्हाला एकाच दृष्टीनें पाहतो या आपल्या मानवी जीवितात जी अनत अगम्य कोडी आहेत, त्या सर्वाचें उत्तर आपणास एकाच वेळी मिळेल. ज्या वेळी आपण परमेश्वराची प्रत्यक्ष भेट घेऊ, त्याच वेळी आपल्याला जीविताचे कोडे उलगडेल या कोड्याचा उलगडा न झाला तर आपलें आयुष्य काष्ठ-लोष्टासारख केवळ जड आहे असेच म्हटले पाहिजे, मानवी जीविताविषयीं आम्हा हिंदुलोकाच्या कल्पना या प्रकारच्या आहेत. केवळ बुद्धिवादानें त्याचे सत्यत्व प्रत्यक्ष सिद्ध करता येणार नाहीं फारच झाले तर त्या शक्य कोटी-तील आहेत, इतकीच गोष्ट बुद्धिवादानें सिद्ध होईल बुद्धिवादाची मजल यापलीकडे जाऊ शकणार नाहीं केवळ भौतिक शास्त्रातही कित्येक सिद्धात असे आहेत की, त्याची सिद्धता अद्यापि केवळ शक्य कोटीपलीकडे गेली नाही. प्रत्यक्ष गोष्टीचे स्वरूप त्यास अद्यापि प्राप्त झालें नाही. प्रत्यक्ष स्वरूप हे इद्रियगम्य स्वरूप आहे कोणत्याही गोष्टीचे प्रत्यक्षत्व अनुभवाने सिद्ध व्हावे लागते, आणि अशाच रीतीने धर्माच्या सत्यत्वाचाही प्रत्यक्ष अनुभव घ्यावा लागतो. परमेश्वर आहे ही गोष्ट सिद्ध करण्यासही परमेश्वराची प्रत्यक्ष भेट घेतली पाहिजे धर्मात सांगितलेल्या गोष्टी खऱ्या आहेत हे पटण्या-करिता त्या गोष्टीचा प्रत्यक्ष अनुभव घेतला पाहिजे कितीही वादविवाद केला तरी नुसत्या शब्दावडबराने या गोष्टींची खात्री पटणार नाही. या गोष्टी खऱ्या आहेत अशी प्रतीति केवळ अनुभवानेंच येईल व त्याजवरचा माझा विश्वासही अढळ होईल.

अशा प्रकारच्या कल्पनेचा उदय आपल्या चरित्रनायकाच्या ठिकाणीं झाला आणि त्या कल्पनेंतच त्याचे सारें चित्त गुतून राहिले त्यानें दिवसभर एक-सारखें रडत बसावे आणि म्हणावे “ माते, तू आहेस ही गोष्ट खरी आहे काय ? कीं ही सारी कवींची कल्पनाच आहे ? जगन्मातेचें अस्तित्व ही भ्रमिष्ट लोकांच्या डोक्यांतून अथवा कवीच्या डोक्यांतून निघालेली कल्पना तर नसेल ना ? ” लौकिक समजुतीप्रमाणे आपला चरित्रनायक सुशिक्षित नव्हता.

कसल्याच प्रकारचें शिक्षण त्याला मिळालें नव्हते. यामुळें निसर्गापासून तो फारसा लाब गेलेला नव्हता अतरंगापासून बुद्धीनें त्याला फार लांब ओढिलेलें नव्हते. बुद्धीच्या जागृतीनें उत्पन्न होणारे संशय आणि भ्रम त्याच्या चित्तात उद्भवले नव्हते यामुळे त्याचें मन अधिक शुद्ध आणि अधिक सुदृढ होते. परक्याच्या विचाराचें मिश्रण त्याच्या चित्तात झालें नव्हते यामुळें त्याचे विचार अधिक शुद्ध आणि एकमार्गी होते त्याचा विश्वविद्यालयात प्रवेश झाला नसल्यानें परकीयाचे विचार त्याच्या चित्तात घुसले नव्हते. यामुळें त्याच्या स्वत च्या विचारास वावरण्यास अधिक अवसर सापडला होता. विश्वविद्यालयातील शिक्षण घेतलें असल्याने आपल्या विचारात परकीयाच्या विचाराची सरमिसळ झाली आहे याच करिता आपला चरित्रनायक हा अधिक शुद्ध विचाराचा होता, असें प्रोफेसर मॅक्समुल्लर यांनीं त्याच्या चरित्रलेखात म्हटलें आहे. स्वत च्या डोक्यात उद्भवलेले विचारच आपला चरित्रनायक बोलून दाखवीत असे, आणि याचें कारण हेच की, त्याचा प्रवेश विश्वविद्यालयाच्या हद्दीत झाला नव्हता परमेश्वरविषयक विचार त्याच्या चित्तात एकसारखे घोळू लागले व शेवटी दुसऱ्या कोणत्याही विषयाचे चिंतन तो करिनासा झाला नित्यपूजाही त्याच्या हातून नीट रीतीने पार पडेनाशी झाली. पूजेत ज्या पद्धती सागितल्या आहेत, त्यात त्याच्या हातून चुका होऊ लागल्या केव्हा केव्हा नैवेद्य दाखविण्याचें भान त्यास राहू नये, केव्हा केव्हा आरति करण्याचे त्यानें विसरावे अथवा केव्हा केव्हां तासाचे तास आरतीच करीत सुटावें, असे होऊ लागलें.

त्याच्या चित्तात आता एकाच कल्पनेस अवसर राहिला होता "माते, तू आहेस की नाहीं ? तू बोलत कां नाहीस ? तू मृत झाली आहेस काय ?" हेच प्रश्न तो सदोदित विचारू लागला आपणापैकीं पुष्कळांच्या आयुष्यक्रमांतही एक वेळ असा येत असतो कीं, त्या वेळीं आपणास हा सारा बुद्धिवाद कटाळवाणा आणि शुष्क वाटतो. ज्या ग्रथातून आम्हास खरोखरच ज्ञानाची प्राप्ति फारशी होत नाहीं, अशा ग्रथाच्या वाचनाचा आपणास कटाळा येतो. अशा वेळी आपली स्थिति फार चमत्कारिक झालेली असते ग्रथ कटाळवाणे वाटले तरी त्यांचे वाचन सुटत नाहीं. अफूची संवय असणाऱ्या मनुष्याप्रमाणें ठरलेल्या वेळीं त्याचें सेवन केल्यावाचून आपणास चैन पडत नाहीं.

अशा वेळीं आपल्याही चित्तांत कित्येक वेळा असे उद्गार निघतात की, " या अधारांतून मार्ग दाखविणारा कोणी तरी मला या विश्वात भेटणार नाहीं काय ? जर कोणी असा असेल, तर तो मला मार्ग का दाखवीत नाही ? तो माझ्याशीं का बोलत नाही ? ग्रथाच्या रूपाने दूत पाठविण्यापेक्षा तो स्वत च मजकडे का येत नाही ? हजारों मतानी आणि मतातरानी भरलेल्या या जगात मी खरें तरी काय मानावे ? जर परमेश्वराचे अस्तित्व खरोखरच असेल, तर मजसारख्या आपल्या दीन लेंकराची अपेक्षा तो का करतो ? आपले चित्त अत्यत उदास झालें असता तेथे अशा प्रकारचे विचार उद्भवतात, पण आपल्या भोंवतीं असलेल्या वस्तूचें जाळे इतकें मोहक आहे कीं, क्षणार्धानेच या विचाराचा आपणांस विसर पडतो. स्वर्गाचीं कपाटे खुलीं होत आहेत, असा क्षणमात्र भास होत असतो आणि प्रकाशमय प्रदेशात आपण एकदम उडी घेणार असें वाटते न वाटते तोच आपल्यातील जड विषय जागृत होतात आणि या शुद्ध बुद्धीचे उच्चाटन करतात ही बुद्धि नष्ट झाल्याबरोबर आपण पुन्हा पदच्युत होतो आणि जन्ममरणाच्या फेऱ्यात पुन पुन्हा सापडतों या सामान्य कोटीस अपवादक अशीही काही माणसे जन्मास येतात त्याचें मन इतक्या सोप्या रीतीनें मोहवश होत नाही एक वार ईश्वराभिमुख झालेलें त्याचें मन तेथून परत फिरत नाही. त्याच्या भोंवती कितीही मोहक वस्तूचा गराडा पडला असला, तरी सत्याकडे जाणाऱ्या मार्गापासून ते परावृत्त होत नाहीत आपले जीवित आणि मोहक वस्तु ही दोन्ही क्षणभगुर आहेत, अशी त्याची खात्री झालेली असते. या जीविताचा उपयोग मोठ्या अर्थाचा लाभ करून घेण्यात करावा असे त्यास वाटत असते जीवित आणि मृत्यु, बरे आणि वाईट इत्यादि अनेक द्वद्वापलीकडे जाऊन मानवी जीविताचें कोडे उलगडण्याहून अधिक मोठा पुरुषार्थ तो कोणता ?

शेवटीं या देवळात नोकरी करणे आपल्या चरित्रनायकास अशक्य झालें. जवळच असलेल्या एका लहानशा वनात तो निघून गेला आणि तेथे राहूं लागला. या वेळच्या स्वत च्या जीवनक्रमाबद्दल अनेक वेळा माझे सद्गुरु मला सागत असत. सूर्य केव्हां उगवला आणि केव्हां मावळला, याचेही भान त्यांस रहात नसे. आपला जीव कसा राहिला हे त्यास आठवत नव्हतें. स्वतः-

बद्दलचा त्याचा सर्व विचार मावळला होता आणि कांहीं खाण्याचेंही भान त्यास राहिले नव्हते. या वेळी त्यांच्या एका आप्तानें मोठ्या प्रेमानें त्याचे संगोपन केलें तो त्यास भरवीत असे आणि ते केवळ एखाद्या यंत्राप्रमाणें घास गिळीत असत.

अशा रीतीने दिवसामागें दिवस आणि रात्रीमागें रात्री जाऊ लागल्या सबध दिवस सपून सध्याकाळ झाली आणि सध्याकाळची आरतीची देवळा-तली घटा वाजू लागून तिचा आवाज त्याच्या कानी पडू लागला, म्हणजे ते फार खिन्न होत असत आणि म्हणत, " माते, आणखीही एक दिवस फुकट गेला, आणि तू तर अद्यापिही येत नाहींस ! या क्षणभगुर आयुष्यातील आणखी एक दिवस कमी झाला आणि मला अद्यापिही सत्य कळले नाही " असे म्हणता म्हणता ते मोठ्यानें रडू लागत आणि या यातना असह्य होऊ लागल्या म्हणजे आपलें डोके भुईवर आपटून घेत आणि पुन्हा मोठ्याने रडू लागत. सदोदित ते एकच प्रकारची बडबड करीत असत. " जगन्माते, तू माझ्या हृदयात प्रगट हो. तुझ्यावाचून मला आता दुसऱ्या कशाची गरज उरली नाही. मला फक्त तूच हवी आहेस." स्वत च्या साध्याची पूर्तता करणें एवढाच त्याचा हेतु या वेळी होता सर्वस्वाचा त्याग केल्यावाचून आणि अहकाराच्या सर्व कल्पना नष्ट झाल्यावाचून मातेचे दर्शन होऊ शकत नाही, असें त्यानीं एकिलें होते प्रत्येकाकडे जाण्याची मातेची इच्छा आहे, पण मनुष्यच तिला येऊ देत नाहीं, असेंही त्याच्या श्रवणपथावर आलें होते. नानाप्रकारच्या मूर्खपणाच्या कल्पनामागें मनुष्य धावत असतात. केवळ चैन करावी असा त्याचा उद्देश असतो. तीं मातेच्या दर्शनासाठी उत्सुक नस-तात. ज्या क्षणी सर्व कल्पनाचा त्याग करून तीं फक्त तिचेंच ध्यान करतील, त्याच क्षणी ती त्यास प्राप्त होईल, असेंही त्यानीं ऐकिले होते. याकरिता या एकाच कल्पनेचा पिच्छा ते पुरवूं लागले. सर्वसगपरित्याग करण्याचा त्यानीं निश्चय केला स्वतःजवळ असलेले कुडुकमिडुक त्यानीं फेंकून दिलें. नाण्याला यापुढें स्पर्शही करावयाचा नाहीं, अशी त्यानीं शपथ वाहिली. लक्ष्मीच्या त्यागाची त्याची ही बुद्धि इतकी दृढ झाली होती कीं, ती त्याच्या सूक्ष्म देहाचा एक भागच बनून गेली होती. ते निद्रित असतां त्यांच्या हाताला एखाद्या नाण्याचा स्पर्श केला, तर तो हात ताबडतोब वांकडा होत

असे; आणि सर्व शरीर पक्षघात झाल्याप्रमाणें निर्जीव भासत असे. तुम्हाला हें सांगणें चमत्कारिक वाटेल, परंतु ही गोष्ट माझ्या अनुभवाची आहे या-शिवाय दुसऱ्याही एका कल्पनेचा उदय त्यांच्या चित्तात झाला होता. काम हा मनुष्याचा भयकर शत्रु आहे, असे त्यास वाटूं लागलें मनुष्याचे खरे रूप म्हणजे त्याचा आत्मा, आणि आत्म्याच्या ठिकाणीं लिंगभेद नाहीं, असे ते आपल्या चित्तास शिकवू लागले कनक आणि कामिनी या दोनच प्रबळ कल्पनाच्या मार्गे लागल्यामुळें मनुष्यप्राण्याला, मातेचे दर्शन होत नाही असें त्यास वाटू लागलें. सर्व विश्व हें जगन्मातेचेंच व्यक्त रूप असल्यामुळें प्रत्येक स्त्रीचा देहसुद्धा तिचेच व्यक्त रूप होय. प्रत्येक स्त्रीच्या ठिकाणी ज्या अर्थी जगन्मातेचे प्रतिनिधित्व आहे, त्याअर्थी मातेवाचून दुसऱ्या कोणत्या दृष्टीनें मी तिजकडे पाहणार ? असा विचार सदोदित ते आपल्या चित्तात करीत असत. प्रत्येक स्त्रीकडे ते केवळ मातेच्या दृष्टीनें पाहात प्रत्येक स्त्री जगन्माता दिसावी अशी स्थिति मनाला सहाजिकपणें यावी याकरिता त्यानी प्रयत्न केला, आणि अखेरपर्यंत कोणत्याही स्त्रीकडे मातेवाचून अन्य दृष्टीनें पाहिलें नाही.

आत्मानुभवाची इच्छा एकवार मानवी अत करणात प्रगट झाली म्हणजे एकसारखी ती वाढतच जाते. एके वेळी मला सद्गुरु म्हणाले, " बाळा, एखाद्या खोलींत सोन्याचा एक मोठा ठेवा आहे आणि शेजारच्या खोलीत एक चोर बसला आहे अशी कल्पना कर अशा वेळीं त्या चोराला झोप तरी येईल काय ? शेजारच्या खोलींत प्रवेश कसा करावा आणि त्या सोन्यावर हात कसा मारावा, हे एकच चिंतन त्याला इतके जाळू लागेल की त्याची झोंप साफ उडून जाईल त्याचप्रमाणे या सर्व दृश्य विश्वाच्यामागें सत्य आहे. त्याच्या मागें परमेश्वराचा वास आहे, जो कधीही मरत नाहीं, जो सदा पूर्णा-नंद स्वरूप आहे, आणि ज्याच्या आनदाच्या तुलनेने 'इंद्रियविषयक आनंद शुद्ध पोरखेळसे भासतात असा परमात्मा उभा आहे, अशी ज्याची बालबाल खात्री झाली आहे असा मनुष्य परमात्मप्राप्ति झाल्यावाचून स्वस्थ राहील असें तुला वाटते काय ? त्याच्या प्राप्तीसाठीं तो एकसारखी धडपड करीत राहणार नाहीं काय ? ही धडपड एक क्षणतरी थाबून राहील काय ? नाहीं; परमात्मप्राप्ति होईपर्यंत तो धडपड करीत राहीलच. या एकाच इच्छेनें तो

अगदीं वेडावून जाईल. " परमात्मप्राप्तीच्या वेडानें आपल्या चरित्रनायकाला या वेळी पूर्णपणे पछाडलें होते. या वेळी त्याला कोणी मार्गदर्शक भेटला नव्हता. कोणा उपदेशकाच्या सगतीची प्राप्ति त्याला झाली नव्हती. तो वेडा झाला आहे असे सर्वास वाटत होते जगाचा हा व्यवहार निरतर असाच आहे. लौकिक व्यवहाराचा ज्यानें त्याग केला आहे त्याला जग वेडा समजतें; पण अशाच प्रकारच्या पुरुषांच्या अस्तित्वावर हे जग अवलबून आहे. ज्या शक्तीनें हे जग चालतें, त्या शक्तीचा उगम अशा प्रकारच्या वेडातूनच झाला आहे. भविष्यत् कालीही ज्या शक्तीने या विश्वाचे व्यवहार चालावयाचे आहेत, ती शक्तीही अशाच वेडातून निर्माण होणार आहे

अशा रीतीने दिवसामागे दिवस आणि महिन्यांमागे महिने जात चालले, आणि सत्याचा शोध सुरू राहिला. याच शोधार्थ चालणाऱ्या धडपडीमध्यें एक क्षणाचाही खळ पडला नाही. शेवटीं आपल्या चरित्रनायकाचें हृदय-कपाट हळूहळू उघडू लागलें त्याला दृष्टात होऊ लागले. मानवी जीविताच्या कोड्याचें उद्घाटन होऊ लागलें. जणू काय पडद्यामागे पडदा गळून पडू लागला. जगन्मातेने त्याचे गुरुत्व स्वीकारिलें, आणि या विश्वाच्या कोड्याचा उलगडा ती आपल्या शिष्यासमोर करू लागली. या वेळीं त्या अरण्यात एक स्त्री आली होती ती फार देखणी होती, व तिचे ज्ञान अतुल होते ती प्रत्यक्ष सरस्वती देवीच होती असे कित्येक वेळा सद्गुरु म्हणत असत. मनुष्यरूपानें प्रत्यक्ष विद्यादेवीच अवतरली होती असे ते सागत. हिंदुराष्ट्राचा एक विशेष येथेही आढळून येतो. हिंदु स्त्रिया अत्यत अशिक्षित असताही आणि पाश्चात्यांच्या दृष्टीनें त्याच्या मागें कडक निर्बंध लागलेले असताही अशा प्रकारच्या स्त्रीवर्गांतूनच एक अत्यत ज्ञानी स्त्री निर्माण झाली. ही स्त्री सन्यासिनी होती. तिने सर्वसगपरित्याग केला होता. ती स्त्री त्या अरण्यांत गेली व आपल्या चरित्रनायकास तिने पाहिले. हीच त्याची पहिली गुरु होती. त्याला काय हवे आहे हे तिनें जाणिले आणि ती त्याला म्हणाली, " बाळा, अशा प्रकारचे वेड ज्याला लागते तो पुरुष धन्य होय हें सारे विश्व मात्र खरोखर वेडें आहे. कित्येक सपत्तीच्या मागे लागून वेडे होतात, कित्येक चैनीसाठी वेडे झालेले आहेत; कित्येकाना कीर्तीचे वेड आहे आणि दुसरे कित्येक अशाच प्रकारच्या अनेक वस्तूच्या नादानें वेडावलेले आहेत कोणाला सोनें हवे, कोणाला पुत्रकलत्र हवे,

श्रीमत होण्यासाठीं कोणी धडपड करितात आणि दुसऱ्यांवर प्रभुत्व गाजविण्यासाठींही कोणी खटपट करितात; पण परमेश्वराच्या प्राप्तीसाठीं वेडावलेला मात्र कोणीही आढळून येत नाहीं हे सारे वेडे एकमेकांस मदत करण्यास उत्सुक असतात. आपल्या स्नेह्याच्या वेडाबद्दल त्यांच्या चित्तांत सहानुकंपा असते; पैशासाठीं कोणी वेडा झाला तर त्याच्या चित्तांत दया उत्पन्न होते. तो कांहीं वावगें करीत आहे असे त्यांस वाटत नाहीं. वेड्याला दुसरा वेडा ज्याप्रमाणें अत्यंत ज्ञानी वाटतो, त्याचप्रमाणें लौकिक वस्तूंनीं वेडावलेल्या या लोकाचा एकमेकांबद्दल समज असतो. असल्या लोकांना परमेश्वराच्या वेडाची कल्पना कशी व्हावी? त्यांनीं त्याला मूर्ख समजावें, आणि त्याचें मन थाऱ्यावर नाहीं असें म्हणावें हें योग्यच आहे. ते त्याच्या वाऱ्यासही उभे राहत नाहींत, यांत कांहीं नवल नाहीं. याच करितां ते तुलाही वेडाच समजतात; पण असें वेड लागणें हें मोठे भाग्य आहे. भगवंताचें वेड ज्याला लागलें, त्याहून अधिक भाग्यवान् असा दुसरा कोण आहे? अशीं मनुष्ये फारशीं पाहण्यात येत नाहींत.''

ही स्त्री त्या अरण्यांत कांहीं वर्षें राहिली होती. त्या काळात आपल्या चरित्रनायकाला तिनें धर्माचें ज्ञान करून दिलें, आणि योगाचे प्रकारही सागितले. जणूकाय, धर्माच्या प्रचड नदींत पोहावयासच तिनें त्याला शिकविलें.

यानतर आणखीही एक सन्याशी त्या अरण्यात आला. भिक्षावृत्तीनें राहणारे असे अनेक सन्यासी हिंदुस्थानात इकडून तिकडे हिंडत असतात. अशापैकींच हाही एक संन्यासी होता. तो मोठा तत्त्वदर्शी होता. या जगाला खरोखर अस्तित्व आहे, ही गोष्ट तो खोटी मानीत असे, आणि आपल्या या तत्त्वाचा प्रत्यक्ष आचार म्हणून सदोदित उघड्या जागीं तो राहत असे. घराचा अथवा मठाचा आश्रय त्यानें कधींही केला नाहीं. हवेत मोठे वादळ झालें अथवा सूर्याचा ताप अत्यत प्रखर पडला, तरी अशा वेळींही तो उघड्या जागेंतच असे. या संन्याशानें आपाल्या चरित्रनायकाला श्रुतींतील तत्त्वज्ञानाचें अध्यापन केलें. या शिष्याला शिकवीत असता तो कित्येक बाबतींत आपणाहूनही श्रेष्ठ आहे, असा अनुभव या सन्याशाला लवकरच आला. तो कित्येक महिने तेथे राहिला होता आणि तेथून निघून जाताना त्यानें आपल्या चरित्रनायकाला संन्यासदीक्षा दिली.

आपला चरित्रनायक पुजारी होता व त्याची विचित्र पूजापद्धति पाहून लोक त्याला वेडा म्हणू लागले; त्या वेळीं त्याच्या आप्तेष्टांनीं एका लहान

मुलीबरोबर त्याचा विवाह केला. अशा रीतीनें त्याला संसारपाशांत बद्ध केलें तर त्याचें वेड जाईल अशी त्यांची समजूत होती; पण त्यांचा हा समज अगदीं चुकीचा होता असें लवकरच अनुभवास आलें. आपल्या चरित्रनायकाचें वेड दिवसेदिवस अधिकच वाढत चाललें. आमच्या देशांत मुलांमुलींचीं लहानपणींच लग्नें होतात. त्यांचे विवाह त्यांचे खुषीनें होत नसून मातापितरेंच ते घडवून आणीत असतात. वास्तविक पाहतां अशा प्रकारच्या विवाहांना वाङ्निश्चयाहून अधिक महत्त्व देतां येत नाहीं. आपला चरित्रनायक स्वतःच्या विवाहाची गोष्ट पूर्णपणें विसरला होता. आपलें लग्न झालें असून आपणांस एक स्त्री आहे, या गोष्टीचें भान त्यास राहिलें नव्हतें. आपल्या चरित्रनायकाची पत्नी हा वेळपर्यंत माहेरींच राहिली होती. आपला जांवई भक्त झाला असून कित्येक लोक त्याला वेडा समजतात, असें त्या मुलीच्या आईबापांनीं ऐकिलें होतें. आपल्या यजमानांची स्थिति खरोखर काय आहे, हें स्वत.च्या दृष्टीनें पाहण्याचा या स्त्रीनें निश्चय केला, आणि त्या अरण्यापर्यंत ती पायींच चालत गेली. आपल्या चरित्रनायकानें तिजकडे पाहिलें आणि तिचा पत्नीत्वाचा हक्क कबूल केला. वास्तविक पाहातां संन्यासी हा व्यवहारापलीकडला असल्यामुळें त्याजवर कोणाचाही कसल्याही प्रकारचा हक्क चालू शकत नाहीं. सद्गुरु आपल्या पत्नीच्या पायीं पडले आणि म्हणाले, " प्रत्येक स्त्रींत माझ्या मातेचें अस्तित्व आहे, असें खुद्द जगन्मातेनेंच मला सांगितलें आहे, याकरितां तुजकडेही मी मातेच्याच दृष्टीनें पाहीन. लौकिक व्यवहारांत शिरून मी पुन्हा ससारबधनांत पडावे अशी तुझी इच्छाच असली तर तसें करण्यासही माझी तयारी आहे."

ती स्त्री फार पवित्र आणि उदार अत.करणाची होती. आपल्या पतीला कशाचें वेड लागलें आहे हें तिनें जाणलें. संसारपाशात जखडण्याची आपली यत्किंचितही इच्छा नाहीं, असें तिनें त्यांना ताबडतोब उत्तर दिलें. त्यांच्या पायापाशीं राहून त्याची सेवा करावी, इतकीच इच्छा तिनें प्रदर्शित केली. तिनें त्याचें शिष्यत्व पत्करिलें आणि ते परमेश्वराचे अवतार आहेत, अशा एकांतिक भावनेनें तिनें मनापासून त्यांची सेवा केली. अशा रीतीनें तिच्या अनुमोदनानेंच त्यांच्या मार्गातील सर्व कांटे दूर झाले आणि स्वेच्छेप्रमाणें वागण्यास त्यांस मोकळिक मिळाली.

यानंतर दुसऱ्याही अनेक धर्मांतील रहस्यें जाणण्याची इच्छा सद्गुरूस झाली. हा वेळपर्यंत स्वतःच्या धर्मावांचून दुसऱ्या कोणत्याही धर्माची माहिती त्यांस झाली नव्हती. दुसऱ्या धर्माचें स्वरूप कसें आहे, हे जाणण्यासाठीं परधर्मांच्या गुरूंचा शोध त्यांनीं केला. गुरु या शब्दाचा आम्हा पौर्वात्यांचा अर्थ तुम्हां पाश्चात्यांच्या अर्थाहून अगदीं भिन्न आहे. ज्याच्याजवळ नुसती पुस्तकी विद्या आहे, त्याला आम्ही गुरु समजत नाहीं. परमात्मतत्त्वाचा ज्याला स्वानुभव झाला आहे, त्यालाच आम्ही गुरु म्हणतों. मुसलमानी धर्माच्या माहितीसाठीं सद्गुरु एका मुसलमानी महंताकडे गेले, आणि काहीं काल त्याजपाशीं राहिले. या काळांत महंताच्या आज्ञेनुरूप ते वागत होते. अशा रीतीनें वागत असतां ज्या पदावर आपण आपल्या मार्गानें आरूढ झालो, त्याच पदीं आरूढ होण्याचा हाही एक मार्ग आहे अशी त्यांची खात्री झाली व त्यांस फार नवलही वाटलें. येशू ख्रिस्तानें सांगितलेला मार्गही शेवटीं त्याच स्थितीस पोहोचवितो, असाही अनुभव त्यास आला. सर्व प्रकारच्या पंथांतील महात्म्यांच्या भेटी त्यांनीं घेतल्या. हा सारा उद्योग त्यांनीं अत्यंत अंतःकरणपूर्वक केला शिक्षण आणि अनुभव यांची प्राप्ति करून घ्यावी यावांचून दुसरा कोणताही हेतु त्यांच्या चित्तात नव्हता. ते एखाद्या गुरूपाशीं जात, तेव्हां त्याच्या सांगण्याप्रमाणें ततोतंत वर्तणूक करीत असत. अशा रीतीने सर्व धर्मांचें साध्य एकच आहे, असा अनुभव त्यास आला. सर्वांचें साध्य एकच असून फरक आहे तो फक्त मार्गांत अथवा भाषेंत आहे अशी त्यांची खात्री झाली. अंतर्यामीं सर्व धर्म आणि सर्व पंथ एकाच साध्यासाठीं खटपट करीत आहेत, आणि या निरनिराळ्या पंथवाल्यांत आणि धर्माभिमान्यांत जे तंटे होतात, त्याचें कारण स्वार्थबुद्धिच आहे, असें त्यास आढळून आलें. सत्याचा शोध करावा या बुद्धीपेक्षां "माझी कीर्ति" आणि "तुझी कीर्ति" ही बुद्धि या अनेक धर्माभिमान्यात अधिक प्रबल आहे, असें त्यास दिसून आलें दोन पंथवाले एकच सत्य सांगत असतां, त्यापैकीं एक दुसऱ्यास म्हणतो, "तुझें म्हणणें खोटे आहे; कारण त्याजवर माझ्या हातचा सत्यत्वाचा शिक्का पडलेला नाहीं. याकरितां तुझें म्हणणें कोणींही ऐकू नये. यावर दुसरा म्हणतो," "तुझें म्हणणे अगदीं खोटे आहे. जी गोष्ट मी सांगतों तीच तू सांगत असलास तरी ज्या अर्थीं माझ्या नांवानें ती तू सांगत नाहींस, त्या अर्थीं तुझा मार्ग चुकीचा."

अशा रीतीनें निरनिराळ्या धर्माभिमान्यांत भांडणें का होतात, याचें कारण सद्गुरूनीं शोधून काढलें, आणि स्वत लीनतेचा अभ्यास ते करू लागले. लीनतेचें महत्व प्रत्येक धर्मात वर्णिलें असल्याचे त्यांस आढळून आलें. "या जगांत मी नसून तू आहेस" असें प्रत्येक धर्मात सांगितलें असल्याचें त्यांस आढळून आलें. जो 'मी' ला रजा देतो, त्याच्या अत करणांत परमेश्वर प्रकट होतो. मानवी हृदयातून अहकार जों जों मावळत जाईल, तो तो ईश्वर तेथें प्रकट होत जाईल. जगातील प्रत्येक धर्मांत या तत्त्वाचा उल्लेख त्यास प्रमुखत्वानें आढळून आला आणि त्याचा अभ्यास त्यानी सुरू केला. कोणत्याही प्रकारचा अभ्यास सुरू केला म्हणजे नुसत्या शाब्दिक अवडबराला स्वत.स बाधून न घेतां तत्त्वाप्रमाणें प्रत्यक्ष आचारासच सुरवात करावयाची, अशी त्याची रीत असे, हें मी पूर्वी एकवार सागितलेंच आहे. परोपकाराबद्दल लाब लाब बाता झोडणारे आणि सर्व मनुष्याच्या समान हक्काबद्दल गप्पा झोडणारे अनेक लोक आपल्या पाहण्यात येतात; पण त्याची वाचा आणि कृती यांचा मेळ पाहिला तर बहुधा ३६ चाच आकडा दिसून यावयाचा. ज्याची कृती आणि उक्ति यांत पूर्ण मेळ आहे, असा पुरुष महद्भाग्यानें आढळून आला. स्वत.ला जें योग्य वाटते त्याचा आचार कोणाचीही भीडभाड न ठेवतां ततोतत करावयाचा अशी माझ्या सद्गुरूची रीत असे. ही कला त्यांना पूर्णपणें अवगत झाली होती.

त्याच्या राहण्याच्या ठिकाणापासून जवळच एका अत्यजाचें घर होतें. हिंदुस्थानात या जातीची बरीच मोठी संख्या आहे. हे लोक अस्पृश्य आहेत अशी आमची समजूत आहे. एखाद्या ब्राह्मणानें सुप्रभातीं या जातीच्या एखाद्या मनुष्याचें तोंड पाहिलें, तर त्यानें सारा दिवस उपवास करावा, असें काहीं प्रथात सागितलें आहे. एखादा अत्यज शहरात शिरला तर त्यानें स्वतःच्या मस्तकावर आपल्या जातीची खूण म्हणून कावळ्याचें पीस लावलें पाहिजे, अशीही कित्येक शहरांत चाल आहे. त्याचप्रमाणें कित्येक शहरात "अत्यज येत आहे, विटाळ होईल, दूर सरा हो !" असें ओरडत त्याला चालावें लागतें ! तो असें ओरडल्याबरोबर लोकही जादूनें भारल्यासारखे पळत सुटतात ! कारण त्याचा स्पर्श झाला तर कपडे बदलून त्यांस सचैल स्नान करावें लागते. हजारो वर्षांच्या संवयीनें खुद्द अत्यजानाही या

गोष्टींत कांहीं वावगें वाटत नाहीं. आपल्या नुसत्या स्पर्शानें लोकांना विटाळ होतो, या गोष्टीवर त्याचा पूर्ण भरंवसा आहे. अशा प्रकारच्या एका अत्यजाच्या घरीं जाऊन माझ्या सद्गुरूंनीं त्याच्या आंगणांतील झाडलोट सुरू केली. शहरांतील रस्ते झाडण्याचें काम या लोकांकडे आहे. त्यांना कोणाच्या घरीं जावयाचें असलें, तर पुढच्या दारानें न जातां मागच्या दारानें त्यांस जावें लागतें, आणि ते निघून गेल्याबरोबर घराचा धनी त्या जागीं थोडेंसें गंगोदक शिंपडतो, आणि अशा रीतीनें ती जागा पवित्र करून घेतो. ब्राह्मण हा जन्मादारभ्यच पवित्र असून, अत्यज अपवित्र असतो असा समज आहे. अशा रीतीनें जन्मादारभ्य पवित्रपणा ज्याच्या आंगीं होता, अशा माझ्या सद्गुरूनीं एका अत्यजाचें घर झाडण्याबद्दल त्याची परवानगी विचारिली. त्या अत्यजानें अर्थातच अशा प्रकारची परवानगी दिली नाही ब्राह्मणाला आपल्या घरीं अशा प्रकारचें हलके काम करू दिल्यास आपणांस मोठें पाप लागेल व आपलें कुळ नष्ट होईल, असा अत्यजांचा समज आहे अत्यजानें परवानगी नाकारताच सद्गुरु त्याच्या घरीं मध्यरात्रीं चोरून जाऊन त्याचें घर झाडू लागले. "माते, मी त्या अत्यजाचा चाकर आहें, अशी भावना माझ्या चित्तांत उत्पन्न कर. त्या अत्यजापेक्षांही मी अधिक हलक्या दर्जाचा आहे, असें मला वाटूं दे." अशी प्रार्थना ते करीत असत. "माझ्या भक्तांची जे पूजा करितात, ते माझे परम भक्त होत. सर्व जगांतील मनुष्ये हीं माझीं लेंकरें आहेत आणि त्याच्या उपयोगीं पडणें हा माझा हक्क आहे." असें हिंदु धर्मग्रथांत सांगितलें आहे.

अशा प्रकारें ज्या अनेक तत्त्वांचा अभ्यास श्रीरामकृष्णांनीं केला, त्याचें वर्णन करावयाचें म्हटलें तर पुष्कळ वेळ लागेल, आणि माझा उद्देश, त्यांचें चरित्र तुम्हांस थोडक्यांत सागावे इतकाच आहे. त्याचा हा अभ्यासक्रम एकदर चाळीस वर्षें सुरू होता. पूर्णत्व पावण्यास लिगभेदाच्या कल्पनेचे समूळ उच्चाटन झालें पाहिजे, अशी त्याची खात्री झाली होती. 'आत्म्याच्या ठिकाणीं लिंगभेद नसल्यामुळें जगांतही ही स्त्री आणि हा पुरुष' असा भेद पहाणें चुकीचें आहे, भेद आहे तो फक्त शरिराचा आहे. बाह्यदेहाचा विचार सोडून ज्याला आत्मानुभव घ्यावयाचा असेल, त्यानें या भेददृष्टीचा त्याग अवश्य केलाच पाहिजे. भेदबुद्धि घालविल्यावांचून अभेदबुद्धीनें मिळ-

णारा आत्मानुभव कसा प्राप्त होईल? श्रीरामकृष्णांना पुरुषाचा देह मिळाला होता, आणि आपण पुरुष आहो हें विसरण्याकरिता स्वतःवर त्यानीं स्त्रीत्वाचा आरोप केला. ते स्त्रियासारखा पोशाख करू लागले. ते स्त्रियांसारखे नाजुक बोलू लागले. पुरुषानीं करावयाचे सर्व धदे त्यानीं सोडून दिले, आणि एका चागल्या कुटुबातील स्त्रियाच्या मेळ्यांत ते जाऊन राहिले. अशा प्रकारच्या कित्येक वर्षाच्या अभ्यासानतर लिंगभेदाची कल्पना त्यांच्या चित्तांतून पूर्णपणें मावळली. ही कल्पना मावळल्यानतर साऱ्या जगाचें स्वरूपही त्याना निराळेंच दिसू लागलें.

स्त्रीपूजनाचा प्रकार पाश्चात्य देशांतही आढळून येतो, पण तेथे स्त्री सुदर आणि तरुण असेल तरच तिची पूजा व्हावयाची. श्रीरामकृष्णांनीं स्त्रियांचें पूजन केलें, तें त्या जगन्माता आहेत या दृष्टीनें केलें. स्त्रियाच्या ठिकाणीं याहून दुसऱ्या कोणत्याही प्रकारची भावना त्याच्या चित्तांत नव्हती. ज्यांना कोणी स्पर्शही करणार नाहीं अशा प्रकारच्या स्त्रियापुढें त्यांनीं उभें रहावें आणि त्यांच्या पायां पडून सद्गदित अतःकरणानें म्हणावें, “ माते, एका आकारानें तू रस्त्यात फिरतेस आणि दुसऱ्या आकारानें हे विश्व भरून टाकतेस. ” हा प्रकार माझ्या स्वत च्या अवलोकनांत अनेक वेळां आलेला आहे. अशा प्रकारें रस्त्यांतून जाणाऱ्या अनेक सामान्य स्त्रियांच्या ते पाया पडत असत. ज्यांच्या हृदयांतून अशा रीतीनें काम नष्ट झाला आहे तेथें शुद्ध आनदाचा वास किती असेल, याची नुस्ती कल्पनाच केली पाहिजे. प्रत्येक स्त्री ही विश्वजननीचें स्वरूप आहे आणि मनुष्यजातीचें संरक्षण ती करते, इतकीच भावना ज्या हृदयांत स्त्रियांबद्दल उत्पन्न होते, तेथे शुद्ध आनंदाला काय तोटा ? आपलें चित्त स्त्रियांबद्दल इतकें निर्मळ झालें पाहिजे. तेथें दभाचा यत्किंचित् अशही उपयोगी नाहीं. दभानें जगन्माता फसेल असें तुम्हांस केव्हांही वाटू देऊ नका. पूर्वी ती कधीं फसली नाहीं, आणि पुढेंही ती कधीं फसणार नाहीं. तुमच्या चित्तांत दभाचा यत्किंचित् अश जरी शिल्लक असला, तरी तो ती हुडकून काढील. तुमचें अंत.करण खरोखरच पवित्र आहे कीं नाहीं, हें तिला समजतें. आत्मानुभव आपणांस हवा असेल तर आपणांस आपलें अतःकरण इतकें पवित्र केलें पाहिजे.

भगवान् श्रीरामकृष्णांचें अतःकरण इतकें पवित्र झालें होतें. कोणत्याही प्रकारच्या वासनेची यत्किंचित् छायाही त्यांजवर नव्हती. आपल्या जीवनक-

मांत नित्य प्राप्त होणाऱ्या दुद्रापलीकडे ते गेले नव्हते. स्वतःच्या आयुष्याचा पाऊण हिस्सा खर्च करून जीं दिव्य ज्ञानरत्नें त्यानीं सपादन केलीं होतीं, त्यांचा उपयोग इतरांस होण्याची वेळ आता प्राप्त झाली आणि त्यांनीं उपदेशाचें कार्य सुरू केलें. उपदेशाची आणि अध्यापनाची त्यांची रीत कांहीं विशेष प्रकारची होती. आमच्या देशात संतमहत हे ईश्वराप्रमाणेंच पूज्य मानले जातात आणि त्यांस तितकाच मान दिला जातो. जो मान आम्ही आमच्या आईबापासही देत नाहीं, तो आम्ही आमच्या गुरूना देत असतों. मातापितरें फक्त देह देतात, आणि सद्गुरु हा मोक्षाचा दाता असतो. मोक्षमार्गांत पडण्याबरोबर आम्ही सद्गुरूना पितृत्व अर्पण करतों. एखादा सद्गुरु प्रकट झाल्याबरोबर हजारों हिंदु लोक त्याच्याकडे धांव घेतात, आणि त्याच्या चरणाभोवती गराडा घालून बसतात. श्रीरामकृष्ण हे अशाच प्रकारचे सद्गुरु होते; पण ते मानापानाचे मात्र भुकेले नव्हते. आपण सद्गुरु आहों ही भावना त्यांच्या चित्तास शिवलीसुद्धां नव्हती. जें कांहीं कार्य घडत आहे, तें आपण करीत नसून जगन्माता तें करीत आहे, अशी त्याची भावना होती. ते नित्य म्हणत असत कीं, माझ्या तोंडून जें कांहीं चांगलें निघतें तें जगन्माताच बोलत असते. मी तें बोलत नसल्यामुळे माझा त्याच्याशीं काहीं संबधही नाहीं. स्वतःच्या कार्याबद्दल त्याची कल्पना या प्रकारची होती; आणि अशा प्रकारची कल्पना चित्तात वागवून देहपातापर्यंत त्यानीं आपलें कार्य केलें. ते आपण होऊन कोणाच्याही मागें जात नसत. व्याख्यानें देत फिरण्याचा उद्योग त्यानीं केला नाहीं. प्रथम आपली दानत दृढ करावी आणि आत्मानुभव मिळवावा म्हणजे सर्व गोष्टी सुरळीत घडून येतील, हें त्याच्या आचरणाचें मुख्य बीज होतें. "कमल फुलल्याबरोबर मधुपानासाठीं भुंगे धांवून येतात. याकरिता आपल्या दानतीचें कमळ प्रफुल्लित करा, म्हणजे सर्व कांही आपोआप घडून येईल." असें ते नित्य म्हणत असत. आपणांस आपल्या आयुष्यांत हा मोठा धडा प्रथम शिकावयाचा आहे. माझ्या सद्गुरूंनीं हा धडा मला शेंकडों वेळ शिकविला, पण अद्यापिही पुष्कळ वेळा तो मी विसरत असतों. नुसत्या विचारात सामर्थ्य किती आहे याचा अदाज बहुतेकांस करितां येत नाहीं. यातील रहस्य जाणणारा अगदीं विरळा. एखाद्या मनुष्यानें स्वतःस गुहेंत कोंडून घेतलें, आणि एखाद्या मोठ्या तत्त्वाचा विचार

करतां करतां त्याचा देहपात झाला, तर त्याचा तो विचार त्या गुहेच्या भिंती फोडून बाहेर पडेल, आसमतात् दुमदुमून राहील आणि कालेंकरून अखेरीस सर्व मनुष्यजातीस भारून टाकील. नुसत्या विचारांतही या प्रकारचें सामर्थ्य आहे. याकरितां आपले विचार लोकांच्या कानांवर घालण्याची फार घाई करू नका. आपले विचार जगापुढें मांडण्याच्या लायकीचे आहेत कीं नाहींत, हें आपण प्रथम पाहिलें पाहिजे. ज्याच्या विचारांत खरोखरच इतकी योग्यता असेल, तोच गुरु होऊ शकेल. तोडानें नुसती बडबड करणें हें गुरुत्वाचें खरें चिन्ह नाहीं. दुसऱ्याचें गुरुत्व स्वीकारणें म्हणजे त्याला काहीं मते शिकविणें एवढ्यानेच भागत नाहीं. त्याला अनुभव प्राप्त करून देणें हेंच गुरुत्वाचें मुख्य लक्षण होय. अशा रीतीनें स्वानुभवाचा आस्वाद दुसऱ्याला देणें हें गुरूचें काम आहे. मी तुम्हास ज्याप्रमाणें फुलासारखी एखादी वस्तु देऊ शकतों, त्याचप्रमाणे खरा सद्गुरु आपल्या शिष्यास स्वानुभव देऊ शकतो, ही गोष्ट अक्षरशः खरी आहे, हे पक्कें लक्षात बाळगा. आमच्या देशांत फार जुन्या काळापासून सद्गुरूची हीच कसोटी ठरली गेली आहे. याकरितां दानत प्रथम शुद्ध केली पाहिजे. आपलें हेंच पहिलें कर्तव्य आहे. सत्याचा अनुभव प्रथम तुम्ही स्वतः घ्या, म्हणजे अनेक शिष्यास तो तुम्ही देऊं शकाल. स्वानुभव तुम्हास झाला, म्हणजे हजारो शिष्य तुमच्याकडे धावून येतील. मग त्यांस शोधित बसण्याचें कारण तुम्हांस पडणार नाहीं. माझे सद्गुरु अशाच रीतीनें वागत होते. त्यानीं कोणावरही टीका केली नाहीं, कोणत्याही धर्मांचा अथवा पंथाचा उपहास त्यानीं केला असल्याचें मला स्मरत नाहीं मी कित्येक वर्षे त्याजपाशीं होतों, पण कोणाच्याही निंदेचे शब्द त्याच्या तोंडून मीं कधीं ऐकिले नाहींत. सर्व धर्मांबद्दल आणि पथांबद्दल त्यांच्या मनात सारखाच पूज्यभाव होता. सर्व धर्मांचें साध्य एकच आहे, हे त्यास कळून चुकलें होतें एखादा मनुष्य बुद्धिमार्गी असेल, दुसरा एखादा भक्त असेल व तिसरा कोणी योगी अथवा कर्ममार्गीही असू शकेल. निरनिराळ्या धर्मांचे नमुने अशा प्रकारें निरनिराळे असू शकतील; तथापि हे सर्व मार्ग जेथें एकवटले आहेत, अशींही मनुष्यें यापुढें निर्माण होतील, अशी त्यांची कल्पना होती याकरितां त्यांनीं कोणासही कधीं दुखविलें नाहीं. परक्यांचे ठिकाणीं जो चांगला गुण असेल, तेवढाच ते पहात असत.

श्रीरामकृष्णांचें भाषण ऐकण्याकरितां हजारों लोकांच्या झुंडी त्यांजकडे धांवून येऊं लागल्या त्यांच्या भाषणातील प्रत्येक शब्दांत विलक्षण प्रकारचा जोम आणि प्रकाश हीं होतीं. मनुष्याच्या भाषणाला जें कांहीं वजन असतें तें त्याच्या विचारांना अथवा त्याच्या भाषेला नसून, त्याच्या दानतीला असतें, पुष्कळ वेळां या गोष्टीचा आपणालाही अनुभव येतो. एखादें वक्तृत्वपूर्ण भाषण आपण ऐकतों ते भाषण तर्कशास्त्राच्या कसोटीला पूर्णपणें उतरण्याजोगें असतें; पण घरीं जाण्याबरोबर आपण काय ऐकिलें याचाही विसर आपणास पडतो. त्या भाषणाचा यत्किंचित्‌ही ठसा आपल्या चित्तावर उमटलेला नसतो. दुसऱ्या एखाद्या वेळीं एखादा सामान्य मनुष्य मोडक्यातोडक्या भाषेंत चार शब्द बोलतो, पण त्यांचा आपल्या चित्तावर इतका परिणाम होतो कीं, ते चार शब्द आपल्या चित्तावर दृढमूल होतात आणि आपल्या जीवनक्रमात त्यांचा परिणामही दिसून येतो. ज्या मनुष्याच्या शब्दाच्या मागें त्याच्या दानतीचें पाठबळ उभें असेल, त्याचेच शब्द परिणामकारक होतात; पण अशा मनुष्याची दानतही अत्यत उच्च असली पाहिजे. शिक्षक आणि शिष्य यांच्यात ‘ दे घे ’ चा संबध असतो. गुरु दाता असतो आणि शिष्य घेणारा असतो, पण गुरूपाशी खरोखर देण्यासारखे कांहींतरी असलें पाहिजे, व त्याप्रमाणें शिष्याची घेण्याचीही तयारी पाहिजे.

श्रीरामकृष्ण कलकत्त्याजवळ राहावयास आले. हें मुख्य राजधानीचे शहर असून हिंदुस्थानांतील एक प्रमुख विश्वविद्यालयही येथें आहे. या विश्वविद्यालयातून प्रतिवर्षी शेंकडों जडवादी आणि अज्ञेयवादी बाहेर पडत असतात. अशा प्रकारचे शेंकडों निरीश्वरवादी आणि अज्ञेयवादीही श्रीरामकृष्णाचें भाषण ऐकण्यासाठीं येत असत. मीही एके वेळीं याचें भाषण ऐकण्याकरितां गेलो. बाह्यत ते एखाद्या सामान्य मनुष्याप्रमाणेच दिसत असत. त्यांच्यांत कांहीं विशेष गुण असतील, असें एकदम वाटण्याजोगा त्यांचा चेहरा नव्हता. अगदीं सोप्या भाषेंत ते आपले विचार प्रगट करीत असत. हा एकदर प्रकार पाहून मला त्यांच्या सद्गुरूपणाबद्दल शका आली. त्यांना कांहीं विशेष ज्ञान असावें असें मला वाटलें नाहीं. पुष्कळांस जो प्रश्न मी विचारीत असें, तोच मी त्यांनाही विचारिला. “ महाराज, परमेश्वराच्या अस्तित्वावर तुमचा भरंवसा आहे काय ? ” त्यांनीं एकदम उत्तर दिलें,

"होय." यावर मीं पुन्हा प्रश्न केला, "हें आपण सिद्ध करूं शकाल काय?" ते म्हणाले, "होय, कारण तुला जसा मी प्रत्यक्ष पाहत आहें, तितकाच अथवा त्याहूनही अधिक स्पष्टपणें मी परमेश्वरास पाहात आहे." या त्यांच्या भाषणाचा परिणाम मजवर एकदम झाला. परमेश्वराला आपण प्रत्यक्ष पाहात आहो असें म्हणणारा प्राणी, मला आजच काय तो आढळून आला. हें जग इंद्रियद्वारा ज्याप्रमाणें आपण अनुभवितो, त्याचप्रमाणें पण त्याहून अधिक स्पष्ट रीतीनें आत्मानुभव आपणास घेता येईल, असें म्हणणारा पुरुष मला हाच प्रथम आढळला. नुसत्या स्पर्शानें अथवा नुसत्या दृष्टिक्षेपानें मनुष्याचा सारा जीवनक्रम बदलून टाकतां येतो. बुद्ध, येशू ख्रिस्त, महमद आणि दुसरे असेच पूर्वकालीन महापुरुष केवळ वचनमात्रेंकरून एखाद्याला पूर्णत्व देत असत, असें माझ्या वाचनांत आलें होतें. त्याच्यासंबधीं सांगितलेल्या या गोष्टी सत्य होत्या, असे आता मला आढळून आलें. श्रीरामकृष्णांच्या नुसत्या दर्शनानें माझे सारे संशय वितळून गेले. आपला अनुभव दुसऱ्यास देता येतो, अशी माझी खात्री झाली. जगांतील इतर कोणतीही वस्तु जितक्या सोप्या रीतीनें देता येते, तीहून अधिक सोप्या रीतीनें आपणास आत्मानुभव देतां येतो, असें श्रीरामकृष्ण नेहमीं म्हणत असत. याकरितां आत्मानुभव प्रथम घ्या. देण्यासारखी अशी वस्तु तुम्ही प्रथम प्राप्त करून घ्या; आणि मग जगात वावरून तिचें दान इतरांस करा. पोकळ बडबड हा धर्म नव्हे. तसेंच काहीं मतें अथवा कांहीं उपपत्ति सांगणें, हाही धर्म नव्हे; त्याचप्रमाणें स्वत स एखाद्या विशिष्ट पथाचा, मताचा अगर धर्माचा म्हणविणें हाही धर्म नव्हे. विशिष्ट पथ काढणें अथवा मडळया स्थापन करणें हा धर्मसंपादनाचा मार्ग नाहीं. धर्म म्हणजे आत्मा आणि परमात्मा यांजमधील संबध. मडळया स्थापून आणि पथ काढून हा संबध कसा जोडता येईल? पथ निर्माण झाला कीं तेथें दे आणि घे हा वाणिज्याचा प्रकारही अवश्य सुरू होतो; आणि ज्या ठिकाणीं असें वाणिज्य प्रवेश करितें, तेथून परमेश्वरत्व लाब जाते. देवळें बाधणें अथवा चर्चें उभारणें, हाही धर्मसंपादनाचा मार्ग नाहीं. शेंकडों लोकांबरोबर जमून प्रार्थना करणें, हासुद्धां मोक्षाचा माग नव्हे. हा मार्ग ग्रथात सांपडावयाचा नाहीं, शब्दांत सांपडावयाचा नाहीं अथवा व्याख्यानांतही आढळून यावयाचा नाहीं. तुम्हीं कितीही संघ

निर्माण केले, तरी त्यांतही परमेश्वराचें अस्तित्व आढळून यावयाचे नाहीं. अनुभव हा आपण स्वत.च मिळविला पाहिजे. सत्याचा अनुभव स्वत. आपणास होईपर्यंत आपलें समाधान होणार नाहीं. आपण कितीही वादविवाद केले अथवा कितीही व्याख्यानें ऐकिलीं, तरीही खऱ्या समाधानाचा मार्ग एकच. तो मार्ग म्हणजे प्रत्यक्ष अनुभव हाच. आपण अट्टाहासानें यत्न केला तर स्वानुभव आपणास सर्वथा साध्य आहे. या अनुभवांतल्या मार्गातला पहिला धडा त्याग हा होय. बनेल तोंपर्यंत आपण त्याग केला पाहिजे. अंधार आणि उजेड हे ज्याप्रमाणे एकत्र वास करीत नाहींत, त्याच प्रमाणें इद्रियजन्य व्यावहारिक सुखें आणि परमेश्वरदर्शनाचें सुख हीं एकत्र वास करीत नाहीत. इन्द्रियजन्य सुखांची तृप्ति आणि भगवद्भक्ति या दोहोंचेंही एकत्र सेवन तुम्हांस कधींही करतां येणार नाहीं. लौकिक व्यवहार करीत असता आणि त्यांतील सुखें भोगीत असताही परमेश्वराच्या चिंतनाचा यत्न करणारे लक्षावधि लोक मला सर्व देशांत आढळून आले आहेत, पण अखेरीस त्याचे हे सारे यत्न फुकट जातात, असाही अनुभव मला आला आहे. परमेश्वराची प्राप्ति करून घ्यावयाची असेल, तर 'त्याग' हा एकच मार्ग आपणास उपलब्ध आहे. त्याग या एकाच शब्दांत या मार्गातील सत्य पूर्णत्वाने भरून राहिलें आहे. त्यागी होणें हें अत्यत बिकट कर्म आहे खरें, पण प्रयत्नानें सर्व कांहीं साध्य होते. आजच आणि याच ठिकाणीं आपण त्यागाला आरंभ केला पाहिजे. अगदीं हळूहळू का होईना, पण निश्चयानें आपण हा मार्ग आक्रमिला पाहिजे.

माझ्या सद्गुरूपासून मला आणखीही एका तत्त्वाची प्राप्ति झाली हे तत्त्व म्हणजे सर्व धर्मांची एकवाक्यता. जगातील सर्व धर्म एकमेकाचे विरोधक नसून सर्वांचा अतिम हेतु एकच आहे, ही गोष्ट सद्गुरूनीं मला शिकविली. जगांतील अनेक धर्म हे एकाच सनातन धर्माच्या अनेक शाखा होत. वेगळया वेगळया परिस्थितीला अनुरूप अशा या अनेक शाखा एकाच सनातन धर्मापासून निर्माण झाल्या आहेत. मानववशाच्या शाखांतील भिन्नत्व आणि त्याची निरनिराळी परिस्थिति यांस अनुसरून या धर्माच्या शाखा निर्माण झाल्या आहेत. हा धर्म माझा आणि हा धर्म तुमचा अथवा हा धर्म आमच्या देशाचा आणि हा धर्म तुमच्या देशाचा अशा प्रकारचें अट-

वस्तूसारखे भिन्नत्व धर्मांत नाहीं. अनेक धर्मांना वास्तविक अस्तित्व नसून खरा धर्म एकच आहे. जगाच्या आरंभकालापासून एकाच सनातनधर्माचें अस्तित्व असून जगाच्या अंतकालापर्यंतही एकाच धर्माचे अस्तित्व रहावयाचें आहे. भिन्न देशांतील भिन्न परिस्थितीस अनुसरून त्याचीं बाह्यरूपे मात्र अनेक होतील. याकरितां जगातील सर्व धर्माबद्दल आपण आदर बाळगिला पाहिजे आणि शक्य असेल तोंवर त्यांतील तत्त्वाचें ग्रहण केलें पाहिजे. केवळ देशाचें भिन्नत्व अथवा शाखेचे भिन्नत्व एवढयाच गोष्टींनीं धर्माचें भिन्नत्व निर्माण होते असे नाहीं; तर प्रत्येक व्यक्तीच्याही भिन्नत्वास अनुसरून धर्माचें स्वरूप भिन्न होतें. परिस्थित्यनुरूप एखाद्या मनुष्याला कर्ममार्ग अनुरूप होतो. दुसऱ्या एखाद्याला भक्तिमार्ग अनुरूप होतो. त्याचप्रमाणें कांहींना योग तर काहीना ज्ञानमार्ग अनुरूप होत असतो. याकरितां अमक्याचा मार्ग बरोबर आणि तमक्याचा खोटा असें म्हणणें चुकीचें आहे. एकाद्याचा मार्ग चुकीचा असला तर त्याच्या दृष्टीनें कर्ममार्गी मनुष्य चुकीचा दिसतो. तसेंच एखादा तत्त्वज्ञ असला तर जगातील अज्ञानी लोकाकडे पाहून त्याला त्याची कींव येते. परमेश्वराचें स्वरूप त्यांना कळत नाहीं असें त्यास वाटते. पण असें वाटणें ही चूक आहे. अमक्याचा मार्ग खरा आणि अमक्याचा खोटा हें निश्चयानें ठरविता येणें शक्य नाहीं. याकरिता एकच सत्य, अनेक भिन्न भिन्न रूपानीं प्रकट होऊ शकते हा सिद्धात आपण आपल्या चित्तावर ठसविला पाहिजे. हे सत्य आपल्या चित्तास पटलें तर परस्परामधील तटेभांडणाचा कायमचा निकाल लागेल; आणि परस्परांबद्दल सहानुभूति आपल्या चितात उत्पन्न होईल. ' पिंडे पिंडे मतिर्भिन्ना ' या न्यायानें एकाच सत्याचे आकलन होण्यासाठीं अनेक धर्ममार्ग निर्माण होतात, हें तत्त्व आपणास पटलें म्हणजे परस्परांबद्दलची आपली द्वेषबुद्धि मावळून तेथें बधुभाव निर्माण होईल. ज्याप्रमाणें विश्वांत अनेक वस्तू असतांही त्यांतील एकतानतेचा भंग होत नाहीं, त्याचप्रमाणें मार्गांच्या भिन्नत्वानें धर्माचें भिन्नत्व होत नाहीं. या विश्वांतील अनेक वस्तूंच्या पोटीं ज्याप्रमाणें एकाच परमेश्वराचा वास आहे, त्याचप्रमाणें अनेक धर्ममार्गाच्या पोटीं एकाच सनातन धर्माचा वास आहे. ' जें पिंडीं तें ब्रह्मांडीं ' हा सिद्धांत आपण नीट लक्षांत बाळगा. ज्याचा वास सर्व विश्वांत आहे त्याचाच वास व्यक्तींतही असतो. विश्वा-

च्या विशाल रूपांत जें व्यक्त झालें आहे, तेंच तत्व व्यक्तीमध्येही अल्प-प्रमाणानें व्यक्त झालें आहे. या दृष्टीनें एक व्यक्ति ही सर्व विश्वाची लहानशी प्रतिकृतीच आहे असें म्हटलें पाहिजे. ही सारी विचारपरंपरा आपण आपल्या चित्तावर पक्की कोरून ठेविली पाहिजे आपणास साप्रतकालीं जर कशाची जरूर असेल, तर ती या सिद्धांताचीच आहे. आमच्या हिंदुस्थानात प्राचीनकाला-पासूनच अनेक पथ आहेत, आणि त्यात नव्या नव्या पथाची आणखीही भर पडत आहे. जगांत ज्याला ज्याला म्हणून पथ काढावासा वाटतो, असा प्रत्येक मनुष्य आपल्या पथाचा उपदेश करावयास आपले दूत हिंदुस्थानात पाठवीत असतो. अमेरिकेतील 'मॉर्मान' पथाचे उपदेशकही आमच्या देशात येऊन गेले होते. यामुळें लहानपणापासूनच मला जगातील अनेक पथांची ओळख झाली होती. या सर्व पथांचें मी मन पूर्वक स्वागत करतों. जगात जितके धर्म आणि पथ आहेत, तितक्या सर्वांनीं खुशाल यावे आणि आमच्या देशांत उपदेश करावा. धर्ममार्गाचा उपदेश करण्यास याहून अधिक योग्य अशी दुसरी भूमि जगात सापडणार नाहीं कोणत्याही धर्माचे बीज हिंदुस्थानातील भूमीसारखें दुसऱ्या कोठेंही रुजणार नाहीं. हिंदुस्थानातील लोकापुढें राजकीय तत्त्वांचे उद्घाटन तुम्ही केलें, तर त्याचा त्यास फारसा उमज पडणार नाहीं. पण एखादा कसलाही विक्षिप्त धर्ममार्ग तुम्हीं त्यास सांगू लागला तर तुमच्या भोंवती क्षणार्धांत हजारों लोकाचा घोळका जमेल. धर्माच्या नावानें तुम्हीं वाटेल तें बरळत सुटला, तरीही तुम्हांस पूज्य मानणारे काहीं निघतीलच. आमच्या या मानसिक स्थितीबद्दल मला खरोखर फार आनंद होतो. धर्माची इतकी आवड असणे, याच गोष्टीची आम्हा हिंदुलोकास गरज आहे.

हिंदुलोकांत अनेक पथ आहेत; आणि वर वर पाहाणारास त्यात विलक्षण विरोध आढळून येतो. कोणत्याही रीतीने त्याची एकवाक्यता करणें शक्य नाहीं, असें वर वर पाहाणारास वाटतें, तथापि वस्तुतः हे सारे पंथही एकाच सनातनधर्माच्या शाखा आहेत, असें तुम्हास दिसून येईल. निरनिराळ्या पर्व-तांतून उगम पावलेल्या नद्या अनेक वाकड्या अगर सरळ मार्गांनीं जात जात ज्याप्रमाणें शेवटीं समुद्रांत एकरूप होतात, त्याचप्रमाणें अनेक पथानीं अनेक प्रकारें केलेलें ईश्वराचें स्तवन शेवटीं त्याजमध्यें एकरूप होतें. ही कांहीं केवळ

उपपत्ति आहे असें नाहीं. खरोखर वस्तुस्थितीच अशी आहे. या सिद्धांताचा आपण मनःपूर्वक स्वीकार केला पाहिजे. येथें केवळ अर्धवट समती कामाची नाहीं "यांत कांहीं बरें आहे, आणि दुसऱ्यातही कांहीं बरें आहे," अशा प्रकाची रामाय स्वस्ति रावणाय स्वस्तिची वृत्ति येथें मुळींच उपयोगाची नाहीं. हा सिद्धान्त पूर्णपणें स्वीकारून त्याचा खोल ठसा आपण आपल्या चित्तावर उमटविला पाहिजे. कित्येक लोक स्वत.च्या धर्माबद्दल इतका काहीं विलक्षण अभिमान बाळगतात कीं, आपलाच धर्म काय तो पूर्ण दशेप्रत पोंचलेला आहे असे त्यांस वाटतें. असे लोक ऐतिहासिकदृष्ट्या धर्माचा विचार करण्याचा आव घालतात; व इतर धर्म हे मनुष्याच्या आद्यस्थितीचे दर्शक आहेत असें म्हणत असतात. कित्येक लोक आपला धर्म जुना आहे, यासाठीं तो पूर्ण आहे असें समजणारे असतात, तर दुसरे कित्येक स्वत.चा धर्म नवा म्हणून अधिक सस्कृत, अधिक उच्च व अधिक पूर्णत्व पावलेला आहे असें म्हणतात. दोन्ही धर्म खरे आहेत व आपणास मोक्ष देण्याची पात्रता दोन्ही धर्मांत सारखीच आहे, हे तत्त्व आपण ओळखलें पाहिजे. त्यांत जी भिन्नता आढळते व जीं तटेभाडणें ऐकू येतात, तो सारा भोळसर कल्पनांचा खेळ होय. हा भेद तत्त्वांचा नसून तो नुसत्या खुळसट धर्मकल्पनाचा मात्र असतो. आपणा सर्वांच्या प्रार्थनेस हांक देणारा परमेश्वर एकच आहे. तुमच्या आमच्यासारख्या सामान्य मनुष्याच्या हातात कोणासही मुक्ति देण्याचें सामर्थ्य नाहीं. तें सामर्थ्य एका ईश्वरापाशींच आहे. परमेश्वराच्या ठिकाणीं आपला पूर्ण भरवसा आहे असें म्हणणारे लोकसुद्धा, कांहीं थोड्याशा लोकासच परमेश्वरानें सत्य मार्ग दाखविला आहे असे कसें म्हणतात, याचें मला खरोखर फार आश्चर्य वाटतें. कांहीं थोड्याशा माणसाच्या हातांत सर्व मानवजातीचें कल्याणसूत्र परमेश्वर कधींतरी अर्पण करील काय? परमेश्वराचें स्वरूप इतके आकुचित आणि एकमार्गी खचित नाहीं. अशा प्रकारच्या धर्माला धर्म तरी कसें म्हणावें? धर्म म्हणजे प्रत्य स्वानुभव. केवळ बडबड करणे, काहीं विशिष्ट मतावर कांहीं भरंवसा ठेवणें, अधारांत चाचपडत फिरणें, पूर्वजानीं सागितलेल्या कांहीं शब्दाची पोपटपची करणें अथवा धर्माच्या प्रमेयाचा उपयोग एखाद्या राजकीय कार्याकडे करणें हा धर्म नव्हे. मुसलमानी धर्माइतका एकलकोंडा धर्म जगांत दुसरा कोणताही नाहीं असें आपणास वाटते; पण त्या धर्मांतील-

सुद्धां कित्येक महापुरुष काय म्हणतात पहा, " परमेश्वरा ! तूं सर्व विश्वाचा शास्ता आहेस. तुझा वास सर्वांच्या अतर्यामीं आहे. तूं सर्वांचा मार्गदर्शक आणि गुरु आहेस. तूं सर्वांबद्दल अत्यत काळजी वाहतोस." सर्व धर्म तत्त्वत. एकरूप असल्यानें परक्याच्या विश्वासाचा उच्छेद करू नका. " न बुद्धिभेदं जनयेत्" अशी आज्ञा भगवान् श्रीकृष्णानीं याच करिता केली आहे. एखाद्याला अधिक चागला मार्ग तुम्हास दाखवितां येण्यासारखा असला तर तो अवश्य दाखवावा. त्याच्या स्थानावरून त्याला अवश्य पुढें न्या. पण असें करीत असतांही त्याच्याजवळ पूर्वींचें जें कांहीं असेल त्याचा नाश करू नका. हजारों लोकाच्या परिस्थितीस अनुरूप असे हजारों मार्ग ज्याला एका वेळीं दाखवितां येतील तोच खरा सद्गुरु होय. स्वत·च्या उच्च स्थितीवरून शिष्याच्या स्थितीपर्यंत खालीं येऊन त्याच्या अतरंगात शिरून त्याची व आपली दृष्टि एक करून आणि त्याच्या मनाशीं समता पावून त्याला योग्य मार्ग दाखवील तोच खरा सद्गुरु होय. दुसऱ्यांच्या विश्वासाचा उच्छेद करणारे हे मनुष्यजातीचे गुरू नव्हत जगांत नुसती मोडतोड उत्पन्न करणाऱ्या या लोकांच्या हातून जगाचें यत्किंचितही कल्याण व्हावयाचें नाहीं. आपल्या याच चालू आयुष्यांत आपणांस पूर्णत्व पावतां येतें ही गोष्ट मी सद्गुरूपासून शिकलों. माझ्या सद्गुरूनीं कोणाबद्दलही कठोर भाषण कधीं केलेलें नाहीं. त्यांच्या तोंडून शापोक्ति कधीं निघालेली नाहीं, इतकेंच नव्हे तर त्यानीं कधीं कोणाबद्दल टीकासुद्धां केली नाहीं वाईट असें त्यांच्या दृष्टीस कांहींच दिसत नसे. कारण त्यांची दृष्टि गुणातीत झाली होती. अमुक गोष्ट वाईट आहे असें त्याच्या चित्तांत कधींच येत नसे. वाईटाची कल्पनाही ते विसरले होते. त्यांना सर्वत्र सर्व वस्तूचें शुभ रूप मात्र दिसत असे. ते स्वत अत्यत पवित्र झाले असल्यामुळें व त्याच्या ठिकाणीं अहकाराचा बिंदुमात्र अशही न राहिल्यामुळें ते केवळ आत्मरूप बनले होते. पूर्ण त्याग व पूर्ण पवित्रता हेंच स्वानुभवाच्या मार्गाचें बीज आहे. " न धनेन न प्रजया त्यागेनैके अमृतत्वमानशु." असे श्रुतिवचन आहे. येशू ख्रिस्त म्हणतो, " तुजजवळ जें कांहीं असेल तें सर्व विकून टाकून त्या पैशांचें दान गरीबास कर; आणि माझ्यामागें ये." सर्व महात्मे आजपर्यंत हेंच तत्त्व शिकवीत आले आहेत; आणि या तत्त्वाचा प्रत्यक्ष आचार कसा करावा हेंही त्यांनीं स्वतःच्या उदाहरणानें

आपणांस शिकविलें आहे. त्यागावाचून आत्मानुभव कसा होईल ? जगांतील कोणताही धर्म तुम्ही पहा, त्याच्या मुळाशीं हेंच त्यागाचे तत्त्व ग्रथित केलें असल्याचें तुम्हास आढळून येईल. ज्या प्रमाणानें आपल्या वर्तनांत त्यागाचा अंश कमी होत जातो त्याच प्रमाणानें इद्रियजन्य सुखाची आपली हाव वाढत जाते आणि आपण धर्ममार्गापासून पराङ्मुख होऊ लागतो. लौकिक सुखें भोगण्याची आकांक्षा जो जों अधिक तो तो धर्मपराङ्मुखता अधिक असें समजावे.

श्रीरामकृष्ण हे त्यागाचा प्रत्यक्ष अवतार होते. जो संन्यासी झाला त्यानें जगातील सर्व सपत्तीवर आणि मानपानावर पाणी सोडलें पाहिजे, असा निर्बंध आमच्या देशांत आहे. हा निर्बंध माझ्या सद्गुरूनीं अक्षरशः अमलात आणिला होता. श्रीरामकृष्णानीं आपल्या हातून एखाद्या वस्तूचें ग्रहण केलें तर स्वत:स धन्य समजणारे असे पुष्कळ दाते त्याजकडे येत असत. श्रीरामकृष्णांच्या चरणीं हजारों रुपये त्यानीं आनदानें अर्पण केले असते. पण अशा प्रकारचीं माणसे दृष्टीस पडल्याबरोबर सद्गुरु पाठ फिरवीत असत. कनक आणि कामिनी या दोन्ही भावनावर त्यानीं पूर्ण विजय मिळविला होता. या दोन्ही कल्पनाच्या पलीकडे त्यांनीं उड्डाण केलें होते जगाच्या साप्रतच्या परिस्थितींत अशाच प्रकारच्या विजयी पुरुषाची फार जरूर आहे. कनक आणि कामिनी या द्वयावांचून आपला जीव राहणेंसुद्धा शक्य नाहीं असें आपणांस साप्रतकाळीं वाटू लागलें आहे अशा मनुष्यांची संख्या दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणावर आहे. अशा स्थितींत जगांतील सर्व खाणींतून निर्माण झालेलें सर्व सोनें तुच्छ लेखणारा आणि कीर्तीची यत्किंचितही इच्छा न बाळगणारा असा एकतरी पुरुष निर्माण होऊ शकतो, असें आपल्या उदाहरणानें सिद्ध करणारे पुरुष आज आपणांस हवे आहेत. असे पुरुष थोडे तरी निर्माण होत आहेत ही मोठ्या भाग्याची गोष्ट आहे.

श्रीरामकृष्णांच्या मनांत दुसऱ्यांबद्दल आटोकाट प्रेम असे त्यांच्या आयुष्याचें प्रथमार्ध स्वानुभव सपादण्यांत गेलें आणि द्वितीयार्धात तो अनुभव त्यांनीं लोकांस दिला. एखाद्या संन्याशाकडे अथवा गुरूकडे जाण्याच्या आमच्या चालीरीती तुमच्या चालीरीतीहून अगदीं भिन्न आहेत. अनेक प्रकारच्या विषयांबद्दल अनेक प्रकारचे प्रश्न करण्यास लांब लांबचे लोक त्यांजकडे धांवून येत असत. एकच प्रश्न विचारण्यासाठीं अथवा त्यांच्या तोंडचा एकच शब्द

ऐकण्यासाठीं कित्येक लोक शेकडो मैल पायानें चालून येत. त्याच्या बैठकीच्या ठिकाणीं निरनिराळ्या ठिकाणांहून हजारो लोक येत आणि खुशाल त्यांच्या बैठकीपर्यंत घुसत. मानापानाच्या कसल्याही कल्पनेस तेथे वाव नव्हता. एखादे वेळीं सद्गुरु एखाद्या वृक्षाच्या तळी बसले असता लोकाचा घोळका त्याच्या भोवतीं जमे, आणि एका घोळक्यातून ते मोकळे होतात न होतात तोच नवा घोळका त्याना पुन्हा गराडा देई, आणि सद्गुरु या सर्वांचे समाधान करीत असत.

अशा रीतीनें माणसाचे थव्यामागें थवे त्याच्या भोवतीं जमत असत; आणि कित्येक वेळां त्याचा उपदेश एकसारखा वीस वीस तास चालू असे. हा प्रकार एक दोन दिवसाचा होता असें नाहीं, तर वेळीं तो कित्येक महिने चालू असे या अत्यत परिश्रमामुळें त्यांना अखेरीस विलक्षण शीण आला व ते अगदीं थकून गेले. मनुष्यजातीबद्दल त्यांच्या मनात अत्यत प्रेम असल्यामुळें अगदीं हलक्या दर्जाच्या मनुष्यालासुद्धा आपल्या हातून होईल ती मदत करावी असे त्यास वाटे. हळू हळू त्याच्या घशात एका भयकर रोगाची उत्पत्ति झाली, पण अशा अवस्थेत सुद्धा त्याच्या उपदेशाला खळ पडला नाही. आपल्या भेटीसाठी लोक जमले आहेत असें कळताच, त्याना एकदम आत येऊ देण्याविषयीं ते अट्टाहास करीत आणि त्याच्या प्रश्नाचे जबाब देत असत. अधिक भाषण न करण्याविषयीं त्यांना कोणीं सांगितलें तर ते म्हणत, "मला या देहाची काय पर्वा आहे ? एकाही मनुष्याला माझ्या हातून काहीं मदत होईल, तर असे हजारों देह मी ओंवाळून टाकीन ! केवळ एका मनुष्यालाही मदत करणें याहून अधिक पुण्यकारक तें काय आहे ?" त्यानीं विश्रांतीची कधीं अपेक्षा केली नाहीं एकदां त्याना एका गृहस्थाने म्हटलें, "महाराज, आपण योगी आहां. मग आपलें थोडेसे सामर्थ्य खर्चून आपला रोग बरा का करीत नाहीं ?" प्रथम या प्रश्नाला त्यानीं कांहींच उत्तर दिलें नाहीं, पण त्या गृहस्थानें तो प्रश्न पुन्हां विचारतांच सद्गुरु म्हणाले, "भल्या गृहस्था, तू साधु आहेस असें मला वाटत होते, पण तू सुद्धां सामान्य व्यवहारी मनुष्याप्रमाणेंच बरळतोस. अरे, जें मन मी ईश्वराला अर्पण केलें आहे, ते तेथून काढून या क्षुद्र देहाकडे लावावें हें तुला युक्त वाटतें काय ? हा देह म्हणजे हाडांचा नुसता सांपळा आहे. आत्मा राहण्याचा तो नुसता पिंजरा आहे."

स्वा. वि. ख. ४–१७.

याप्रमाणें लोकाना उपदेश करण्याचा त्याचा क्रम एकसारखा सुरू होता, आणि त्यांचा देह क्षीण झाला असून ते लवकरच इहलोक सोडतील, अशी बातमी पसरतांच लोकाचे थवे अधिकाधिक लोटू लागले अशा प्रकारच्या अवतारी पुरुषाभोवती हिंदुस्थानात किती लोक जमतात, याची तुम्हास कल्पनाही करिता येणार नाहीं. अशा पुरुषाबद्दल हिंदुलोकाच्या मनांत असलेला आदरभाव तुम्हांस अजमावतां येणार नाहीं. केवळ त्याच्या पायाचा स्पर्श व्हावा, एवढयाचसाठी हजारो लोक तिष्ठत राहतात. परक्याच्या धार्मिक भावनाचें बीज आपणास करता आलें, तर आपल्या स्वत च्या धार्मिक भावनाही जागृत होतात मनुष्याला जी वस्तु मनापासून हवीशी वाटते आणि जिचे रहस्य तो जाणू शकतो, ती त्याला प्राप्त होत असते. हीच गोष्ट एखाद्या राष्ट्रालाही लागू आहे हिंदुस्थानात जाऊन राजकीय विषयांवर तुम्हीं एखादें व्याख्यान दिलें आणि ते कितीही उच्च दर्जाचें असलें, तरी तुम्हांस फारसे श्रोते मिळावयाचे नाहींत, पण तेच धर्माविषयीं तुम्ही काहीं बोलूं लागला तर हजारों श्रोते तुमच्या भोवती जमतील; आणि त्या धर्माचा प्रत्यक्ष आचार तुम्ही सुरू केला, तर हजारों लोक तुमच्या पायांही पडतील. श्रीरामकृष्णाच्या देहाचा भरवसा नाहीं असें वाटू लागताच लोकांचे थव्यावर थवे त्याच्या दर्शनासाठी येऊ लागले; आणि स्वत.च्या प्रकृतीची यत्किंचितही पर्वा न करता सद्गुरूनीही आपला उपदेशाचा क्रम चालूच ठेविला. त्याना गप्प बसविणे आम्हास शक्य नव्हतें. कित्येक लोक फार लाबून आलेले असत आणि त्याच्या प्रश्नाचा जबाब देईपर्यंत सद्गुरूना चैन पडत नसे. ते म्हणत, “ माझ्या तोडात बोलण्याचें सामर्थ्य आहे तोपर्यंत त्याच्या प्रश्नांचा जबाब देणें मला भाग आहे, आणि त्याचप्रमाणें देहपाताच्या क्षणापर्यंत त्यांचा उपदेश चालूच होता. आपण जाणार असें एके दिवशीं त्यानीं आम्हास सागितलें, आणि त्या दिवशीं श्रुतिमत्र म्हणत असता त्यानी देह ठेविला आणि ते परमात्म्याशी समरस झाले.

त्यानीं प्रगट केलेले विचार आणि मानवजातीस दिलेला सदेश यांची खरी योग्यता जाणून, त्याचा प्रसार लोकात करावयास योग्य असे शिष्य फारच थोडे होते. त्याच्या पाठीमागें जगाचा त्याग केलेले असे काहीं तरुण होते; आणि त्याच्या सदेशाचें कार्य पुढे सुरू राखण्याविषयीं ते उत्सुक होते. हा

त्यांचा यत्न सफल होऊ नये, याविषयी उद्योग करणारेहि कांहीं महात्मे निर्माण झाले, पण आपणांस आपल्या सद्गुरूचा अक्षय्य पाठिंबा आहे, हें जाणून ते शिष्य डगमगले नाहींत. सद्गुरूचें उदाहरण त्यांच्या डोळ्यासमोर होते. अशा पुण्य पुरुषाचा सहवास कित्येक वर्षे घडल्यामुळें आपलें कार्य पार पाडण्यास त्यांस धैर्य प्राप्त झालें होते. हे तरुण सन्यस्तवृत्तीनें राहत असत; आणि ज्या शहरात त्याचा जन्म झाला, तेथेच ते भिक्षाही मागत. यापैकीं कित्येक गर्भश्रीमतही होते. त्याच्या कार्यांत पुष्कळ अडथळे आले, पण त्यांनीं आपलें उपदेशाचें कार्य सोडलें नाहीं. श्रीरामकृष्णांचा संदेश हिंदुस्थानच्या कोनाकोपऱ्यापर्यंत त्यांनीं पोंहोंचविला. श्रीरामकृष्ण हे विद्वान् पुरुष नव्हते शिक्षणाचा त्यास गधही नव्हता. बगाल्यातल्या एका कोंपऱ्यातल्या खेड्यांत त्यांचा जन्म झाला होता. अशा प्रतिकूल परिस्थितींतही केवळ स्वत.च्या निश्चयावर त्यांनीं आत्मानुभव सपादिला आणि इतरासही तो दिला. त्याच्या पाठीमागें त्यांचा मार्ग जिवत ठेवण्यास थोडेसे तरुण मात्र शिल्लक राहिले आहेत.

आज श्रीरामकृष्णाचें नांव हिंदुस्थानांत लक्षावधी लोकांच्या तोंडीं झालें आहे; एवढेंच नव्हे, तर त्यांचें सामर्थ्य हिंदुस्थानच्या बाहेरही पसार पावलें आहे. माझ्या भाषणात जें कांहीं सत्य असेल, जो कांहीं प्रकाश असेल अथवा जो कांहीं राम असेल, त्याची सारी मालकी माझ्या सद्गुरूकडेच आहे. त्यांत काहीं चुकांचा अश असेल, त्याचा मालक मात्र मी एकटाच आहे. श्रीरामकृष्णानी जगाला जो संदेश दिला त्यांतील तात्पर्य हेच. " केवळ मताच्या आणि मतातराच्या मागें लागू नका. केवळ पथाच्या आणि धर्मसमजुतींच्या मागें लागू नका. त्यांना फारसें महत्व नाहीं. तुमच्या स्वत च्या अतर्यामीं जें सत्य वास करीत आहे, तेच तुम्हीं अधिक प्रकाशमय केलें, तर त्यापासून अधिक हिताची प्राप्ति होईल. याकरिता परक्यावर टीका करीत न बसतां आत्मसशोधन करा. सर्व मतांत आणि सर्व धर्मांत सत्याचा कांही अश असतोच. धर्म म्हणजे पोकळ शब्द नव्हत, अथवा नुसता बाह्याचार हाही धर्म नसून, आत्मानुभव हाच खरा धर्म आहे, हें स्वत.च्या आचरणाने तुम्ही सिद्ध करा. आत्मानुभवी असतील त्यानाच या गोष्टीचा उमज पडेल. आत्मानुभव ज्यांना प्राप्त झाला असेल, तेच इतरांस तो देऊ शकतील. हेच पुरुष

मानवजातीचे गुरु होऊ शकतील. प्रकाशाचें सामर्थ्य फक्त अशानाच प्राप्त होईल."

देशांत अशा पुरुषाच्या उत्पत्तीचे प्रमाण जो जों वाढत जाईल, तो तों तो देश अधिक वर येईल. ज्या देशांत असा एकही पुरुष पैदा होत नसेल, तो देश काळाच्या कराल दाढेत शिरला आहे असे समजावे. असल्या देशाचें रक्षण कोणीही करूं शकणार नाहीं. याकरिता साऱ्या मानवजातीस माझ्या सद्गुरूचें एकच सागणें आहे कीं, "धर्ममार्गास अनुसरून स्वानुभव घ्या." आपल्या बाधवाच्या उपयोगीं पडण्यासाठीं तुम्हीं सर्वसगपरित्याग केला पाहिजे. लोकहित साधण्याची नुसती बडबड करण्यांत काहीं फायदा नाहीं. बडबड बद करून तिचें सार प्रत्यक्ष आचरणांत व्यक्त होईल, अशी योजना तुम्हीं केली पाहिजे. सर्वसगपरित्याग करण्याची वेळ हीच आहे. स्वानुभवाची वेळ हीच आहे. स्वानुभवाची प्राप्ति तुम्हास झाली म्हणजे जगातील सर्व धर्मांत एकतानता आहे, अशी तुमची खात्री होईल. तटेभाडणें करण्याला मुळातच काहीं कारण नाही, अशी तुमची खात्री पटल्यावर मानवजातीस मदत करण्याची तुमची खरी तयारी होईल. सर्व धर्मांच्या पोटीं एकाच तत्त्वाचा वास असून त्या सर्वांत एकतानता आहे, असे सर्व जगापुढें सिद्ध करून दाखविणें हेंच सद्गुरूचें अवतारकार्य होते. पूर्वकाली होऊन गेलेल्या अवतारी पुरुषांनीं केवळ स्वत चेच धर्म लोकास शिकविले आणि ते धर्म त्याच्या नांवावर अद्यापिही चालू आहेत, पण एकोणिसाव्या शतकांत जन्मास आलेल्या या अवतारी पुरुषांनीं कोणत्याही एकाच धर्मावर आपला हक्क सागितला नाहीं. कोणताही धर्म उध्वस्त करण्याचा उद्योग त्यानीं केला नाहीं. कारण सर्व धर्म हे एकाच सनातनधर्माच्या शाखा आहेत, असें त्यास पूर्णपणे समजलें होतें.



# गीतेसंबंधानें कांहीं विचार.



[ इ. स. १८९७ सालीं स्वामीजी कलकत्त्यास असता ते फारकरून रामकृष्ण मिशनाच्या मुख्य मठात राहत असत. हा मठ आलमबझार येथें होता. त्या वेळीं पुष्कळ तरुण गृहस्थ अभ्यासाकरितां तेथे येत असत. त्यांनीं ब्रह्मचर्य आणि संन्यास यांची शपथ वाहिली होती आपल्या भावी कार्याला तयार करण्यासाठीं या तरुण गृहस्थाना स्वामीजी शिक्षण देत असत. भगवद्गीता आणि वेदांत यांचें उद्घाटन करून ते त्यास योगमार्गाचा अभ्यासही सांगत असत. यांपैकी भगवद्गीतेवर एक व्याख्यान त्यांनी बगालींत दिलें होते, त्याचा साराश मठातील रोजनिशींत पुढीलप्रमाणें दिला आहे ]

गीता या नांवानें जो ग्रंथ उपलब्ध आहे, तो महाभारताचा एक भाग आहे. भगवद्गीतेचे रहस्य बरोबर समजण्याकरिता प्रथम काहीं इतर गोष्टी समजून घेणे अवश्य आहे. गीता हा महाभारतातीलच एक भाग आहे कीं काय, हे प्रथम पाहिलें पाहिजे. गीतेचें कर्तृत्व वेदव्यास याजकडे जाते, कीं हा भाग महाभारतात कोणीं मागाहून घुसडून दिला आहे, याचा विचार प्रथम केला पाहिजे. त्याचप्रमाणें श्रीकृष्ण या नांवाची कोणी व्यक्ति खरोखरच जन्मास आली होती कीं काय, हेही पाहिलें पाहिजे. तिसरा मुद्दा हा की, गीतेत सांगितल्याप्रमाणे कुरुक्षेत्रावर खरोखर युद्ध झालें की काय, आणि अर्जुन व इतर व्यक्ती या खरोखर ऐतिहासिक आहेत कीं काय, याचाही विचार करणें भाग आहे.

आतां अशा प्रकारच्या चौकसपणाची काय जरूर आहे, हे प्रथम दर्शविलें पाहिजे. वेदव्यास या नावाच्या अनेक व्यक्ती होऊन गेल्या, हे आपणास अवगतच आहे. यांपैकीं गीतेचें कर्तृत्व बादरायण व्यासाकडे जाते, कीं द्वैपायन व्यासाकडे जाते, याचा खुलासा झाला पाहिजे. व्यास हें केवळ एक उपपद आहे. कोणीही एखाद्या नव्या पुराणाची रचना केली, म्हणजे तो व्यास या नांवानें प्रसिद्धीस येत असे. विक्रमादित्य हेंही अशाच प्रकारचें एक सामान्य नाम आहे. गीतेसंबधी आणखीही एक मुद्दा ध्यानांत ठेवण्याजोगा

आहे. तो हा कीं, आद्य शंकराचार्यांनीं आपली विख्यात टीका तिजवर लिहून ती प्रसिद्धीस आणीपर्यंत तिजबद्दल सामान्य जनांत विशेष पूज्यभाव नव्हता. त्यापूर्वी बोधायनांनीं केलेली गीतेवरील टीका उपलब्ध होती ही गोष्ट सिद्ध झाली, तर गीतेचे प्राचीनत्व व व्यासांचें कर्तृत्वही सिद्ध होण्याचा मार्ग बराच सुलभ होईल. बोधायनांनीं वेदांतसूत्रांवर भाष्य लिहिलें होते. या भाष्यावरूनच श्रीरामानुजांनीं आपलें श्रीभाष्य रचिलें श्रीशकराचार्यांनींही या भाष्याचा नामनिर्देश करून त्यांतील उतारेही जागोजाग दिले आहेत. या भाष्यासंबधीं स्वामी दयानद यानींही पुष्कळ वेळां वादविवाद केला होता. परंतु साऱ्या हिंदुस्थानभर फिरूनही मला त्याची एक प्रतसुद्धां उपलब्ध झाली नाहीं. ज्या प्रतीवरून श्रीरामानुजाचार्यांनी आपलें भाष्य लिहिलें, तीं प्रतसुद्धां किड्यांनीं खाल्लेली होती असे सांगतात वेदांतसूत्रांवरील बोधायन-भाष्यासंबधीं अशी स्थिति असतां, गीतेवरील त्यांच्या भाष्याचें अस्तित्व सिद्ध करण्याचा यत्न करणें फुकट आहे. भगवद्गीता ही आद्य शकराचार्यांनींच रचिली असून, त्यानीच ती महाभारतांत घुसडली असेंही कित्येक म्हणतात

भगवान् श्रीकृष्ण या व्यक्तीच्या अस्तित्वासंबंधानेंही संशयास बरीच जागा आहे. छादोग्योपनिषदांत देवकीचा पुत्र कृष्ण घोरनामा नांवाच्या योग्याजवळ अध्यात्मविद्या शिकत होता असा उल्लेख आहे. महाभारतांतील कृष्ण हा द्वारकेचा राजा होता. विष्णुपुराणांतील कृष्ण गोपींबरोबर क्रीडा करताना आपणास आढळतो. त्याचप्रमाणें भागवतांत कृष्णाच्या रासलीलेचा वृत्तांत सविस्तरपणें ग्रथित केल्याचें आढळून येतें. प्राचीन कालीं आपल्या देशांत मदनोत्सव या नावाचा एक उत्सव साजरा करण्यांत येत असे. याच उत्सवाचें वर्णन बहुधा श्रीकृष्णाच्या गळयांत अडकविलें गेलें असावें. त्याच प्रमाणें रासलीला व दुसऱ्या अनेक कथाचें जाळें त्याच्याभोंवतीं गोविलें गेलें नसेल, अशी खात्री कोण देईल? प्राचीन कालीं कोणत्याही गोष्टीची ऐतिहासिक दृष्टया चर्चा करून तिच्या सत्यासत्यतेचा निर्णय करण्याची प्रवृत्ति आपल्यांत फारकरून नव्हती. यामुळें कोणताही पुरावा न देतां स्वतःच्या बुद्धीला वाटेल ती गोष्ट वाटेल त्यांनीं ठोकून द्यावी, अशी पद्धत पडून गेली होती. त्याचप्रमाणें त्या काळीं मोठ्या नांवाची अथवा कीर्तीची

अपेक्षाही फारकरून कोणाला नव्हती यामुळें एखाद्यानें एखादा ग्रंथ लिहावा आणि तो आपल्या गुरूच्या अथवा दुसऱ्या कोणाच्या तरी नांवानें प्रसिद्ध करावा असे घडत असे. अशा प्रकाराच्या परिस्थितींत कोणत्याही गोष्टीची ऐतिहासिक दृष्टया चर्चा करून सत्य शोधू जाणारास फार मोठ्या अडचणी आहेत हें निर्विवाद आहे प्राचीन कालीं भूगोलज्ञान अत्यंत अल्प होतें. केवळ कल्पनेला त्या वेळीं वावरण्यास पूर्ण मुभा मिळालेली होती मधुसमुद्र, क्षीरसमुद्र, घृतसमुद्र, दधिसमुद्र हीं याच इतस्तत भटकणाऱ्या कल्पनेचीं फळें आहेत. पूर्वी दहा हजार वर्षांचे आयुष्य असे, असें वर्णन पुराणात आढळतें. त्याचप्रमाणें लक्षावधि वर्षांचें आयुष्यही पुराणानें कोणा कोणास दिलेलें आहे. ‘शतायुर्वै पुरुष:’ (‘पुरुषाचें आयुष्य शंभर वर्षांचे आहे,’)असे वेदाचें मत आहे अशा स्थितींत खऱ्याखोट्याची निवड तरी काय करावी ? अशा रीतीनें श्रीकृष्णासबधीही निश्चयानें कांहीं सांगता येणें शक्य नाहीं.

एखाद्या महापुरुषाच्या खऱ्या चारित्र्यावर अनेक प्रकारच्या काल्पनिक व लोकोत्तर गुणाचा आरोप करावा, असा मनुष्यस्वभाव बनून गेला आहे. श्रीकृष्णाबद्दलही असेच घडलें असावें, तथापि श्रीकृष्ण हा राज्याभिषिक्त पुरुष होता, हें मात्र अगदीं सभवनीय आहे, कारण, प्राचीन काली आपल्या देशात राजेलोकच ब्रह्मज्ञानाचें सपादन विशेषत करीत असत. या ठिकाणीं दुसराही एक मुद्दा विशेषेंकरून ध्यानांत ठेवण्याजोगा आहे. तो हा की, भगवद्गीतेचा कर्ता कोणीही असला, तथापि तींतील विवेचन साऱ्या महाभारतांतील मुद्याशी सुसगत आहे. यावरून महाभारतकालीं कोणी तरी महापुरुष जन्मास आला असून, त्या वेळच्या जनतेला गीतेच्या रूपाने त्यानें ब्रह्मज्ञानाचा उपदेश केला इतके अनुमान आपणास नि·संशय काढता येईल. दुसराही एक लक्षांत ठेवण्यासारखा मुद्दा हा कीं, प्राचीन कालीं निरनिराळे पथ जसजसे अस्तित्वांत येऊ लागले, तसतशीं त्यानीं आपलीं निरनिराळीं शास्त्रेंही प्रचारांत आणिलीं. कालेंकरून हे पथ कालाच्या उदरांत नाहीसे झाले असावे व त्याचीं शास्त्रेंही नाहींशीं झालीं असावीं, किंवा पथ नाहींसे होऊन केवळ शास्त्रग्रथ मात्र उरले असावे. अशाच प्रकारच्या एखाद्या पथाचा गीता हा शास्त्रग्रंथ असणें शक्य आहे. त्या पंथानें या ग्रथाच्या रूपानें आपल्या उच्च आणि उदार कल्पना गुफल्या असाव्यात.

आतां कुरुक्षेत्रावर झालेल्या युद्धासंबधाच्या तिसऱ्या मुद्याकडे आपण वळू. यासंबधीं कांहीं विशेष पुरावा कोठे दिलेला नाहीं, तथापि कुरु आणि पांचाल यामध्ये एक युद्ध झालें होतें, ही गोष्ट मात्र निःसंशय आहे यासंबधी आणखीही एका मुद्याची चर्चा करण्यात येत असते ज्या ठिकाणीं दोन सैन्ये युद्ध सुरू करण्याच्याच केवळ सूचनेची वाट पाहत आहेत, अशा ठिकाणीं ज्ञान, भक्ति आणि योग यासारख्या गहन विषयांवर वादविवाद होणें शक्य आहे काय? तसेच रणभूमीच्या प्रचड नादात कृष्ण आणि अर्जुन यांच्यामध्यें झालेला सवाद शब्दशः टिपून घेण्यास तेथे कोणी लघुलेखक होता कीं काय? कित्येकाच्या मते कुरुक्षेत्रावरील लढाई हें एक नुसते रूपक असावें. त्यांच्या मतें मानवी मनांत बरे आणि वाईट याचें जे युद्ध सदैव सुरू असते, तेच हे महाभारतीय युद्ध होय. गीतेत ह्याच अतस्थ अर्थ व्यक्त केला आहे असें कित्येकाचें म्हणणे आहे. असा अर्थ घेतला तरी तो युक्तिवादास अगदी सोडून नाही.

आपल्या चवथ्या मुद्यासंबधीं विचार करता अर्जुन आणि इतर व्यक्ती या ऐतिहासिक होत्या की काय, याबद्दल शका घेण्यास बराच अवसर आहे असें दिसून येते. शतपथ ब्राह्मण हा एक फार प्राचीन ग्रथ आहे. अश्वमेध यज्ञ कोणी केला, त्या सर्वांची यादी या ग्रथात नमूद केली आहे. या यादींत अर्जुन आणि इतर व्यक्ती यांचा नामनिर्देशही सापडत नाही, तथापि या ग्रथात अर्जुनाचा नातू आणि परीक्षिताचा पुत्र जनमेजय याचे नाव आढळते. युधिष्ठिर, अर्जुन आणि इतर व्यक्ती यानी अश्वमेध यज्ञ केल्याचा उल्लेख महाभारतात आहे.

या ठिकाणीं आणखीही एक गोष्ट विशेषेकरून लक्षात ठेवण्यासारखी आहे. ती ही कीं, अशा प्रकारच्या ऐतिहासिक चर्चेचा सबध आपल्या मुख्य हेतूशीं कोणत्याही प्रकारें नाही. धर्मज्ञान सपादन करणें हा आपला प्रमुख हेतु आहे. ऐतिहासिक दृष्ट्या या साऱ्या गोष्टी अगदीं खोट्या आहेत असेही सिद्ध झाले, तरी आपल्या दृष्टीनें आपला त्यात यत्किंचितही तोटा नाहीं. मग अशा प्रकारची ऐतिहासिक चर्चा आपण कां करावी, असा प्रश्न तुम्ही कदाचित् उपस्थित कराल. त्याचे उत्तर इतकेच कीं, आपणांस सत्य शोधावयाचें आहे. अज्ञानाच्या जाळ्यात गुरफटले जाऊन भलत्याच कल्पना उराशीं

बाधण्याचें आपणांस कारण नाहीं. अशा प्रकारच्या चर्चेला आपल्या देशात कोणी फारसा मान देत नाहींत. अनेकास कल्याणकारी असा शास्त्रोपदेश करावयाचा असल्यास खोटे बोलण्यासही कांही नड नाहीं, अशी कित्येक पथाची समजूत आहे. शास्त्रोपदेशाचें काम अशा गीतीनें अधिक सुलभपणें होण्यासारखे असलें, तर खोटें बोलण्यात फारसें पातक नाहीं, असे त्यांचें मत आहे. त्यांच्या दृष्टीनें अखेरची सिद्धि महत्त्वाची असून साधनें गौण आहेत. यामुळेंच पुष्कळ तत्रग्रथाच्या आरभी "महादेव पार्वतीला म्हणाले" असें वाक्य आढळते, तथापि सत्य शोधावयाचे हा आपला मुख्य मुद्दा असावा. जें केवळ सत्य असेल, तेवढयाचाच स्वीकार करावयाचा, अशी दृष्टि आपण बाळगिली पाहिजे. अधविश्वासाचा तडाखा असा जबर आहे कीं, येशू ख्रिस्त, महमद आणि इतर महापुरुष यांसही त्याने सोडिलें नाही पुरातन कालच्या कल्पनाचा त्याग त्याच्यानेंही करवला नाहीं आपण केवळ सत्याकडेच दृष्टि देऊन अधविश्वासाचा पूर्णपणें त्याग केला पाहिजे

आता गीता ग्रथात काय सागितलें आहे, याचा विचार केला पाहिजे. उपनिषद्ग्रंथाचे अवलोकन करतां अनेक प्रकारच्या विषयांच्या गुतागुतींत एखादें महातत्त्व एकदम आढळून येते. एखाद्या घनघोर अरण्यात भटकत असता काट्याकुट्याच्या जाळींत गुरफटलेलें एखादें गुलाबाचें फुल अचानक दिसावे, त्याचप्रमाणें अनेक असंबद्ध विषयाच्या गुतागुतीत एखादें सुदर तत्त्व उपनिषद्ग्रथांत आढळून येते; पण गीतेची गोष्ट उपनिषद्ग्रथाहून वेगळी आहे. अनेक पुष्पें सुदर रीतीनें गुफून शोभिवत हार तयार करावा, त्याप्रमाणें गीतेनें ही सर्व तत्त्वरत्ने यथायोग्य स्थळी गुफून त्याचा नयनमनोहर हार तयार केला आहे. श्रद्धेविषयी उपनिषदांत जागोजाग विवेचन आढळते; पण भक्तीचा फारकरून तेथे उल्लेखही नाही. गीतेत भक्तीचा उल्लेख वारंवार आहे; एवढेंच नव्हे, तर भक्तिमार्गाच्या रहस्याची अत्युच्च परिसीमा गीतेतच आढळून येते.

आता गीतेत कोणत्या मुद्याचें प्रमुखत्वाने विवेचन केलें आहे ते पाहू. गीताकालाच्या पूर्वी जे तत्त्वग्रथ अस्तित्वांत होते, त्यांहून गीतेंत अधिक काय आहे याचा विचार करणें अवश्य आहे. गीताकालापूर्वीही योग, ज्ञान, भक्ति इत्यादि अनेक पथ अस्तित्वांत होते आणि त्या प्रत्येक पथाला पुष्कळ

अनुयायीही होते. आपला मार्ग सर्वांत अधिक श्रेष्ठ आहे, असा तटा या साऱ्या पथांत प्रत्यहीं होत असे. या सर्व मार्गांची एकवाक्यता करण्याचा यत्न कोणीं कधींही केला नाहीं. गीतेच्या कर्त्यानें हें एकीकरण करण्याचा यत्न प्रथम केला. गीताकालीं अस्तित्वांत असलेल्या सर्व पथांत जीं जीं उत्कृष्ट तत्त्वे होतीं, तीं सर्व ग्रहण करून त्याचा हार गुफण्याचे काय भगवद्गीतेच्या कर्त्यानें केलें, परतु ज्या ठिकाणीं भगवान् श्रीकृष्णाचा हा समन्वयाचा यत्न सिद्धीस गेला नाहीं, त्या ठिकाणीं त्याची पूर्तता श्रीरामकृष्ण परमहंसांनीं या एकोणिसाव्या शतकांत पूर्णत्वानें केली आहे.

निष्काम कर्म हा गीतेंतील दुसरा प्रमुख मुद्दा आहे निष्काम कर्म म्हणजे काय, याजबद्दल निरनिराळया लोकाच्या निरनिराळया समजुती आहेत. कित्येक लोक असें म्हणतात कीं, ज्यात कोणतेही ध्येय अथवा साध्य साधावयाचे नसेल तें निष्काम कर्म. निष्काम कर्म याचा अर्थ जर खरोखरच असाच असता, तर अत करणशून्य पशू अथवा या भिती हीं निष्काम कर्म करणाऱ्याचीं उत्कृष्ट उदाहरणें झालीं असतीं. दुसरे पुष्कळ लोक जनकाचें उदाहरण देतात आणि आपण स्वतः जनकतुल्य आहो असें भासवित असतात! केवळ पुष्कळ मुलें जन्मास घालूनच राजा जनकानें ही पदवी मिळविली नाही, पण आमचे हल्लींचे निष्कामकर्मकर्ते केवळ डझन भर मुलाचे बाप होऊनच जनकाची पदवी पटकावू पहात असतात! छे! छे! निष्काम कर्म याचा असा अर्थ नाहीं. पशूमारखें कर्म करणें, दगडासारखे निश्चल असणें किंवा अत करणशून्य बनून जाणें म्हणजे निष्काम होणे नव्हे. निष्काम वृत्ति ही तामसी नसून सत्त्वगुणप्रधान आहे, हे लक्षात बाळगिलें पाहिजे. जो खरोखर निष्काम झाला असेल, त्याच्या हृदयांत जगातील यच्चयावत् व्यक्तीबद्दल प्रेम आणि सहानुकपा यांचा वास असतो. त्याच्या चित्ताच्या या स्थितीचें खरें रहस्य सामान्य जगाला बहुधा समजत नाहीं. अनेक मार्गांचें एकीकरण आणि निष्काम कर्म हे गीतेंतील दोन प्रमुख मुद्दे आहेत

आतां गीतेंतील दुसऱ्या अध्यायास आरभ करू

संजय उवाच—

तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् ।
विषीदन्तमिदं वाक्यमुवाच मधुसूदन. ॥ १

श्रीभगवानुवाच—

कुतस्त्वा कश्मलमिद विषमे समुपस्थितम् ।
अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥ २ ॥
क्लैब्यं मा स्म गम पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ।
क्षुद्र हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परतप ॥ ३ ॥

'त तथा०' इत्यादि शब्दांनीं आरंभिलेल्या या श्लोकात अर्जुनाच्या खऱ्या स्थितीचें चित्र किती सहृदयत्वानें रंगविलें आहे बरें ? यानतर भगवान् श्रीकृष्णांनीं "क्लैब्य मा स्म गम " या शब्दांनीं अर्जुनास भगवान् युद्धास का प्रवृत्त करीत आहेत, याचें कारण हेच कीं, अर्जुनाच्या ठिकाणीं जी युद्धविमुखता प्राप्त झाली होती, ती सत्त्वगुणापासून प्रवृत्त झाली नव्हती. तेथें सत्त्वगुणाचें आधिक्य नव्हते. ही प्रवृत्ति केवळ तमोगुणप्रधान होती. ज्याच्या बुद्धींत सत्त्वगुण प्रामुख्यानें आरूढ झाला असेल, त्याला आयुष्यातील सर्व प्रसग सारखेच वाटत असतात. " वोखटें का गोमटें। ह कांहींच जया नुमटे।" अशी त्याची स्थिति असते. सुख आणि दु ख या दोहोसंबधींही त्याची सारखीच वृत्ति असते; पण अर्जुनाची मन.स्थिति अशा प्रकारची नव्हती, त्याच्या हृदयांत दौर्बल्यानें प्रवेश केला होता. युद्ध करण्याची इच्छा त्याला नव्हती असें नाहीं तो युद्ध करण्यासाठींच रणभूमीवर आला होता, या एका गोष्टीनेंच त्याच्या मनाच्या स्थितीचे परीक्षण होण्याजोगें आहे. आपणा सामान्य मनुष्याच्या आयुष्यातही असे प्रसग अनेकवार उद्भवत असतात. अशा प्रसगीं आपण सात्त्विक आहों, असा भ्रम पुष्कळांस होत असतो, पण ते सात्त्विक नसून भेकड मात्र खास असतात. गलिच्छपणानें वागणारे पुष्कळ लोक स्वत:स परमहंस समजत असतात; कारण परमहसस्थितींतील लोक वेड्यासारखे अथवा गलिच्छ माणसासारखे वागत असतात असें शास्त्रें म्हणतात. परमहस हे बालवृत्तीचे असतात, असें शास्त्रानें सांगितलें आहे; पण ही तुलना केवळ एकपक्षीय आहे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. परमहंस आणि लहान मुलें हीं सर्व प्रकारें सारखींच आहेत, असा भ्रम होऊ देऊ नका. केवळ बाह्यत: त्यांच्या वृत्ती सारख्या दिसत असतात; पण तत्त्वतः परमहस आणि बालक एकमेकापासून दोन ध्रुवां इतक्या अत-

रात असतात. परमहंस हे ज्ञानाच्याही पलीकडच्या स्थितींतील आहेत. बालकाला ज्ञानाची रूपरेषाही अवगत नसते. प्रकाशकिरणाची अत्यत मद आणि अत्यत तीव्र ही दोन्ही आदोलनें आपल्या दृष्टिपथाच्या बाहेर असतात; पण तीव्र आदोलनात उष्णतेची अत्यत परिसीमा झाली असून मद आदोलनांत उष्णतेचा फारसा मागमूसही नसतो. ही स्थिति सत्त्व आणि तम या दोन गुणाच्या स्वरूपास लागू आहे. केवळ बाह्यत त्याचें स्वरूप काहीं अशीं सारखें दिसते, पण त्याच्या खऱ्या स्वरूपात जमीन अस्मानाचें अतर आहे हे ध्यानात ठेविलें पाहिजे. सत्त्वाच्या पोषाखात वावरण्याचा मोह तमोगुणाला वारंवार होत असतो. अर्जुनाच्या ठिकाणी हा तमोगुण दयेच्या रूपानें उद्भवला.

अर्जुनावर जी ही तमोगुणाची झडप पडली होती आणि तीमुळें जो मोह त्याला प्राप्त झाला होता, तो घालविण्यासाठीं भगवतानीं कसा उपाय केला आहे हे पहा. कोणी एखादा मनुष्य पापी असला, तर त्याला तूं पापी आहेस असा उपदेश करून, त्याला हिणविण्यात फायदा नाही, असें मी तुम्हास वारवार सांगत असतो. उलट अशा मनुष्याच्या ठिकाणीं जी अतस्थ चैतन्यशक्ति असते, तिच्याकडे त्याचे लक्ष आपण वेधविलें पाहिजे. भगवान् अर्जुनाला म्हणतात, "हें क्लैब्य तुला शोभत नाही. तूं अविनाशी असा आत्मा आहेस, या तुझ्या खऱ्या आत्मभावाचा तुला विसर पडला आहे आणि त्यामुळे तू स्वत.ला पापी समजत आहेस आणि शरिराच्या आणि मनाच्या कष्टानीं दु.ख पावत आहेस भगवान् आणखी म्हणतात, "क्लैब्य मा स्म गम पार्थ।" "पार्था, तुझ्या ठिकाणीं भेकडपणा शिरू देऊ नकोस. पाप, दु.ख, रोग इत्यादिकास या जगात अस्तित्व नाही. पाप या नांवाला खरोखर योग्य अशी जर एखादी स्थिति असेल, तर ती स्थिति दौर्बल्य हीच होय. तुझ्यांतील गुप्त असलेलें चैतन्य ज्या ज्या कार्यानें व्यक्तदशेस येतें, तें सर्व कार्य पुण्यरूप आहे, आणि ज्यामुळें तुझें मन अथवा शरीर यांच्या ठिकाणीं दुर्बलता उत्पन्न होते, तें कार्य पापरूप आहे हे नित्य ध्यानांत ठेव. याकरितां हृदयांतील या दौर्बल्याचा प्रथम त्याग कर. तू वीर असल्यामुळें तुला हें नपुसकत्व शोभत नाहीं." माझ्या मुलांनो "क्लैब्यं मा स्म गम. पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते।" या एकाच उपदेशाचा घोष साऱ्या जगभर तुम्हीं केला, तर जगांतील

सर्व रोग, दु खें आणि पातके या अवनीतलावरून तीन दिवसात पळून जातील! दौर्बल्याच्या या साऱ्या कल्पना एकदम गाडल्या जातील !! सध्या या दौर्बल्याचे कप सर्वत्र उद्भवत आहेत. हा ओघ आपण परत फिरविला पाहिजे हा ओघ उलटा झाला, तर केवढा चमत्कार होईल पहा! तुम्ही सर्व शक्तिमान् आहां तुम्ही प्रत्यक्ष तोफेच्या तोंडावर चालून गेला, तरी तुम्हास भीति कशाची? कोणीही एखादा भयकर पापी असला तरीसुद्धा त्याजबद्दल द्वेषबुद्धि बाळगू नका. त्याच्या बाहेरील आवरणाकडे असलेली तुमची नजर फिरवून ती अतर्वर्ती करा त्या आवरणाच्या आंत जो परमात्मा आहे त्याचें दर्शन घ्या. सर्व जगाला उच्च घोषानें इतकेच सागा कीं, "तुम्हीं पापी नाहीं. तुमच्या ठिकाणीं दु.खाचा वास नाहीं. जगांतील सर्व सामर्थ्याचा झरा तुम्हीच आहा. जागे व्हा, आणि तुमच्यात असलेलें हे सामर्थ्य व्यक्तदशेस आणा."

"क्लैब्यं मा स्म गम " इत्यादि हा एकच श्लोक जो कोणी वाचील, त्याला सर्व गीतेच्या पठणाचे पुण्य प्राप्त होईल. गीतेंत ज्या अनेक तत्त्वांचा ऊहापोह केला आहे, त्या साऱ्यांचें रहस्य या एकाच श्लोकात सांठविलें आहे.



# भक्ति.



( पंजाबांत सियालकोट येथें दिलेलें व्याख्यान )

[ पजाब आणि काश्मीर येथून आलेल्या बोलावण्यांचा स्वीकार करून स्वामी विवेकानद कांहीं दिवस त्या भागात प्रवास करीत होते. काश्मिरात ते एक महिनाभर होते, आणि काश्मीरचे महाराज व त्यांचे बंधु यानीं स्वामीजींच्या कामगिरीची फारच तारीफ केली तेथून ते मुरी, रावळपिंडी आणि जम्मू येथे गेले होते; आणि या सर्व ठिकाणीं त्यांनी व्याख्यानें दिलीं. यानतर ते सियालकोट येथें गेले आणि तेथे एक इग्रजींत आणि एक हिंदींत अशी दोन व्याख्यानें त्यांनीं दिलीं. हिंदींत दिलेल्या त्याच्या व्याख्यानाचा विषय भक्ति हा होता ]

या जगात अनेक धर्म असले तरी त्यातील पूजनाच्या प्रकारातच काय तो भेद असून, वस्तुतः या सर्वांचें ऐक्य आहे. कित्येक ठिकाणीं लोक देवळें बाधतात आणि पूजा करतात, कित्येक ठिकाणीं अग्नीच्या पूजेचा प्रघात आहे, आणि दुसऱ्या कित्येक ठिकाणीं अनेक देवदेवताच्या प्रतिमा करून त्याचें पूजन केलें जाते. याशिवाय कित्येक निरीश्वरवादीही आहेत. हे सर्व पथ वस्तुत. खरे आहेत; कारण, यांतील पूजाप्रकाराच्या अतस्थ हेतूकडे आणि अतस्थ धर्मांकडे तुम्हीं लक्ष दिलें, तर त्या सर्वांत एकच सत्य भरून राहिलें आहे असें तुमच्या लक्षात येईल. कांहीं धर्म असे आहेत कीं त्यात परमेश्वराच्या पूजनाचा प्रकार नाहीं, एवढेंच नव्हे, तर परमेश्वराचें अस्तित्वही त्यांस मान्य नाही, पण याच धर्मात जे कोणी महापुरुष होऊन गेले, त्याचे पूजन परमेश्वराप्रमाणें होत असतें. अशा प्रकारच्या धर्माचें चांगलें उदाहरण म्हटले म्हणजे बौद्धधर्म होय. भक्तीची व्याप्ति सर्व धर्मात आहे. मग ती भक्ति परमेश्वराबद्दल असो, अगर महापुरुषांबद्दल असो; उपासनेला सर्व धर्मानीं प्रमुखस्थान दिलें आहे, आणि ज्ञानापेक्षां भक्तीचा मार्ग अधिक सुकरही आहे. द्रव्यसपादनासाठी विशेष प्रकारची अनुकूल परिस्थिति आणि दीर्घ परिश्रम यांची आवश्यकता असते योगासंबधीं पाहातां अत्यंत सुदृढ प्रकृती आणि सासारिक बधनांपासून पूर्ण

मुक्तता हीं असल्याखेरीज योगविद्या साध्य होत नाहीं, पण भक्तिमार्गांत अशा प्रकारची कोणतीही अडचण नसून संसारांतील सर्व परिस्थितींत ती साध्य करून घेता येते. ईश्वराच्या ठिकाणीं परम अनुराग अशी भक्तीची व्याख्या शांडिल्य ऋषीनीं केली आहे प्रल्हादाची व्याख्याही याच अर्थाची आहे. एखाद्या मनुष्याला एक दिवस अन्न मिळालें नाहीं तर त्याची काय स्थिति होते अथवा एखाद्याचा पुत्र मरण पावला तर त्याच्या चित्ताला कशा प्रकारच्या वेदना होतात, हें लक्षात आणा. परमेश्वरदर्शनासाठीं अशाच प्रकारच्या वेदना खऱ्या भक्ताच्या अंतःकरणात होत असतात. भक्तीचा खरा उपयोग चित्तशुद्धि हा होय. परमेश्वराच्या ठिकाणीं खरी भक्ति निर्माण झाली तर चित्तशुद्धीसाठीं अन्य उपायांची जरूर नाहीं. भक्त म्हणतो, "परमेश्वरा, तू अनंत नांवानीं ओळखला जातोस, तथापि त्यापैकीं प्रत्येकात तुझेंच सामर्थ्य भरलेलें असून, तुझें प्रत्येक नाव अत्यंत गूढ आणि खोल अशा अर्थानें भरलेलें आहे." भक्तीला कोणत्याही प्रकारच्या उपाधीची आवश्यकता नाहीं. काल अथवा स्थल यांचा विचार चित्तात न आणता आपण सदोदित परमेशचिंतन करीत असावें.

परमेश्वराचें स्वरूप अनेक नावांनीं जाणलें जात असलें, तरी हा फरक केवळ बाह्य आहे हें अगोदरच सांगितले आहे. प्रत्येकाला आपापला मार्ग हा मुक्तिलाभाचा निश्चित उपाय आहे असे वाटत असते, पण या सर्वांच्या मुळाशीं काय आहे याचा विचार केला, तर तेथे एकच सत्य आपणांस आढळून येईल. शैव हे शिवाला सर्वशक्तिमान् समजतात, वैष्णवाच्या मते विष्णु हा सर्वशक्तिमान् असून, देवीभक्ताच्या मतें देवीच्या ठिकाणीं विश्वातील सर्व सामर्थ्य एकवटलेलें असते. द्वेषबुद्धि हा भक्तीच्या मार्गातील भयंकर अडथळा आहे. द्वेषबुद्धि ज्याच्या चित्तातून समूळ नाहीशी झाली असेल त्यालाच परमेश्वराची प्राप्ति होते; पण अशा स्थितीतही स्वत च्या इष्टदेवतेचें पूजनच आवश्यक आहे. हनुमान म्हणतो, "शिव, विष्णु, राम हे सर्व एकच आहेत, हे मी जाणतों, तथापि कमलनेत्र रामालाच मी आपल्या हृदयांत सांठविलें आहे. प्रत्येक मनुष्याला जन्मापासूनच त्याचे स्वतःचे विशेष भाव प्राप्त झालेले असतात आणि ते भाव मरेपर्यंत कायम राहतात. "स्वभावो दुरतिक्रमः" हें वचन आपणास ठाऊक असेलच. जगांत अनेक धर्म अस्तित्वांत

येण्याचें कारण हेंच आहे. ईश्वर करो, आणि साऱ्या जगाचा एकच धर्म असे कधींही न होवो. साऱ्या जगाचा एकच धर्म झाला तर सर्वत्र गोंधळ मात्र माजेल सध्याच्या अनेकतेंतही जी एकतानता आढळून येते, ती तशा स्थितीत आढळून येणार नाहीं. प्रत्येकानें आपापल्या इष्टमार्गाने जाणें हेंच योग्य आहे तो अशा मार्गावर आरूढ असता त्याच मार्गात पुढे गेलेला कोणी गुरु त्याला भेटला, तर तो त्याला पुढील मार्ग दाखवील प्रत्येकाचे जे अतस्थ भाव असतील, त्यास धरूनच प्रत्येकानें आपली उन्नति करून घेतली पाहिजे. कोणी एखादा मनुष्य आपल्या विशिष्ट मार्गानें जात असतां, अपण त्याला दुसऱ्याच एखाद्या मार्गावर घातलें, तर त्याची 'इतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः' अशी स्थिति मात्र होण्याचा सभव आहे शरिराच्या स्वरूपांतही एक मनुष्य दुसऱ्यासारखा आढळून येत नाही. अशाच रीतीनें प्रत्येक मनुष्याची प्रकृति वेगळी असते, अशी स्थिति असता प्रत्येकाला ज्याच्या त्याच्या मार्गानें जाऊ देणें हेंच योग्य नाहीं काय ? नदीचा प्रवाह आपल्या विशिष्ट मार्गानें जात असता तोच मार्ग आपण अधिक सरळ केला, तर तो प्रवाह अधिक झपाट्यानें वाहू लागतो; पण त्याला भलतेंच वळण देण्याचा यत्न आपण केला, तर इष्टकार्य अधिक दुष्कर मात्र होते. आपले आयुष्य अतिशय मोलाचें आहे, याकरिता त्याचा उपयोग आपल्यातील विशिष्ट भावांच्या पोषणाकडेच केला पाहिजे. हिंदुस्थानात धर्मद्वेष कधींही अस्तित्वांत नव्हता. सर्व धर्म परस्परद्वेषाशिवाय एकत्र नादत होते. आपलाच मार्ग तेवढा खरा आणि जो त्यावर विश्वास ठेवीत नाहीं तो मूर्ख, अशा कल्पना चित्तांत उद्भवल्या म्हणजे तेथें द्वेषाचे बीज रुजलें जातें. जो कोणी आपल्या मार्गास अनुसरत नाही, तो निवळ दांभिक असला पाहिजे असे वाटूं लागतें.

जगांतील सर्व लोकांनीं एकच धर्म पाळावा, अशी परमेश्वराची इच्छा असती, तर इतके धर्म कां निर्माण झाले असते ? सर्वांवर एकच धर्म लादण्याचे प्रयत्न आजपर्यंत पुष्कळ वेळा झाले आहेत, आणि ते फुकटही गेले आहेत. कित्येक वेळा अशा प्रयत्नात तरवारीचाही उपयोग करण्यात आला होता, पण यामुळें जगाचा एक धर्म न होतां, तेथें आणखी नवे दहा धर्म मात्र निर्माण झाले, असें इतिहास आपणास सांगत आहे. एकच धर्म सर्वांस

सारखा उपयोगी पडेल असें नाहीं. जगात क्रिया आणि प्रतिक्रिया अशा दोन शक्ती नेहमीं चालू असतात. यामुळेंच मनुष्याला विचारशक्ति प्राप्त झाली आहे. यामुळेंच विविधताही उत्पन्न झाली आहे. अशा प्रकाराच्या शक्ती विश्वात अस्तित्वांत नसत्या तर, मनुष्याला विचारशक्तिही प्राप्त झाली नसती मनुष्य हा विचारशून्य प्राणी आहे मनुष्याला मन आहे आणि हें मन नष्ट झालें, तर त्याची विचार करण्याची शक्ति जाते, आणि तो पशूच्या पदवीप्रत जाऊन पोंचतो. अशा प्रकारचा मनुष्यप्राणी कोणाला आवडणार आहे? परमेश्वर करो आणि हिंदुस्थानाला अशी स्थिति कधींही प्राप्त न होवो विश्वातील एकतानतेंत विविधता असणे हें अत्यत इष्ट आहे. मनुष्यप्राण्यामध्ये जें कांहीं सामर्थ्य आज आढळून येतें, ते या विविधतेचेंच फळ आहे. सर्व प्रकारच्या परिस्थितींत विविधता पाहिजेच. विविधता आहे तोंपर्यंतच जगाचे अस्तित्व शक्य आहे हा हलका आणि तो थोर असा मात्र विविधता या शब्दाचा अथ समजू नये. आपापल्या परिस्थितींत प्रत्येक मनुष्यानें आपल्या आयुष्यातील कर्तव्ये उत्तम रीतीनें बजाविली, तर ती विविधता आपोआपच उत्पन्न होईल. प्रत्येक धर्मांत चागलीं आणि कार्यकर्तीं माणसें निपजलीं आहेत, आणि त्याच्या-मुळेच त्यांच्या धर्माला मानाचें पद प्राप्त झाले आहे, आणि प्रत्येक धर्मात ज्या अर्थी अशा प्रकारचे लोक निर्माण होतात, त्या अर्थी कोणत्याही धर्माचा द्वेष करण्याचें कारण आम्हास नाहीं. एखादा धर्म अनीतिप्रवर्तक असला तर अशा धर्माबद्दलही पूज्यबुद्धि बाळगावी कीं काय, असा प्रश्न कोणी कोणी विचारतात. अशा प्रश्नाला नाहीं हेंच निश्चित उत्तर होय अशा प्रकारच्या धर्मामुळें अगर पथामुळे बऱ्या-पेक्षां वाईटच अधिक होण्याचा सभव असल्यामुळें, असा पंथ जगातून नष्ट करणें, हेंच फायद्याचें आहे. प्रत्येक धर्माच्या मुळाशी नीति आणि आचार हीं अवश्य असलीं पाहिजेत. आचार याचा अर्थ केवळ बाह्य वर्तन असा समजू नये. शरिराची आणि मनाची जी शुद्धि, तिचें नाव आचार. शास्त्रांत सागितलेल्या रीतीनें पाणी आणि इतर वस्तू यांच्या साह्यानें शरीर-शुद्धि प्राप्त करून घेतां येते. सत्यभाषण आणि नीतिमार्गाचा अवलब याच्या योगानें मनःशुद्धि प्राप्त करून घेतली पाहिजे. त्याच प्रमाणे परोपकार हाही

मन:शुद्धीला आवश्यक आहे. तुम्हीं काहीं पातक केलें नाहीं, तुम्ही खोटें बोललां नाहीं, दारू प्याला नाहीं, जुगार खेळलां नाहीं अथवा चोरी केली नाहीं, तर तें चांगलेंच; पण तेवढयामुळें तुम्ही मोठ्याशा स्थितीला पात्र होतां असें मात्र नाहीं; कारण अशा प्रकारच्या वर्तनानें तुम्ही फक्त आपलें कर्तव्यच करीत असतां. याकरिता परोपकार हा फार आवश्यक आहे. तुम्ही ज्याप्रमाणें स्वतःचें हित पहाता, त्याचप्रमाणें परक्याचेंही पाहिलें पाहिजे. या ठिकाणीं भोजनाबद्दल चार शब्द मला सांगावयाचे आहेत. आपल्या जुन्या चालीरिती नष्ट झाल्या आहेत, आणि त्याऐवजीं आज " हा अगर तो पंक्तिबाह्य " एवढीच कल्पना शिल्लक उरली आहे. शेकडों वर्षांपूर्वी जे नियम आपल्या पूर्वजांनीं घालून ठेविले होते, त्यांच्या मुळाशी असलेलें शुचितेचे तत्त्व अद्यापही शिल्लक आहे. शास्त्रदृष्टया तीन प्रकारचें अन्न त्याज्य मानलें आहे. जातिदोष हा पहिला प्रकार होय. लसूण किंवा कांदा इत्यादि पदार्थांप्रमाणें ज्यात स्वभावतःच दोष असतात, असा पदार्थ शास्त्रानीं त्याज्य मानिला आहे. अशा प्रकारचे पदार्थ अधिक भक्षण केले, तर त्यामुळे रजोगुण वाढतो, आणि त्यामुळे मनुष्याच्या हातून नीतीचा अतिक्रम होण्याचा संभव असतो. त्याचप्रमाणें अशुद्ध जागेंतही अन्नभक्षण करू नये, असें शास्त्रात सागितलें आहे. भोजनाची जागा स्वच्छ आणि पवित्र असावी तसेंच ज्याला दुष्ट मनुष्याचा स्पर्श झाला असेल, असें अन्नही शास्त्रानें त्याज्य मानिलें आहे. अशा प्रकारच्या अन्नसेवनानें आपल्या चित्तात वाईट कल्पना उत्पन्न होण्याचा संभव असतो. कोणी एकादा जातीनें ब्राह्मण असतां अनीतिमान असला, तर त्या ब्राह्मणाच्याही हाताचे अन्न सेवन करू नये.

या नियमांत जीं तत्त्वें अंतर्भूत झालीं आहेत, तीं आपण विसरलों आहों. या नियमांच्या पोटातील रहस्य नष्ट होऊन बाहेरील फोलकट मात्र आपण उराशीं बाळगिलें आहे. यामुळें कसा विपर्यास झाला आहे पहा. एखादा मनुष्य कितीही पवित्र आणि कितीही चांगला असला, तरी तो उच्च वर्णाय नसेल तर त्याच्या हातचें अन्न आपण सेवन करीत नाहीं. आपल्या जुन्या नियमांची उपेक्षा पूर्णत्वानें पहावयाची असेल, तर ती सध्याच्या विश्रांतिगृहांत अथवा मिठाईवाल्यांच्या दुकानात उत्तम रीतीनें आढळून येईल. तेथील पदार्थांवरून माशांचे थवेच्या थवे घोंघावत असतात, आणि भरींत भर

घालण्यास रस्त्यांतील धुळीचा लोटही त्यांजवर हल्ले करीत असतो; आणि या पदार्थांच्या स्वच्छपणाला शोभण्याइतकीच त्या विकणाराची स्वच्छता असते. अशा प्रकारच्या दुकानांवर गिऱ्हाइकानीं पूर्णपणें बहिष्कार घातला पाहिजे. अशा रीतीनें केलेली जिनसांची विक्री बद झाली तर कॉलरा, प्लेग इत्यादि अनेक रोगांच्या जन्तूच्या प्रसारास आळा बसेल. पुरातनकालापेक्षां आपण खरोखर अधिक सुधारलें पाहिजे, पण तसें होण्याऐवजीं दिवसेंदिवस आपण अधिक मार्गे मात्र जात आहों. पाण्यात थुकू नये असे मनु म्हणतो, पण घरातील सर्व घाण नदींत फेंकून देण्याची आपली चालू वहिवाट आहे. आपल्या एकदर राहाणीकडे पाहता शरीरशुद्धीची आपणास अत्यत जरूर आहे, असें दिसून येते. शास्त्रकाराना हें सर्व कळत होतें आणि त्याकरितांच त्यानी शुचितेचे नियम घालून दिले होते, पण अगोदर म्हटल्याप्रमाणे त्यातील रहस्य नष्ट होऊन केवळ अक्षरे मात्र आपणाजवळ शिल्लक राहिलीं आहेत. चोर, दारुबाज, आणि अनेक प्रकारचे आततायी लोक आपले ज्ञातिबधु होऊ शकतात, आणि त्याजबरोबर आपला अन्नव्यवहारही होतो, पण एखादा मनुष्य दुसऱ्या एखाद्या सत्त्वशील पण हलक्या जातीच्या मनुष्याबरोबर जेवला, तर त्याची उच्च जात नष्ट होते आणि त्याजवर बहिष्कार पडतो. अशा प्रकारच्या समाजपद्धतीनें आपल्या देशाचे भयकर नुकसान केलें आहे. याकरिता आपण स्पष्टपणें इतकेंच लक्षात बाळगिलें पाहिजे कीं, पातक्याशीं स्पर्श झाल्यामुळेंच आपण पातकी होऊ शकतों, आणि पुण्यशीलाशीं झालेल्या स्पर्शाने आपण पुण्यशील होतो दुष्ट मनुष्याला स्पर्श न करणे, हाच बाह्यशुद्धीचा उपाय आहे. अत शुद्धि ही याहून अधिक खडतर आहे. सत्यवचन, परोपकार इत्यादि अतःशुद्धीचे मार्ग आहेत. आपण सदोदित सत्यच बोलत असतों काय ? कोणी एखादा आपल्या कामासाठीं एखाद्या श्रीमताच्या घरीं जातो आणि आपण मोठे परोपकारी आहा, अशा प्रकारे त्याची मिथ्या स्तुति करतो. कदाचित् तो श्रीमंत मनुष्य खरोखर अनेकाचे गळे कापीत असेल ! अशी स्थिति म्हणजे निवळ असत्य वचन नव्हे काय ? अशा प्रकारच्या प्रलापानीं आपण आपलें मन बिघडवीत असतों, हे लक्षांत ठेविलें पाहिजे. बारा वर्षेपर्यंत चित्तांत कोणत्याही प्रकारच्या वाईट कल्पनेचा स्पर्शही होऊ न देतां ज्यानें अशा रीतीनें अत.शुद्धि संपादिली

असेल, त्याच्या तोंडांतून निघणारा प्रत्येक शब्द खरा होईल यात शंका नाहीं. सत्याचा प्रभाव असा आहे अशा रीतीने बाह्यशुद्धि आणि अंत शुद्धि याची जोड ज्याला मिळाली असेल, तोच भक्तिमार्गात पाऊल ठेवण्यास योग्य होईल; पण खरी भक्ति ही स्वत'च इतकी सामर्थ्यवान् आहे की, ती मन - शुद्धीचें कार्य बऱ्याच मोठ्या प्रमाणावर संपादू शकते. बाह्यशुद्धीकडे यहुदी, मुसलमान आणि ख्रिस्ती याचे हिंदूइतके लक्ष नसलें तरी थोड्याबहुत प्रमाणानें बाह्यशुद्धीची आवश्यकता त्यासही कबूल आहे. यहुदी लोकात मूर्तिपूजेचा निषेध आहे, तथापि त्याचेही एक देऊळ बाधलेलें होते त्या देवळांत एक मोठी पेटी ठेविलेली असे. त्या पेटीला ' आर्क ' असें नाव होतें. त्या पेटीत नीतिग्रंथ ठेविलेले होते, आणि तिजवर दोन देवताच्या प्रतिमा असून परमेश्वर त्या प्रतिमाच्या मध्ये मेघाच्या रूपानें अवतरतो, असा त्यांचा समज असे ते देऊळ नष्ट झाल्यास आज पुष्कळ काळ लोटून गेला आहे, पण त्यानतर जी नवी देवळे बाधण्यात आली किंवा येत आहेत, ती या नमुन्याबरहुकूमच आहेत रोमन कॅथोलिक आणि ग्रीक ख्रिस्ती याजमध्येंही कोणत्याना कोणत्या स्वरूपाची मूर्तिपूजा चालू आहेच जीझस याचा बाप आणि त्याची आई याच्या प्रतिमेचे पूजन ते करीत असतात. प्रॉटेस्टट ख्रिस्ती लोकात प्रतिमापूजन नाहीं, तथापि व्यक्तिविशिष्ट परमेश्वराची अर्चा ते करतात यामुळे हाही मूर्तिपूजेचाच एक प्रकार आहे असें म्हणणें अयोग्य नाहीं. पारशी आणि इराणी लोकांत अग्निपूजेचा प्रकार आहे मुसलमान लोकात आद्यगुरु आणि इतर संतलोक याची पूजा करितात. या सर्व गोष्टीचा विचार करता आपणांस असें आढळून येईल कीं, मनुष्यप्राणी धर्ममार्गाच्या पहिल्या पायरीवर आरूढ होत असता त्याला कसल्यातरी बाह्योपचाराची आवश्यकता असते. बाह्योपचारानीं अंत शुद्धि प्राप्त झाली म्हणजे अधिक निरुपाधिक तत्त्वांकडे त्याचे लक्ष्य वळते. जीवाचा बाह्याशी संबध जोडून ज्ञानमार्गावर आरूढ होणे ही मध्यम उपासना होय. जप ही अधम उपासना मानिली असून केवळ बाह्योपचार हा पूजनाचा अधमाधम प्रकार होय, पण ह्या अधमाधम प्रकाराचा आचार करणेही अनिष्ट नाहीं हे लक्षात ठेविलें पाहिजे. प्रतिमेचें पूजन म्हणजे पातक नव्हे हे विसरता कामा नये. आपल्या हातून जें जें होण्यासारखें असेल, तोच आचार प्रत्येकानें करावा हें इष्ट आहे.

त्याच्या मार्गातून त्याला नष्ट केलें तर तो आणखी तिसराच मार्ग स्वीकारील. याकरिता प्रतिमापूजकाबद्दलही आपण अनिष्ट बोलू नये त्याच्या पायरी-प्रमाणे प्रतिमापूजनच त्याला युक्त असेल. अशा मनुष्याना अधिक शहाण्यांनीं मदत करून त्याना चागला मार्ग दाखवावा, पण अशा प्रकारच्या पूजनाच्या प्रकाराबद्दल नुसते तटे करीत बसणें हें मात्र इष्ट नाही.

कित्येक लोक सपत्तीसाठीं परमेश्वराची पूजा करीत असतात. तसेच दुसरे कित्येक संततीसाठीही भक्ति करीत असतात, आणि हे लोकही आपणास भागवत म्हणवीत असतात पण ही भक्ति नव्हे आणि हे खरे भागवतही नव्हत. आपण किमया करतों असे सांगणारा एखादा बैरागी भेटला तर हे लोक त्याजकडे धावत जातात अशाना भागवत हें नाव कधीही देता येणार नाही. सततीसाठीं अथवा सपत्तीसाठीं परमेश्वरपूजन करणें ही भक्ति नव्हे. फार काय, पण स्वर्गाच्या आशेनेंही केलेली भक्ति हीसुद्धां खरी भक्ति नव्हे. नरकयातनांतून सुटण्यासाठी केलेली भक्ति हीसुद्धा खरी भक्ति नव्हे. मुख्य मुद्दा हा कीं, भीति किंवा आशा यापासून ज्या भक्तीचा उद्भव होतो, ती खरी भक्ति नव्हे खरा भगवद्भक्त काय म्हणतो पहा, देवा, मला सुदर स्त्री नको, मला ज्ञान नको अथवा मुक्तीही नको, मला शेकडों जन्म प्राप्त व्हावे आणि जन्मोजन्मी तुझी सेवा घडावी इतकीच माझी इच्छा आहे. अशा प्रकारच्या पदवीला जो पोहोचला आणि ज्याला प्रत्येक वस्तु परमेश्वराचें स्वरूप दिसूं लागली तोच पूर्ण भक्त होय. अशा भक्ताला गवताच्या पातीपासून तो ब्रम्हापर्यंत सर्वत्र परमेश्वराचा वास दिसत असतो अशा स्थितीत वस्तुमात्र हे परमेश्वराचेंच व्यक्त रूप आहे, असा प्रत्यय त्याला येतो. परमेश्वराव्यतिरिक्त कोणत्याही वस्तूला या जगात अस्तित्व नाहीं हें त्यास दिसतें. अशा स्थितीस आपण खरोखर किती क्षुद्र आहों, याची साक्ष पटते; आणि अशा स्थितींतच भक्ताच्या खऱ्या अतर्यामानें तो परमेशपूजन करीत असतो. तीर्थाटनादि बाह्यपूजोपचारविधि त्याच्या स्थितीत मागे पडून गेलेले असतात, कारण प्रत्येक मनुष्य हे चालतेंबोलतें देवालय आहे असें त्याला दिसत असते. शास्त्रांनीं भक्तीचें वर्णन अनेक प्रकारें केलें आहे. परमेश्वर पिता आहे अथवा परमेश्वर माता आहे इत्यादि प्रकारचें वर्णन शास्त्रें करीत असतात. अशा प्रकारचे संबध आपल्या चित्तांत उत्पन्न करून

देण्यांत परमेश्वराबद्दलचा भक्तिभाव अधिक दृढतर करावा, असा शास्त्रांचा हेतु आहे; अशा दृष्टीनें परमेश्वराला तीं नावें देणें न्याय्य आहे. परमेश्वराबद्दल खऱ्या भक्ताच्या अंत:करणात जो उमाळा फुटत असतो, तो दर्शविण्यासाठीं या नांवाची योजना आहे रासलीलेंतील राधा आणि कृष्ण यांची कथा पहा. भक्तीचे खरें रहस्य या कथेंत साठविलें आहे. स्त्री आणि पुरुष यांमध्ये जें प्रेम परस्पर उद्भवू शकतें, त्याहून उच्चतर असें प्रेम या जगात नाही. अशा प्रेमात भीतीचा लेशही नसतो अशा प्रेमांत त्या दोघास परस्पर अभेद्य रीतीनें बाधणारा असा जो संबध असतो, त्यावाचून दुसऱ्या कोणत्याही भावनेला तेथे थारा मिळत नाही. आईबापांबद्दल मुलाच्या चित्तात जें प्रेम असते, त्यांत आदरबुद्धीमुळें उत्पन्न होणाऱ्या भीतीची भेसळ असते. परमेश्वर आपला रक्षणकर्ता आहे, यावाचून दुसरा कोणताही भाव आपल्या चित्तात असू नये. जगांत आपला प्रेमाचा साठा काय तो एक परमेश्वर, हे लक्षात ठेवून चित्तास भीतीचा लेशही शिवू न देतां, आपण त्याची भक्ति केली पाहिजे ज्या वेळीं सर्व प्रकारच्या वासना आपल्या चित्तातून नष्ट होतील, परमेश्वरप्राप्तीवाचून दुसरी कसलीही आशा आपणास उरणार नाही आणि ज्या वेळीं आपण फक्त त्याच्याच करिता वेडे बनून जाऊ, त्या वेळींच परमेश्वराबद्दल खरें प्रेम आपल्या चित्तात उत्पन्न होईल एखाद्याला आपल्या प्रीतिप्रात्राबद्दल जे प्रेम असते, तेच प्रेम परमेश्वराबद्दल आपल्या चित्तात उत्पन्न झालें पाहिजे. राधेच्या चित्तात कृष्णाबद्दल कशा प्रकारचें प्रेम होते हें ग्रंथातरीं वाचून पहा, म्हणजे तुम्हांला परमेश्वराबद्दलच्या खऱ्या प्रेमाची कल्पना येईल, पण राधेच्या भक्तीचे रहस्य कितीकास कळते? विषयाग्नीच्या ज्वाला ज्याच्या रोमरोमात भडकलेल्या आहेत आणि ज्याना नीतीची पुसट कल्पनाही नाही, अशा मनुष्याना हें रहस्य कळावे तरी कसें? चित्तातून सर्व लौकिक विचारांस रजा देऊन केवळ नैतिक आणि धार्मिक अशा वातावरणांतच जे संचार करीत असतील, अशांना अत्यंत गहन असे विचारही आपोआप सुलभ होतील. असे लोक अशिक्षित असले तरी महापंडित होतील, पण अशा स्वभावाचे लोक कितीसे सापडणार? स्वत:च्या फायद्याकरिता मनुष्यप्राणी धर्मतत्त्वांची अवहेलना करून आपणास परवडेल असें हवे तें स्वरूप त्यांस देत असतो. अशा प्रकारची गडबड ज्यात करता

येणार नाहीं, असा एकही धर्म या जगांत नाहीं. उदाहरणार्थ आत्मा आणि देह हीं भिन्न आहेत, असें आपल्या धर्मात सांगितलें आहे. अशा स्थितींत एखादा मनुष्य पातक करतो आणि म्हणतो कीं, आत्मा आणि देह हीं भिन्न असल्यामुळें देहाच्या पातकामुळें आत्मा लिप्त होत नाहीं. ज्यानें त्यानें आपला धर्म खऱ्या अंतःकरणानें पाळला, तर चित्तशुद्धि प्रत्येकाला प्राप्त होण्यासारखी आहे. मग तो हिंदु असो, मुसलमान असो अथवा ख्रिस्ती असो; पण प्रत्येक मनुष्य स्वतःच्या प्रकृतीस अनुरूप असें वर्तन करीत असतो, हें नाकबूल करतां येणार नाहीं. परमेश्वराचें नांव कानीं पडल्याबरोबर भान विसरणारे असेही लोक जगांत असतात. परमेश्वराचें नांव कानीं पडतांच, ज्याच्या नेत्रातून आनंदाश्रूचे पूर वाहू लागतात, तेच खरे भगवद्भक्त होत.

भक्तीच्या पहिल्या पायरीवर असतां परमेश्वर हा आपला धनी आणि आपण त्याचे सेवक अशी भावना भक्ताच्या चित्तांत असते. आपल्या आयुष्यक्रमात लागणाऱ्या वस्तूही परमेश्वर पुरवीत असतो, असे त्याला वाटत असतें. अशा प्रकारचे विचार चित्तातून दूर करा. विश्वांतील यच्चयावत् वस्तूंची चालकशक्ति एकच आहे आणि ती शक्ति म्हणजे परमेश्वर होय. याच शक्तीच्या हुकुमानें सूर्य, चंद्र आणि इतर वस्तू परिभ्रमण करीत आहेत. विश्वांत जें कांहीं बरें किंवा वाईट असेल ते सर्व त्याचेंच आहे. आपल्या आयुष्यक्रमात जें कांहीं बरेंवाईट घडून येते, ते सर्व आपणांस परमेश्वरासन्निध नेत असतें. स्वतःची एखादी इच्छा तृप्त करण्याकरितां एक मनुष्य दुसऱ्याचा खून करितो, पण या कृतीच्या मुळांतही प्रेमाचेंच वास्तव्य आहे. तें प्रेम त्याच्या ठिकाणीं केवळ स्वतःबद्दल असेल अथवा दुसऱ्या कोणाबद्दल असेल. आपण एखादी बरी अथवा वाईट कृती केली, तरी ती करण्यास उत्तेजित करणारी शक्ति प्रेम हीच होय. एखाद्या वाघानें एखादा बैल मारला तर तें कृत्य त्यानें स्वतःच्या अथवा आपल्या बच्च्याच्या प्रेमाकरिताच केलेलें असतें. परमेश्वर केवळ प्रेमरूप आहे व वस्तुमात्रात तो भरून राहिला आहे. आपणाला कळत असो अथवा नसो आपण एकसारखे परमेश्वराकडेच धाव घेत आहों. एखाद्या स्त्रीचें तिच्या पतीवर प्रेम असतें, तें त्याच्यांतील अंतर्भूत परमेश्वरस्वरूपावर असतें हें तिच्या लक्षांत येत नाहीं. हें परमेश्वराचें

प्रेममय स्वरूप सर्वत्र पाहणें हेंच त्याचें खरें पूजन होय. परमेश्वर केवळ उत्पन्नकर्ता आणि रक्षणकर्ता आहे एवढीच भावना चित्तांत असली, तर नुसत्या औपचारिक पूजेवांचून दुसऱ्या प्रकारची पूजा आपणांस करता येणें शक्य नाही. परमेश्वराच्या प्रेममय स्वरूपाची जेव्हा आपणास सर्वत्र ओळख पटेल आणि ज्या वेळीं आपण त्याला सर्व वस्तूत पाहू शकू त्याच वेळीं खरे भक्त या नांवाला आपण पात्र होऊ.



# जडभरताख्यान.



भरत या नांवाचा एक मोठा राजा हिंदुस्थानात होऊन गेला. ज्याला सध्या परदेशीय लोक इडिया या नावानें ओळखतात, त्या देशाचें आमचे पूर्वीचे नाव 'भरतवर्ष' असे आहे. कोणीही हिदु गृहस्थ वृद्ध झाला म्हणजे त्यानें ससार सोडावा, त्यातील सपत्ति, सुखे आणि पुत्रकलत्रादि वस्तु याचा त्याग करावा आणि अरण्यात जाऊन आत्मचिंतन करावे, अशी हिदुशास्त्राची त्यास अनुज्ञा आहे अशा रीतीनें केवळ सत्य वस्तूचे चितन करून हिदुमात्रानें मुक्त व्हावे, असे त्याच्या शास्त्राचे सागणें आहे कोणी राजा असो अथवा भिक्षुक असो, शेतकरी असो अथवा नोकरचाकर असो, आणि कोणी स्त्री असो अथवा पुरुष असो, प्रत्येकाने हें कर्तव्य बजावलेंच पाहिजे, कारण गृहस्थधर्माने वागत असता पुत्राच्या नात्यानें, पित्याच्या नात्यानें, बधुभगिनीच्या नात्यानें अथवा मातेच्या नात्याने कोणीही जी काही कर्मे करितो तीं या भावी त्यागाच्या पूर्वतयारीसाठीच करीत असतो त्यागानतर देहात बद्ध असलेला आत्मा सर्व प्रकारच्या पाशातून मुक्त होतो.

या चालीस अनुसरून भरत राजाने आपलें राज्य वृद्धपणी आपल्या पुत्राच्या स्वाधीन केलें आणि तो अरण्यात निघून गेला. ज्यानें कोट्यवधी लोकावर प्रभुत्व गाजविलें होते, जो सगमरवरी दगडाच्या राजवाड्यात रहात होता, जो सुवर्ण, हिरे आणि माणके इत्यादि रत्नाचा उपभोग घेत होता, त्याच राजानें आता स्वत च्या हातानें हिमालय पर्वताच्या आसमतात् नदीतीरीं एक पर्णकुटिका बाधली. तेथें कदमूलादि पदार्थ स्वहस्ते जमा करून त्याचें तो भक्षण करीत असे आणि सर्वांतर्यामी परमेशाचे चितन करीत असे. अशा रीतीनें दिवस, महिने आणि वर्षे गत झालीं. ज्या ठिकाणीं हा राजर्षि तप करीत होता, त्या ठिकाणीं एके दिवशीं एक हरिणी पाणी पिण्याकरिता आली. इतक्यात सिंहाची एक घोर गर्जनाही काहीं अतरावरून ऐकू आली. ती गर्जना ऐकून ती हरिणी इतकी भयभीत झाली कीं, पाणीही न पिता नदीवरून पलीकडे जाण्याच्या इराद्यानें तिनें एकदम उडी मारिली.

त्या हरिणीच्या पोटीं गर्भ होता. एकदम उत्पन्न झालेल्या या भीतीने व उडी मारण्याच्या श्रमानें तो गर्भ बाहेर आला आणि इतक्यात ती हरिणीही मरून पडली. त्या हरिणीचे पाडस पाण्यात पडून प्रवाहाबरोबर वाहत आहे असें राजानें पाहिलें चिंतनाचा त्याग करून राजा उठला आणि त्यानें तें पाडस पाण्यांतून बाहेर काढून पर्णकुटिकेत आणिलें. नतर राजानें अग्नि पेटविला व अत्यत काळजीनें त्या पाडसाला शेकून व कुरवाळून त्याला जीवदान दिलें. नतर राजानें ते पाडस आपणापाशींच ठेवून घेतले आणि आपल्या हातानें त्याला गवत व फळें वगैरे चारून, त्याची त्यानें जोपासना केली. राजाच्या जोपासनेनें तें पाडस चागलें वाढीस लागले आणि त्याचें फार सुदर हरीण झालें. त्यावर राजाचें फार मन बसलें. सत्ता, उपभोग आणि कुटुब याची जन्मादारभ्य असलेली संगत तोडून टाकण्याइतका मनोनिग्रह ज्या राजापाशीं होता, तोच राजा या हरणाच्या लोभांत गोंवला गेला त्या हरणावरचें, त्याचें प्रेम दिवसेंदिवस वाढत चाललें आणि दिवसेंदिवस राजाचें चिंतन कमी होऊ लागलें. ते हरण चरण्यासाठी रानात जात असे. त्याला परत येण्यास, एखादे दिवशीं उशीर झाला, तर राजा अगदीं घाबरून जात असे. त्या हरणाच्या सुरक्षिततेविषयी त्याला अत्यत चिंता पडे "एखाद्या वाघानें माझ्या लाडक्याला भक्षण केलें नाहीना? अथवा दुसरें एखादें भीतिस्थान उपस्थित झालें नाहीना? त्याला उशीर का झाला?" इत्यादि चिंतन राजा करीत बसे.

अशा रीतीनें कित्येक वर्षांचा काल लोटून गेला. राजाचा मृत्युसमय, येऊन ठेपला, पण अशा समयीं त्याच्या मनानें आत्मचिंतन करावे तें न करता त्या हरणाचें चिंतन तें करीत होतें. त्या हरणाच्या दुःखी मुद्रेकडे पाहत असतां मृत्यु राजाला घेऊन गेला "यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यंते कलेवरम्। तं तमेवैति कौंतेय सदा तद्भावभावित ।" (गीता, अ० २) या न्यायाला अनुसरून राजाला पुढील जन्मीं हरिणाचा जन्म प्राप्त झाला, पण असें झालें तरी पूर्वकर्म कधींही फुकट जात नसल्यामुळें, त्याने राजा व त्यागी या नात्यानें जीं काहीं सत्कार्यें केलीं होतीं, त्यांचेंही फळ त्याला त्या देहाबरोबर प्राप्त झालें होतें. त्याचा देह हरणाचा होता, तथापि पूर्वकर्माच्या फलानें त्याला पूर्वजन्मींची स्मृति राहिली होती. पूर्वजन्मींच्या प्रमाणें त्याला अवयव नव्हते अथवा वाचाही नव्हती, पण त्या जन्मींची स्मृति मात्र काय

राहिली होती. आपल्या कळपाला सोडून तो एकटाच फिरत असे आणि ज्या ठिकाणीं उपनिषदांचा पाठ व होमहवनादि कर्मे चालत असतील, अशा मठाच्या समोर उभा राहून त्या मठाकडे एकसारखा पाहत असे.

अशा रीतीनें त्या देहाची आयुर्मर्यादा त्यानें सपविली आणि त्याचा त्याग केला. यापुढें एका श्रीमान् ब्राह्मणाच्या कुलात त्याचा जन्म झाला. त्या जन्मींही त्याचें पूर्वस्मरण कायम होतें यामुळें अगदीं बालपणापासून या जगातील सुखदु खादि द्वद्वात आणि संसाराच्या गोत्यांत सापडावयाचे नाहीं असा त्यानें निश्चय केला. तें मूल वाढू लागलें तसतसें शरिरानेंही सुदृढ होत गेलें; पण ते एकहि शब्द बोलत नसे एखाद्या जडमूढाप्रमाणें अथवा वेड्याप्रमाणे त्याची वृत्ति बनली जगाचा पाश आपणाभोवतीं पडू नये, याकरिता त्याने ही वृत्ति स्वीकारिली होती. तो सदोदित परमात्मचिंतन करीत असे केवळ प्रारब्धकर्मांचाच क्षय करण्यापुरता तो त्या देहांत राहिला होता कालें-करून त्याचा पिता मरण पावला त्या वेळीं त्याच्या बधूनीं वडिलार्जित मिळ-कतीची वाटणी केली आणि हा आपला भाऊ अगदी निरुपयोगी आणि मुका आहे असे पाहून त्याच्या वाटणीचाही त्यानी अपहार केला त्याला जीवर-क्षणापुरते अन्न देण्याइतके औदार्य मात्र त्याजजवळ होते त्याच्या बधूच्या पत्नी त्याला अत्यत निर्दयपणें वागवीत असत आणि त्याजकडून सर्व प्रकारचीं काबाडकष्टाचीं कामें करवीत एखादे काम त्याच्या हातून त्याच्या मनाप्रमाणें झालें नाहीं, तर त्याचा त्या अतिशय छळ करीत, पण अशा स्थितींतही त्रासाचे अथवा भीतीचें एखादेंही चिन्ह त्यानें दाखविलें नाहीं अथवा तोंडा-वाटे एक ब्रही काढला नाहीं एखादे वेळीं भावजयाचा क्रोध अनावर झाला तर घरातून निघून जाऊन एखाद्या झाडाखालीं तो बसत असे व त्या शात झाल्या म्हणजे तो पुन्हा घरीं परत येत असे.

एके दिवशीं अशाच रीतीनें त्याचा असह्य छल झाल्यामुळें तो घरांतून बाहेर पडला व एका वृक्षाच्या छायेखालीं बसून राहिला. त्याच वेळीं एक राजा पालखींत बसून त्या मार्गानें चालला होता त्याच्या वाहकापैकीं एक वाहक एकाएकीं आजारी झाला होता. यामुळें त्याचे नोकर एखादा वाहक पाहण्यासाठीं इकडे तिकडे फिरत होते. झाडाखालीं बसलेल्या भरताकडे त्यांची दृष्टि गेली व तो तरुण आणि बळकट आहे असें पाहून "तू राजाची

पालखी उचलतोस काय?" असा प्रश्न त्यानीं त्याला केला, पण भरतानें या प्रश्नाला जबाब दिला नाहीं. तो धष्टपुष्ट आहे असें पाहून राजाच्या चाकरांनीं त्याला खेंचून पालखीकडे नेलें आणि पालखीचा दाडा त्याच्या खाद्यावर ठेविला. एक शब्दही न बोलतां भरत चालू लागला. थोड्याच वेळाने पालखीचा तोल बरोबर साभाळला जात नाहीं असें राजाच्या लक्षात आलें. या नव्या वाहकाकडे पाहून राजा म्हणाला, " मूर्खा, तुझा खादा दुखू लागला असेल तर क्षणभर विश्राति घे." भरतानें पालखीचा दांडा खाद्यावरून खाली ठेविला आणि साऱ्या आयुष्यात आज त्यानें प्रथम तोड उघडलें. तो म्हणाला, " राजा, तू मूर्ख कोणाला म्हणतोस? पालखी खालीं ठेवण्याविषयी तू कोणाला सागतोस? कोण दमला आहे असे तुला वाटतें? तू अरे तुरे कोणाला म्हणतोस? 'तू' या शब्दानें जर तू या देहाला समजत असशील तर त्यातील मासवसादि पदार्थ हे तुझ्या देहातील पदार्थासारखेच आहेत. या देहाला कोणत्याहि प्रकारचें ज्ञान नाहीं. तो कधीं थकत नाहीं, अथवा त्याला दु खही समजत नाही. जर तू या मनाला समजत असशील तर तेंही तुझ्या मनासारखेंच आहे मन हे विश्वव्यापी आहे. आता तुझें सबोधन या दोन्ही वस्तूपलीकडे असलेल्या पदार्थाला अनुलक्षून असेल तर तो आत्मा होय. माझ्यात जें काही सत्यरूप आहे तें आत्मा हेंच होय. तो आत्माही तुझ्या देहातील आत्म्यासारखाच आहे. तो सर्व विश्वात भरून राहिलेल्या आत्म्याप्रमाणें आहे. या आत्म्याला कधीं काळीं दु ख होत असेल अशी तुला कल्पना तरी कशी आली? तो कधीं दमतो काय? त्याला कोणीं दु:ख देऊ शकतो काय? हे राजा, इकडे तिकडे फिरत असलेल्या कृमिकीटकांवर या देहाचा पाय पडू नये अशी या देहाची इच्छा होती यामुळें तो वांकडातिकडा चालत होता. तुझ्या पालखीला हिसके बसण्याचे हेंच कारण होय आत्मा कधींही दमत नाही, त्याच्या शक्तीचा क्षय कधींही होत नाहीं, आणि त्यानें कधीं पालखीचा दांडाही खाद्यावर घेतला नाहीं. तो सर्वशक्तिमान् आणि सर्वव्यापी आहे." अशा रीतीनें त्यानें अत्यत वक्तृत्वपूर्ण रीतीने आत्मचर्चा चालविली अत्यत उच्च ज्ञान तो एकसारखा बोलत राहिला. त्या राजाला स्वत:च्या ज्ञानाची मोठी घमेंड होती, पण भरताचें भाषण ऐकून तो पालखीखालीं उतरला आणि भरताच्या पायीं

पडून तो म्हणाला, " हे महासिद्धा, मला क्षमा कर. तू सिद्ध आहेस हे मला माहित नव्हतें. तुला माझ्या पालखीला लावण्यांत मीं मोठा प्रमाद केला आहे " भरतानें त्याला आशीर्वाद दिला आणि तो तेथून चालता झाला. आपल्या आयुष्यातील पुढील कालही त्याने अशाच रीतीने घालविला. योग्य वेळीं त्यानें त्या देहाचा त्याग केला आणि या खेपेस जन्ममरणाच्या फेऱ्यातून मुक्त झाला.



# प्रल्हादाख्यान.

—·o.—

हिरण्यकशिपु या नांवाचा दैत्यांचा एक राजा होता. देव आणि दैत्य हे एकाच कुलात जन्मास आले होते, तरी त्याचीं एकमेकाशीं सारखीं युद्धे चाललेलीं असत. मनुष्यानीं केलेल्या यज्ञयागादि कर्मांत दैत्याना हविर्भाग मिळत नसे, आणि जगाच्या शासनाचाही अधिकार त्याजकडे नव्हता, तथापि कित्येक वेळा देवाहून ते अधिक सामर्थ्यवान् होऊन त्याना स्वर्गातून हाकलून लावीत असत; आणि स्वर्गाचें व पृथ्वीचें राज्य आपण करीत असत. अशा वेळीं देव सर्वशक्तिमान् विष्णूकडे जाऊन त्याची प्रार्थना करीत आणि तोही त्याच्या संकटात त्याना मदत करी. दैत्यांना पदच्युत करून देवांचें राज्य तो पुन्हा प्रस्थापित करीत असे एके वेळीं दैत्यांचा राजा हिरण्यकशिपु यानें देवाचा पाडाव करून त्याचें राज्य हिरावून घेतलें, आणि तो जगत्रयाचा राजा झाला. स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ अशीं या तीन जगाचीं नांवे आहेत. स्वर्गात देवाची वस्ती असते. मृत्युलोकांत मनुष्यें आणि पशु हीं रहातात आणि पाताळात दैत्यांची वस्ती असते. देवास जिंकिल्यानंतर हिरण्यकशिपूनें अपाल्या नावानें जगत्रयाच्या अधिपतित्वाची द्वाही फिरविली. आपणच या जगत्रयातील मुख्य देव आहो असें तो म्हणू लागला. सर्वशक्तिमान् विष्णूची पूजा यापुढें कोणीं करू नये असा हुकूम त्यानें फर्माविला. केवळ स्वत चीच पूजा करावी व सर्व हविर्भाग स्वतःलाच दिले जावे, अशी योजना त्यानें केली.

हिरण्यकशिपूला प्रल्हाद या नांवाचा एक मुलगा होता. हा मुलगा बालपणापासूनच अत्यत भक्तिमान् होता तो विष्णूची भक्ति करीत असे. अगदीं लहानपणापासूनच त्याच्या ठिकाणीं विष्णुभक्तीचा अकुर स्पष्ट दिसत होता. जगांतून देवाच्या नावाचेंही उच्चाटन करावयाचें असा हिरण्यकशिपूचा हेतु होता. आपला प्रत्यक्ष मुलगा आपला हेतु विफल करणार कीं काय, अशी भीति हिरण्यकशिपूला पडली. त्यानें त्या मुलाला दोन गुरूच्या स्वाधीन केलें. हे गुरू कडकपणानें मुलांना शिस्त लावण्याविषयीं प्रसिद्ध होते. विष्णूचें

नांवही प्रल्हादाच्या कानीं जाऊ नये, अशी व्यवस्था करण्याबद्दल हिरण्यकशिपूनें या गुरूंना आज्ञा केली होती. या गुरूनीं प्रल्हादाला आपल्या घरीं नेलें आणि इतर समवयस्क मुलांबरोबर त्याला शिक्षण देण्यास सुरुवात केली. प्रल्हादाचें लक्ष पुस्तकी विद्येकडे लागेना. तो विष्णूच्या नामाचा एकसारखा गजर करीत असे, आणि इतर मुलांसही तसें करण्याबद्दल उपदेश करीत असे प्रल्हादाची ही कृति पाहून गुरूंना फार भय पडलें. हिरण्यकशिपु हा फार प्रबल असल्यामुळें त्याला सर्व भीत असत. राजपुत्रानें आपला मार्ग सोडावा म्हणून गुरूनीं त्याला अनेक प्रकारें उपदेश करून पाहिला, पण प्रल्हादानें विष्णुपूजन सोडिलें नाही अथवा दुसऱ्या मुलांस उपदेश करण्याचेंही बद केलें नाहीं श्वास चालत आहे तोंपर्यंत आपलें विष्णुपूजनही चालणार असे तो म्हणू लागला स्वतःवरील जबाबदारी दूर करण्याकरितां हें भयकर वर्तमान गुरूनीं राजाच्या कानांवर घातलें. प्रल्हाद स्वत बिघडला आहे, एवढेंच नव्हे, तर इतर मुलांसही तो बिघडवीत आहे, असें राजाला त्यांनीं सागितलें.

हे वर्तमान ऐकून राजाला अत्यत क्रोध आला आणि प्रल्हादाला आपल्या समोर बोलाविलें विष्णूची पूजा करू नये, असा उपदेश करून त्याचें मन वळविण्याविषयीं त्यानें प्रथम यत्न करून पाहिला. त्रैलोक्याधिपति राजा हाच खरा परमेश्वर आहे, व सर्वांच्या पूजनास तोच एक योग्य आहे, असा त्यानें प्रल्हादाला उपदेश केला, पण या उपदेशाचा मुळींच उपयोग झाला नाहीं. विष्णु हाच एक सर्वव्यापी असून या विश्वाचा शास्ता आहे आणि तोच फक्त पूजनाला योग्य आहे. आपणाला हें राज्य मिळालें आहे हेंसुद्धां विष्णूच्याच कृपेचें फल असून त्याची इच्छा आहे तोंवरच तें टिकेल, असे त्यानें बापाला म्हटलें मुलाचें हें भाषण ऐकून हिरण्यकशिपूचा क्रोध अनावर झाला, आणि मुलाला मारून टाकण्याविषयीं त्यानें हुकूम फर्माविला. राजाचा हुकूम ऐकून कित्येक दत्यांनीं प्रल्हादावर तीक्ष्ण शस्त्रांचा प्रहार केला; पण प्रल्हादाचें मन विष्णूच्या ठिकाणी एकरूप झालें असल्यामुळें त्याला यत्किंचितही इजा झाली नाहीं.

मुलाला इजा झाली नाहीं हें पाहून हिरण्यकशिपूला थोडें भय वाटलें; पण थोड्या वेळानें त्याचा दैत्यभाव खवळून उठला आणि पुत्राचा नाश करण्या-

विषयी अनेक युक्त्या तो योजू लागला त्यानें त्याला हत्तीच्या पायीं दिलें, पण त्या क्रोधाविष्ट हत्तीच्यानें प्रल्हादाच्या देहाचा नाश करवला नाहीं. लोखडाच्या गोळयाप्रमाणें त्याचे शरीर अभेद्य राहिलें आपली ही युक्ति फसली असे पाहून राजानें त्याचा कडेलोट करविला, पण प्रल्हादाच्या हृदयांत विष्णूचा वास असल्यामुळे गवतावर फूल पडावे, त्याप्रमाणें तो कड्यावरून पृथ्वीवर आला यानतर राजाने त्याजवर विषयप्रयोग करविला, त्याला अग्नींत टाकिलें, उपाशी ठेविलें आणि विहिरींतही बुडविलें. त्याचप्रमाणें त्याजवर जारमारणादि प्रयोगही केले, पण यापैकीं एकाही युक्तीचा उपयोग झाला नाहीं. ज्याच्या हृदयात विष्णूचा वास आहे, त्याला इजा करण्यास कोण समर्थ असणार ? शेवटीं नागपाशानीं बद्ध करून त्याला समुद्राच्या तळीं फेंकावे व त्याजवर मोठमोठ्या पर्वतांचें दडपण ठेवावे, असा हुकूम त्यानें फर्माविला अशा स्थितींत त्याला कुजत ठेविल्यानें आज नाही तरी कालेंकरून तो मरून जाईल, असे हिरण्यकशिपूला वाटलें अशा स्थितीत पडला असताही विष्णूच्या नामाचा गजर प्रल्हादाने सोडला नाही. ' **विष्णवे नमः**,' ' **विष्णवे नमः**,' हाच त्याचा उच्चार एकसारखा चालू राहिला. अशा रीतीनें विष्णूचें ध्यान एकसारखे राहिल्यामुळे आपण विष्णूच्या सन्निध आहो आणि विष्णूशीं समरस होत आहों असे त्याला वाटूं लागलें शेवटी आपण आणि विष्णु एकच असून आपण सर्वव्यापी आणि सर्वांतरात्मा आहों असा अनुभव त्याला आला.

असा अनुभव त्याला आल्यानतर त्याला बद्ध करणारे नागपाश तटातट तुटून पडले, पर्वतांचें भस्म झालें, आणि समुद्र दुभगून जाऊन लाटाबरोबर प्रल्हाद किनाऱ्यावर सुरक्षित आला. किनाऱ्यावर उभा असता आपण दैत्य आहों, ही भावना प्रल्हाद विसरला होता. आपण मर्त्यशरीरधारी आहो ही आठवणसुद्धा त्याला नव्हती. आपण विश्वव्यापी असून, सर्व सामर्थ्यांचे धनी आहों, व हें सर्व विश्व आपल्याच सामर्थ्यावर चालत आहे, असें त्याला दिसून आलें. आपण सर्व विश्वाचे. आणि आदिशक्तीचे शास्ते असल्यामुळें आपणास इजा करण्यास कोणीही समर्थ नाही, असा प्रत्यय त्याला आला. अखंड आनदाच्या या स्थितींतून काहीं काळानें प्रल्हाद देहभानावर आला. आपण देहधारी असून आपलें नाव प्रल्हाद आहे, अशी आठवण त्याला

झाली. अशी आठवण झाली असतां एकच परमेश्वर आंत आणि बाहेर सारखा भरून राहिला आहे, असें त्यानें पाहिलें. त्याच्या दृष्टीला सर्वत्र विष्णुरूप दिसूं लागलें.

आपली सर्व शक्ति खर्च करून प्रल्हादाला मारण्यासाठीं केलेले सर्व प्रयत्न फुकट गेले असें पाहून हिरण्यकशिपूला फार भीति वाटली. आतां काय करावें याची विवंचना तो करूं लागला. पुन्हां एकवार त्यानें प्रल्हादाला आपल्या समोर आणविलें, आणि पुन्हां एकवार त्याचें मन वळविण्यासाठीं त्यानें त्याला हळू हळू उपदेश करण्यास सुरवात केली; पण या साऱ्या उपदेशाला प्रल्हादाचें एकच उत्तर होतें. ' विष्णवे नमः ' एवढेंच तो म्हणत असे. आपला मुलगा वयांत आल्यानंतर त्याचा हा बालिशपणा नष्ट होईल असा पोक्त विचार करून, हिरण्यकशिपूनें त्याला पुन्हां गुरूंच्या स्वाधीन केलें आणि त्याच्या भावी राजपदाला योग्य असें शिक्षण त्याला देण्यास त्यांस सांगितलें. या राजकीय शिक्षणाकडेही प्रल्हादाचें मन लागेना. आपल्या सोबत्यांना विष्णु-भक्तीचें शिक्षण देण्याचा उपक्रम पुन्हां सुरू झाला.

मुलगा आपला क्रम सोडीत नाहीं असें पाहून हिरण्यकशिपूचा क्रोध पुन्हां खवळला, आणि मुलासमक्ष तो विष्णूला गालिप्रदान देऊं लागला. विष्णु हाच एक जगाचा शास्ता आहे असें प्रल्हादही पुनःपुन्हां म्हणूं लागला. तो अनादि, अनंत, सर्वशक्तिमान् आणि सर्वव्यापी असल्यामुळें तोच एक पूजनास योग्य आहे, असें तो पुनःपुन्हां म्हणूं लागला. हिरण्यकशिपूचा क्रोध अनावर झाला. तो म्हणाला, दुष्टा तुझा विष्णु जर सर्वव्यापी आहे असें म्हणतोस, तर या समोरच्या खांबांत तो कां नाहीं? "तो त्या खांबांतही आहे" असें प्रल्हाद म्हणाला. हिरण्यकशिपु म्हणाला, " असें आहे तर तुझें मस्तक या माझ्या तलवारीनें तोडीत असतां तो तुझें कसें रक्षण करतो हें पाहतों." असें म्हणून तलवार घेऊन राजा खांबाकडे धांवला, आणि त्या तलवारीनें एक प्रचंड आघात त्यानें त्या खांबावर केला. त्याबरोबर निमि-षार्धांत प्रचंड कडकडाट होऊन तो खांब दुभंग झाला, आणि अत्यंत उग्र अशा नृसिंहरूपानें तेथें विष्णूचा अवतार प्रकट झाला. हें उग्र रूप पहातांच दैत्य भयभीत होऊन सर्व दिशांना पळत सुटले. पण हिरण्यकशिपु

मात्र त्याबरोबर युद्ध करू लागला. शेवटीं नृसिंहानें त्याचा पराजय करून त्याचें उदरविदारण केलें.

आकाशांतून देव पुष्पवृष्टि करू लागले, आणि विष्णूचें स्तवनही करू लागले. प्रल्हादानेंही त्याच्या पायावर लोळण घेतली आणि तोही अनेक प्रकारानीं विष्णूची स्तुति करू लागला. नृसिंह प्रल्हादाला म्हणाला, " बाळा प्रल्हादा, तुला पाहिजे तो वर मागून घे. तुझ्या ज्या काहीं इच्छा असतील, त्या तृप्त करण्यास मी तयार आहें." भक्तीने कठ भरून प्रल्हाद येऊन म्हणाला, 'भगवता, मला तुझ्या दर्शनाचा लाभ झाला आहे, आता दुसऱ्या कशाची मला इच्छा असणार! या पृथ्वीवरील अथवा स्वर्गातील भोगानीं माझे मन लालचावू नको.' हें उत्तर ऐकून नृसिह म्हणाला, तुझें म्हणणें खरे आहे, तथापि कांहींतरी वर माग. तेव्हा प्रल्हादानें उत्तर दिलें, अज्ञ मनुष्याच्या हृदयात लौकिक वस्तूबद्दल जी आसक्ति असते, तीच आसक्ति तुझ्याबद्दल माझ्या हृदयांत असो. ती भक्ति अत्यत निर्हेतुक आणि अव्यभिचारी असो.

भगवान् श्रीकृष्ण म्हणाले, 'प्रल्हादा, माझ्या भक्ताना मनातून जरी कोणत्याही गोष्टीची इच्छा नसते आणि जरी ऐहिक अथवा पारलौकिक सुखाची चाड त्यांना नसते, तथापि माझ्या आज्ञेनें प्रलयापर्यंत तू पृथ्वीचे राज्य कर व लौकिक सुखाचा उपभोग घे, आणि मला हृदयात बाळगून धर्म-मार्गानें चाल. तुझ्या सध्याच्या देहपातानतर तू माझ्याशी समरस होशील. प्रल्हादाला असा आशिर्वाद देऊन भगवान् श्रीविष्णु गुप्त झाले नतर देवानीं ब्रह्मदेवाकडून दैत्याच्या सिंहासनावर प्रल्हादाला अभिषेक करविला, आणि तेही आपापल्या स्थानीं निघून गेले



# खासगी पत्रें.

——:०:——

## पत्र ३८ वें.

मुंबई, ता. २० सप्टेंबर १८९२

प्रिय पंडितजी महाराज,

आपलें पत्र पावलें. आपण माझी इतकी अवास्तव स्तुति कां करावी हें मला कळत नाहीं. परमेश्वरावाचून निवळ चांगलेपणा विश्वांत दुसऱ्या कोठेंही आढळत नाही, असें भगवान् येशू ख्रिस्तानें म्हटलें आहे. बाकीचीं आम्हीं सारीं मनुष्यें परमेश्वराच्या हातांतील साधनें मात्र आहोंत. स्तुतीला पात्र एक परमेश्वर मात्र आहे तसेंच स्तुतीला योग्य अशीं कांहीं माणसेंही आहेत हे खरें. पण स्तुति करून घेण्याची पात्रता माझ्यासारख्याच्या ठिकाणीं नाहीं. नोकरानें आपलें कर्तव्य बजावलें तर त्यांत स्तुति करण्यासारखें काय आहे? विशेषत माझ्यासारख्या फकिराला स्तुतीचा तर हक्कच नाहीं. पंडित यांचा मी आभारी आहें. तसेंच प्रोफेसर—यांचेंही मजवर फार प्रेम आहे

आतां आणखी एका गोष्टीबद्दल मला तुम्हांस कांहीं सांगावयाचें आहे. आम्हा हिंदूचें मन प्रथमपासूनच सिद्धांतांची चर्चा करण्याकडे फार वळलें आहे. बाह्यसृष्टीतून अंतःसृष्टीकडे जाण्याचा त्याचा फारसा कल नाही. एखादा सिद्धांत प्रथम गृहीत धरून मग त्यावर शेंडी तुटेपर्यंत वादविवाद करण्याची पद्धत आमच्या साऱ्या तत्त्वग्रंथांत आढळून येते, पण कित्येक वेळां ज्या सिद्धांतावर एवढीं रणें माजतात, तो सिद्धांत इतका पोरकट असतो कीं त्याची खरोखर उपेक्षाच करणें योग्य होईल. या सिद्धांताची वास्तविक योग्यता काय आहे, याचा शोध कोणीही केलेला नाहीं. यामुळें आमची स्वतंत्र विचाराची शक्तीच नष्ट झाल्यासारखी दिसत आहे. सूक्ष्म निरीक्षणावरून सिद्धांत बांधणाऱ्या शास्त्रांची जी मोठी उणीव आमच्यांत आहे, तिचेंही कारण हेंच. असें कां झालें? या आपत्तीचीं दोन कारणें आहेत. आमच्या हवामानांत उष्णता फार असल्यामुळें आमच्या स्वभावांत कार्यव्यापृतेपेक्षा स्वस्थपणें विचार करण्याकडे अधिक प्रवृत्ति झाली. दुसरें कारण असे कीं, ब्राह्मणांनीं लांबलांबच्या प्रदेशांत धर्मगुरु या नात्यानें केव्हांही प्रवेश केला नाहीं. त्या वेळीं पुष्कळ लोक प्रवास करीत असत आणि दूरदूरच्या देशीं जात असत हें खरें, पण ते बहुतेक सारे व्यापारी होते. केवळ पैशाच्या

दृष्टीनें फायदा व्हावा म्हणून त्यांनीं प्रवासाचा अंगिकार केला होता. त्यांच्या द्रव्यतृष्णेमुळें त्यांच्या बुद्धीची वाढ खुटली होती. यामुळें त्यांच्या प्रवासापासून मनुष्याच्या ज्ञानांत भर न पडतां तें उलट विकृत मात्र झालें. त्यांची निरीक्षणशक्ति हलक्या प्रतीची होती, आणि त्यांनीं आपल्या प्रवासाच्या ज्या कांहीं हकीगती सांगितल्या, त्या इतक्या फुगवून आणि विकृत करून सांगितल्या कीं, त्यामुळें मूळचें स्वरूप ओळखीच्यासुद्धां बाहेर गेलें.

याकरितां पुष्कळ प्रवास करून आपण देशोदेशीं हिंडलें पाहिजे. इतर देशांत समाजाचें यंत्र कोणत्या पद्धतीनें चालतें, याचें निरीक्षण आपण केलें पाहिजे. आपणांस पुन्हां राष्ट्र या पदवीस चढावयाचें असेल, तर इतर राष्ट्रांतील मोठीं माणसे काय करीत आहेत, याचा शोध आपण केला पाहिजे. बाह्य देशांशीं आपण अगदी मोकळेपणाने संघटन ठेविलें पाहिजे. तसेच समाजातील भयंकर विषमताही आपण बंद केली पाहिजे. आमची सध्याची समाजरचना किती हास्यास्पद झाली आहे पहा ! एखादा भंगी कोणाकडे गेला तर प्लेगनें पछाडलेल्या रोग्यासारखें त्याला दूर करण्यांत येतें; पण एखाद्या पाद्र्यानें प्रार्थनेची थोडीशी बडबड करून एक पंचपात्रीभर पाणी त्याच्या डोक्यावर ओतिलें आणि त्याच्या पाठीला एखाद्या फाटक्यातुटक्या वस्त्राचा स्पर्श केला, कीं तो एकदम निराळा प्राणी बनतो. अशा रीतीनें पालटलेला हा प्राणी एखाद्या पक्क्या कर्मठ हिंदूकडे गेला, तर त्याच्याशीं शेक हॅंड करून त्याला खुर्ची देणार नाहीं, असा मायेचा पूत मला कोणी दाखवा या प्रकाराहून अधिक विचित्रपणा कोठें तरी आढळेल काय ? पाद्रीलोक दक्षिणेंत काय करीत आहेत पहा. खालच्या जातीच्या लक्षावधि लोकांस ते ख्रिस्तीधर्माची दीक्षा देत आहेत. त्रावणकोर हा भिक्षुकांनीं गजबजलेला प्रांत आहे. एवढी मोठी भिक्षुकांची एकत्र वस्ति या प्रांताशिवाय दुसऱ्या कोठें सांपडेल कीं नाहीं, याची मोठी शंका आहे. प्रांतांतील साऱ्या जमीनजुमल्यावर फक्त ब्राह्मणांचाच हक्क आहे, आणि मोठमोठ्या घराण्यातल्या स्त्रियासुद्धां ब्राह्मणांकडे उपस्त्रिया म्हणून राहण्यात मोठें भाग्य समजतात. ब्राह्मणाचे एवढें वजन जेथे आहे, तेथेंच जवळ जवळ चतुर्थांश प्रजा ख्रिस्ती बनली आहे ! या स्थितीबद्दल खालच्या वर्गाच्या लोकांना दोष देण्यांत फायदा नाहीं. त्यांची स्थिति कशी आहे याचा विचार तुम्हींच करा. परमेश्वरा ! सर्व मनुष्यांत समतेचें नातें उत्पन्न झालें आहे, असा दिवस केव्हां उगवणार ?

आपला—

विवेकानंद.